

# दुखी राजबंधु

फार पूर्वीची गोष्ट आहे ही! महानगर हे शहर विशाल देशांत राजधानीपासून खूप दूर होतं. देशांत जरी कुठे दुष्काळ असला तर महानगर मात्र त्यापासून सुरक्षित होतं. तिथली जमीन सुपीक होती असं कांहीजण म्हणत. तर तिथले नागरिक चांगले होते असंही कांहीजण सांगत. पण या सुस्थितीचे सारे श्रेय नगरपाल हेमशंकरला आहे असं बरेच जण ठासून सांगत असत.

हेमशंकर बहुश्रुत होता. साधेसुधे जीवन जगत होता. त्याला राहाण्यासाठी चांगले राजभवन होते. पण तिथे न राहाता तो नागरिकांच्या समवेत एका साध्या झोंपडीत आपल्या परिवाराबरोबर राहात होता. नगराच्या कामासाठी तो दिवसा त्या राजभवनांत जात असे. आम जनतेच्या तक्रारीचे नीट निवारण करण्यांत तो जातीने लक्ष घालीत असे.

नगरांतल्या लोकांचे हेमशंकरवर प्रेम होते. पण राजबंधु हा एकमेव नागरिक त्याचा मत्सर करीत होता. नांवाप्रमाणे तो राजाचा दूरचा नातेवाईक होता. तो खूप श्रीमंत होता. पिढ्यान पिढ्यांनी जरी नुसते बसून खाल्ले तरी त्याची संपत्ती घटली नसती. पण जरी पैसा अमाप होता तरी त्याला लोक प्रतिष्ठित मानत नसत.

राजबंधुच्या पत्नीचे नांव होते राणीबंधु. ती देखील राणीची लांबची नातलग होती. एके दिवशी या दोघा पतीपत्नींमधे यश व प्रतिष्ठा मिळवण्यासाठी काय करायला हवे याबद्दल चर्चा झाली.

दानशूर शिबीराजा, ययाति, बळी, हे सगळे चक्रवर्ती होते. असामान्य दानवीर कर्णदेखील अंगराज बनल्यानंतर यशस्वी व प्रतिष्ठित गणला गेला होता. याचाच अर्थ असा कीं यश व प्रतिष्ठा ही पदाशी जोडलेली असतात. जरा वेळ विचार करुन राणीबंधुने विचारले, ''जेव्हां कुणी राणी म्हणवली जाते; तेव्हां लोक तिचा मानसन्मान करतात. पण पदावर नसतानादेखील नांव मिळवणारे कुणी लोक असतीलच कीं!''

त्यावर राजबंधुने हंसून उत्तर दिले, ''जे प्रतिभावंत असतात, त्यांना पद मिळाले नसले तरी ते नामवंत असू शकतात. आम्ही प्रतिभावंत आहोत, पण अनुभवी नाही! आपल्याला आदर मिळवायचा असेल तर त्यासाठी महत्वाचे पद मिळाले पाहिजे. म्हणून आपण त्वरेने महाराजांकडे जाऊं या, व त्यांना व राणीसाहेबांना विनंती करुं या कीं माझी नेमणूक नगरपाल म्हणून करावी. आपली विनंती ते अव्हेरणार नाहीत ही माझी खात्री आहे.'' दोघेही राजधानीला गेले आणि राजाराणीला भेटले.

त्यांची मागणी ऐकून राजा विचारांत पडला. थोड्याच वेळांत भानावर येऊन राजाने म्हटले, ''तुम्हाला नगरपालाचे पद द्यायला माझी हरकत नाही. पण महानगर हे आदर्श नगर मानलं जातं. दिवसेंदिवस त्याची चौफेर वाढ होते आहे. त्याचे खरे कारण आहे चांगला नगरपाल हेमशंकर. तिथून त्याची बदली करणे न्यायाचे ठरणार नाही ना?''

राजबंधु म्हणाला, ''महाराज, महानगर संपन्न व स्वयंपूर्ण आहे. कारण तिथले नागरिक कष्टाळू आहेत, हे विसरता येणार नाही. लोक सारे श्रेय हेमशंकरला देतात आणि त्याची प्रशंसा करीत बसतात. एवढंच नाही तर लोक आता असं म्हणतात की विशालदेशाचा राज्यकर्ता हेमशंकर झाला तर फार बरं! त्याच्या यशावर नियंत्रण



ठेवले नाही तर आपले सिंहासन संकटात येईल.''

हेमशंकरच्या लोकप्रियतेमुळे आपले आसन संकटात पडेल, याची तोपर्यंत राजाला कल्पना नव्हती. त्याचे मन बिथरले. उलटसुलट विचार केल्यावर राजाराणीला एक मार्ग सुचला. त्यांनी महानगरला ताबडतोब एक दूत धाडला. त्या दूताने हेमशंकरला सांगितले, ''आपल्या कारकीर्दीत या नगराची फार भरभराट झाली. महाराजांची इच्छा आहे की साऱ्या देशाची अशीच प्रगती व्हावी. या कामांत त्यांना आपले सहाय्य हवे आहे. यापुढे आपण महाराजांचे सल्लागार व्हाल. आणि आपल्या जागी इथें राजबंधु नगरपाल होतील.''

अशा रीतीने राजबंधु नगरपाल बनला. त्याने तोंडपुजे लोक जवळ केले, आणि त्यांच्यामार्फत



तो स्वतःची प्रशंसा करुन घेऊं लागला. त्याच्या कल्पनेपेक्षां कितीतरी जास्त पटीने त्याची प्रतिष्ठा वाढली.

राजाज्ञेनुसार हेमशंकर राजधानीला पोंचला. अनेक क्षेत्रांत त्याने राजाला रास्त सल्ला द्यायला सुरवात केली व तो अंमलात आणला गेला. सारा विशालदेश स्वयंपूर्ण व संपन्न होऊं लागला.

दोन वर्षानंतर महानगरांत भयंकर दुष्काळ पडला. जे नगर आजपर्यंत वैभवसंपन्न होते, लोक सुखी होते, तिथे आता हाहाःकार माजला. धान्याचे दुर्भिक्ष झालेच, त्याशिवाय पिण्याचे पाणीदेखील दुर्लभ झाले. जेव्हां राजाला महानगरांतल्या नागरिकांवर आलेले संकट समजले, तेव्हां राजाने हेमशंकरला तिथे पाठवले व या दुर्दशेचे खरे कारण शोधण्यास सांगितले.

त्यावेळी मंत्रीगणांनी राजाला सांगितले, "आता संपूर्ण देश सुखी व संपन्न आहे, तर महानगरांत दुष्काळ पडला आहे. हेमशंकरच्या कारकीर्दीत तिथें सारे कांही सुरळीत चाललेले होते. ते तिथून बाहेर पडले आणि महानगराच्या दुर्दशेला सुरवात झाली. महानगरावर आलेले हे संकट निवारले जाईल आणि सारा देशही सुखी होईल, असे कांहीतरी ठोस पाऊल उचलले पाहिजे."

राजाने नकारार्थी मान हालवत म्हटले, "आपल्या विचारसरणींत कांहीतरी कुठेतरी त्रुटी आहे हेमशंकरच्यामुळे जर देशाचे भले होणार असेल, तर महानगरचेही भले होईलच कीं! नाही तरी महानगर हे देशाचा एक हिस्सा आहे."

मंत्रीगणांनी तावडतोब सांगितले, "आपल्या या प्रश्नाचे उत्तर महानगरचे नगरपाल राजबंधु यांनी दिलं पाहिजे. आपल्या आज्ञांचं पालन त्यांच्याकडून झालंय कीं नाही ते आपण जाणून घ्यावं."

या सूचनेतली कळकळ राजाला जाणवली. म्हणून महानगरांतली सत्य परिस्थिती पाहाण्यासाठी राजा स्वतःच तिकडे गेला. तिथे पोंचल्यानंतर एकूण रागरंग पाहून राजा फारच दुःखी झाला. पृथ्वीवरचा स्वर्ग अशी ख्याति असणारे नगर आता अगदी बकाल झाले होते. गरीब बेकार होते, धनिकांना चोरांची भीती होती, आणि रोगराई फैलावली होती. जेव्हां राजाने नगरांत प्रवेश केला तेव्हां राजबंधुने राजाचं भव्य स्वागत



केलं आणि आपल्या लोकांमार्फत राजावर स्तुतीचा भडिमार केला.

राजभवनात पोंचल्यानंतर राजबंधु व हेमशंकर यांनी राजाची भेट घेतली. हेमशंकरने राजाला म्हटलं, "महाराज, कांही काळांत इथे फारच अनीति माजलेली दिसते आहे. स्वार्थी लोकांचा राज्यकारभारांत बुजबुजाट झाला, आणि नगराची दुर्दशा झाली आहे. इथली व्यवस्था पाहायला मला दोन वर्षांची मुदत द्या. मी हे महानगर पूर्वीसारखं प्रगतिच्या मार्गावर घेऊन जाईन आणि त्याला पूर्ववत शोभिवंत नगर बनवूं शकेन."

तेव्हां राजबंधुने खुलासा करीत म्हटलं, "राजन्, सगळेच दिवस कांही सारखे नसतात. नगराची ही दुर्दशा केवळ अनैतिक अधिकारी आहेत म्हणून झालेली नाही. ती फक्त दैवाची लीला आहे. मला फक्त दोन महिन्यांचा अवधि द्यावा महाराज! मी नगराचा कायापालट करीन."

राजाने एकवार राजबंधुकडे रोखून बघितले आणि नंतर हेमशंकरकडे मान वळवून त्याला राजाने विचारले, "मी राजबंधुच्या शब्दावर विश्वास ठेवूं की तुमच्या शब्दावर विश्वास ठेवूं?"

हेमशंकरने अतिशय नम्रपणाने उत्तर दिले, "महाराज, राजबंधु खरं तेच सांगत आहेत. पण मी इथे असताना मी जनतेच्याबरोबर राहात होतो. आता राजबंधु राजभवनांत राहात आहेत. मला प्रजाजन आपापल्या अडचणी सांगत होते. तसे ह्यांना त्यांनी सांगितल्या नसतील. म्हणून त्यांना खरी परिस्थिती पूर्णपणे माहिती नसेल."



त्यावर राजबंधुने उत्तर दिले, "महाराज, प्रजाजन आणि मी ह्यांच्यात अजिबात अंतर नाही. सत्य काय ते जाणून घेण्याचा एकच मार्ग आहे. आम्ही दोघेही नगरांतल्या सर्व प्रकारच्या लोकांना भेटून त्यांच्याकडून खरी माहिती मिळवून घेऊं."

राजाने सांगितलं, "ठीक आहे, मी वेष पालटून तुमच्याबरोबर येईन. त्यानंतर हेमशंकरच्याबरोबर जाऊन लोकांना भेटेन."

त्यानुसार राजा व राजबंधु नगराच्या दिशेने पुढे निघाले. ते प्रथम एका श्रीमंताकडे गेले. नुकतीच त्याच्या घरी चोरी झाली होती. चोरांनी एक लाख मोहरा नेल्या होत्या. त्या श्रीमंताच्या मुलाने चोरांना थांबवण्याचा खूप प्रयत्न केला. पण चोरांनी त्याला मार दिला आणि त्यांत तो घायाळ झाला. ते सारे कुटुंब राजबंधुच्याजवळ

धाय मोकलून रडायला लागले. त्या घरांतल्या स्त्रियांना धीर देतादेता स्वतः राजबंधुलाही रडूं कोसळले.

त्या घरांतून बाहेर पडताना राजबंधु राजाला म्हणाला, ''पाहिलंत महाराज, लोक मला फार मानतात. त्यांच्याशी बोलताना मला माझ्या भावनांना आवर घालता आला नाही. मला ते किती जवळचे वाटतात ते आपण पाहिलंत ना?'' त्यानंतर त्यांनी आणखी दोन श्रीमंत, चार मध्यवर्गीय व पांच गरीब घरांना भेटी दिल्या. प्रत्येक ठिकाणी हेच झालं.

संध्याकाळीं, हेमशंकरच्याबरोबर राजा नगराच्या दुसऱ्या एका पेठेकडे वळला. तिथे सर्व वर्गांतल्या लोकांची परिस्थिती फारच केविलवाणी होती. पण हेमशंकर त्यांच्याशी प्रेमाने बोलला आणि त्यांच्या अडचणी त्याने लक्षपूर्वक ऐकल्या. त्याबरोबर खुलासेवार माहितीसाठी त्याने अनेक प्रश्नही विचारले.

राजभवनांत परत आल्यानंतर राजाने हेमशंकरला म्हटले, ''नागरिकांची अवस्था फारच कठीण दिसते आहे. त्यांना पाहून राजबंधुला तर अश्रू आवरेनात. पण तुम्हाला मात्र थोडेसेदेखील दुःख वाटलेले दिसले नाही.''

हेमशंकरला आश्चर्य वाटून त्याने उत्तर दिले, ''महाराज, मला दुःख जरूर वाटले होते. पण मी माझ्या भावनांना आवर घातला. आपण राज्याचे अधिकारी आहोत. कोणत्याही स्थितींत जनतेच्या समोर असहाय्य, अनाथाप्रमाणे आपण रडता कामा नये. त्यामुळे त्यांच्या मनांतल्या प्रतिमेला तडा बसतो. लोकांची विचारपूस केल्यानंतर माझ्या लक्षांत आले कीं शासनपद्धती आंतून पूर्णपणे बिघडलेली आहे आणि ह्याला अधिकारीच जबाबदार आहेत. आपणदेखील पाहिलंत. आता याला उपाय शोधायला हवा.''

हेमशंकरचे बोलणे ऐकून राजाने त्यावर फारसा विचार केला नाही. त्याने लागलीच हेमशंकरला नगरपालपदावर पुन्हां नेमले आणि राजबंधुला आपला सल्लागार नेमले.







# अस्वल्या मांत्रिक

## 14

*(अस्वल्या मांत्रिक आणि कालीवर्मा मायामर्कटाचा पाठलाग करीत किल्ल्याजवळ पोंचले. अस्वल्या वधिकाने त्यांना किल्ल्याच्या आंतल्या लढाईची माहिती दिली. जितकेतू राजाच्या मंत्री जीवगुप्ताने तिथे पोंचल्यानंतर एका सैनिकाला कालीवर्माकडे धाडले. तितक्यांत नागमल्ल डाकू व त्याच्या साथीदारांनी किल्ल्याच्या दरवाज्यांना आग लावली. त्यानंतर ...)*

किल्ल्याचे दरवाजे जळून, त्यांची राखरांगोळी झाली. ते पाहून अस्वल्या वधिक सोंडतुटक्या हत्तीवर स्वार होऊन जेव्हां तिथे पोंचला तेव्हां तो म्हणाला, ''कालीवर्मा महाराज, आता आपण किल्ल्यांत प्रवेश करूं. तिथे तो मायावी मर्कट नक्की आपल्या हाती लागेल.'' आणि जळकी लांकडे हातांत धरून उड्या मारणाऱ्या रानटी नोकराला हांक मारून तो म्हणाला, ''ए सेवका! लौकर इथें ये आणि या हत्तीला किल्ल्याच्या आंत ने!''

त्या सेवकाने हातांतली लांकडे दूर फेकून दिली व नागमल्लाला सावधगिरीचा इशारा देत तो म्हणाला, ''अस्वल्यामहाराज, हा बघा मी आलोच!'' आणि तो त्या हत्तीच्या दिशेने जाणारच होता, तेवढ्यांत नागमल्लाने त्याला हाताने खूण करून थांबवले व म्हटले, ''इथे आता मला नि माझ्या साथीदारांना काय काम आहे? आम्ही आपली रानाची वाट धरतो आणि आमचा धंदा पुन्हां सुरूं करतो!''

किल्ल्याच्या दरवाज्याजवळ असलेल्या कालीवर्माने हे शब्द ऐकले आणि तो नाराज झाला.



नागमल्लच्या दिशेने रागाने बघत, तलवार दाखवून तो बोलला, "अरे रानटी दरोडेखोरा, शेवटल्या क्षणी तू आपल्या वाईट विचारांची ओळख दिलीसच ना! निःशस्त्र वाटसरुंना धाक दाखवून त्यांना लुटणे एकढेच तुला ठाऊक, पण धैर्य दाखवून शत्रूशी दोन हात करण्याचे साहस कां तुम्ही दाखवत नाही?"

त्यावर नागमल्लाने सर्वांकडे एकवार नजर फिरवली आणि उत्तर दिले, "मी जन्मलो तो एक लुटारु म्हणूनच! पोट भरण्यासाठी ज्यांच्याकडे धन मिळेल त्यांनाच मी लुटतो. आता किल्ल्यांत दुर्मुखराजा जिंकला किंवा सूर्यभूपति जिंकला, मला काय त्याचं सुखदुःख?"

अस्वल्या मांत्रिकाच्या लक्षांत आलं कीं पैशाच्या लालसेने नागमल्ल आडवळणाने असे उलट सुलट बोलतो आहे, आपली तलवार नागमल्लाच्या खांद्यावर टेकवून कालीवर्माने दरडावून त्याला म्हटले, "अरे नागमल्ला! या तलवारींत मंत्राची शक्ती नाही, पण जर हा माझा मंत्रदंड असता तर एव्हांना तुलाही अस्वलाच्या रुपांत मी बदलून टाकले असते. दुर्मुखराजा सोडून दुसरा कुणी आता विजयी झाला तरी तो अरण्यांतल्या हिंस्र श्वापदांसारखा तुमचीच शिकार करेल. हे लक्षांत कसं येत नाही तुझ्या? तू तर अगदीच रानटी आहेस कीं!"

हे शब्द ऐकून नागमल्ल वाटलं कीं त्याने दुर्मुखराजाच्या पक्षांत जाणं हेच योग्य ठरेल. त्याने आपल्या दोघा सहकाऱ्यांच्याकडे वळून पाहिलं आणि म्हटलं, "अरे ऐका! आजपासून आपल्याला रानावनांत भटकण्याची कांहीही जरुरी नाही. आपण जर दुर्मुखराजाच्या पक्षांत राहून शत्रूचा संहार केला तर ते विजयी झाले कीं त्यांच्या सैन्यांत आपल्याला नक्की नोकरी मिळेल."

आपल्या नेत्याच्या तोंडून ही बातमी ऐकल्यावर दोन्ही डाकू आपापल्या तलवारी उंचावून ओरडले, "दुर्मुख महाराजांचा विजय असो!"

अस्वल्या मांत्रिक आणि कालीवर्मा आपापल्या वाहनांवर स्वार होऊन वधिकाला म्हणाले, "आपण सगळेजण मिळून दहाजणदेखील होणार नाहीत. आपले मुख्य काम म्हणजे मायावी मर्कटाचे रूप धारण करणाऱ्याकडून मंत्रदंड हस्तगत करणे आहे. त्यानंतर दुर्मुखराजाचे रक्षण करणे हे आहे. त्यासाठी तुम्ही प्रत्येकाने आपले धैर्य व त्याग यांचा परिचय करुन द्यायला हवा."



सर्वांना हत्यारे उंचावून घोषणा केली, "कालीवर्मा की जय!"

घोड्यावर स्वार झालेला कालीवर्मा पुढे राहून किल्ल्याच्या आंत जाऊं लागला. कांहीतरी आठवलं म्हणून त्याने घोडा मागे फिरवला आणि विचारले, "राक्षस उग्रदंड कुठे आहे?"

त्याचवेळी उग्रदंड एका हत्तीची सोंड पकडून दूर उभ्या असलेल्या जितकेतूचा मंत्री जीवगुप्त याच्याकडे जात होता.

ते बघून कालीवर्मा थक्क होऊन अस्वल्या मांत्रिकाला म्हणाला, "गुरुजी! हा राक्षस जितकेतूच्या पक्षाला मिळणार असं वाटतंय."

"असं कधीही होणार नाही. त्याचं माझ्याकडे कांहीतरी वैयक्तिक काम आहे असं मला कळलंय. तू झटकन जा आणि खरी गोष्ट काय आहे त्याचा छडा लाव." मांत्रिकाने सल्ला दिला.

या गोष्टी ऐकून अस्वल्या वधिक हत्तीवर बसलेल्या दुर्मुखराजाच्या अंगरक्षकांना म्हणाला, "अरे अंगरक्षकांनो! तो राक्षस कदाचित कालीवर्माजींना कांहीतरी दगाफटका करील, पण त्यापूर्वीच आपण सावध होऊन त्यांना संरक्षण देत त्यांच्या पाठीमागून हत्तीबरोबर जाऊं या." असं सांगून त्याने एका वन्य माणसाला आज्ञा दिली आणि कालीवर्माच्या घोड्याच्या पाठोपाठ आपला हत्ती नेला.

घोड्यावर बसलेला कालीवर्मा आणि हत्तीवरचा अस्वल्या वधिक व अंगरक्षक आपल्या दिशेने येत असलेले पाहून उग्रदंड राक्षस क्षणभर



स्तंभित झाला. नंतर त्याने आपली दगडी गदा वर उचलली, आणि हत्तीची सोंड पकडून ती त्यांच्या दिशेला वळवून तो तयारीने उभा राहिला.

कालीवर्मा उग्रदंडाजवळ जाऊन म्हणाला, "उग्रदंडा, हे काय आहे? आम्हाला वाटलं होतं कीं तू आमच्याबरोबर किल्ल्यांत येशील आणि दुर्मुखराजाचे सूर्यभूपतीपासून रक्षण करशील!"

"कालीवर्मा, दुर्मुखराजा जिवंत आहे असा तुला विश्वास आहे कां?" उग्रदंडाने विचारले.

"दुर्मुखराजा आत्तापर्यंत मेला असेल अशी शंका तुझ्या मनांत कां आली? किल्ल्याच्या आंतले कांही सैनिक दुर्मुखच्या बाजूने लढत आहेत. तसं नसेल तर आंतला शस्त्रांचा खणखणाट आपल्याला कसा ऐकू आला असता?"

दूरवर उभ्या असलेल्या जीवगुप्त मंत्र्याच्या



सैनिकांच्या दिशेने हाताने खूण करीत उग्रदंड राक्षस म्हणाला, ''कालीवर्मा, तुम्ही सारे किल्ल्याच्या दारांतच वायफळ चर्चा करण्यांत कां वेळ वाया घालवत आहात? अजूनही तुम्ही लौकर किल्ल्यांत घुसा, दुर्मुखराजाला वांचवा, आणि त्याबरोबर मायामर्कटाकडून मंत्रदंड मिळवा!''

''हेंच करायला आम्ही तिकडे जात आहोत. पण या हत्तीला घेऊन तू कुठे चालला आहेस?'' कालीवर्माने प्रश्न केला.

उग्रदंडाने दगडी गदा जीवगुप्ताच्या दिशेने उंचावत म्हटले, ''जीवगुप्त मंत्री आणि त्याचे सैनिक किल्ल्यांत मागल्या बाजूने घुसून तुम्हाला मारतील म्हणून मी त्यांना रोखून धरायला जातो आहे.''

हे शब्द ऐकून कालीवर्माला फार समाधान वाटले आणि वधिक वगैरे मंडळींबरोबर तो किल्ल्याच्या दरवाज्याजवळ परत आला. सगळे गर्जतच किल्ल्यांत शिरले. दोन हत्तींवर तलवारी, भाले घेऊन कांहीजण स्वार झाले होते. परंतु एका घोड्यावर कालीवर्मा, रेड्यावर अस्वल्या मांत्रिक आणि त्यांच्यामागे नागमल्ल व त्याचे साथीदार ओरडत येताना बघून सूर्यभूपतीचे सैनिक घाबरुन गेले व त्याला म्हणाले, ''महाराज, अस्वल्या मांत्रिक हत्तींचे दळ घेऊन आंत येतो आहे. या क्षणीं आपण इथून पळून जाणेच योग्य आहे.''

दुसऱ्याच क्षणाला एका लहानशा इमारतीच्या मागे लपलेला सूर्यभूपती आपली रक्ताने माखलेली तलवार परजत पुढे येऊन गरजला, ''अरे सैनिकांनो, तुम्ही घाबरुं नका. दुर्मुखच्या पक्षांत लढणाऱ्या बहुतेक सर्वजणांना आपण मारलेले आहे. हा मांत्रिक काय विशेष करुं शकणार आहे? आपल्या पक्षांतल्या मायावी मर्कटाकडे मांत्रिकापेक्षां जास्त मंत्रशक्तीचे बळ आहे ना!''

सूर्यभूपतीला बघून कालीवर्मा दांतओठ खात ओरडला, ''अरे भेकड मांडलिका, माकडाची मदत घेऊन लढाई जिंकायचा बेत आहे वाटतं तुझा? दुर्मुखराजा कुठे आहे? झटकन सांग. त्याच्या हातून मी तुझा शिरच्छेद करवणार आहे.''

त्याच वेळी त्या इमारतीच्या छोट्याशा भिंतीवर मायामर्कट उडी मारुन येऊन बसला आणि किचकिच करुं लागला. सर्वांनी माना वेळावून त्याच्याकडे बघितले. मर्कटाच्या उजव्या हातांत मंत्रदंड चमकत होता. उजव्या



हातांत एका मुंडक्याचे केस पकडले होते. ते हलवत मर्कट म्हणाला, ''अरे कालीवर्मा, तू दुर्मुखराजाची माहिती विचारतो आहेस ना? हे बघ, त्याचे धडावेगळे मस्तक आहे. तू त्याच्या धडाच्या शोध घेईपर्यंत तुझे मस्तकदेखील सूर्यभूपतीच्या तलवारीने असेच धडावेगळे होऊन खाली जमिनीवर पडेल.''

लगेच अस्वल्या मांत्रिकाने तलवार उपसली आणि आपल्या वाहनाला म्हणजे रेड्याला पुढे हाकलत तो बोलला, ''माकडाच्या रुपांतल्या दुष्ट प्रतिमती, तू माझा मंत्रदंड चोरला आहेस म्हणून उगीच हुरळून जाऊं नकोस. माझ्याजवळचे शस्त्रदेखील तितकेच प्रभावी आहे. तुझे गुरु मिथ्यामिश्रसुद्धां ब्रम्हपुत्रेच्या कांठचा प्रदेश सोडून इकडचे अरण्य बघायला आले आहेत वाटतं?''

या प्रश्नाचे उत्तर म्हणून मायामर्कट तुच्छतेने किचकिचत बोलूं लागला, ''अरे अस्वल्या मांत्रिका! तुझ्या मंत्रशक्तीच्या जोरावर तू माझ्या गुरूंचा ठावठिकाणा शोध कीं! बहुतेक माझे गुरु तुझ्या गुरु अस्वलपादाचे मस्तक छाटण्यासाठी बर्फाच्या लादीवर आपली तलवार पाजळत असतील.''

हे शब्द ऐकताच मांत्रिक संतापाने लाल झाला आणि दांतओठ खात म्हणाला, ''अरे शिष्या कालीवर्मा! तुम्ही सर्वांनी असा कडक पहारा बसवा कीं किल्ल्यांतला शत्रूपक्षाचा एकही जिवंत माणूस पळून जाऊ शकणार नाही, आणि शक्य झालं तर या मायामर्कटाला आणि सूर्यभूपतीला मात्र पकडून त्यांचे तुकडे तुकडे करुन टाका.''



मांत्रिकाच्या तोंडून हे शब्द बाहेर पडल्यानंतर अस्वल्या वधिकाच्या हत्तीवर बसलेल्या वन्यमाणसाने बाण सोडला. आणि माया-मर्कटाच्या ज्या हातांत कापलेले मस्तक होते. त्या हाताला तो बाण लागला, त्याबरोबर मायामर्कटाने किंकाळी फोडली आणि त्याच्या हातांतले मस्तक घसरुन दूर जाऊन पडले.

लागलीच दुसऱ्या हत्तीवर बसलेले दुर्मुखराजाचे दोन्ही अंगरक्षक उडी मारुन खाली उतरले आणि धावतच जाऊन त्यांनी त्या मस्तकाची तपासणी केली. ''हे कांही दुर्मुख महाराजांचे मस्तक नाही हा मायावी आपल्याला फसवतोय.''

दुसऱ्याच क्षणीं अस्वल्या वधिक ''सिरस भैरव!'' अशी गर्जना करीत, परशू उंचावत म्हणाला, ''अरे रानटी सेवका! तू तर

मायामर्कटावर बाण चालवून अद्भुत काम केले आहेस कीं रे! दुर्मुखराजाला शोधण्यासाठी आम्ही आता साऱ्या किल्ल्यांतल्या कोपरान् कोपरा पिंजून काढूं. जे माझ्या परशूचे बळी होणार नाहीत, त्यांना तू तुझ्या बाणांनी ठार मारून परलोकांत पाठव." आणि त्याने हत्तीच्या गंडस्थळावर परशुच्या मुठीने जोरांत आघात केला.

हत्तीने गगनभेदी चित्कार केला. त्या वेळांत मायावी मर्कटाने त्या लहानशा भिंतीवरुन उडी मारली आणि तो दिसेनासा झाला. तेव्हां कालीवर्मा अस्वल्या मांत्रिकाला म्हणाला, "गुरुजी, आपण अगोदर सूर्यभूपती व त्याच्या सैनिकांना मारलं पाहिजे. दुर्मुखराजा या किल्ल्यांत नक्की जिवंत असेल असा माझा विश्वास आहे."

तोपर्यंत सूर्यभूपतीच्या सैनिकांपासून लपून राहिलेले दुर्मुखराजाचे सैनिक मांत्रिकाजवळ पळतपळत येऊन पोंचले नि म्हणाले, "महाराज! आमचे महाराज शत्रूला घाबरुन दरबारांतल्या सिंहासन असलेल्या दालनांत लपून बसले आहेत." "तर तुम्हीच पुढे होऊन मार्ग दाखवा. शत्रूचं काय करायचं ते आम्ही बघतो." कालीवर्माने त्यांना दिलासा दिला. कालीवर्मा आणि अस्वल्या मांत्रिक सभामंडपाजवळ पोंचले, तेवढ्यांत हत्तीवर स्वार असलेला अस्वल्या वधिक तिथें आला. दुसऱ्याच क्षणी सिंहासनवाल्या दालनाचे दरवाजे उघडले. सर्वांनी आश्चर्याने बघितलं कीं दुर्मुखराजा सिंहासनावर बसलेला आहे.

सारेजण थक्क होऊन पाहात होते, तोच दुर्मुखराजाने आपला हात उंचावून म्हटले, "हे अस्वल्या वधिका, आपल्या सिंहासनावर फिरून एकदा बसण्याची माझी इच्छा पूर्ण झाली. आता तू कोणत्याही विघ्नाशिवाय माझे मस्तक छाटून आपल्या गुरुच्या हातांत देऊं शकतोस. माझी कोणतीही तक्रार राहणार नाही."

तावडतोब वधिकाने आपला परशू उंचावला आणि हत्तीवरुन त्याने खाली उडी मारली व तो सभामंडपाच्या दिशेने पळत जाऊं लागला.

(क्रमशः)





वेताळ-कथा

# राज-चोर

निश्चयाचा पक्का विक्रमार्क पुन्हां त्या प्राचीन वृक्षाजवळ गेला. त्याने झाडावरुन प्रेत खाली उतरवले, आपल्या खांद्यावर टाकले आणि तो स्मशानाच्या वाटेने चालायला लागला. तेव्हां शवांत लपलेल्या वेताळाने म्हटले, "राजन्, तुझे हे कठोर परिश्रम पाहून मी चकित झालो आहे. मला वाटतं तुझा कुणीतरी अप्रत्यक्षपणे अपमान केला आहे. त्यांतून त्याला लपवण्यासाठी किंवा स्वतःला सावरण्यासाठी तू प्रयत्न करतो आहेस. सांग, माझा हा तर्क खरा आहे कीं नाही? माणूस कांहीतरी चांगले करण्यासाठी एखादे काम हातांत घेतो. पण परिस्थिति त्याला साथ देत नाही. उलट त्या कामामुळे त्याचे नुकसानच होते. आणि



तो त्याला अपमान वाटतो. लोक हंसतील या भीतीने तो ती गोष्ट इतरांना सांगत नाही..त्याबद्दल सावध राहातो. त्याचे उदाहरण म्हणून मी सुनीलवर्मा राजाची गोष्टच तुला सांगतो. एका चोराने ह्या राजाला फसवले. पण ही गोष्ट इतरांना माहीत असूं नये असे राजाला वाटत होते. म्हणून जेव्हां तो चोर पकडला गेला, तेव्हां राजाने त्याला शिक्षा केली नाही, उलट त्याला माफी दिली. एक राजा म्हणून त्याने असं करायला नको होतं. त्या राजाची ही कथा नीट लक्ष देऊन ऐक.'' आणि वेताळ राजाला सुनीलराजाची कथा सांगू लागला.

सुधीरवर्मा राजाचा मुलगा सुनील हा दयानंद मुनींच्या गुरुकुलांत शिक्षण घेत होता. सर्व विद्यांचे भरपूर ज्ञान संपादन केल्यानंतर दयानंद मुनी त्याला म्हणाले, ''तू विद्यार्जन करताना त्यांत रस घेतलास आणि निरंतर परिश्रम करीत राहिलास. त्यामुळे इतर विद्यार्थ्यांच्या मानाने तू कमी वेळांत शिक्षणक्रम पूर्ण केलास.

आता तुला इथें राहाण्याची आवश्यकता नाही. विद्या ही माणसाच्या दोन्ही डोळ्यांसारखी आहे. राज्याचा कारभार चालवताना तुला तिचा उपयोग होईल.

जनतेचे कल्याण कसे होईल व त्यांतून सर्वांचा फायदा होईल असे निर्णय अधिकारीवर्गाने विचारपूर्वक घ्यायचे असतात. त्यामुळे राज्यकर्त्याला विद्या ही अत्यंत आवश्यक व उपयोगी असते. या विद्येचा व संबंध मानव-जन्माचाही परम अर्थ आहे परोपकार. हे परम सत्य तू स्वप्नांतदेखील कधी विसरुं नकोस. तीच माझी खरी गुरुदक्षिणा होईल.'' असं सांगून मुनींनी सुनीलला आशिर्वाद दिला.

सुनीलने गुरुंना भक्तिभावाने नमस्कार केला. गुरुकुलासाठी त्याच्या पित्याने धाडलेल्या वस्तू त्याने गुरुजींना अर्पण केल्या आणि तो राजधानीला परतला.

विद्येचे तेज त्याच्या चेहऱ्यावर झळकत होते. पूर्णचंद्रासारखा तेजस्वी दिसणारा आपला पुत्र पाहून राजा सुधीरवर्माला फारच आनंद झाला. मंत्रीगण व राजगुरुंना विचारुन त्याने मुलाला थाटामाटांत राज्याभिषेक केला.

पित्याला साजेशा रितीने पुत्रानेही राज्य-कारभार दक्षतेने चालवला. गुरुकुलांतून बाहेर



पडताना गुरुजींनी सांगितलेले उपदेशपर शब्द त्याच्या कानांत गुंजत होते. म्हणून तो बरेच वेळा वेष पालटून राज्यांत फिरत असे आणि प्रजेच्या चिंता समस्या यांची माहिती मिळवीत असे.

जमेल तितक्या समस्यांचे निवारण करण्याकडे त्याचा कल होता. अडचणींत असलेल्या लोकांना मदत करण्यांत त्याला अपार आनंद मिळत होता.

एकदा तो कापडव्यापाऱ्याच्या वेषांत दुसऱ्या प्रांतात जायला निघाला. राजधानीपासून थोड्याशा अंतरावर वाहणारी नदी पार करुन, तिथले रान ओलांडून, तो एका गांवाजवळ पोंचला, तेव्हां अचानक त्याला एक केविलवाणा आवाज ऐकूं आला, ''माझ्या मुलाला वांचवा, माझ्या मुलाला वांचवा.'' ते शब्द ऐकताच राजाने तिकडे वळून पाहिले.

तिथे एका ओसाड विहिरीजवळ एक माणूस उभा होता आणि विहिरीत बघत ओरडत होता. ''अहो भाऊ, माझा मुलगा विहिरीत पडला, मी लंगडा आहे, मला विहिरीत उतरता येणार नाही. माझ्या मुलाचे प्राण वांचवा, कृपा करुन त्याला वांचवा.'' त्याने दीनवाण्या सुरांत विनवले.

वेषांतर केलेल्या सुनीलने कापडाचे मोठे गांठोडे जमिनीवर ठेवले आणि विहिरींत वांकून पाहिले, व आंत उडी मारली. त्याने विहिरीत नीट पाहिले, अगदी तळाशी बुडी मारुनदेखील सगळीकडे पाहिले, पण मुलगा दिसला नाही.



बराच वेळ तो विहिरीत थांबला. शेवटी तो वरती आला तेव्हां तिथे तो लंगडा नव्हता आणि राजाचे कापडाचे मोठे गांठोडेदेखील नव्हते. आपण फसवले गेले आहोत हे राजाला लागलीच समजले. तो उदास मनाने राजवाड्यांत परतला.

दहा दिवस झाले. अकराव्या परतला जेव्हां सुनील राजा दरबारांत सिंहासनावर बसला होता, तेव्हां हातकड्या घालून एका चोराला सैनिकांनी राजापुढे आणले.

राजाने त्याच्याकडे निरखून पाहिले आणि त्या चोराचा कोणता अपराध होता ते सैनिकांना विचारले.

''महाराज, पुण्यगुप्त सराफाच्या घरी ह्याला चोरी करताना हा पकडला गेला.'' सैनिकांनी सांगितले.



थोडावेळ राजाने मनाशी विचार करुन सांगितले, "ठीक आहे, उद्यां सकाळपर्यंत याला तुरुंगात ठेवा. त्याला काय शिक्षा द्यायची ते मी उद्यां सांगेन."

सैनिकांनी त्याला ओढत नेले आणि तुरुंगात डांबून ठेवले.

त्या रात्री राजाने पुन्हां कापडाच्या व्यापाऱ्याचा वेष घेतला आणि तो तुरुंगात गेला. झोंपी गेलेल्या चोराला राजाने उठवले.

चोर दचकून उठला आणि समोर त्याच व्यापाऱ्याला बघून चकित होऊन म्हणाला, "तू इथे कसा आलास? तूही एक चोर आहेस कीं काय?"

राजाने आपली खोटी दाढी काढली, पगडी उतरवली आणि ते पाहून चोराची बोबडीच वळली. तो थरथर कांपत, चांचरत म्हणाला, "महाराज, क्षमा करा. मी आपल्याला फसवून आपले गांठोडे चोरले. मी यापुढे खरंच कधीही चोरी करणार नाही. मला वांचवा." आणि त्याने राजाच्या पायांवर लोटांगण घातले.

"तुझ्या अपराधाची शिक्षा तुला भोगायलाच हवी. सराफाच्या घरी चोरी केलीस त्याबद्दल तुला शिक्षा होईल. तू मला फसवलंस त्यासाठी मी तुला कांही शिक्षा करणार नाही. मात्र एक लक्षांत ठेव; विहिरीच्याजवळ जे कांही घडलं, ते तू दुसऱ्या कुणालाही, कधीही सांगायचं नाही. ही माझी अट तुला कबूल आहे?" राजाने विचारलं.

"हो महाराज, मला मान्य आहे!" चोराने राजाचे पाय धरीत म्हटले. राजा तुरुंगातून बाहेर पडला.

दुसऱ्या दिवशी सैनिकांनी चोराला दरबारांत राजासमोर उभे केले. राजाचा न्यायनिवाडा ऐकायला सारे दरबारी उत्सुक होते.

राजाने चोराला विचारले, "पुण्यगुप्त सराफाच्या घरी तू चोरी करताना पकडला गेलास कां?"

"होय, महाराज!"

"ही तुझी पहिलीच चोरी आहे कीं चोऱ्या करणे हा तुझा धंदा आहे?" राजाने विचारले.

"महाराज, चोरी करणे हा माझा धंदा नाही. माझे शिक्षण संपल्यानंतर माझ्यावर चोरीचा खोटा आळ लादला गेला. ती चोरी मी खरोखरीच केलेली नव्हती. माझ्यावर चोर असण्याचा शिक्का बसला.



कांही कामधंदा मिळावा म्हणून मी खूप प्रयत्न केले. पण चोर ठरवला गेलो होतो-साहजिकच कुणी काम देईना. मला जगणे असह्य झाले होते. या आयुष्याची समाप्ति करावी म्हणून मी मरण्यासाठी अरण्यांत गेलो पण आत्महत्या करण्याचा मला धीर झाला नाही.

मी भुकेने कळवळून एका विहिरीच्या कांठावर थकून बसलो होतो. तिथे एक पुण्यात्मा आला होता. त्याचे कापडाचे गांठोडे आणि भरपूर शिदोरी दिसली ती मी लबाडीने पळवली. ते भोजनाचे पदार्थ मी पोटभर खाल्ले. आणि माझ्या मनांत आलं कीं अशी चोरी करीत मला आरामांत आयुष्य जगता येईल. पोट भरण्यासाठी कष्ट केलेच पाहिजेत, काम केलेच पाहिजे, असं कांही नाही. त्या दिवसापासून मी किरकोळ चोऱ्या करायला लागलो. काल मी सराफांच्या घरांत घरफोडी करताना पकडला गेलो." अश्रू ढाळत त्या चोराने आपली कहाणी सांगितली.

"जर तुला जगायची चांगली संधी मिळाली तर तू चोरी करणे सोडून देशील कां?" राजाने विचारले.

"महाराज, मी जन्मांत पुन्हां कधी चोरी करणार नाही असे वचन देतो." चोराने डोळे पुसत सांगितले.

त्यावर राजाने आज्ञा केली." गेल्या दहा दिवसांत तू जिथे जिथे चोरी केलीस, त्यांच्या वस्तू तू त्यांना परत देऊन टाक व त्यांची माफी माग. तोपर्यंत माझे सैनिक तुझ्याबरोबर असतीलच. त्यानंतर तुला कांहीतरी कामधंदा मी मिळवून देईन." राजाने आश्वासन दिले.

हा निकाल ऐकून सभागृहांतल्या सर्व उपस्थितांनी टाळ्या वाजवल्या.



"आपली आज्ञा शिरसावंद्य आहे, महाराज" असं नम्रपणे म्हणून चोर सैनिकांच्याबरोबर गेला. सुनील राजाला आपल्या गुरुजींची आठवण झाली व त्यानेही समाधानाने मान डोलावली.

कहाणी पूर्ण झाल्यानंतर वेताळाने राजाला विचारले, "राजन्, राजा म्हणतो कीं अपराध्याला शिक्षा ही व्हायलाच हवी आणि दुसरीकडे चोरी केली तरी त्या चोराचा अपराध माफ झाला. हे विचित्र आणि परस्परविरोधी वाटत नाही कां? जर चोराने खरी गोष्ट सांगितली असती तर लोक आपल्याला हंसतील. या भीतीने राजाने त्या चोराला माफी दिली आणि त्याला रोजगारीचे आश्वासन दिले.

ज्या चोराच्या हातून खुद्द राजाच फसवला गेला होता. त्या चोराला माफी देणे हे तर्कसंगत आहे कां? यालाच न्याय व धर्म म्हणायचे कां? त्यामुळे देशांत गुन्हेगारी वाढणार नाही कां? या माझ्या शंकांची उत्तरे माहीत असूनदेखील जर तू मौन स्वीकारलेस, तर तुझ्या मस्तकाची शंभर शकले होऊन पडतील."

राजा विक्रमार्कने उत्तर दिले, "अपराध्याला शिक्षा ही व्हायला हवीच, पण त्या शिक्षेमुळे त्याच्या वृत्तीत बदल झाला पाहिजे. तुरुंगात जेव्हां चोराला राजा भेटला, तेव्हांपासून चोराची मनोवृत्ती पालटायला लागली होती, त्याला पश्चात्ताप होत होता. चोर असला तरी राजाने त्याच्या शब्दावर विश्वास ठेवला. चोरी करण्याचे मूळ कारण नाहीसे झाले कीं चोर सुधारला असता व त्याने चोरी केली नसती. म्हणून राजाने चोराला सुधारण्याची एक संधी दिली. आता राजा फसवला गेला, त्याची गोष्ट गुप्त रहावी ही राजाची इच्छा होती. कारण परोपकाराबद्दलचा गुरुंचा आदेश त्याला तंतोतंत पाळायचा होता. जग हंसेल याची राजाला भीती नव्हती. पण परोपकाराबद्दल जनतेत विश्वास उत्पन्न व्हावा, या उदात्त विचारामुळे राजाने ही गोष्ट एक गुपित राहावे, अशी अट चोराला घातली होती."

राजाचा मौनभंग झाला आणि वेताळ शवासहित पुन्हां अदृश्य होऊन झाडावर जाऊन बसला.








## रामायणाची ३०० भाषांतरे




या प्रसिद्ध महाकाव्याची सर्व भारतीय भाषांमधे अनेक भाषांतरे झालेली आहेत. तुलू व वन्यवासी भिल्ली व संताली भाषांतदेखील रामायण आहे. शेजारच्या आग्नेय आशियाई देशांतल्या अन्नामीडा, बालीनीज, कांबोडियन, चिनी, जपानी, लाओशियन, मॅले, थाई व तिबेटी भाषांतली भाषांतरे पाहून ही कथा किती लोकप्रिय आहे ते समजते. सर्व युरोपीय भाषांत रामायण गेलेले आहे. एका प्रसिद्ध इतिहासकाराने म्हटले आहे "रामायण हे इतिहासाचे एक पान नाही. रामायणाचा स्वतंत्र इतिहास विविध ठिकाणी, वेगवेगळ्या वेळी, या विषयाभोवती गुंफलेला असून अनेक भाषांतरांमधल्या कहाण्यांत भरलेला आहे."

## स्थानकाला सांस्कृतिक वारसा दर्जा

मुंबईतल्या छत्रपती शिवाजी या स्थानकाला जागतिक वारसा हा दर्जा देण्यांत आला आहे. पश्चिम बंगालमधले दार्जिलिंग या स्थानकालाही हा दर्जा मिळालेला आहे. छत्रपती शिवाजी स्थानक हे जगांतले सर्वात जास्त रहदारी असणारे स्थानक आहे. त्याचे बांधकाम १८७८ साली सुरु झाले आणि दहा वर्षानंतर स्थानक तयार झाले. महाराणी व्हिक्टोरिया यांच्यावरुन त्याचे नांव व्हिक्टोरिया टर्मिनस ठेवण्यांत आले होते. १९२९मधे, तेरा फलाट (प्लॅटफॉर्म) वाढवले गेले. १९९६ साली आणखी दोन फलाट वाढवले आणि नामांतर झाले. इथून रोज तीस लाख प्रवाशांची येजा होत असते.



# म्हणून समुद्र खारट झाला!

**फार** फार वर्षांपूर्वी अरण्याजवळच्या एका खेड्यांत दोन मित्र राहात होते, सुझू आणि यामार. सुझू बलवान आणि चुणचुणीत होता, यामार अशक्त नव्हता, पण जरा आळशी होता. जर एखाद्या उंच झाडावर पिकलेली फळें दिसली, तर सुझू झाडावर चढून फळें काढीत असे. पण त्यांतली फळें निवडायला तो प्रथम यामारला संधी देत असे.

दोघेही मोठे झाले, त्यांची लग्नें झाली. सुझू एका



लहानशा घरांत राहून मोलमजुरी करुन आपला उदरनिर्वाह करीत होता. यामार मात्र आरामांत राहात होता. कारण त्याच्या वडिलांनी कांही अेकर जमीन त्याच्या नांवाने ठेवली होती.

पण दोघांची मैत्री कायम टिकली होती. जेव्हां केव्हां दोघांना वेळ मिळेल तेव्हां ते दोघेजण एकत्र अरण्यांत जात. एकदा ते असेच एका गुहेंत शिरले. अंधारात चमकणारे कांही दगड सुझूला दिसले. त्याने ते दगड गोळा केले. गुहेच्याबाहेर आल्यानंतर त्याने ते यामारला दाखवले. यामारने ते नीट पाहिले. त्याचे डोळे आनंदाने चमकले. पण तो कांहीही न दाखवता सहजपणे म्हणाला, ''मला उद्यांच नगरांत जायचं आहे. तिथे मी या दगडांची किंमत विचारुन घेईन.''

दुसऱ्या दिवशी यामार नगरांत गेला. त्याचा कयास खरा ठरला. ते दगड म्हणजे किंमती रत्नें होती. त्याने ते विकले आणि भरपूर धन घेऊन तो खेडेगांवी परत आला. त्याने सुझूला थोडेसे पैसे दिले आणि पुढे म्हणाला, "हे दगड अगदीच कमी किंमतीचे निघाले. पण एका श्रीमंत माणसाने ते पुष्पपात्र सजवायला म्हणून विकत घेतले. त्यांतली ही अर्धी रक्कम - हा तुझा हिस्सा!"

यामारने मोठे घर बांधले. घोडे विकत घेतले आणि बरेच नोकरचाकर ठेवले. ''मला माझ्या घरांत पुरलेला एक लहानसा खजिना सांपडला.'' त्याने शेजाऱ्यांना सांगितले.

आपल्या मित्राचे भाग्य फळफळले त्याचा सुझूला आनंद झाला. ''आपल्याला कधी अडचण आलीच तर त्याची मदत मिळेल?'' सुझूने बायकोला सांगितले. पण तिला जरा संशय येत होता. सुझूला मिळालेले दगड हेच यामारच्या श्रीमंतीचे कारण नसेल ना, असे सारखे तिच्या मनांत येत होते.



एक दिवशी सुझू एकटाच त्या गुहेकडे गेला. आपल्या छोट्या आजारी मुलासाठी औषधे आणायची होती आणि त्याला पैशाची फार जरुरी होती. त्या जागी पोंचल्यावर त्याला यामार गुहेत शिरताना दिसला. ''तू काय करतो आहेस इथें?'' सुझूने विचारले.

यामार दचकला आणि चांचरत म्हणाला कीं तो त्या वाटेने जात होता आणि सहजच गुहेकडे वळला होता. ''पण तू कशासाठी आला आहेस इकडे?'' यामारने सुझूला विचारले. ''मी इथें कांही दगड मिळतात कां ते बघायला आलो होतो,'' सुझूने खरी गोष्ट सांगितली.

''फार छान! चल, आपण दोघे मिळून शोधूं या. जर कांही दगड मिळाले तर मी ते घेऊन नगरांत जाईन आणि त्याची किंमत करीन. तू फार सरळ स्वभावाचा आहेस. म्हणून तुला लोक फसवतील हां!'' यामार म्हणाला. दोघांनी सगळीकडे शोधून पाहिले, पण त्यांना कांहीच हाती लागले नाही.

ते गुहेच्याबाहेर आले आणि घराच्या वाटेला लागले. ''पाऊस पडेल बहुतेक. चल भरभर!'' यामार म्हणाला आणि तो सुझूच्यापुढे निघून गेला.

''अरे बाळा, अेवढी ही लांकडाची मोळी उचलून माझ्या डोक्यावर ठेवतोस कां रे?'' झाडाखाली बसलेल्या एका म्हातारीने यामारकडें बघत काकुळतीने विचारले.

यामारने तिच्याकडे हेटाळणीने बघितले नि तो घाईने पुढे निघून गेला.

''आजी, थांबा, मी देतो ती मोळी तुम्हाला उचलून'' असे म्हणत सुझूने ती मोळी उचलली आणि म्हातारीच्या डोक्यावर नीट ठेवली. तो तिच्याबरोबर तिच्या झोंपडीपर्यंत गेला आणि ती मोळी खाली उतरवायला त्याने म्हातारीला मदत केली.

''पोरा, मला मदत केलीस ते पाहून फार बरं वाटलं हां!'' म्हातारीने त्याचे आभार मानले आणि घरांत



जाऊन तिने केकचा एक तुकडा आणला नि सुझूला दिला.'' तुला भूक लागली असेल. हा केकचा तुकडा खा. तुझी भूक तर भागेलच, पण तुला जर एखादा रोग असेल तर तोदेखील बरा होईल.''

सुझूला आनंद झाला. केकचा तुकडा फार मोठा नव्हता. त्याने तो आपल्या आजारी मुलासाठी राखून ठेवला. तिथून चारसहा पावले तो पुढे गेला असेलनसेल, तोच त्याला एक केविलवाणा आवाज ऐकू आला, ''अरे बाबा, मला कांहीतरी खायला देशील कां? नाहीतर भुकेने मी मरुन जाईन.'' एक इसम दगडावर आडवा पडलेला होता. त्याच्या आयुष्याचे शेवटचे कांही क्षण उरले असावेत असा त्याचा चेहरा दिसत होता. सुझूने जवळचा केकचा तुकडा त्याला दिला. त्या मरणासन्न माणसाने तो चवीने खाल्ला,



आणि तो ताबडतोब उठून बसला. "अरे भल्या माणसा, ही घे तुला एक छोटीशी भेट! आहे लहान पण तिची ताकद महान आहे." आणि त्याने बांबूच्या काड्यांनी बनवलेले एक लहानसे चाक सुझूला दिले. त्याला धरण्यासाठी एक दांडा होता.

"तुला जी वस्तू खरोखरीच हवी असेल ती या चाकाकडे माग आणि दांडा उजव्या बाजूला फिरव. तुझी मागणी पूर्ण झाली की लगेच हा दांडा डावीकडे फिरवायचा म्हणजे हे चाक थांबेल. या चाकावर कायमचा तू अवलंबून राहूं नकोस. तू प्रामाणिकपणे काम केलं पाहिजेस. जेव्हां तुझ्या साऱ्या गरजा पूर्ण होतील आणि तुझे आयुष्य सुखांत जाऊं लागेल, तेव्हां तू हे चाक समुद्रांत फेकून दे."

सुझूने त्या माणसाचे आभार मानले, ते चाक घेतले आणि तो घराच्या वाटेला लागला.

हे एवढंसं चाक आणि मनांत आलेली कोणतीही इच्छा हे पूर्ण करुं शकेल, ह्यावर विश्वास ठेवणे जरा कठीणच होते. मुलाचे औषध आणण्यासाठी सुझूला थोडे पैसे हवे होते. यामारकडे मागितले तर त्याने नक्कीच दिले असते असं सुझूला वाटलं. यामारच्या घरी तो पोंचला, तेव्हां पावसाला सुरवात झाली होती.

"अरे मित्रा, मला थोडे पैसे तांतडीने हवे आहेत. माझा लहान मुलगा आजारी आहे आणि...."

"सुझू, अरे आंत ये ना आणि जेवूनच जा. पण आता मला इतके मित्र झाले आहेत कीं प्रत्येकाच्या मुलाच्या आजारपणांत मदत करणे मला कांही जमणार नाही!" यामार म्हणाला. "अरे, मी तुझे पैसे परत देईन. तू मला उसने दे ना!"

"मी आधी जे सांगितले ते पुन्हां एकदा सांगू कां?" यामारने विचारले.

"नाही, नको. त्याची कांही जरुरी नाही." सुझूने उसासा सोडला आणि तो घरी गेला.

"बाबा, तुम्ही हे काय आणलं आहे?" सुझूच्या आजारी मुलाने वडिलांच्या हातांतले चक्र पाहून विचारले.

"अरे, हे ना! हे आपल्याला जेवण देणार आहे असं मला वाटतं!" सुझूने गंमतीने म्हटलं आणि चाकाचा लहान दांडा उजव्या बाजूला फिरवला.

आणि काय चमत्कार, भोजनाचे कांही पदार्थ समोर आले. जणूं कांही जेवायचेच बाकी होते. सुझूने दांडा डावीकडे फिरवला. नंतर सुझूने त्याचा मुलगा बरा व्हावा म्हणून चाकाजवळ औषधे मागितली. ती लागलीच मिळाली. त्या छोट्या मुलाला ती औषधे दिली नि तो बरा झाला. तोपर्यंत मुसळधार पाऊस सुरुं झाला होता. सुझूच्या घराच्या छपरांतून आंत पाणी गळायला लागले. "जरा चांगले भक्कम घर असायला हवे आपल्याला!" त्याची ही इच्छा पूर्ण झाली.

सुझूचे घर आता साऱ्या गांवातले शानदार घर झालेले पाहून गांवकरी स्तिमित झाले. यामार तर डोळे फाडफाडून बघत राहिला, आणि त्याचे तोंड बघण्यासारखे झाले होते. "हे कसं काय झालं रे?" त्याने सुझूला विचारलं. "देवाच्या कृपेने झालं." सुझूने उत्तर दिलं.

हळूंहळूं दैनंदिन चाकोरींत संसाराला लागणाऱ्या सर्व सुखसोयी सुझूने जमवल्या.

यामारची त्यामुळे झोंप उडाली होती व मनःशांती ढळली होती. अनेक रात्री तो सुझूच्या घराभोवती टेहळणी करी आणि खिडकीतून डोकावून कांही नवीन वस्तू दिसतेय कां, ते पाहाण्याचा प्रयत्न करी.

एका रात्री यामारला सुझू ते चाक फिरवताना दिसला. सुझूने उजवीकडे चाक वळवले, आणि देवाची दगडी मूर्ती पूजेसाठी मागितली. मूर्ती मिळाल्यानंतर सुझू त्याच्या बायकोला म्हणाला, "आता हे चाक समुद्रांत टाकून यायला हवं. आपल्याला पुरेसं सारं कांही मिळालंय. आपण कष्ट करुन आपल्याला हवा तितका पुरेसा पैसा मिळवायचे विसरता कामा नये."

"अगदी बरोबर!" सुझूच्या बायकोने दुजोरा दिला.

यामारला सुझूचे गुपित समजले. सुझू ते चाक कुठे ठेवतो आहे, ते यामारने बघून ठेवले. मध्यरात्री त्याने ते चाक चोरुन नेले. दुसऱ्या दिवशी त्याने एक होडी आणली आणि जवळच्याच एका बेटाच्या दिशेने तो निघाला. त्या बेटावर एक राजवाडा निर्माण करायचा आणि त्यांत सर्व आधुनिक सुखसोयी ठेवायच्या असा त्याचा हेतू होता. नंतर आपले कुटुंब तिथे हालवायचे, म्हणजे यामारने ते जादूचे चाक चोरले आहे असा सुझूला संशय आला नसता.

यामारने थोडे भोजनाचे पदार्थ बरोबर घेतले होते. घटकाभर होडी चालवल्यानंतर त्याला भूक लागली, व त्याने शिदोरी उघडली व खायला सुरवात केली. पण त्यादिवशी आचारी पदार्थांत मीठ घालायला विसरला होता. यामारला हंसू आले. त्याने ते चाक घेतले आणि मीठ हवे म्हणून दांडा उजव्या बाजूला फिरवला. क्षणांतच त्याच्यासमोर मिठाचा ढीग येऊन पडला. तो ढीग वाढत राहिला. होडींतले वजन वाढूं लागले. तो ढीग थांबवायचा कसा हे कांही त्याला माहीत नव्हते. तो भेदरुन गेला नि इकडेतिकडे पाहूं लागला. होडी आता बुडायला लागली. दोघा नावाड्यांनी पाण्यांत उड्या मारल्या आणि दुसऱ्या नावेच्या दिशेने ते पोहत जाऊं लागले. पण यामारला कांही पोहायला येत नव्हते. तो त्या होडीबरोबर समुद्राच्या तळाशी गेला.

पण त्या चाकांतून मिळणारा मिठाचा ढीग कांही केल्या थांबेना. सारा समुद्र खारट झाला. आजदेखील त्या चाकातून मीठ येण्याचे कांही थांबलेले नाही. समुद्रांत इतका गोड पाण्याचा पाऊस पडतो तरीसुद्धां समुद्राच्या पाण्याचा खारटपणा कांही कमी होत नाही. कां ते कळलं ना आता?

*- विश्वावसू*



आंध्र प्रदेशांतली एक लोककथा

# राजपुत्र जिवंत होतो

**स्वप्नसुंदरी** ही राजा महेंद्राची मुलगी होती. राजाने आपल्या मृत्यूपूर्वी साती राजपुत्रांची लग्ने केली, त्यावेळी स्वप्नसुंदरी लहान होती. राजापाठोपाठ राणीचाही मृत्यू झाला. तिने आपली कन्या सुनांच्या हाती सोपवली होती.

सुंदरीच्या भावांना धाकट्या बहिणीबद्दल फार प्रेम होते. पण त्यांच्या बायका मात्र आता तिला दासीप्रमाणे वागवू लागल्या, आणि तिच्याविरुद्ध तक्रारी सुरुं झाल्या. राजवाड्यांत सुंदरीची अवस्था केविलवाणी होऊन गेली. पण तिने भावांजवळ त्याविषयी कधी कुरकुर केली नाही.



एके दिवशी सुंदरीला हे जिणे अगदी असह्य झाले. "आता मात्र मी माझ्या भावांना तुम्हा प्रत्येकीबद्दल खरं काय ते सांगणार आहे." त्यावेळी सर्व भाऊ वाड्यांत नव्हते. तिच्या भावजयांनी तिला राजवाड्यांतून बाहेर हाकलून दिले. "चालती हो, इथें तुला आता जागा नाही." त्या म्हणाल्या.

"हो, जातेच मी आता, पण पुन्हां येईन ती राजपुत्राशी लग्न करुनच येईन." तिने रडतरडत सांगितले.

"हो तर, तुझी वाट बघत बसलाच आहे तो जसा कांही! जा, जा, आणि अगदी जरी चंदनराजाशी तुझे लग्न लागले ना, तरी तू कांही परत येऊं नकोस!" भावजयांनी तिला हिणवले.

सुंदरी ताबडतोब तिथून निघाली. तिची सर्वांत धाकटी वहिनी तिच्या मागे पळत आली. "हे घे तुझे कपडे. लग्नाच्या वेळी नकोत कां? आणि ही भाताची पोटळी! तुझ्या चंदनराजासाठी जेवायला हवीच कीं!" वाड्याच्या लोखंडी फाटकाशी जाईपर्यंत इतर भावजयांचे कुत्सित हंसणे तिला ऐकूं येत होते.

चंदनराजा हे नांव तिच्या मनावर कोरले गेले. तोपर्यंत तिने हे नांव कांही ऐकले नव्हते. पण आता ती त्याचा शोध घेणार होती. तिने त्याला भेटायचे ठरवले.



वाटेंत समोरुन येणाऱ्या कांही बायका तिला दिसल्या. तिने एकीला विचारले, "ताई, चंदनराजाकडे मला जायचंय. मी कोणत्या वाटेने जाऊं?"

त्या बाईचा चेहरा एकदम उतरला. "चंदनराजा? पण तो तर खूप वर्षांपूर्वीच मरण पावला." तिने इतर बायकांकडे बघत सांगितले.

"तो राजा होता कां? त्याचे राज्य कोणते होते?" स्वप्नसुंदरीने चौकशी केली.

"तो दक्षिण देशांतल्या एका राज्याचा राजा होता म्हणे!" त्या बाईने अगदी सहजपणे सांगितले आणि पुढे जाणाऱ्या घोळक्यांत ती घाईघाईने जाऊन सामील झाली.

सुंदरी दक्षिणेच्या वाटेला लागली; बरेच दिवस ती चालतच राहिली आणि एका अरण्यांत पोंचली. तिथे तिला एका ओसाड जागी एक राजवाडा दिसला. तिने वाड्याभोवती एक फेरी मारली. पण तिथे चिटपाखरुं देखील नव्हते.

तिने धैर्याने वाड्यांत जायचे ठरवले. मुख्य दरवाजा उघडाच होता. नंतर मात्र तिला तिथें ओटीवर एक कुत्रा व एक मांजर दिसले. ते या वाड्याचे रहिवासी होते कीं राखणदार? कुत्रा भुंकला आणि मांजरानेही मियाँव केले. तिने तिचे गांठोडे उघडले आणि जमिनीवर त्यांतला थोडा भात ठेवला. त्या कुत्र्याने व मांजराने तो अगदी प्रेमाने चाटून खाल्ला. त्यांना बहुतेक तो एक नवा पदार्थ असावा!



कुत्रा त्या मोठ्या वाड्याच्या आंत गेला आणि त्याने तोंडात एक लहानशी पुरचुंडी आणली व तिला दिली. तो कुत्रा तिच्याशी माणसासारखा बोलायला लागला. तेव्हां तिला फारच आश्चर्य वाटले. "तू मला आणखी थोडा भात दिलास कीं मी ही पुडी तुला देईन."

"काय आहे त्याच्यात?" सुंदरीला उत्सुकता होती.

"जर यांतली लाल पूड एखाद्या स्त्रीने कपाळावर लावली तर तिचा नवरा दीर्घायुषी होतो. आणि ती जर कुमारिका असेल तर तिला मनपसंत नवरा मिळतो." सुंदरीने आपले गांठोडे उघडले आणि त्या कुत्र्याला आणखी थोडा भात दिला. तिला कुत्र्याने पुडी दिली. तिने त्यांतली कुंकवाची चिमूट घेतली आणि आपल्या कपाळावर लावली.



तोपर्यंत ते मांजरदेखील आंत गेले आणि त्याने दुसरी एक पुडी आणली. मांजर प्रेमाने म्हणाले, ''ही पांढरी पूड आहे, ती घे आणि मलाही थोडासा भात दे!''

''या पांढऱ्या पुडीचा मी कसा उपयोग करुं?'' सुंदरीने मांजराला भात देऊन विचारले. त्यावर मांजर म्हणाले, ''तू जर ही पूड डोळ्यांत घातलीस तर इतरांना तू दिसणार नाहीस, पण तुला मात्र सगळं कांही दिसत राहील.'' त्या दोन्ही जनावरांनी तिला धन्यवाद देताना सांगितले, कीं तो भव्य महाल एका राक्षसाचा होता. तो राक्षस येणाऱ्याजाणाऱ्या वाटसरुंना ठार मारुन त्यांना खाऊन टाकीत असे. त्यांतले उरलेले मांस तो त्या कुत्र्याला व मांजराला खायला देत होता. माणसांचे मांस खाऊनखाऊन त्यांना आता वीट आला होता. म्हणून सुंदरीने दिलेला वाळका भात त्यांनी आवडीने खाल्ला.

राक्षस परत येण्यापूर्वी सुंदरीने तिथून जायला हवे, असेही त्यांनी तिला सांगितले. नाहीतर त्याने तिलाही ठार केले असते. सुंदरीने उरलेला सगळा भात त्यांना देऊन टाकला, आणि ती घाईने तिथून निघाली.

त्या अरण्यांतून ती सावधपणे जाऊं लागली. सुदैवाने तिला तो राक्षस दिसला नाही. अरण्याच्या टोंकाला एक गवताळ रान होते, ते ओलांडून तिला जायचे होते, म्हणजे नंतर तिला पायवाट मिळाली असती, व जवळपासचे एखादे खेडे दिसले असते. तिथें तिला आश्रय हवा होता. अरण्यांत मोठ्या झाडांमुळें आता अंधार वाटत होता. ती तशीच धीटपणे चालत राहिली. रान ओलांडताना तिला लांबदूर दिव्याचा उजेड दिसला.

त्या दिशेने ती उजेडाजवळ गेली. एका मोठ्या राजवाड्यासारख्या महालांतून हा उजेड येत होता. तो महालदेखील निर्मनुष्य होता. ती आंतल्या दालनांतून जात राहिली. तिथे कुणीही नव्हते, पण वाड्याच्या प्रशस्त चौकांत एका झाडाखाली एक ओटा होता. त्या ओट्यावर एक सुंदर तरुण निजलेला होता. ती त्याच्याकडे एकटक पाहातच राहिली. तो जिवंत असावासे वाटत नव्हते.

पण तो मेलेलाही दिसत नव्हता. सुंदरीने थांबून वाट पाहायचे ठरवले. ती दुसऱ्या एका



ओट्याच्या टोंकाला बसून राहिली. छान चंद्रप्रकाश होता आणि मध्यरात्रीच्या सुमारास त्या निर्जीव शरीरांत थोडीफार हालचाल सुरुं झाली. लौकरच तो तरुण उठून बसला आणि त्याने डोळे चोळले. ''पऱ्यांनो, पऱ्यांनो! अजून आला कीं नाहीत?'' तो स्वतःशीच बोलला.

''इथे कुणी पऱ्या नाहीत, महाराज!'' स्वप्नसुंदरीने सांगितले. इथें कुणीतरी परकी व्यक्ती आलेली आहे हे त्याला समजलं. ''कोण आहेस तू? कुठून आलीस? आणि इथपर्यंत कशी काय आलीस?''

सुंदरी उठून उभी राहात म्हणाली, ''माझं नांव स्वप्नसुंदरी आहे. मी एक राज्यांतली राजकन्या आहे आणि मला सात भाऊ आहेत. माझ्या भावजयांनी मला घरांतून हाकलून दिले आणि आता मी अनाथ आहे. मला चंदनराजाचा शोध घ्यायचाय व त्याच्याशी लग्न करायची माझी इच्छा आहे.''

''मीच चंदनराजा आहे आणि मीही एक राजकुमार आहे. पण तुला माझ्याशी लग्न करता येईल कीं नाही ते सांगता येत नाही. कारण मी दिवसभर मेलेला असतो आणि मध्यरात्र झाली कीं कांही घटका मी जिवंत होतो.''

''हे राजपुत्रा, तू मघाशी पऱ्यांचा उल्लेख केलास. त्या कोण आहेत?'' सुंदरीने विचारले.

''ती एक मोठीच कहाणी आहे. संपूर्ण सांगायला वेळ पुरणार नाही आणि तुला उद्याच्या मध्यरात्रीपर्यंत इथे थांबावे लागेल.'' राजपुत्राने उत्तर दिले. कांही क्षण थांबून त्याने पुढे सांगायला सुरवात केली.

''माझ्या वडिलांना बरीच वर्षे मूलबाळ नव्हते. एकदा अरण्यांत शिकारीला गेले असताना ते वाट चुकले आणि एका मठापाशी पोंचले. तिथल्या मुनींनी त्यांना आसरा दिला आणि रात्रीं तिथे त्यांनी विश्रांति घेतली. सकाळी पुढे जाताना मुनींनी त्यांना चंदनाच्या फुलांचा हार दिला. ''हा तुझ्या राणीला दे आणि तिला तो गळ्यांत घालायला सांग. या हारांत संजीवनी शक्ती आहे. मी हे सांगतो आहे, कारण तुझी पत्नी एका मृत बालकाला जन्म देणार आहे. पण त्या बाळाच्या गळ्यांत हा हार घातला कीं ते जिवंत होईल. हा हार त्याच्या गळ्यांत कायम राहील, ह्याची काळजी मात्र तुम्ही दोघांनी घेतली पाहिजे.''





माझे वडील परत गेले आणि त्यांनी राणीला तो हार दिला व तिला गळ्यांत घालायला लावला. पुढे तिने मृत बालकाला जन्म दिला, परंतु तो हार गळ्यांत घातल्यावर बाळ जिवंत झाले. बाळाच्या गळ्यांत तो हार सदैव असे. बाळ मोठा झाला व एक देखणा तरुण दिसूं लागला. एके दिवशी तो राजवाड्याच्या गच्चीवर संध्याकाळी झोपी गेला. त्या रात्रीं कांही पऱ्यांना तो दिसला. त्यांना त्याच्याभोवती फेर धरुन नाच केला. एकीला तर त्याच्याशीच लग्न करावे असे वाटले. त्याला ही कल्पना नापसंत नव्हती, पण परीबरोबर परीराज्यांत कायम राहायला त्याने नकार दिला. म्हणून तिने रागावून त्याचा चंदनफुलांचा हार हिसकावून घेतला व ती निघून गेली. दुसऱ्या दिवशी राजपुत्राचे निर्जीव शरीर झोपलेले होते. हार गळ्यांत नव्हता. तोपर्यंत त्याचे नांव चंदनराजा पडले होते.

त्या हाराचा वाड्यांत, बागेंत, खूप शोध घेतला गेला. पण हार मिळाला नाही. राजाराणीने ठरवले कीं राजपुत्राचे शरीर दहन किंवा दफन करायचे नाही. तो हार पुन्हां मिळाला कीं राजपुत्र जिवंत झाला असता. म्हणून त्यांनी अरण्यांत एक सुंदर राजवाडा बांधला व चौकांत राजपुत्राचे शरीर ठेवले. दर आठवड्याने राजा व राणी तिथे येत, मुलाच्याजवळ जरा वेळ बसून अश्रू ढाळत व परत जात असत. त्या परीकडे तो हार आहे हे त्यांना अर्थातच ठाऊक नव्हतं.''

त्या तरुणाने त्याची कथा सांगेपर्यंत पहाट झाली, आणि तोही थकला होता. तो जमिनीवर पडला आणि दुसऱ्याच क्षणीं त्याचे शरीर अचेतन झाले. सुंदरीने त्या दिवशी रात्रीपर्यंत तिथेच थांबायचे ठरवले.

राजपुत्र पुन्हां जिवंत झालेला तिला पाहायचा होता. त्या दिवशी राजा व राणी तिथे आले व राजपुत्राजवळ बसले. त्यांच्या डोळ्यांतून सारखी आंसवे गळत होती. नंतर ती दोघे निघून गेली. सुंदरीने डोळ्यांत पांढरी पूड घातली होती, म्हणून ती त्यांना दिसली नाही.

मध्यरात्रीनंतर राजपुत्र पुन्हां जिवंत झाला. ''अरे राजपुत्रा, त्या पऱ्या पुन्हां केव्हां इथे येतील? मी तिच्याकडून तो चंदनहार काढून घ्यायचा प्रयत्न करीन. मी अदृश्य होऊं शकते.'' सुंदरी म्हणाली.

राजपुत्र कांही उत्तर देण्यापूर्वी कांहीतरी



अद्भुत असे संगीत ऐकूं आले. राजपुत्र तिला म्हणाला, ''मला वाटतं त्या पऱ्या येत आहेत. गुलाबी पंख असलेली परी पाहा. तिनेच माझा हार नेला होता.''

असं म्हणून राजपुत्र पुन्हां त्याच्या जागेवर झोपी गेला. पऱ्या त्याच्याभोवती फेर धरुन नाचायला लागल्या.

गुलाबी पंख असलेली परी त्याच्याजवळ गेली, तिने त्या चंदनहाराचा स्पर्श राजपुत्राच्या शरीराला केला. तो उठून बसला. तिने तोच प्रश्न पुन्हां विचारला, ''माझ्याशी लग्न करशील कां रे राजपुत्रा?''

त्यावर त्याने उत्तर दिले, ''जरुर करीन. पण मग तू इथें या राजवाड्यांत माझ्याबरोबर राहिलं पाहिजेस. चालेल?''

''मी कशी इथे राहाणार? मी परीराज्यांतली आहे, आणि आम्हाला दुसऱ्या जगांत राहाता येत नाही.'' ती परी त्याच्याजवळून उठली आणि त्या उंच ओट्यावरुन खाली उतरताना तिचा पाय कशाततरी अडकला आणि ती खाली पडली. सुंदरीच तिथे उभी होती पण त्यांना दिसत नव्हती. तिने क्षणार्धांत तो हार त्या परीच्या गळ्यांतून काढून घेतला.

सुंदरीला जी अदृश्य होण्याची शक्ती मिळाली होती, ती परीचा स्पर्श झाल्यामुळे नष्ट झाली. पऱ्यांना ती मूळ स्वरुपांत दिसूं लागली. गुलाबी पंखाची परी किंचाळली, ''सख्यांनो, मनुष्य-जातींतल्या कुणीतरी आपल्याला बघितलंय'' आणि तत्क्षणीं त्या दिसेनाशा झाल्या.

सुंदरी घाईघाईत त्या ओट्याजवळ गेली आणि तिने राजपुत्राच्या गळ्यांत तो चंदनहार घातला. आणि काय आश्चर्य, राजपुत्र उठून उभा राहिला आणि त्याने सुंदरीचा हात धरला. ''हे गोड राजकन्ये, तू मला जिवंत केलं आहेस. चल आपण जाऊन माझ्या आईवडिलांना भेटूं या. आपल्याला पाहून त्यांना अतिशय आनंद होईल.''

दोघेही राजधानीला गेले. राजाराणीला तर हर्षवायू होईलसे वाटले. सुंदरीमुळे आपला मुलगा जिवंत झाला हे ऐकून तर ते फारच आनंदून गेले. तिला त्यांनी आपली सून करुन घ्यायचे ठरवले. विवाहानंतर दोघांनी त्या अरण्यांतल्या सुंदर राजवाड्यांत आपला संसार थाटला.





# कुबेराचे सरोवर

ब्रह्मदत्त काशी येथे राज्य करीत असतां बोधिसत्वांनी त्याचा मुलगा म्हणून अवतार धारण केला. राजाने त्यांचे नाव महाशासन असे ठेवले. आणखी कांही काळ लोटल्यावर राणीला आणखी एक मुलगा झाला. त्या मुलाचे नांव सोमदत्त असं ठेवण्यात आलं.

दोन मुलं झाल्यानंतर दोन वर्षांनी राणी स्वर्गलोकी निघून गेली. राजाने आणखी एक लग्न केलं. दुसऱ्या राणीला एक मुलगा झाला. ती शुभवार्ता ऐकून राजाला परमानंद झाला. राणीला भेटून राजा म्हणाला, ''राणी, काय वाटेल तो वर मागून घे!''

राणी म्हणाली - ''हा वर मी पुढे कधी आवश्यक वाटेल तेव्हां मागून घेईन!''

धाकट्या राणीच्या मुलाचं नांव आदित्य होते. त्याने वयाप्रमाणे राजोचित सर्व विद्या शिकून घेतल्या व यथासमयी एक सुंदर तरुण युवक झाला. राणी एकदां राजाला म्हणाली - ''आपण तेव्हां एक वर देतो, म्हणाला होता; तो वर मी आता मागते आहे. आदित्याला युवराज म्हणून अभिषेक करावा!''

राणीची ती इच्छा ऐकून राजा अवाक् झाला. म्हणाला, ''थोरल्या राणीची दोन मुलं असताना धाकट्या मुलाला युवराजपद कसं देता येईल? तू मागितलेला वर न्याय्य नाही!'' राजाने सांगून टाकलं.

एके दिवशी राजाने आपल्या दोघा थोरल्या मुलांना बोलावून सर्व गोष्टी समजावून सांगितल्या व म्हणाला - ''तुम्ही राजधानीबाहेर दूर कोठेतरी कांही काळ जाऊन रहा कसे! माझ्यानंतर राज्य तुम्हांलाच मिळणार आहे. म्हणून तेव्हां परत येऊन राज्यभार हाती घेता येईल.''

असा राजाने त्यांना सल्ला दिला. पित्याने सुचविल्याप्रमाणे महाशासन व सोमदत्त राजधानी सोडून निघाले.

ते राजधानीच्या वेशीपर्यंत पोचले असतील नसतील, तेवढ्यांत आदित्य त्यांच्या पाठोपाठ आलाच. तिघे मिळून प्रवास करीत हिमालय पर्वतात कांही दिवस भ्रमण करीत. फिरल्यावर तेथील अरण्य प्रांतात येऊन पोचले.

जातक कथा

एके दिवशी तिघे दमून भागून एका झाडाखाली विश्रांतीसाठी येऊन बसले. महाशासन धाकटा भाऊ आदित्य याला म्हणाला, ''आदित्या! ती झाडं दिसत आहेत ना, त्यांच्या जवळपास एक सरोवर दिसतं आहे. तू स्वतः पाणी पिऊन घे आणि आम्हां दोघांसाठी कमळाचे दोन द्रोण करून त्यांत प्यायला पाणी घेऊन ये.''

आदित्य त्या सरोवरावर गेला आणि पाणी प्यायला म्हणून त्याने सरोवरात पाय टाकला मात्र, एका यक्षाने त्याला धरलं आणि त्याला घेऊन तो सरोवराच्या बुडाशी त्याचे घर होते तेथे घेऊन गेला. बराच वेळ झाला तरी आदित्य न आलेला पाहून महाशासनाने सोमदत्ताला चौकशी करायला व स्वतः पाणी पिऊन एक द्रोण भरून पाणी आणायला पाठविले, त्याने पाण्यांत पाऊल टाकल्याबरोबर यक्षाने त्यालासुद्धां धरून नेले.

कांही वेळ वाट पाहून महाशासन स्वतः दोघा धाकट्या भावांच्या शोधार्थ निघाला. दोघांना कांही अपाय तर नाही झाला, ही शंका त्याच्या मनात होती. म्हणून तो तलवार उपसूनच सरोवराच्या कांठी आला. परंतु तो सरोवरात उतरला नाही व सरोवराकडे बराच वेळ निरखून पहात उभा राहिला. ते पाहून यक्षाने ओळखलं की हा धाकट्या भावांसारखा घाईघाईने पाण्यात उतरणार नाही.

यक्ष एका कोळ्याचे सोंग करून महाशासन-जवळ येऊन म्हणाला - ''तुम्ही असे पहात उभे कां आहांत? तहान लागली असेल तर पाण्यांत उतरून पाणी पिऊन घ्या की!'' महाशासनाने ते ऐकून यांत काहीतरी लबाडी असली पाहिजे, हे ओळखले व म्हणाला - ''तुझ्या बोलण्यावागण्या-




वरुन तू माझ्या दोघा धाकट्या भावांना कांही तरी केले असावेस, अशी मला शंका येते आहे.''

''तू थोडा विवेकवान दिसतो आहेस खरा. तर मग खरं ते ऐक. एका ज्ञानसंपन्न विवेकी व्यक्तीला सोडून बाकी सरोवराजवळ जो कोणी येईल त्याला मी धरतो. अशी आमचे प्रभू कुबेर यांची मला आज्ञा आहे.'' यक्ष म्हणाला.

''म्हणजे ज्ञानसंपन्न व्यक्तीकडून तुला उपदेश हवा आहे, असंच ना? मी तुला ज्ञानबोध करतो. परंतु मी वाटेने चालून दमून भागून गेलो आहे.'' महाशासन म्हणाला.

लगेच यक्ष त्याला आदरपूर्वक आपल्या घरी सरोवराच्या तळाला घेऊन गेला व त्याचा सर्व प्रकारे अतिथिसत्कार वगैरे करून त्याला बसायला त्याने योग्य आसन दिले व स्वतः त्याच्या पायांजवळ बसला.

महाशासनाने त्याला गुरुकडून जो ज्ञानबोध झाला होता त्याबरोबर स्वानुभवाने त्याला मिळालेले ज्ञान, या सर्वांचा समग्रबोध यक्षाला करून दिला.

लगेच यक्षाने कोल्ह्याचं सोंग टाकून दिलं व स्वस्वरूपात प्रगट होऊन म्हणाला - "देवपुरुषा, तू फार मोठा ज्ञानी पुरुषही आहेस. मी तुझ्या दोघा भावांपैकी तुला जो हवा तो परत द्यावा म्हणतो आहे. तू कोणाला तो मागून घे!"

"तर मग आदित्याला दे!" महाशासन म्हणाला.

"आपल्या सख्ख्या पाठच्या भावाला मागायचं सोडून तू आपल्या धाकट्या सावत्र भावाला मागून घेतो आहेस, हा न्याय झाला का?" यक्षाने विचारलं.

"यांत न्याय्य नाही असं काय आहे? मी माझ्या आईचा आहेच आहे. मग माझ्या सावत्र आईला एकजण नको का? माझ्या सावत्र आईने आपल्या एकुलत्या एका मुलासाठीच राज्य नव्हते का मागितले? आम्ही दोघे वडिलांच्या आज्ञेप्रमाणे राज्य सोडून निघालो असता भ्रातृभावाने तो भोळा भाऊ नाही कां आमच्याबरोबर आला? आम्ही दोघे जर राजधानीत परतलो तर आमची सावत्र आई विचारणार नाही का कीं आदित्य कोठे आहे? प्रजेने विचारलं तर यक्षाने त्याला खाल्लं असं सांगून मी मोकळा होऊं म्हणतोस का?" महाशासनाने यक्षाला उलट प्रश्न विचारले.

तेव्हां यक्ष महाशासनाचे पाय धरून म्हणाला, "मी तुझ्यासारखा ज्ञानसागर आजपर्यंत पाहिला नाही. मी तुझ्या दोघां धाकट्या भावांना सोडीत आहे. तुम्ही या अरण्यांत रहाल तितके दिवस, माझे अतिथी म्हणून राहा!"

महाशासन आपल्या दोघा भावांसह यक्षाचे पाहुणे म्हणून राहूं लागले. कांही दिवसांनी त्यांचे वडील ब्रह्मदत्त महाराज वारल्याचे कळले. तेव्हां महाशासन आपल्या दोघा भावांना बरोबर घेऊन यक्षासह काशीला गेला.

महाशासनाचा राज्याभिषेक झाला. त्याने सोमदत्ताला आपला प्रधान व आदित्याला आपला सेनापती नेमले. त्याला मदत करणाऱ्या यक्षाला त्याने चांगलेसे घर बांधून दिले व त्याच्या सुखसोयींसाठी दासदासी नेमले.







# विष्णु पुराण

सुग्रीव किष्किंधेचा राजा झाला. वालीचा मुलगा अंगद याच्यावर त्याने सर्व राज्य कारभार सोंपविला आणि स्वतः ऐषारामांत गुरफटून गेला. रामाला दिलेले वचनच तो विसरून गेला. लक्ष्मणाला राग आला आणि तो धनुष्यावर बाण चढवून किष्किंधेला गेला. हनुमानाने जाऊन सुग्रीवाला बजाविले की रामाच्या कामाची जबाबदारी तत्क्षणी बजाविली पाहिजे.

सुग्रीवाने चारही दिशांना वानरांना पाठविले व सीतेचा शोध काढून यायला सांगितले. अंगद, हनुमान, जांबुवंत, वगैरे वानरवीर दक्षिण दिशेला निघाले. त्यावेळी रामाने मारुतीला बोटांतली अंगठी काढून दिली आणि "ही मी खुणेसाठी देत आहे" असें सांगून सीतेला द्यायला सांगितले.

दक्षिणेकडील समुद्राच्या किनाऱ्यावर पोंचल्यावर वानर म्हणू लागले - "जटायूने रावण सीतेला घेऊन दक्षिणेकडे गेला असल्याचे सांगितले खरे, पण तो कोठे गेला, आणि त्याने पुढे काय केले कोणास ठाऊक?" त्याच वेळीं सर्व वानरांना गिळण्यासाठी जटायूचा थोरला भाऊ संपाती पुढे चालतच येत होता. त्याला पंख नव्हते.

एकदा जटायू आणि संपाती चढाओढ लावून सूर्यमंडलाकडे गेले. जटायूला उडता आले नाही म्हणून तो थांबला. संपाती उडतच राहिला आणि त्याने आपले पंख जाळून घेतले. दक्षिणेकडे समुद्रकाठीं तो असहाय होऊन पडला. तेव्हांपासून सहजी मिळेल ते गिळून तो आपला उदरनिर्वाह चालवीत होता.

संपातीला वानरांकडून घडलेले सर्व वृत्त कळले. त्याने अंगदाला पाठीवर उचलून बसविले आणि जितके दूर पाहातां येईल ते पहायला सांगून



त्याला लंकाद्वीप दाखविले.

शंभर योजने पार करून लंकेला जाऊ शकणारा कोण आहे आपल्यामध्ये, असा विचार वानर करू लागले.

हनुमानाला त्याच्या अंगात किती शक्ती आहे हे माहीत नव्हते. कारण त्याने ऋषीमुनींना त्रास दिल्यामुळे त्याला तसा शाप होता. हे जांबुवंताला माहीत होते. तो म्हणाला - "अरे हनुमंता! तू सहज लंका पार जाऊन रामकार्य करू शकशील."

तेव्हां हनुमानाने रामाचे एकदां ध्यान करून उड्डाण केले. हनुमान आकाशमार्गे समुद्रपार करीत असतां त्याच्या शक्ती व युक्तीची परीक्षा घेण्यासाठी देवांनी सुरसा राक्षसिणीला पाठविले.

ती देवस्त्री असूनही राक्षसरूप घेऊन आपले तोंड उघडून मध्ये उभी राहिली. हनुमानाने आपले शरीर मोठे केले. सुरसेने सुद्धां आपले तोंड वाढविले. हनुमान आणखी मोठा झाला. सुरसाने आपले तोंड आणखी मोठे करून हनुमानाला गिळायला ती पुढे आली. लगेच सूक्ष्म रूप धारण करून हनुमान सुरसेच्या तोंडात शिरला आणि तत्क्षणी विराट रूप धारण करून तिचे तोंड फाडून बाहेर आला. सुरसा पुन्हां देवस्त्री रूप घेऊन निघून गेली. देवांनी हनुमानाच्या शक्तिसामर्थ्याची प्रशंसा केली.

हनुमान उडत उडत जात असताना त्याची सावली राहूची आई सिंहिका नांवाच्या राक्षसिणीने धरली आणि ती मागे ओढू लागली. हनुमानाला शंका आली. त्याने खाली डोकावून पाहिले. सिंहिकेवर एक मुष्टिप्रहार करून तिला त्याने ठार केले.

सर्व विघ्ने पार करून हनुमान पुढे निघाला असतां सुवत्सला नांवाची सागर-कन्या माशाच्या रूपाने तोंड उघडून चकित होऊन पाहू लागली. हनुमानाचा एक स्वेदबिंदु तिच्या तोंडात पडला. तिने तो गिळला. त्यामुळे तिला गर्भ राहिला आणि मत्स्यवल्लभ नांवाचा मुलगा तिला झाला.

एकदा पर्वतांना पंख होते, ते इंद्र आपल्या, वज्रायुधाने कापीत असतां हिमालयाचा मुलगा मैनाक समुद्रांत जाऊन लपून बसला होता. हनुमानाला पाहून तो वर आला व हनुमानाला म्हणाला - "हनुमंता, जरा माझ्या शिखरावर थांबून विश्रांती घे रे, मी विनंती करतो !"

मैनाकाच्या विनंतीला मान देऊन हनुमान त्याच्या शिखरावर थोडा वेळ थांबला आणि पुन्हां उड्डाण करून विद्युत् वेगाने लंकेला जाऊन पोंचला.

लंकानगरीच्या रक्षणार्थ लंकिणी नावाची एक



राक्षसीण होती. तिने हनुमानाला लंकेत शिरत असतां पाहिले व एक भाला घेऊन ती हनुमानावर चालून गेली.

हनुमानाने सूक्ष्म रूप धारण केले आणि स्वतःचा बचाव केला. तो त्या रूपांतच लंकेचे द्वार पार करण्याच्या प्रयत्नांत होता. लंकिणीने हनुमानाला हाताने माशी पकडावी, तसे पकडले. हनुमान लंकिणीच्या तळहाताला चावला. रक्तप्रवाह सुरू झाला. लंकिणीने त्याला सोडले.

हनुमंताने आपली मूठ वळून लंकिणीच्या छातीत प्रहार केला. तो मुष्टिप्रकार होताच लंकिणी भडाभडा ओकू लागली आणि बेशुद्ध होऊन पडली.

लंकिणीने शुद्धीवर आल्यावर हनुमानाला नमस्कार केला व म्हणाली - "मी जेव्हां अशी बेशुद्ध होऊन पडेन, त्या घटकेपासून लंकेचा नाश सुरु होईल, असे ब्रह्मदेवाने सांगितले होते. शापामुळे मी एक क्षुद्र देवता होऊन लंकेचे रक्षण करीत आले. इतके दिवस मी पाहारा दिला. आतां मी निघून जातें, तू आंत जा!" असें सांगून लंकिणी गंधर्वरूप धारण करून आकाशांत उडून गेली आणि अंतर्धान पावली.

हनुमानाने लंकानगरीत प्रवेश केला. रत्नदीप जळत होते आणि उंच इमारती लंकेत होत्या. लंकेचे वैभव पाहून हनुमान चकित झाला.

हनुमान सूक्ष्मरूप धारण करून सीतेचा शोध लंकानगरीत सर्वत्र काढू लागला. त्याने रावणाचा सारा महाल धुंडकून पाहिला. त्याला मंदोदरीच सीता असेल असे भ्रमवश वाटले, परंतु लगेच आपली चूक त्याच्या लक्षांत आली.

सीतेचा पत्ता कोठेही लागेना. तिचा शोध



काढीत हनुमान अशोकवनांत गेला. तिथे त्याला रामनामाचा जप कोणी करीत असल्याचा आवाज कानी पडला.

चंद्रशिलेने बांधलेल्या एका मंडपांत रामाचे स्मरण करून सीता त्याच्या नामाचा जप करीत होती.

त्या मंडपाच्या चारही बाजूला मोठमोठे भाले, तलवारी, वगैरे शस्त्रे धारण करून राक्षसस्त्रिया पाहारा देत होत्या.

मंडपाजवळच असलेल्या एका अशोक वृक्षावर चढून हनुमान पाहू लागला.

सीता मंडपांतून येऊन शेजारच्या एका अशोक वृक्षाखाली बसली.

रावण थाटामाटाने अशोकवनात येत होता. त्याच्या पाठीमागून देव, गंधर्व, नाग, यक्ष, राक्षस व सुंदर मानव स्त्रिया त्याच्या वैभवाचे गान



करीत येत होत्या. रावण अशोकवृक्षाजवळ आला व सीतेला म्हणाला - ''तू आतां तरी मी म्हणतो ते ऐक. एक क्षुद्र असा मानव राम, त्याच्यावर विश्वास करू नकोस. तो लंकेला येणे म्हणजे एक स्वप्नच!''

सीतेने गवताची एक काडी तोडून घेतली व त्याला म्हणू लागली - ''हे रावणा! तुझ्या बढाया आणि तुझ्या वैभवाला पाहून मी लुब्ध होईन हेच स्वप्न आहे! तू एक चोर आहेस! तुला शिक्षा करणे हे राजारामाचे कर्तव्य आहे! तू उगीच दहा कंठांनी कंठशोष करू नकोस! राम तुला शासन करण्यापूर्वी ज्या फुशारक्या मारायच्या असतील त्या मारून घे! तू आपल्या अंतःपुरात जा. तुझा अंतकाळ जवळ येऊन ठेपला आहे!''

रावण ते ऐकून एक मोठी तलवार उपसून म्हणाला, ''मी तुझे तुकडे तुकडे करून टाकतो!''

ते ऐकून सीता म्हणाली - ''तू तसें करणे शक्य नाही! मी स्वतःच तुझ्यासमोर नमून जाईन, असे तुला वाटते आहे. रामाची बायको, रावणाचा प्रताप आणि वैभव पाहून नम्रपणे तुझी होऊन जाईल, असे तुला वाटते आहे. तुझा हा अहंकार आहे व तुझी ही दुराकांक्षा आहे!''

''होय, आमच्या एका राक्षसवनितेचा जो अपमान झाला त्याला असाच प्रतिकार मिळणार आहे! तोच माझा हट्ट आहे!'' रावण म्हणाला.

''नाही, तू रामाशी दोन हात करून जिंकून मला जिंक. तू आहेस भितरा. मायारूप घेऊन चोरासारखा आलास. राम तुझा संहार करील. माझा हा हट्ट आहे!'' सीता म्हणाली.

रावण गुरगुरत तेथून निघून गेला.

हनुमान संधी पहात होता. राक्षस स्त्रिया नसतेवेळी तो झाडावरून उतरून आला. आणि रामाची अंगठी त्याने दिली. तारिका जणू त्याच्या डोक्यावर शोभत होत्या, असे विराट रूप धारण करून ''माझ्या खांद्यावर बसून आलीस तर रामाजवळ घेऊन जाईन,'' असे हनुमान तिला म्हणाला.

''ते योग्य नाही; रामाने रावणाचा संहार केला पाहिजे आणि मला सोडवून नेले पाहिजे! तोपर्यंत सीता अशोकवनांत शोक करीत राहणार, असे रामाला सांग!''

सीता म्हणाली. तिने आपल्या वेणीतील चूडामणी काढून दिला आणि ''रामाला हा दे!'' असे म्हणाली.

हनुमानाने आपण आलो होतो, हे रावणाला कळावे म्हणून अशोक वनाचा विध्वंस केला.



त्याला ठार करायला जंबुमाली आला. त्याला, अक्षयकुमाराला, आणि सहस्त्रावधी राक्षसांना हनुमानाने ठार केले.

रावणाचा मोठा मुलगा इंद्रजित याने हनुमानावर ब्रह्मास्त्राचा प्रयोग केला. ब्रह्मदेवाचा गौरव रहावा, यासाठी हनुमान थोडा वेळ स्वस्थ राहिला आणि ब्रह्मास्त्राने स्वतःला बद्ध करून घेतले. रावणाच्या दरबारांत जाऊन त्याची कानउघाडणी करण्याची इच्छासुद्धां होती.

राक्षस हनुमंताला रावणाच्या दरबारात घेऊन गेले, तेव्हां रावण एका उच्च सिंहासनावर बसलेला होता. खाली लोखंडाच्या साखळदंडांनी बांधलेल्या हनुमानाकडे त्याने हंसत पाहिले.

हनुमानाने आपले शरीर वाढवून साखळदंड तोडले आणि आपल्या शेपटीची वेटोळी एकावर एक करून रावणाच्या सिंहासनापेक्षां एक उंच आसन केले व त्यांवर बसला.

तो रावणाला म्हणाला - ''ऐक रावणा, राक्षसांच्या राजा! मी रामाचा दूत आहे. रामाने माकडांनाच मोठे वीर म्हणून तयार करून तुझ्या लंकेवर स्वारी करण्यास तयार केले आहे. तो असा श्रेष्ठ मानव आहे. तू बलिष्ठ आहेस, असा गर्व करू नकोस. बलिष्ठ सापाला मुंग्यानी कसे ठार केले, तुला ती गोष्ट सांगण्याची गरज नाही. तू सीतेला रामाकडे मुकाट्याने पोचती करून रामाची क्षमा माग!''

रावणाला भयंकर राग आला व त्याने तलवार उपसली. तेव्हां बिभीषणाने रावणाला आठवण करून दिली की दूताला मारावयाचे नसते. ते नीतिविरुद्ध आहे!



रावण म्हणाला, "तसे असेल तर या घमेंडखोर माकडाच्या शेपटीला चिंध्या गुंडाळून त्यावर तेल ओता." शेपटी लांबच होत गेली. कपडे व तेल पुरेच पडत नव्हते. त्याला आग लावली गेली. मारुतीने शरीर वाढविले आणि उड्डाण केले. पेटलेल्या शेपटीसह गरगर फिरला. मोठमोठ्या इमारती व वाड्यांवरुन उड्या मारीत गेला-आणि सर्व लंकानगरीची जणू आहुती अग्नीला दिली. रावणाचे अंतःपुरही जळून गेले. कित्येक राक्षस जळून गेले. बिभीषणाचा वाडा मात्र वांचला.

सीता अशोकवनात सुरक्षित आहे हे पाहून त्याने समुद्रांत उडी मारली आणि आपली शेपटी विझविली. नंतर चूडामणी घेऊन रामाकडे परतला.

चूडामणीला पाहून रामाला आनंद झाला व हनुमान सीतेला पाहून आल्याची खात्री पटली. हनुमानाने सर्व वर्णन सांगितले.

रामाने हनुमंतास आलिंगन दिले व म्हणाला, - "हनुमाना! पाहून ये असे म्हटले होते तुला, पण तू लंकेला आग लावून आलास. तुझ्यासारखे वानर माझ्या बाजूला असता मला असाध्य असे कांहीच नाही. मी व सीता यांच्यामधे असलेले अंतर तू दूर केलेस त्याचा मला परमानंद होत आहे! तू बुद्धिमान आहेस, कीर्तिमान आहेस!"

रामाने कोदंड उचलले आणि सीतेने म्हटल्याप्रमाणे रावणाचा वध करण्यासाठी जणू कांही प्रतिज्ञाच केली.

विभीषण हा रावणाचा सावत्रभाऊ होता. "रामाशी वैर करू नकोस व सीतेला गौरवासहित रामाकडे पोचती कर आणि लंकेचे रक्षण कर," असे त्याने रावणाला परोपरीने सांगितले.

रावणाला अनावर क्रोध आला. तो म्हणाला - "तुझ्या एकट्याचा हट्ट आहे! तुझ्या मूर्खपणामुळे सर्व राक्षसकुळाचा अपमान करू म्हणतोस?" बिभीषणाला अशा शब्दांत उत्तर देऊन रावण पुढे म्हणाला - "अरे भितऱ्या! तू राक्षस कुळांत व्यर्थ जन्मलास! शूर्पणखेचा अपमान हा सर्व राक्षस जातीचा अपमान आहे, हे विसरू नकोस! तू कुळद्रोही आहेस. तू लंका सोडून चालता हो! पुन्हां दृष्टीस पडलास तर तुझा जागच्या जागी शेवट करीन!"

विभीषण आपल्या अनुचरांसह लंकेहून निघाला.





# अर्धाकच्चा वैद्य

हेलापुरीत राहाणारा गोपी दोन गाई व दोन म्हशीचे दूध विकायचा व्यापार करीत होता. एकदा त्याची ठिपकेवाली गाय आजारी पडली. त्यावेळीं गोपी सुगंधीपूरचा दुधाचा व्यापारी कल्लू याला भेटला. गोपीने कल्लूला आपल्या आजारी गाईसंबंधी सांगितले.

त्याचे बोलणे पूर्णपणे ऐकल्यानंतर कल्लूने त्याला म्हटले, "तुझ्या बोलण्यावरुन तर अगदीच स्पष्ट समजतंय कीं तुझी गाय नीट चारा खात नाही, पाणी पीत नाही, आंबोणाला तर तोंडही लावीत नाही, होय ना?" "हो रे, तसंच आहे म्हटलं तरी चालेल," गोपीने जरा चिडून उत्तर दिलं.

पण कल्लूने प्रेमळ सुरांत सांगितलं, "हे बघ गोपी, एका महिन्यापूर्वी माझी पांढरी गाय अशीच आजारी पडली होती. मला थोडीफार गुरांच्या औषधांची माहिती आहे. घमेलेभर आंबोण घेऊन त्यांत लोटाभर कडुनिंबाचा रस घातला, आणि दोन लोटे भरून हिरडा आणि कारल्याचा रस मिसळून तिला ते पाजलं. आणि बास, बघता बघता...." तो पुढे कांही सांगणार त्यापूर्वीं गोपी तिथून जाताजाता म्हणाला, "तुझं औषध काय ते समजलं. भेटूं पुन्हां!"

दोन दिवसानंतर दुःखीकष्टी झालेला गोपी कल्लूला भेटला आणि सांगायला लागला, "कल्लू, मी देखील तुझ्याप्रमाणेच उपाय केला आणि त्यानुसार गाईला खायला प्यायला दिलं, पण दुसऱ्याच दिवशी गाय मेली रे!" "अरे, माझ्या त्या औषधाने माझी पांढरी गाय पण मेली होती. म्हणून मी तुला पुढे सांगणार होतो की माझ्यासारख्या अर्ध्याकच्च्या वैद्यापेक्षां तू आपला चांगल्या पशुवैद्याला गाय नेऊन दाखव म्हणजे चांगलं! पण तू माझं बोलणं नीट ऐकलंच नाहीस आणि चालता झालास!" कल्लूने म्हटलं.

- *अनंत प्रभू*





# वात्सल्य

एका गांवात एक शेतकरी होता. त्याचा मुलगा मोहन अगदी आळशी व उनाड होता. आपल्या वडिलांच्या कामांत तो अजिबात मदत करीत नसे. गांवातल्या शाळेंत त्याला शिकायला पाठवण्याचा वडिलांनी खूप प्रयत्न केला. पण मोहनला मुळी अभ्यासाचा तिटकाराच होता. कारण धडा पाठ केला नाही म्हणून गुरुजी त्याला दोनतीन वेळा रागावले होते व मारही दिला होता. म्हणून तो शाळेंत जाईना. नुसता इकडेतिकडे टवाळकी करत हिंडत बसला. मुलाचा हा उनाडटप्पूपणा पाहून बाप घाबरला. त्याने मुलाला धाक दाखवला, धमकी दिली आणि नीट समजावले, पण कांही उपयोग झाला नाही.

मोहन मोठा झाला. वडिलांना वाटले कीं या तरण्याबांड मुलाचे लग्न करावे. कुटुंबाचे पालनपोषण करण्याची जबाबदारी पडली कीं तो आपोआप सुधारेल. लग्न झाल्यावर मोहनने लगेच वडिलांना विचारलं, "बाबा, माझा हिस्सा मला हवाय. मी माझे आयुष्य स्वतंत्रपणें जगेन."

वडिलांनी आश्चर्याने विचारले, "तुला या घरांत कोणता त्रास होतोय? तुला वेगळं व्हायला कुणी सांगितलंय? तुला जमेल तशी थोडीफार कमाई करून तू माझ्याजवळच राहिलास तर मला खूप समाधान वाटेल. तू कधी एकटा राहिलेला नाहीस की कधी पैसे कमावलेले नाहीस. वेगळं घर केलंस तर संकटात सांपडशील. तुला व्यवहारी जगाचा कांही अनुभव नाही. शिकलाही नाहीस, कामाची मुळीच संवय नाही, तेव्हां माझ्या देखरेखीखाली थोडंसं शेतीभातीचं काम शिकलास तर तुझाच फायदा होईल. आणि, माझी मालमत्ता तुझीच तर आहे. तू आणि सूनबाई, ह्यांच्याशिवाय मला दुसरं कोण आहे?" आणि पित्याच्या डोळ्यांतून अश्रू वाहूं लागले.

"बाबा, उगीच माझ्यावर प्रेम करायचं नाटक करुं नका हं! तुम्ही सारखे मला रागवत होता, माझ्याबद्दल काडीची माया वाटत नाही तुम्हाला! आजपर्यंत तुम्ही फक्त मला ओरडलात, मारलंत नि त्रास दिलात! आता मला स्वतंत्रपणे जगायची इच्छा आहे तर तुम्ही कां मधे अडथळा आणताय? मी वेगळा राहून सुखी झालो तर तुम्हाला आवडणार नाही कां?" मोहनने विचारलं.

मुलाच्या या क्षुद्र वृत्तीच्या शब्दांमुळे पित्याचे हृदय विदीर्ण झाले. काय बोलावे नि काय बोलूं नये, हेच त्याला समजेना. कांही वेळ तो स्तब्ध बसला आणि मनांतल्या मनांत स्वतःलाच दोष देत राहिला. नंतर त्याने मुलाचे म्हणणे ऐकायचे ठरवले. कांही दिवसांतच त्याला डाळतांदुळाचे भाव समजले कीं येईल परत बापाजवळ! असं मानून निराशेने तो मुलाला म्हणाला,

"ऐक पोरा! असं कधीही वाटूं देऊं नकोस. तुला हवं तिथे राहा, सुखी राहा, असंच मला वाटेल." असं म्हणून बापाने मुलाचा वांटा त्याला वेगळा काढून दिला. आपल्या वांटणीची रकम घेऊन मोहन जवळच्याच दुसऱ्या गांवात राहायला गेला. तिथे तो मोलमजुरी करुन दिवस कंठायला लागला.

एक वर्ष उलटले. मोहनला मुलगा झाला. मोहनप्रमाणे त्याचा मुलगादेखील कामचुकार आणि उनाड निघाला. त्याचे उर्मट वागणे पाहून मोहनला खूप राग येत असे. एक दिवस संतापाने पेटून मोहनने आपल्या मुलाला चांगला चोप दिला. तो घरांतून पळून गेला आणि आपल्या आजोबांच्या गांवी गेला व त्यांना सारी हकीकत सांगितली.

आजोबा नातवाला घेऊन गांवातल्या एका मित्राकडे गेले. त्याच्याशी बोलून चार दिवस नातवाला त्यांच्या घरी ठेवण्याची त्याने व्यवस्था केली.

इकडे मुलगा घरांत नाही हे पाहून मोहन घाबरला. त्याने मुलाला खूप शोधले, पण कांही उपयोग झाला नाही. मुलाला शोधतशोधत मोहन



२५ वर्षांपूर्वीची चांदोबात प्रकाशित झालेली कथा

    

शेवटी आपल्या पित्याजवळ गेला व त्याने विचारले, "बाबा, माझा मुलगा घरांतून पळून गेला आहे. तो इकडे नाही ना आला? तो कामबिम कांही करत नाही, शिकत नाही, नुसता उडाणटप्पू बनलाय. म्हणून मी त्याला चांगला मार दिला, नि तो घरांतून निघून गेला."

"गेला निघून तर जाऊं दे की! असल्या आळशी मुलाने घरांत राहिलं काय किंवा नाही राहिलं, तरी बिघडलं कुठे? तो थोडाच तुझ्या मदतीला येणार आहे? तू उगीच काळजी करुं नकोस." मोहनच्या पित्याने समजावले.

मोहन निराशेने घरी परत गेला. आपला पती एकटाच परत आलेला बघून मोहनची पत्नी रडतरडत म्हणाली, "मुलाला मार दिलात, काय मिळवलंत तुम्ही? त्याची संवय कधी तुम्ही बदललीत कां? बिचारा भुकेने कळवळून कुठे उपाशी बसला असेल कोण जाणे!"

एकुलता एक मुलगा हरवला म्हणून मोहनने अंथरुण धरले. जेवणखाण सोडून दिले आणि दिवसरात्र तो मुलाच्या आठवणी काढून रडत राहिला. त्याची पत्नीदेखील दिवसरात्र टिपे गाळीत होती. घरात सुतकी कळा दिसू लागली.

मोहनच्या वडिलांना जेव्हां ही बातमी समजली, तेव्हां त्याने नातवाला बरोबर घेतले आणि तो मोहनच्या घरी गेला. मुलाला बघून मोहनला अश्रू आवरेनात त्याने मुलाला मिठी मारली आणि तो ढसाढसा रडूं लागला.

मोहनच्या पित्याने त्याचे सांत्वन करताना म्हटले, "पोरा, बापाचे वात्सल्य असेच असते. तू मुलाला मारलेस कारण तो उनाड झाला होता. पण त्याचा अर्थ तुझे मुलावर प्रेम नाही असा नव्हे. बघ, चार दिवस तो दिसला नाही तर काळजीने तुझा चेहरा कसा सुकून गेलाय. मीदेखील तू चांगला व्हावास म्हणून तुला नेहमी रागावलो, मार दिला, शिव्यादेखील मोजल्या. मी परोपरीने सांगितले तरीदेखील तू ऐकले नाहीस आणि घरांतून निघून गेलास. तेव्हां मला किती वाईट वाटलं असेल ते तुला आता समजलं असेल!"

त्यानंतर मोहन आपल्या पत्नी व मुलासह पित्याच्या घरी परत आला. शेतामधे काम करायला लागला आणि सारीजण सुखाने एकत्र राहूं लागली.





मुनींच्या आश्रमात सुरक्षित आहे हे पाहून वनवासी राजा शांतिदेव समाधानाने प्राण सोडतो. शिकारीच्या निमित्ताने गादी बळकावणारा वीरसिंह अरण्यातील बंडखोरांचा पत्ता काढतो. जेव्हां त्याचे सैनिक रानटी श्वापदांवर हल्ला करतात. तेव्हां जयानंद त्या भूमीच्या पावित्र्याबद्दल त्याला आठवण करून देतात. वीरसिंह लगेच परत जाण्याच्या तयारीला लागतो. सरदार सुखदेवांना महत्त्वाच्या कामासाठी भेटायला जयानंद जातात.

# आर्य

## अज्ञात राजकुमाराचे रहस्य

चित्र : गांधी अय्या










जयानंद मिली पोपट व वाघाबरोबर परत जातात.

कांही दिवसानंतर....

सरदार, एक मूर्ति मिळाली आहे, सुवर्णप्रतिमा!

होय रे महादेव?

ती आत्ताच बाहेर काढली जाते आहे.

मुनींना त्या जागी घेऊन ये.

वाचकांसाठी कथास्पर्धा (ऑगस्त)

# सर्वोत्तम कथा

कथापूर्ती:



''माफ करा साहेब! माझ्याकडे परवाना असताना देखील मी पळालो व तुम्हाला विनाकारण त्रास दिला त्याबद्दल मला वाईट वाटते! पण काय करुं? माझ्यासोबतच्या मित्राकडे परवाना नव्हता म्हणून मी विचार केला कीं मी पळूं लागलो की तुमचा गैरसमज होऊन तम्ही माझा पाठलाग करणार आणि जरी तुम्ही मला पकडले, तरी तुम्हाला मी माझा परवाना दाखवूं शकतो, आणि तोपर्यंत माझा मित्र या संधीचा फायदा घेऊन जंगलाबाहेर गेलासुद्धां असेल. त्यामुळे आता तुम्ही आम्हा दोघांनाही पकडूं शकणार नाही.'' विजय विजयी हास्य करीत म्हणाला.

पोलीस अधिकाऱ्याने थोडा विचार करुन म्हटले, ''तरीसुद्धा तुला आम्ही अटक करीत आहोत!''

''ते कां म्हणून? मी काय गुन्हा केला?'' विजयने आश्चर्यचकित होत विचारले.

''गुन्हा?'' पोलीस अधिकारी म्हणाला, ''तू एकूण दोन गुन्हे केले आहेस! एक म्हणजे तुझ्याकडे परवाना असताना तू पळून जाऊन आम्हाला फसवलेस व आमचा वेळ वाया घालवलास, व दुसरे म्हणजे परवाना जवळ नसलेल्या तुझ्या गुन्हेगार मित्राला पळून जाण्यास तू मदत केली आहेस.''

हे सर्व ऐकून विजय घाबरला व त्याने मनोहरला पकडण्यास मदत केली. दोघांनी योग्य तो दंड भरला व त्यांची सुटका झाली.

**अवंतिका भालचंद्र कुलकर्णी, न्यू इंग्लिश स्कूल, सातारा, प्लॉट नं. १२, अनंत सहकारी हाऊसिंग सोसायटी, शाहूनगर, गोडोली, सातारा (महाराष्ट्र) - ४१५ ००२.**





# अजब स्वप्न

शिवराम लक्ष्मीपुरांत राहात होता. त्या गांवातल्या एका सधन परिवारांतला तो तरुण होता. त्याचे आईवडील तो लहान असतानाच वारले, म्हणून त्याच्या आत्याने त्याचे संगोपन केले. लहानपणा-पासूनच तो अत्यंत आळशी होता. शेतीचे काम कधीही स्वतः करीत नसे. सारी जबाबदारी नोकरांच्यावर टाकून तो गांवात उनाडक्या करीत वेळ घालवत असे. एकदा अमावास्येच्या रात्रीं, जेवणखाण आटोपून तो झोपी गेला, तेव्हां त्याला एक विचित्र स्वप्न पडले.

त्या स्वप्नांत त्याला दुर्गादेवीच्या मंदिरासमोर एक सोन्याचे सिंहासन दिसले. त्या सिंहासनावर तो स्वतः बसला होता, व त्याच्या डोक्यावर एक घुबड बसले आहे असे त्याला दिसले. गांवातले सारे लोक दुर्गादेवीची पूजा करण्याऐवजी त्याचीच पूजा करुन त्याला नैवेद्य दाखवत आहेत आणि दूरवर उभा असलेला एक कुत्रा त्याला पाहून सारखा भुंकतो आहे असे त्याला स्वप्नांत दिसले.

शिवराम जागा झाला. त्याला ते स्वप्न विसरता येईना. त्याने आत्याला ह्या स्वप्नाचा अर्थ विचारला. आत्या हंसत म्हणाली, ''अरे शिवराम, स्वप्नें म्हणजे देवाचा विचार असतो. ते आपल्याल समजण्याच्या पलीकडे असते. आपल्या गांवाचा अधिकारी हरीनारायण बुद्धिमान आहे. त्याला विचारलंस तर तो तुला त्याचा अर्थ सांगेल.''

शिवराम हरिनारायणला भेटला आणि त्याने त्याला आपल्या स्वप्नाबद्दल सविस्तर सांगितलं. तेव्हां हरीनारायणने म्हटलं, ''तू स्वतःला मोठा माणूस समजतोस, म्हणून तुला असं स्वप्न पडलं.''

त्यावर शिव म्हणाला, ''मी कधीही स्वतःबद्दल अशी कल्पना केलेली नाही. मी देवापेक्षां स्वतःला केव्हांही मोठा मानत नाही. तुम्ही म्हणता ते खरं आहे, असं घटकाभर समजलो तरी मग मला पाहून कुत्रा कां सारखा भुंकत होता? माझ्या डोक्यावर घुबड कां बसलं होतं?''

हरीनारायण आपले डोके खाजवीत म्हणाला,

कविता चौधरी



"आमच्या शेजारच्या गांवातल्या श्रीधरने स्वप्नां-बद्दल बरेच ग्रंथ वाचले आहेत. त्याला विचार."

शिवराम श्रीधरला जाऊन भेटला आणि त्याने आपली शंका व्यक्त केली. श्रीधर चकित होऊन शिवरामकडे टक लावून थोडा वेळ बघत राहिला. नंतर तो म्हणाला, "तुमच्या गांवात कांहीतरी अनर्थ घडणार आहे. म्हणून गांवातले लोक देवीची पूजा न करता तुझी पूजा करीत आहेत."

शिवरामला श्रीधरने सांगितलेला हा अर्थ कांही पटला नाही. त्याने विचारलं, "पण मग कुत्रा आणि घुबड यांचा तुम्ही काय अर्थ काढाल?"

"कुत्रा भुकेजलेला आहे, म्हणून सारखा भुंकतो आहे. लोक देवीची पूजा न करता, तुझी पूजा करत आहेत, म्हणून अशुभदर्शक घुबड तुझ्या डोक्यावर बसले आहे." श्रीधरने सांगितलं.

शिवराम श्रीधरचा निरोप घेऊन गांवी परत यायला निघाला. गांवात पोंचल्यानंतर दमल्यामुळे तो एका झाडाखाली विसावा घेण्यासाठी जरा बसला. तिथेंच एक बैरागी बाजूला बसला होता, त्याने विचारले, "अरे शिवराम, कांही दिवस दिसला नाहीस तू! कुठे गेला होतास कां?"

गांवातल्या लोकांनी त्या बैराग्याला वेडा ठरवलं होतं, आणि पहावं तेव्हां लोक त्याला चिडवीत. त्याची टिंगल करीत असत. शिवरामला ते माहीत होतं. म्हणून त्याने त्या बैराग्याला म्हटलं, "मला एक विचित्र स्वप्न पडलं होतं. त्याचा अर्थ लावण्यासाठी मी गांवी गेलो होतो. आत्ता हा परत येतो आहे." बैरागी हंसत म्हणाला, "त्याचा योग्य अर्थ कुणालाही सांगता आला नसेल, होय ना?"

"हो, हो, तू बरोबर सांगितलंस. कुणीही त्या स्वप्नांचा अर्थ समजूं शकला नाही. पण हे तुला कसं काय कळलं?" शिवरामने विचारलं.

'अरे मूर्खा, तुझ्या स्वप्नाचा खरा अर्थ सांगणारा एकच मनुष्य या पृथ्वीतलावर आहे. आणि तो आणखी दुसरा कुणीही नसून स्वतः मीच आहे!"

शिवरामने एक प्रदीर्घ श्वास घेतला आणि विचारले, "ठीक आहे, तर मग सांग, ह्या स्वप्नाचा काय अर्थ आहे?" आणि त्याने ते स्वप्न पुन्हां सविस्तर सांगितले. बैरागी मोठमोठ्याने हंसू लागला आणि म्हणाला, "ऐक, दिवसेंदिवस लोकांच्या मनांत देवाविषयी भक्तीभाव कमी होत चालला आहे. लोकांच्यात स्वार्थीपणा आणि आळस मोठ्या प्रमाणांत वाढतो आहे. त्याचं जिवंत उदाहरण म्हणजे तुझ्यासारख्या उडाणटप्पू आणि आळशी माणसाची लोकांनी पूजा करायची. आता सोन्याच्या सिंहासनाबद्दल सांगायचं, तर ते म्हणजे तुझ्यांत भरलेला अहंकार आणि बेफिकिरपणा याचं ते द्योतक आहे."

"पण कुत्रा कां भुंकत राहातो? माझ्या डोक्यावर ते घुबड कशासाठी?" शिवरामने विचारलं.

बैरागी उत्तरला, "तुझी आत्या तुला रोज पोटभर जेवायला घालते, आणि तुझ्याबरोबर त्या कुत्र्याला-देखील देते. पण त्या कुत्र्याला तुझा राग आहे. कारण तू कांही तुझ्या शेतांत काम करीत नाहीस, इतरांकडून करवून घेतोस आणि गांवात रिकामटेकडा हिंडत असतोस ना? कुत्र्याला तुझा तिरस्कार दर्शवायचा असेल म्हणून तो भुंकत राहातो. आता राहिली घुबडाची गोष्ट! घुबडाला अंधार आवडतो. पण त्या अंधारापेक्षांही जास्त काळोखी, आळस आणि अज्ञानांत आयुष्य घालवणाऱ्या तुझ्यासारख्या आयतोबाच्या जीवनांत कायम असते. म्हणून ते घुबड मोठ्या प्रेमाने तुझ्या आसऱ्याला आले!"

शिवरामने हात जोडून म्हटले, "तू कांही वेडा नाहीस, खूप बुद्धिमान आहेस. तुझा स्वप्नाचा अर्थ सांगायची पद्धत आणि विवरण मला फारच आवडलं. आज माझे डोळे उघडले आहेत!"

शिवराम तिथून जायला निघाला, तेव्हां बैराग्याने त्याला थांबवून म्हटले, "पहा, जेव्हां सारा गांव मला ओरडून वेडा ठरवतो, तेव्हां मी वेडा नाही असे सांगणारा तू रे कोण टिकोजीराव? जा, जा, आता मला मुळीच या गांवात राहायचं नाही." असं म्हणून बैरागी तिथून निघून गेला.





# सज्जनांची संगत

**त्या** गांवातल्या मोठ्या शेतकऱ्यांच्या यादीत भूषणचे नांव होते. त्याचे मोठे प्रशस्त घर होते. चारी भाऊ त्या घरांत राहात होते. रोज संध्याकाळीं घरांतली व शेजारपाजारची मुले एकत्र जमत व खूप खेळत. त्यांचा बराच आरडाओरडा चालू असे.

एके दिवशी सूर्यास्तानंतर अंधार पडला तेवढ्यांत घरासमोर एक घोडागाडी येऊन थांबली. कुतुहलाने मुले गाडीतून कोण आलंय ते पाहायला लागली. तितक्यांत आळीतल्या पारावर बसलेले भूषण आणि त्याचा धाकटा भाऊ उठून गाडीजवळ आले आणि गाडींतून उतरणाऱ्या म्हाताऱ्या स्त्रीला म्हणाले, ''काकू, कशी आहेस? प्रकृति ठीक आहे ना?''

त्या वृद्ध स्त्रीला पाहून मुलांचे चेहरे आनंदाने उजळले. ते ओरडत सुटले, ''आजी आली, आजी आली.'' असं म्हणून त्यांनी आजीला गराडाच घातला.

ती वृद्धा भूषणची काकू सावित्री होती. तिथून चार कोस अंतरावरच्या गोकुळगांवात ती राहात होती. भूषणचे कुटुंब व त्यांची मुले यांच्यावर तिचा विशेष लोभ होता. ती त्यांना इतक्या छान गोष्टी सांगायची कीं गोष्टी ऐकताना मुलांना जेवायची आठवण राहात नसे.

रात्र झाली. जेवणानंतर सारी मुलें अंगणात जमली. आजीने भूषणच्या धाकट्या मुलाकडे बघत म्हटले, ''अरे गोपू, हाताला ही पट्टी कां रे बांधली आहेस?''

गोपूने कांही बोलण्याअगोदर भूषणची बायको तिथे उभी होती. तिने आजीला सांगितले, ''सासूबाई, शाळेंतल्या खोडकर मुलांशी याची मैत्री असते. सारखी त्यांची मारामारी होत असते आणि रोज हा जखमा घेऊन घरी परत येतो!''

त्यावर आजीने गोपूला आपल्या मांडीवर बसवले आणि म्हटले, ''हादेखील खटयाळ असेल. एक खटयाळ दुसऱ्या खटयाळाशी मैत्री करतो.''

आजीच्या गोष्टी : ललित जोशी

आणि आजी पुढे गोपूला सांगायला लागली, ''गोपाळा, लक्ष देऊन ऐक. सर्वांत उत्तम काय असेल तर सज्जनांची संगत. त्याचा अर्थ आहे, चांगल्या लोकांशी मैत्री करावी. आता मी तुम्हाला अशाच सज्जनांच्या संगतीबद्दलची एक गोष्ट सांगणार आहे. सर्वांनी नीट ऐकायची हां!'' आणि आजीने गोष्ट सांगायला सुरवात केली.

खूप वर्षांपूर्वीची गोष्ट आहे ही. रामापूर गांवात एक भूस्वामी नांवाचा दयाळू व धार्मिक वृत्तीचा गृहस्थ राहात होता. त्याला श्रीकांत नांवाचा एक मुलगा होता. तोही वडिलांसारखाच सुस्वभावी होता. सर्वांशी तो प्रेमाने, आदराने वागत असे. लोक त्याची नेहमी स्तुती करीत असत.

त्याच गांवात राजीव नांवाचा एक शेतकरी होता. त्याला सोमदेव नांवाचा मुलगा होता. तो जरा खोडकर होता, पण अभ्यास करण्यांत तो कधी मागे राहिला नाही. त्याची ही आवड पाहून राजीवने आपल्या मुलाला गांवातले शिक्षक नारायण त्रिवेदी यांच्याकडे अभ्यासासाठी पाठवायला सुरवात केली.

श्रीकांतही तिथे शिकवणीसाठी येत असे. तो सोमदेवशी प्रेमाने बोलत असे. पण सोमदेवचे वागणे मात्र निराळे होते. तो श्रीकांतची पर्वा करीत नसे. प्रत्येक बाबतींत सोमदेव बढाया मारीत उर्मटपणे वागत असे.

कांही दिवसानंतर दोघांचाही अभ्यासक्रम पूर्ण झाला. जास्त शिकण्यासाठी म्हणून श्रीकांत तिथून कांही मैलांच्या अंतरावर असलेल्या जमीनदारांच्या पाठशाळेंत जाऊं लागला. राजीवने



श्रीकांतच्या वडिलांना सांगून सोमदेवला पण त्याच गाडीतून त्या शाळेत शिकण्याची व्यवस्था केली.

एका दिवशी सोमदेवने बरोबर शिकत असलेल्या जमीनदारांच्या मुलाला, राजाला, मुद्दाम एक दगड मारला. राजाच्या डोक्याला खोक पडली आणि भळाभळा रक्त वाहूं लागले. ही बातमी साऱ्या शाळेंत आगीसारखी फैलावली.

मुख्य शिक्षक विष्णुशर्मा यांनी वैद्याला निरोप धाडला आणि जखमेवर एक ओले फडके ठेवून त्यांनी विचारले, ''राजाला दगड कुणी मारला? हा दांडगेपणा कुणी केला?'' ते चिडले होते.

हा प्रश्न ऐकून सोमदेव घाबरला आणि भीतीने थरथर कांपायला लागला. दोन तीन विद्यार्थ्यांनी याबाबतीत सोमदेवचे नांव घेतले. ते ऐकून

विष्णुशर्मा आश्चर्यचकित झाले. त्यांनी विचारले, "सोमदेव तर आमच्या श्रीकांतला मित्र आहे. तो बापडा असं कशाला करील?"

त्यांचे हे शब्द ऐकून सोमदेवचे डोळे पाणावले. आपण किती वाईट आहोत, आणि श्रीकांत किती चांगला आहे, हे त्याला आता समजले. आपल्या दुष्ट स्वभावाचा त्याला पश्चात्ताप होऊं लागला.

विष्णुशर्माने सोमदेवकडे बघितले आणि ज्या मुलांनी त्याला दोष दिला होता, त्यांना म्हटले, "बघा, मी त्याला रागावलो नाही तरीदेखील त्याला वाईट वाटते आहे. तो बिचारा असं करील कां? यापुढे उगीच कुणाही निर्दोष माणसावर दोष लादू नका!"

त्यानंतर राजाने सोमदेवकडे स्नेहशील नजरेने बघत म्हटले, "सोमदेव फक्त श्रीकांतचाच नाही, तर माझाही मित्र आहे. तो असल्या खोड्या कधीही करणार नाही."

हे ऐकून सोमदेव गप्पच बसला. त्याच्या तोंडातून एक शब्ददेखील निघेना. स्वतःला सावरुन तो विष्णुशर्मांच्या जवळ गेला व खाली मान घालून म्हणाला, "गुरुजी, राजाच्या अंगावर मीच दगड फेकला होता. राजा आणि श्रीकांत फार चांगले आहेत, म्हणून ते मला निर्दोषी मानत आहेत. पण मला त्यासाठी शिक्षा करा."

सोमनाथला पश्चात्ताप झाला होता. ते पाहून विष्णुशर्मा कांहीतरी सांगणार होते. तितक्यांत राजा व श्रीकांत त्यांना म्हणाले, "गुरुजी, सोमदेवने दगड मारला हे आम्हाला ठाऊक होतं. पण आता त्याला आपल्या चुकीबद्दल वाईट वाटतंय हे जेव्हां आम्हाला दिसलं. तेव्हां आम्ही मुद्दामच त्याला निर्दोषी आहे असं म्हटलं. कृपा करुन त्याला शिक्षा करुं नका."

दोघा मित्रांच्या या दिलदार वृत्तीमुळे विष्णुशर्मा फारच खूष झाले. ते सोमनाथला म्हणाले, "बघ सोमनाथ, आता तुला समजलं असेल कीं सज्जनांची संगत किती महत्वपूर्ण असते ती!"

मुलें खूष होऊन म्हणाली, "हो, हो, आम्हालाही छान समजलं, यापुढे आम्ही चांगल्या लोकांशीच मैत्री करुं."







# अस्वल्या मांत्रिक

## 15

*(आपल्या साथीदारांसह कालीवर्माने किल्ल्यांत प्रवेश केला. मायामर्कटाने त्याला एक मुंडके दाखवले. ते दुर्मुखराजाचे मस्तक नव्हते हे ह्यांना समजले. ते सगळीकडे राजाला शोधूं लागले. शेवटी त्यांनी दुर्मुखला सिंहासन असलेल्या दालनांत बसलेले पाहिले. दुसऱ्याच क्षणीं वधिकाने हत्तीवरुन खाली उडी घेतली आणि परशू घेऊन सभामंडपात तो वेगाने गेला. त्यानंतर...)*

अस्वल्या वधिक आंत येताच कांहीतरी दुर्घटना घडणार असं कालीवर्माला जाणवलं. हत्तीवर बसलेल्या वन्यचराला तो म्हणाला, "अरे बाबा, चटकन जा आणि दुर्मुख राजाचा शिरच्छेद करणाऱ्या अस्वल्याला आवर" आणि आवाज उंचावून तो ओरडला, "अरे अस्वल्या बधिका, थांब, थांब! हा मी आलोच. राजाला मारुं नकोस."

कालीवर्माची आज्ञा ऐकल्यावर हत्तीवरचा माणूस खाली उतरून वधिकाला थांबवण्याच्या उद्देशाने त्याच्यासमोर उभा राहिला आणि म्हणाला, "अस्वल्याबुवा, घाई करुं नका हो! राजाचा शिरच्छेद करायचा नाही असं कालीवर्मा सांगताहेत."

अस्वल्या वधिकाने संतापून म्हटलं, "अस्वल्या मांत्रिकाने मला त्याचे मस्तक घेऊन ये, अशी आज्ञा दिली आहे. जर मी त्यांची आज्ञा पाळली नाही, तर ते माझं अस्वल करुन टाकतील."

तेवढ्यांत कालीवर्मा तिथे पोंचला. सिंहासनावर



कांही न बोलताहालता स्तब्ध बसलेल्या दुर्मुख-राजाला त्याने पाहिले आणि विचारले, ''ह्या राजाला काय झालंय? डोळे मिटून हा स्तब्ध कां बसला आहे?''

अस्वल्या वधिकाने खांद्यावर परशू ठेवून म्हटले, ''कालीवर्मा मालक, आपली काय आज्ञा आहे ते सांगावं.''

कालीवर्मा दुर्मुखच्याजवळ आला, ''वधिका, तुला ह्याचे मस्तक धडावेगळे करावे लागणार नाही. कारण हा आधीच मेलेला आहे. असं कसं झालं असेल? हातांत परशू घेऊन तुला येताना पाहिल्यावर भीतीने ह्याचं हृदय तर बंद पडलं नसेल?''

''तोंच अस्वल्या वधिकाने दुर्मुखचे मस्तक छाटले ना?''

असं म्हणत मांत्रिक आंत आला. सिंहासनावर निश्चेष्ट बसलेल्या राजाला नीट पाहून तो म्हणाला, ''बिचारा! हा प्राणभयाने बेशुद्ध पडलेला दिसतोय. नंतर आपली तलवार राजाच्या खांद्याला लावीत त्याने म्हटलं, ''दुर्मुखराजा, शुद्धीवर ये. भिण्याचे कारण नाही. मी तुला आश्वासन देतो आहे.''

दुर्मुखने चटकन डोळे उघडले आणि आपल्या डोक्याला हात लावीत म्हणाला, ''वा! माझे डोके किती मजबूत आहे. अस्वल्या वधिकाने आपला परशू फेंकला, तरी हे डोके जसेच्या तसे आहे!''

त्यांच्या बोलण्यावर सगळेच हंसायला लागले. सिंहासनावरुन उठून दुर्मुख म्हणाला, ''कालीवर्मा, इथे मांत्रिक वगैरे सगळेच हजर आहेत. आणखी एकदा सिंहासनावर बसायची माझी दुर्दम्य इच्छा आहे. मग नंतर माझा शिरच्छेद झाला तरी मला त्याची चिंता नाही.''

कालीवर्माने दुर्मुखचे खांदे पकडून त्याला सिंहासनावर बसवले आणि म्हटले, ''राजा दुर्मुख, आपण आमचे मित्र आहात. जे झालं ते विसरुन जा. ज्या सूर्यभूपतीने तुमचा किल्ला बळकावला, आणि तो मायामर्कट, ज्याने माझे गुरु अस्वल्या मांत्रिक यांचा मंत्रदंड चोरलाय, ते दोघेही एकत्र आले आहेत. आधी आपण त्यांना पकडलं पाहिजे.''

कालीवर्माचे हे शब्द ऐकल्यानंतर दुर्मुखराजा आनंदाने फुलून निघाला. झटकन तो सिंहासना-वरुन खाली उतरला व सर्वांच्या मधे येऊन आपली तलवार उंचावून मोठ्या आवाजांत ओरडला, ''ऐका, मी उदयगिरीचा राजा तुम्हाला आज्ञा देतो आहे. माझ्या सर्व विश्वासू सैनिकांनी इकडे यावं.



जे येणार नाहीत, ते राजद्रोही मानले जातील आणि त्यांची डोकी उडवली जातील.''

क्षणार्धात किल्ल्याच्या प्रत्येक बाजूने सैनिक तिथे येऊं लागले. कालीवर्माने त्यांची संख्या मोजली आणि दुर्मुखराजाला म्हटले, ''दुर्मुखराजे, तुमचे एकूण सैनिक चाळीसपेक्षां जास्त नाहीत. उदयगिरीच्या राजाकडे फक्त इतकेच सैनिक?''

दुर्मुखराजाने मान खाली घातली व उत्तर दिले, ''कालीवर्मा, सूर्यभूपतीने पैशाची लालूच दाखवून माझे सारे सैनिक फितवले आहेत. आधी त्या फितुराला आपण शोधून पकडलं पाहिजे.''

कालीवर्माने अस्वल्या मांत्रिकाला विचारले, ''गुरु, आता आपली काय आज्ञा आहे?'' मांत्रिक सभामंडपाच्या भिंतीलगत उभा होता आणि तो किल्ल्याच्या भिंती निरखून पाहात होता. त्याला आपला मंत्रदंड हरवल्याचीच काळजी जास्त होती. त्याशिवाय त्याच्या मनांत विचार आला कीं जर तो हा प्रदेश सोडून निघून गेला तर दुर्मुखराजा शत्रूच्या हाती सांपडेल आणि त्याचे हाल होतील. आहे त्या परिस्थितींत कालीवर्मादेखील त्याच्या गुरु अस्वलपादाकडे यायला नकार देईल.

असा विचार मनांत येऊन मांत्रिक कालीवर्माला म्हणाला, ''शिष्य काली, माझ्या आज्ञेचं राहूं दे! तुला काय करायचे आहे ते सांगशील?''

कालीवर्माने उत्तर दिले, ''गुरु, हा काय प्रश्न झाला? एकदा आपण इच्छा व्यक्त केलीत कीं आपले गुरु अस्वलपाद यांच्या राहण्याच्या पर्वताकडे आपण जायचे आहे. आपण ते विसरलात कीं काय?''



त्याचे हे उत्तर ऐकून खूष झालेल्या मांत्रिकाने म्हटले, ''शिष्य काली, तुझी गुरुभक्ती प्रशंसनीय आहे. माझे गुरु भल्लूकपाद एका मांत्रिकामुळें आज बिकट परिस्थितीशी सामना करीत आहेत. ते संकटात सांपडले आहेत. त्यांना तुझ्यासारख्या धाडसी आणि पराक्रमी माणसाची मदत हवी आहे. त्याच्यासाठी प्रतिफळ म्हणून तुला काय पाहिजे ते निःसंकोच मनाने सांग.''

क्षणभर विचार करुन कालीवर्मा म्हणाला, ''गुरु, प्रतिफळाच्याबद्दल आपण नंतर बोलूं या. जितकेतु राजाने जेव्हां मला शिरच्छेदाची शिक्षा सुनावली, तेव्हां त्यावेळी आपण मला मोलाची मदत केली होतीत. तेव्हां आपल्याला कोणतीही मदत करण्याचे वचन मी देऊन चुकलो आहे. आता मी काय करायला हवे त्याची आज्ञा तेवढी करा.''



"तर मग तू माझ्याबरोबर ब्रह्मपुत्रा नदीच्या उगमाजवळ असलेल्या अस्वली पर्वतराजीकडे आलं पाहिजेस." अस्वल्या मांत्रिकाने म्हटलं.

"आपली आज्ञा शिरसावंद्य आहे. चलावं!" असं म्हणून कालीवर्मा जायला निघाला.

दुर्मुखराजा थरथर कांपत म्हणाला, "मांत्रिक महाराज, मला वाटतं आपण माझी गोष्ट विसरुन गेलात. इतक्या कमी सैनिकांना घेऊन पुन्हां राज्याचा कारभार चालवणं हे माझ्यासाठी अशक्य आहे. मी देखील आपल्याबरोबर अस्वली पर्वताकडे येतो."

अस्वल्या मांत्रिक त्याला कांहीतरी सांगणार होता. त्यापूर्वी अस्वल्या वधिकाने परशु जमिनीवर टाकला आणि रडक्या स्वरांत म्हणूं लागला, "महाराज, आपण मला विसरलात कीं काय? आपण सगळे इथून गेल्यानंतर माझा जुना स्वामी जितकेतु राजा मला आज्ञाभंगाच्या आरोपाखाली मला अत्यंत कठोर शिक्षा देतील. मलादेखील बरोबर घेऊन चला ना!"

अस्वल्या मांत्रिक मंदहास्य करीत वधिकाच्या खांद्यावर हात ठेवून म्हणाला, "अरे वधिका, घाबरुं नकोस! तुझी आणि दुर्मुखराजाची गोष्ट मी विसरलो आहे असं समजूं नकोस. तुमची दोघांची नीट व्यवस्था लावून मी नंतर इथून निघून जाईन. चंद्रशिला नगराच्या राजा जितकेतुने कालीवर्माचा व माझाही अपमान केला आहे. आपण त्यांच्या नगरांत जाऊन त्यांचा पराभव करायचा आहे."

"त्या घमेंडखोर राजाचा मंत्री जीवगुप्त कांही सैनिकांसाठी किल्ल्याच्याबाहेर पहारा देतो आहे. तो आपल्यावर अचानक हल्ला करणार नाही, यासाठी उग्रदंड राक्षस आवश्यक ती काळजी घेतो आहे आणि त्याला थोपवून धरण्यांत तो गुंतला आहे. आता किल्ल्याच्या कोणत्या कोपऱ्यांत सूर्यभूपती आणि तो मायामर्कट लपून बसले आहेत हे अजून आपल्याला माहीत नाही." कालीवर्माने सांगितलं.

त्याबरोबर अस्वल्या वधिकाने हातांत परशू घेऊन म्हटले, "कालीवर्मा महाराज, मी हत्तीवर बसून प्रथम किल्ल्याच्या बाहेर जातो, आणि तिथली परिस्थिती बघून येतो. उग्रदंड राक्षसाच्या मदतीला मी तिथे गेलो ना, कीं तिथले सैनिक व मंत्री चंद्रशिला नगराकडे पळतच सुटतील."

"ठीक आहे, तू तिथे जाणे योग्यच ठरेल. आम्ही देखील इथे तो मांडलिक व मायामर्कटाला शोधून पुन्हां याच जागी परत येऊं." कालीवर्माने सांगितलं.



"अरे ए वनवासी, या बाजूने हत्ती जरा पुढे घे पाहूं." वधिकाने त्या माहूताला उद्देशून म्हटले.

हत्ती तिथे येताच अस्वल्या वधिक त्याच्यावर स्वार झाला. तोपर्यंत दुर्मुखराजा हे सारं निमूटपणें बघत होता. त्याने मांत्रिकाला विचारले, "मांत्रिक महाराज, इतके कमी सैनिक बरोबर असले तर माझे किल्ल्याच्या आंत राहाणे उचित ठरणार नाही. कोणत्याही क्षणी शत्रू माझ्यावर तुटून पडेल. मी पण तुमच्याबरोबर चंद्रशिला नगराकडे येतो."

त्यानंतर सारेजण सभामंडपातून खाली आले. मग त्यांनी सैनिकांना आज्ञा दिली कीं सूर्यभूपती व मायामर्कटाच्या शोधासाठी त्यांनी निघावे. तेवढ्यांत किल्ल्याच्या तटावर उभा असलेला दुर्मुखराजाचा अंगरक्षक मुक्तकंठाने ओरडायला लागला, "महाराज, आपले मांडलिक, मायामर्कट जितकेतू राजाच्याबरोबर उभे आहेत. ते राक्षसा-बरोबर बोलत आहेत."

"गुरु, असं कांहीतरी घडणार अशी मला शंका होतीच. जळलेल्या प्रवेशद्वारापाशी आपण कांही सैनिक उभे करायला हवे होते. हे दुष्ट लोक बहुतेक उग्रदंड राक्षसाला आपल्या पक्षांत घेण्याचा प्रयत्न करीत असतील." कालीवर्माने शंका बोलून दाखवली.

'कालीवर्मा, त्यांचे प्रयत्न कधीही यशस्वी होणार नाहीत. त्या राक्षसाला माझ्याकडून कांही भरघोस मदत हवी आहे. म्हणून तो त्यांना सामील होणार नाही." अस्वल्या मांत्रिक म्हणाला.

कालीवर्माची शंका बरोबर ठरली. जितकेतूचा मंत्री जीवगुप्त हा उग्रदंडाला आपल्या पक्षांत ओढण्याचे अतोनात प्रयत्न करीत होता. त्याने



तऱ्हेतऱ्हेची आमिषें उग्रदंडाला दाखवली. मायावी मर्कटाच्या रुपांतला भ्रांतिमतीदेखील जीवगुप्ताची री ओढत होता व उग्रदंडाला लालूच दाखवीत होता.

उग्रदंडाने आपली दगडी गदा वर उचलीत म्हटले, "मला तुमची कुणाचीही मदत नको आहे. अस्वली पर्वतरागांमधे माझा एक भाऊ बंदी आहे. त्याला सोडवायचे हेच माझे एकमेव ध्येय आहे."

त्याच्या या बोलण्याची टर उडवण्याच्या हेतूने मायामर्कट म्हणाला, "उग्रदंडा, तो तुझा भाऊ आणखी कोण आहे? तुझाच थोरला भाऊ नव्हे कां? अरे, तो सुटण्याचा प्रश्नच उद्भवत नाही. माझे गुरु तांत्रिक मिथ्यामिश्र यांनी त्याला केव्हांच जमिनीत गाडून टाकलंय. तू मुकाट्याने जितकेतू महाराजांच्या आश्रयाला राहा आणि

शांतपणे आनंदात जग. असे करणे तुझ्यासाठी श्रेयस्कर आहे.''

''त्या तांत्रिकाने माझ्या भायाला खरोखरीच मारुन टाकलंय कां? कीं तू खोटे बोलतो आहेस?'' असं म्हणून उग्रदंडाने दांतओठ आवळले.

मायामर्कट उत्तर म्हणून कांहीतरी बोलणार त्यापूर्वीच जीवगुप्त मंत्र्याने त्याला थांबवून म्हटले, ''उग्रदंडा, जे कांही झालं ते तू विसरुन गेलास तर बरं! तू जर आमच्याबरोबर राहिलास तर आम्ही अभिमानाने सांगू कीं आमच्या राज्यांतही एक बलवान राक्षस आहे. त्याशिवाय महाराजांच्या आश्रयाखाली तू अगदी शांतपणे सुखासीन आयुष्य काढूं शकशील.''

''म्हणजे तुम्हाला असं म्हणायचंय कीं माझ्याकडून कोणत्याही मदतीची अपेक्षा न करता तुमचा राजा माझा पाहुणचार करीत राहील! होय ना?'' उग्रदंडाने विचारले.

''तुझ्याकडून एकच मदत आम्हाला हवी आहे. आम्ही आता किल्ल्यांत प्रवेश करणार आहोत. तिथे अस्वल्या मांत्रिक आणि कालीवर्मा नांवाचे दोघे अपराधी आहेत. तिथे दुर्मुखराजा-सुद्धां आहे. बस्, या तिघांचा सर्वनाश करण्यांत तू आम्हाला मदत कर. झालं, एवढीच मदत तुझ्याकडून आम्हाला हवी आहे.'' जीवगुप्ताने म्हटलं.

उग्रदंड त्याचे उत्तर देणारच होता, तितक्यांत रेड्यावर बसलेल्या अस्वल्या मांत्रिकाबरोबर सारेजण किल्ल्याबाहेर आले.

त्यांना पाहून मंत्री भेदरुन गेला. काय करावे ते त्याला सुचेना. त्याने लागलीच घोड्यावर स्वार असलेल्या सूर्यभूपती व मायामर्कटाकडे नजर टाकली.

उग्रदंड राक्षसाने जोराने हुंकार काढीत म्हटले, ''मंत्रीबाबा, तुम्हाला माझी मदत हवी आहे ना? तर मग ही घ्या माझी तुम्हाला आणि दुष्ट मंडळींना मदत!'' आणि बोलताना आपली दगडी गदा त्याने मायामर्कटांवर फेकली.

मायामर्कटाने किंचाळत घोड्यावरुन वर उडी घेतली. उग्रदंडाची गदा घोड्याच्या डोक्याला लागली.

*(क्रमशः)*





वेताळ-कथा

# पहारेकरी भूत

निश्चयाचा पक्का विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला. झाडावरचे प्रेत त्याने खाली उतरवले, खांद्यावर घेतले, आणि त्याने स्मशानाची वाट धरली. प्रेतांत लपलेला वेताळ त्याला म्हणाला, ''राजन्, तुझा हट्ट खरोखर कौतुकास्पद आहे. इतक्या प्रयत्नानंतर देखील यश मिळाले नसले तरी तू निराश झालेला नाहीस. तू आपला शब्द पाळण्यासाठी तुझा जीव धोक्यांत घालतो आहेस! तुझा थकवा दूर करावा म्हणून मी तुला आता विचची कहाणी सांगतो. संपत्तीची हांव धरल्यामुळें त्याचे एका पहारेकरी भुतांत रुपांतर झाले होते.'' आणि वेताळाने पुढील गोष्ट राजाला सांगितली.



''फार वर्षांपूर्वी सुधन नांवाच्या एका व्यापाऱ्याने परदेशांत हिंडून अपार धन कमावले होते. शेवटी तो भाग्यपुरांत स्थायिक झाला. त्याचा तिथे एक लहानसा खजिनाच होता. त्याच्या राखणीची जबाबदारी त्याच्या पत्नीचा नातेवाईक विघ्न ह्याच्यावर त्याने सोंपवली होती. विघ्न काय करतो ते त्याच्या नकळत देखरेख ठेवून सुधन बघत होता.

पण हे कांही विघ्नला माहीत नव्हतं. तो दररोज खजिन्यांतल्या थोड्या मोहोरा चोरुन आपल्या घरी घेऊन जात असे.

ही गोष्ट सुधनने आपल्या पत्नीला, सुमतीला सांगितली. तिने ताबडतोब विघ्नला बोलावून रागवायचे ठरवले. पण सुधनने तिला थांबवून म्हटले, ''हे बघ, त्याच्या चोरीमुळे आपल्याला कांही फरक पडत नाही. थोडी संपत्ती कमी होईल, इतकेच! वाईट इतकंच वाटतं कीं ज्याच्यावर विश्वास ठेवला, त्यानेच धोका दिला. मी त्याच्यावर लक्ष ठेवीन. किती दिवस चोरी करतोय ते तरी पाहूं! योग्य वेळ आली कीं त्याला पकडून चांगला धडा शिकवीन.''

सुमती त्यावर म्हणाली, ''आपलं नुकसान होत नसेल तर आपण गप्प बसावं, किंवा त्याला सावध करावं! पहारेकऱ्यावर आपण पहारा देत बसण्यापेक्षां आपल्या खजिन्यावर आपणच राखण करावी कीं!''

सुधन हंसून म्हणाला, ''अग, सगळ्या खजिन्याची राखण करायची हे फार मोठं काम आहे. तेच तर विघ्न सांभाळतोय. पण त्याच्यावर पहारा ठेवणं हे छोटं काम आहे आणि ते मी करतो आहे. आपलं नुकसान मोठं नाही, पण तो जे करतोय ते चूक आहे. ते त्याला समजायला वेळ लागेल.''

बघता बघता विघ्नने ज्या मोहोरा लुटल्या होत्या, त्यांनी दोन घागरी भरल्या. त्या घागरी त्याने मागील दारच्या अंगणात खड्डा खणून त्यांत पुरल्या.

आणखी कांही दिवसांनी सुधनने विघ्नला बोलावून त्याला सांगितले, ''माझे तुझ्यावर सतत लक्ष होते. खजिन्यावर पहारेकरी म्हणून मी तुला नेमले. पण तू विश्वासघात केलास आणि स्वतःच चोरी करीत होतास. माझी संपत्ती घागरींत भरुन त्या तुझ्या मागल्या अंगणात तू जमिनींत लपवल्या आहेस. सांग, ह्यावर तुला काय म्हणायचे आहे?''

विघ्न घाबरला. सुधनच्या पायांवर डोके ठेवून तो म्हणाला, ''हो, माझं फारच चुकलं यापुढे मी अशी चूक करणार नाही. इमानाने काम करीन. मला क्षमा करा.'' त्याने शपथ घेऊन सांगितले.

सुधन म्हणाला, ''तू माझ्या पत्नीचा नातलग आहेस, म्हणून तुला माफ करतो आहे. त्याबरोबर ती चोरलेली संपत्ती तुलाच देतो आहे. पण अट एवढीच कीं तू आपली लायकी सिद्ध करुन दाखव नाहीतर मी तुला कोतवालाच्या स्वाधीन करीन.''

विघ्नने हात जोडून म्हटले, ''तुम्ही महान आहात, उदार मनाचे आहात. माझी लायकी सिद्ध करण्यासाठी मी काय करुं ते तुम्हीच सांगा!''

सुधनने लगेच सांगितलं, ''तू जी माझी संपत्ती चोरली आहेस, ती एका आठवड्याच्या आंत तुझ्या नकळत मी चोरुन घेईन. तू राखणदार आहेसच तेव्हां मला थांबवता आलं तर थांबव, आणि स्वतःची लायकी सिद्ध कर.'' आणि त्याने त्याला घरी पाठवून दिलं.

सुमतीने जेव्हां सुधनला याचा खुलासा विचारला, तेव्हां तो म्हणाला, ''मी पूर्वी त्याला सावध केले असते तर आपल्या मूठभर मोहोराच फक्त गेल्या असत्या. पण आता त्याला दोन घागरी भरुन असलेल्या संपत्तीचे रक्षण करायचे आहे. त्यामुळे विघ्नला आयुष्यभर दुःखी राहावं लागेल. त्याच्या चुकीसाठी हाच त्याला योग्य धडा आहे.''



विघ्नने जेव्हां हे त्याच्या पत्नीला सांगितलं, तेव्हां ती खूष होऊन म्हणाली, ''त्यासाठी आपल्याला देवाची मदत हवी. गांवाबाहेरच्या डोंगरांतल्या एका गुहेत एक सिद्धपुरुष राहातात. तुम्ही त्यांची मदत घ्या.''

त्यानुसार विघ्न गेला व साधुला त्याने सविस्तर माहिती दिली. साधु त्याला म्हणाला, ''मी तुला मंतरलेले भस्म देतो. जिथें तू हे भस्म शिंपडशील, तिथें लपवलेल्या संपत्तीला एक आठवडाभर तरी कुणीही स्पर्श करुं शकणार नाही. अगदी सुधनदेखील नाही. परंतु तो या संपत्तीचा खरा मालक आहे आणि तू त्याला मनाई करतो आहेस. हे पाप आहे. या पापामुळे तुझ्यावर संकट येऊं शकेल. तरीसुद्धां तू हे कां करतो आहेस?''



विचने पापांचा भार डोक्यावर घेतला आणि साधूच्या सांगण्याप्रमाणे करायला तो तयार झाला.

भस्माच्या प्रभावामुळे सुधनचे प्रयत्न असफल ठरले. व ती संपत्ती विचची आहे असे त्याला मान्य करावे लागले. विच खूष झाला. पण लगेच एकाएकी त्याच्या शरीराची आग होऊं लागली. तो घाबरुन साधुकडे पळत गेला.

साधुने म्हटलं, "सुधन सज्जन आहे. तू त्याची संपत्ती चोरली आहेस. आणि त्याला रोखण्यासाठी माझे भस्म वापरलेस! ह्या पापामुळे तुझे शरीर जळते आहे. ही पीडा आता तुला जन्मभर सहन करावी लागेल. नाहीतर तुला भूत बनून या संपत्तीची राखण करावी लागेल. काय करायचं ते नीट विचार करुन ठरव. मात्र कांही झालं तरी ही गोष्ट तुझ्या पत्नीलादेखील सांगायची नाही."

शरीराची पीडा असह्य झाल्यामुळे साधूच्या मदतीने विचचे एक भुतांत रुपांतर झाले. आपले हिडीसरुप पाहून त्याने दुःखाने साधूला विचारले, "या रुपांत मी किती दिवस राहायचे, महाराज?"

"सुधनने जी संपत्ती तुला दिली ती तू पगार म्हणून जर मानलास तर त्यासाठी जितकी वर्षे काम करावे लागले असते, तितकी वर्षे तू भूत होऊन राहाशील." साधूने सांगितले.

"म्हणजे मला आता शंभर वर्षे काम करावे लागेल. त्याच्याअगोदर यांतून सुटका होण्याचा कांही उपाय नाही कां?"

"जे घडलं, ते तू जाणूनबुजून केलंस! त्याची जबाबदारी तुझी आहे. ती तू आता सांभाळ. जर तुझं नशीब जोरावर असेल तर दुसरं एखादं पहारेकरी भूत जेव्हां तुला शोधत येईल तेव्हांच तुला मुक्ति मिळेल." असं सांगून साधूने विचला परत पाठवलं.

आता सुधनने दिलेल्या संपत्तीवर विच पहारेकरी होऊन भुताच्या रुपांत राहिला. त्याच्या पत्नीला व मुलाला विच कुठे गेला ते कळले नाही. त्या दोघांनी जमिनीत पुरलेल्या घागरी काढायचा प्रयत्न केला, पण ते भूत तिथे आले व त्याला बघून ती दोघे खूप घाबरली. ते भूत म्हणजे विच होता हे त्यांना ठाऊक नव्हते. भुताच्या भीतीने विचची बायको मुलासह ते गांव सोडून दुसऱ्या गांवी राहायला गेली. पण सुधनला मात्र वाटलं



कीं विच चोरलेली संपत्ती घेऊन, सहकुटुंब परागंदा झालेला आहे.

अशीच कांही वर्षे गेली. विचच्या रिकाम्या घरांत देवनाथ नांवाचा एक इसम सहपरिवार राहायला आला. तो कमालीचा कंजूष होता. त्याला एक मुलगा व एक मुलगी होती. पैसे खर्च होऊं नयेत म्हणून तो मुलीचे लग्न लांबणीवर टाकीत होता. शेवटी त्याच्या आईने मुलीचे लग्न करुन दिले. बापाच्या स्वभावाला कंटाळून मुलगा घर सोडून गेला. त्या दुःखाने त्याची बायकोही वारली.

पण देवनाथला त्याचे वाईट वाटले नाही. एके दिवशी शेजाऱ्याच्या घरी सत्यनारायणाची पूजा होती. पूजेनंतर शेजाऱ्याने देवनाथला दोन आंबे प्रसाद म्हणून दिले. आंबे उत्तम प्रतीचे होते. देवनाथला वाटलं कीं त्या कोयी जमिनीत पुराव्या, म्हणजे तशीच चांगली फळें देणारी झाडे होतील. तो कुदळ घेऊन जमीन खणूं लागला, आणि खण्खण् आवाज येऊं लागला. त्याने जास्ती खणलं तर तिथे दोन घागरी होत्या.

त्या घागरी पकडून तो बाहेर काढायचा प्रयत्न करीत होता. तेवढ्यांत तिथे धूर झाला आणि त्यांतून एक भूत समोर आले, व त्याला म्हणाले, "अरे नीचा, मी या मोहोरांच्या घागरींचा पहारेकरी आहे. इथे जर तू थांबलास ना, तर मी तुला ठार मारुन टाकीन."

भुताला बघून देवनाथ प्रथम घाबरला, पण जेव्हां त्याने ऐकलं कीं त्या घागरींत मोहोरा आहेत तेव्हां त्याला मोह झाला. तो धीर एकवटून



म्हणाला, "हे घर माझं आहे, हे अंगण माझं आहे. तेव्हां इथे जो निधी आहे तो माझाच आहे. मला अडवणारा तू कोण आहेस?"

भूत मोठ्याने भेसूरपणे हंसलं आणि नंतर गप्प बसलं. देवनाथला कांही त्या घागरी बाहेर काढता येईनात. तो हात जोडून म्हणाला, "हे भूतनाथ, मला या घागरींचा मालक व्हायचं आहे. आपणच सांगा, त्यासाठी मी काय करुं?"

भूताने देवनाथला आपली कहाणी सांगून म्हटले, "इथली संपत्ती दुसऱ्या एखाद्या पहारेकरी भुताला मिळूं शकेल." आणि त्याने गुहेतल्या साधूची माहिती दिली. देवनाथ धावतच त्या साधुकडे गेला व त्याने आपली इच्छा त्याला सांगितली. साधूने आश्चर्याने पाहिले व नंतर शांतपणे सांगितले, "बेटा, तुझ्यासारख्या कंजूष

लोकांचा जगाला कांही उपयोग असतो कां? असं मला नेहमी वाटायचं. पण आता समजलं, कीं विचसारख्यांना मुक्ती देण्यासाठी तू मानवी रुपांत अवतार होऊन आला आहेस. जा तुझी इच्छा अवश्य पूर्ण होईल." देवनाथने नमस्कार करुन साधूचा निरोप घेतला. परत येऊन त्याने विचला हे सांगितलं.

विच गप्प होता, पण देवनाथने उत्साहाने कुदळ घेऊन खणायला सुरवात केली व दोन्ही घागरी बाहेर काढल्या. त्यांतले जवाहीर व मोहरा पाहून तो आनंदाने वेडा झाला "या माझ्या आहेत, हे माझे आहे" असं म्हणत नाचायला लागला. बघताबघता त्याचे प्राणपाखरु उडून गेले.

दुसऱ्याच क्षणीं विचला आपले पूर्वीचे रूप मिळाले. देवनाथ त्या संपत्तीवर पहारा करुं लागलेला पाहून विच तिथून निघून गेला.

गोष्ट सांगून वेतालाने राजाला विचारले, "राजन्, साधूचे बोलणे परस्परविरोधी वाटत नाही कां? देवनाथला तो मानवी रुपांतला अवतार म्हणाला. तुझी इच्छा पूर्ण होईल म्हणाला. तर मग देवनाथ कां मेला? साधूच्या बोलण्यांत कांही गूढार्थ आहे कां? माझ्या या शंकांचं समाधान तुला माहीत असूनही जर तू गप्प बसलास तर तुझ्या मस्तकाचे तुकडेतुकडे होतील."

विक्रमने म्हटलं, "देवनाथने आपल्या बायको मुलीशी अत्यंत वाईट वर्तन केले होते. स्वार्थाने तो आंधळा झाला होता. परक्याचे धन विषासमान असते आणि असा लोभी नि स्वार्थी माणूस भुतासमान असतो. त्या लोभानेच त्याचा प्राण घेतला, व त्याचे भूत झाले. साधूच्या नजरेत लोभी मनुष्य मेल्यासारखाच आहे म्हणून त्या जमिनींतल्या संपत्तीसाठी देवनाथ योग्य पहारेकरी होता.

साधूने देवनाथला तुझी इच्छा पूर्ण होईल असे सांगितलेले होते. म्हणून साधूच्या बोलण्यांत कांहीही बदल झालेला नाही!"

राजाचे मौनभंग करण्यांत सफल झाल्यामुळे वेताळ शवासहित अदृश्य झाला आणि पुन्हां झाडावर जाऊन बसला.

*(सुभद्रादेवींच्या रचनेवर आधारित)*








# गांधी–मंदिर

सार्‍या देशांत राष्ट्रपित्याविषयी आदर आहे. ओरिसांतल्या संबळपूरमधल्या लोकांनी एक मंदिर उभारले असून त्यांनी गांधीजींच्या ब्रॉंझ पुतळ्याची स्थापना केली आहे. रोज सकाळसंध्याकाळी पूजा व आरती केली जाते. भक्तीगीतांऐवजी लोक राष्ट्रगीते गातात. गांधीजींच्या सायंप्रार्थनेंत हा दैनंदिन कार्यक्रम असे. या मंदिरांत प्रजासत्ताक दिन (२६ जानेवारी), हुतात्मा दिन (३० जानेवारी), आणि गांधीजयंती (२ ऑक्टोबर), या दिवशी येणाऱ्या भक्तांची संख्या सर्वांत जास्त दिसते.



# जैन गुरु आणि त्यांची वाहने



वर्धमान महावीर हा जैनधर्माचा संस्थापक मानतात, परंतु जैनपंथ त्यापूर्वीही अस्तित्वांत होता. कारण महावीर हा शेवटचा जैन गुरु किंवा तीर्थंकर होता. त्यांतली खास गोष्ट म्हणजे सगळ्याच चोवीस तीर्थंकराचे पुतळे सारखेच दिसतात. समतल बैठकीवर या मूर्ती बसलेल्या स्थितींत आहेत. पण प्रत्येकाचे वाहन वेगवेगळे आहे. म्हणजे आदिनाथचे वाहन वृषभ आहे. सुमतीनाथचे वाहन पक्षी आहे. या वाहनाचे चित्र बैठकीच्या मधोमध कोरलेले आढळते.

देशविदेशच्या दंतकथा (पोलंड)

# विचित्र नाकाचा राजा

शंभर वर्षांपूर्वीपर्यंत उत्तर पोलंडचे लोक एका हिरव्यागार खोऱ्याकडे बोट दाखवून म्हणत, ''इथल्या झाडीत एके काळीं व्लादिमिरचं अद्भुत सफरचंदाचं झाड होतं. अजूनही ते तिथे असतं तर किती बरं झालं असतं!''

आज ती झाडी नाही, ते खोरे नाही, तिथे आहे फक्त एक गांव. पण देशाच्या दंतकथांमधे मात्र व्लादिमिर नि त्याचं सफरचंदाचं झाड जिवंत आहे!

एका ज्योतिषाने व्लादिमिरच्या आईला सांगितलं कीं तुला एक असामान्य मुलगा होईल. पण तो एक तर समाधानी तरी होईल किंवा श्रीमंत होईल. तिला जसा पुत्र हवा असेल, त्यासाठी तिने देवाची तशी प्रार्थना करावी.



ती तरुणी हुशार होती म्हणून तिने समाधानी मुलगा व्हावा अशी देवाला विनंती केली. कारण समाधान मिळवण्यासाठी अनेक मार्ग असतात, त्यांतला संपत्ती हा एक मार्ग आहे. जर मुलाला समाधान मिळणार असेल तर चिंता सोबत घेऊन येणाऱ्या संपत्तीची कशाला काळजी करायची?

तिने व्लादिमिरचे संगोपन मोठ्या प्रेमाने केले ती गरीब होती, म्हणून दूरच्या गांवात असलेल्या शाळेंत ती मुलाला पाठवूं शकली नाही. तिने त्याला एका तज्ञ चांभाराकडे धाडला. म्हणजे बूट तयार करायला तो शिकला असता. तिचा मुलगा चांभाराकडे कांही दिवस गेला, आणि एक दिवस घरी परत आल्यानंतर तो आईजवळ कुरकुरला, की जे बुटांची खरेदी करतात ते सारेच श्रीमंत असतात. गरीबांकडे नवीन बूट होण्याइतके पैसेच नसतात. केवळ श्रीमंतांसाठी उपयोगी पडेल असला व्यवसाय त्याला करायचा नव्हता.

त्या प्रेमळ मातेने मान डोलावली. नंतर तिने त्याला एका हुशार शिंप्याकडे पाठवले. शिंपी व्लादिमिरला शिंपीकाम शिकवायला तयार झाला.



थोडे दिवस मुलगा शिलाईकाम शिकत होता, पण तो आईकडे परत येऊन म्हणाला कीं फक्त श्रीमंत लोकच शिंप्याकडे कपडे शिवायला देतात आणि त्याला फक्त त्यांचेच काम करायचे नव्हते.



आता आईने त्याला तलवारी बनवणाऱ्या लोहाराकडे पाठवले. त्या काळी आजूबाजूच्या राज्यांमधे नेहमीच लढाया होत असत. साहजिकच तलवारींना कायम चांगली मागणी असे. पण आठवड्यापेक्षां जास्त दिवस हा मुलगा कांही तिथे टिकला नाही. त्याने कासावीस होऊन आईला सांगितले, ''आई, लोकांना ठार मारण्याची वस्तू मी बनवायची कां? कशासाठी?''

''तुला नको असेल तर नको बनवूस, पण मग तुला पोटासाठी दुसरा कांहीतरी कामधंदा शिकवणे मला जमणार नाही बघ! बरं तर, तू आता निदान रानांत चरायला गुरें घेऊन जात जा आणि गांवातल्या इतर मुलांच्याबरोबर गुरें घेऊन परत ये.'' आईने त्याला सांगितले.

व्लादिमिरने आईचा सल्ला मानला. त्याला हिरव्या शेतांतून हिंडायला आवडले. तो इतर गुराख्यांबरोबर गाणी गाई, आणि लपंडाव खेळे. एकदा त्याला एका लहान खडकाभोवती आग लागलेली दिसली. खडकावर एक पाल आपला जीव वांचवण्याचा प्रयत्न करीत होती, पण तिला ते जमत नव्हते. त्याने एक लहान काठी घेतली आणि तिने पालीचा जीव वांचवला. त्या पालीचे एका जख्ख म्हातारीत रुपांतर झाले. तिने व्लादिमिरचे आभार मानले आणि त्याला एक रोप दिले. ''हे तुझ्या अंगणात लाव. त्याला येणारी सफरचंदे कोणताही आजार बरा करूं शकतील.'' असे सांगितल्यावर म्हातारीला पुन्हां पालीचे रूप प्राप्त झाले, आणि ती झुडुपांत नाहीशी झाली.

व्लादिमिरने ते रोप त्याच्या खिडकीजवळच लावले. दोन महिन्यांत ते जोमाने वाढले आणि त्याला फळें लागली. व्लादिमिरच्या आईला बारीक ताप येत होता. झाडाचे पहिले फळ त्याने आईला दिले. लौकरच ती पूर्णपणे बरी झाली. त्यानंतर व्लादिमिरने अनेक आजारी मंडळींच्याबर सफरचंदाचे औषध दिले व त्याचे औषध शंभर टक्के यशस्वी होत गेले. या जादूच्या फळाची माहिती लौकरच राजाच्या कानी गेली. ''त्याला आपण सरदारकी देऊं या'' राजा म्हणाला.



सांगितले. खरं तर, राजाला सपाटून सर्दी झाली होती, आणि जादूचं सफरचंद खाऊन त्याला बरे व्हायची जबरदस्त इच्छा होती. राजवैद्यांनी दिलेल्या कडूजहर गोळ्या आणि रंगीत औषधाने कांहीच उपयोग होत नव्हता.

तोपर्यंत इकडे गांवात व्लादिमिर-देखील उदासवाणा होता. कारण आता दुखणेकरी लोकांना तो मदत करू शकत नव्हता. निराश मनाने तो पुन्हां रानांत गेला व त्या खडकाजवळच्या झाडा-खाली बसला. त्याला म्हातारीची आठवण आली. "अहो दयाळू आजीबाई, तुम्ही पुन्हां मला भेटायला याल कां हो?" त्याने पालीला हांक मारली. अचानक वावटळ आली आणि वाळलेल्या पानांचा ढीग त्याच्यासमोर आला. क्षणभरांतच ती पाल आजीच्या रुपांत समोर आली.

ब्लादिमिरने तिला राजाने व त्याच्या सैनिकांनी केलेल्या अन्यायाबद्दल सांगितले. आजीबाईनं त्याला लालबुंद सफरचंदांची एक मोठा परडी दिली. "तू असाच राजाकडे जा आणि ही सफरचंदे त्याला खरेदी करायला सांग. आणि नंतर बघ गंमत!" ती म्हणाली आणि पुन्हां वावटळ आली आणि धुळीच्या वादळांत ती दिसेनाशी झाली.

ब्लादिमिर तसाच तडक राजवाड्याकडे गेला. "ही फळें कुणी घेईल कां? ही कांहीतरी अद्भुत प्रकार करतील, पण काय ते मला ठाऊक नाही." त्याने सरळपणे सांगितले. राजाच्या सैनिकांनी

"त्याची जरुरी नाही महाराज!" राजवैद्याने सुचवले.

"आपण ते झाड आणून आपल्या बागेत लावावं, म्हणजे काम झालंच कीं!" राजवैद्याचा मेहुणा मुख्यमंत्री होता. त्याने ह्या कल्पनेला दुजोरा दिला.

राजाने आज्ञापत्र काढले आणि त्याचे सैनिक ब्लादिमिरच्या गांवात गेले. त्याच्याशी एक शब्दही न बोलता त्यांनी ते झाड उकरुन नेले आणि राजाच्या बागेंत लावले. पण त्या झाडाला फळे यायची थांबली. ते पाहून सारेजण निराश झाले. राजवैद्य व मंत्र्याचा चेहरा बघण्यासारखा झाला. त्यांनी कांहीतरी उपाय सांगावा, असे राजाने चिडून



त्याला दरबारांत नेले. ही फळें आपली सर्दी बरी करतील कां, असा प्रश्न राजाने विचारला. ब्लादिमिरने उत्तर दिले, "करतीलही कदाचित; किंवा त्यापेक्षांही जास्त कांहीतरी सुद्धां करतील!"

राजा व इतर कांही सरदारांनी एकेक फळ उचलले नि मिटक्या मारीत खाल्ले. आणि झालं काय, राजाचे नाक लांब व्हायला लागलं, अगदी करकोच्याच्या चोचीसारखं लांबच लांब झालं.

"अरे हे काय?" राजा भीतीने किंचाळला.

"महाराज, पण अगोदर मला सांगा कीं तुमची सर्दी गेली कीं नाही?" ब्लादिमिरने प्रश्न केला.

"माझ्या या एवढ्या मोठ्या नाकांत ती सर्दी कुठे लपलीय, ते शोधणं जमणार तरी कसं?" राजा म्हणाला.

"अरे हे काय? असं काय झालं?" बारातेरा आवाज एकदम आले. सगळ्या दरबाऱ्यांची नाके करकोच्याच्या चोचीसारखी लांबच लांब झाली होती.

"महाराज, आपण आणि आपले सरदार, सारेजण आपल्या या खास लांबीच्या नाकामुळे खासे दिसत आहात हां!" ब्लादिमिर म्हणाला.

"पण आम्हाला असं खास दिसायची मुळीच इच्छा नाही. आमची नाके पूर्वीसारखी लहान कशी होतील?" राजाने विचारले.

"तुम्ही माझ्या अंगणातून चोरलेल्या सफरचंदाच्या झाडाची फळें खाल्लीत कीं बहुधा तुम्ही पूर्वीसारखे दिसायला लागाल. आणि ते झाड पुन्हां माझ्या अंगणात लावलं तरत त्याला फळें येतील. तोपर्यंत मंडळींनो, तुमची ही खास नाकें घेऊनच तुम्हाला वावरावं लागेल." ब्लादिमिरने उत्तर दिले.

राजाने ते झाड पुन्हां ब्लादिमिरच्या अंगणात नेऊन लावायची आज्ञा दिली. आठवड्यानंतर त्या झाडाला पुन्हां फळें लागली. तोपर्यंत राजा व लांब नाके असलेली दरबारी मंडळी वाड्याबाहेर पडली नाहीत.

पण जेव्हां ब्लादिमिर पुन्हां सफरचंदांनी भरलेली मोठी परडी घेऊन आला तेव्हां मात्र त्यांच्या जीवांत जीव आला. त्याने त्या जादूच्या झाडाची फळें सर्वांना खायला दिली आणि त्या साऱ्या-जणांची नाकें पुन्हां पूर्वीसारखीच लहान झाली.

मंत्री व राजवैद्याकडे लक्ष न देता राजाने ब्लादि-मिरला सरदारकी बहाल केली. पण ब्लादिमिरने त्याचे मानधन घेण्याचे नाकारले. त्या जादूच्या फळांमुळे रोग्यांना बरे करण्यांतच त्याला पुरेपूर आनंद मिळत होता. तो खूप वर्षे जगला. त्याच्या-नंतर मात्र ते झाड फळें देईनासे झाले.

*-विश्वावसू*














**Petroleum Conservation Research Association**
'Sanrakshan Bhavan',10, Bhikaiji Cama Place, New Delhi-110 066
Phone : 26198856 Fax : 26109668
**Northern Region :**
Chief Regional Co-ordinator, "Sanrakshan Bhavan", 10, Bhikaiji Cama Place,
New Delhi-100 066. Phone : 26198753, 26182181 Fax : 26109668
**Eastern Region :**
Chief Regional Co-ordinator, Everest House (2nd Floor), 46-C, Chowringhee Road,
Kolkata-700 071. Phone : 22887250 / 22881913 Fax : 22880763
**Western Region :**
Chief Regional Co-ordinator, C-5, Keshva Building (Ground Floor),Bandra-Kurla Complex,
Bandra East, Mumbai-400 051. Phone : 26592587 / 26592181 Fax : 26590034
**Southern Region :**
Chief Regional Co-ordinator, TMB Mansion (1st Floor),739, Anna Salai,
Chennai-600 002. Phone : 28521662 / 28520417 Fax : 28521662




# आरशांतले युद्ध

शंकर हा सोळा वर्षांचा एक भोळा तरुण होता. तो तीन वर्षांचा असताना त्याची आई पार्वती वारली. त्याचा पिता श्यामराव याने लक्ष्मीबरोबर दुसरा विवाह केला. लक्ष्मीला दोन मुलगे झाले. तिचे आपल्या मुलांवर फार प्रेम होते. ती त्यांना गांवातल्या शाळेंत शिकायला पाठवत असे. पण शंकर मात्र घरांत नि शेतांत तिच्या सांगण्यावरुन राबत होता. तरीही त्याला त्याचे कांहीएक वाटत नव्हते.

दिवस असे चालले होते. शामराव अचानक आजारी पडला. त्यांतून तो जगेलवांचेल याची आशा त्याला वाटत नव्हती. आपली पत्नी आणि मुलांना त्याने जवळ बोलावले. तो लक्ष्मीला म्हणाला, "शंकर भोळा व निष्पाप आहे.त्याची जबाबदारी तुझ्यावर मी सोंपवतो आहे. पोटच्या पोराप्रमाणे त्याच्यावरही माया कर." आणि दुसऱ्याच दिवशी त्याचे निधन झाले.

लक्ष्मीचा इरादा मात्र अगदी वेगळा होता. एके दिवशी तिने शंकरला सांगितले, "बाळ, काल रात्रीं तुझे वडील माझ्या स्वप्नांत आले आणि त्यांनी मला हा आरसा तुला द्यायला सांगितला. हा आरसा मोठा मूल्यवान व शकुनाचा आहे. हा तुझ्या वांटणीचा हिस्सा आहे असं समज."

शामरावच्या पहिल्या बायकोला, पार्वतीला हा आरसा एका साधूच्या रिकाम्या आश्रमांत सांपडला होता. ती शेतांतून घरी परत येताना साधूचे दर्शन घ्यावे म्हणून ती आश्रमांत गेली होती. पण साधू निघून गेलेला होता. लोक म्हणत असत कीं तो साधू मोठा सामर्थ्यवान होता व त्याच्यापाशी अद्भुत शक्ती होत्या. शेतांतून घरी परत आल्यावर पार्वतीने तो आरसा शामरावा-जवळ दिलेला होता.

शंकरने आपल्या सावत्र आईचे बोलणे शांतपणें ऐकले आणि आरसा हातांत घेत तो म्हणाला, "आई, म्हणजे आता मी घरांतून बाहेर जायचे कां?" त्याच्या प्रश्नांत निष्कपटीपणा होता.



"होय बाळ, तुझ्या वडिलांनी हा आरसा तुझ्या वांटणीचा हिस्सा म्हणून द्यायला सांगितले होते. त्याचा अर्थ असा झाला कीं हा घेऊन तू घराबाहेर निघून जा, आणि तुला जसं जगायचं असेल तसा जग." तिने त्याला वाटखर्चासाठी चार रुपये हातांत दिले.

त्यादिवशी शंकरने आपले कपडे एका फाटक्या पिशवींत ठेवले, त्यांत तो आरसा नीट गुंडाळून ठेवला आणि तो घरांतून बाहेर पडला. संध्याकाळपर्यंत तो राजाच्या किल्ल्याजवळच्या एका धर्मशाळेंत जाऊन थांबला. तिथें अर्धा रुपया देऊन त्याने रात्री जेवण केले आणि तिथल्याच एका खोलींत तो निजला. त्याने पिशवीतून तो आरसा हळुवारपणे बाहेर काढला.

आरसा फारच सुरेख होता. शंकरने त्यांत आपला चेहरा बघितला आणि स्वत:शीच तो बडबडूं लागला, "बाबा, आईने सांगितलं कीं हा आरसा मोठा अद्भुत आहे. पण त्या आरशांत कोणती शक्ती आहे हे रहस्य कांही तिने सांगितले नाही." त्याने तो आरसा छातीशी धरला आणि नीट पुन्हां पिशवींत ठेवून दिला. शंकरला गाढ झोप लागली.

मध्यरात्रीनंतर एकाएकी गडबड सुरुं झाली. लोकांच्या बोलण्यावरुन शंकरला कळले कीं व्याघ्रकेतु नांवाच्या शेजारच्या राजाने ह्या राज्याचा राजा मित्रवर्मावर अचानक हल्ला केला, आणि किल्ल्याला वेढा घातला. त्यावेळी मित्रवर्मा आपल्या शयनागारांत झोपला होता. जेव्हां त्याला ही बातमी कळली तेव्हां तो शत्रूसेनेला सामोरा गेले. प्रजेचे मित्रवर्मावर फार प्रेम होते, कारण तो न्यायी व दक्ष राजा होता.

धर्मशाळेचा व्यवस्थापक सांगत होता कीं व्याघ्रकेतु फार दुष्ट, क्रूर व महत्वाकांक्षी होता. "देव आमच्या राजाला विजयी करो" असं म्हणून त्याने हात जोडले.

हे बोलणे ऐकत असलेल्या शंकरने आरशांत बघत म्हटले, "जर धर्मात्मा मित्रवर्मा विजयी झाले तर किती चांगले होईल!"

झालं, एकाएकी वीज चमकायला लागली आणि आरशांतून लहानलहान खेळण्यांतल्या बाहुल्यासारखे सैनिक रांगेने बाहेर येऊं लागले आणि पाहाता पाहाता त्यांचा आकार मोठा होत ते बलदंड सैनिकांसारखेच दिसूं लागले. हे सैनिक शत्रूसैन्यावर तुटून पडले.



हा आकस्मिक व भयंकर परिणाम पाहून व्याघ्रकेतू चक्रावून गेला. त्याचे सैनिक एका-पाठोपाठ एक धारातीर्थी पडूं लागले. तितक्यांत त्या जादूच्या आरशांतून एक लांबलचक जाड दोरी बाहेर आली व तिने व्याघ्रकेतूला विळखा घालून बांधून टाकले.

किल्ल्याबाहेर लढायला आलेल्या मित्रवर्मानि-देखील ह्या सैनिकांना पाहिले. व्याघ्रकेतुला दोरीने बांधलेले पाहून तोही चकित झाला. राजा स्वत: धर्मशाळेंत आला आणि शंकरला आला आणि शंकरला त्याने बोलावून म्हटले, "या शक्तिशाली आरशामुळेंच आज आपले राज्य वांचले आहे. तुझं नांव काय? तुझं गांव कोणतं आहे?"

शंकरने अ... नांवगांव सांगितले आणि नंतर पित्याच्या मृत्यूनंतर जे घडलं ते ही सविस्तर सांगितलं. शंकर पुढे म्हणाला, "या आरशामुळे माझं काय भले होईल ते मलाच माहीत नाही. मी फक्त एवढीच इच्छा व्यक्त केली की धर्मात्मा राजा मित्रवर्मा विजयी होवो. बघताबघता त्यांतून हे सैनिक बाहेर पडले आणि त्यांनी शत्रूला हरवले."

राजा आश्चर्याने म्हणाला, "तुझ्या सावत्र आईने कोणत्या हेतूने तुला हा आरसा दिलाय ते मला माहीत नाही. पण त्याच्यामुळे आपल्या राज्यावरचे संकट मात्र टळले. मी तुला आजच गुरुकुलांत दाखल करीन, आणि तुझ्या शिक्षणाची व्यवस्था करीन. हे तुला मान्य आहे कां?"

शंकरने मान हालवून आपला होकार दर्शवला. तितक्यांत त्याच्या हातांत असलेला आरसा आकाशांत उडाला आणि मोठा आवाज होऊन त्याचे तुकडे तुकडे होऊन पडले. शंकर निराशेने त्या तुकड्यांकडे बघत राहिला.

राजाने त्याच्या खांद्यावर हात ठेवून म्हटले, "वाईट वाटून घेऊं नकोस. जादू व मंत्र यांची मदत मानवाच्या प्रगतीसाठी फार वेळ नसते. आत्मविश्वास आणि साहस यांच्या जोरावर आपला विकास आपणच करायचा असतो चल आता!" आणि राजा त्याला घेऊन गेला. शंकरच्या चेहऱ्यावर आनंद होता. त्याने सर्वांकडे एकवार बघितले आणि तो राजाच्या मागोमाग जाऊं लागला.



संताळी लोककथा

# राजाचा विचित्र प्रश्न



**कोणे** एके काळीं एक राजा होता. त्याच्याकडे अलोट संपत्ती होती. सोने चांदीच्या किंवा हिऱ्यामाणकांच्या स्वरुपांत नव्हे, तर गुरें, हत्ती, घोडे, उंट व गाढवे ही विपुल संपत्ती होती.

एकदा राजाने सर्व नोकरचाकर, कर्मचारी यांना एका ठरलेल्या वेळी एकत्र जमायची आज्ञा केली. कशासाठी ते कांही राजा बोलला नव्हता, म्हणून कां बोलावले असेल याबद्दल सारेजण निरनिराळे तर्क करीत होते.

तो दिवस उजाडला आणि राजवाड्याच्या चौकांत सारेजण जमले. राजा आला आणि फारसा घोळ न घालता त्याने विचारले, ''प्रत्येकजण इथें हजर आहे ना?'' कांहीच उत्तर आले नाही.

राजाने सर्वांकडे एक चौफेर नजर टाकली आणि म्हटले, ''तुमच्या गप्प राहाण्यावरुन कुणीही गैरहजर नाही असं मी मानतो. मी तुम्हाला कांहीतरी विचारणार आहे, आणि मला प्रत्येकाकडून उत्तर मिळाले पाहिजे.''

राजाने मुद्यालाच हात घालीत म्हटले, ''माझ्या मनांत काय आहे ते तुम्ही सांगायला हवं - चिंता आहे कीं मनांत उत्सुकता आहे ते ओळखलं पाहिजे. म्हणून मी सर्वांनाच इथे एकत्र बोलावून घेतले. प्रत्येकाने ओळीने पुढे यायचं, नि आपलं उत्तर देऊन जायचं!''

आळीपाळीने प्रत्येकजण राजासमोर आला आणि जे योग्य वाटलं ते उत्तर प्रत्येकाने दिले. वर मान करुन पाहिलं तर राजाने प्रत्येक उत्तरानंतर नकारार्थी मान हलवली होती. सुदैवाने राजाच्या चेहऱ्यावर खास भावना कांही दिसली नाही. म्हणून राजा रागावला, नाराज झाला, दुःखी झाला, कीं निराश झाला, ते कुणालाही कळेना.

सर्वांनी उत्तर देऊन झाल्यानंतर राजाने त्यांना विचारले, ''तुमचे कुणाचेच उत्तर बरोबर नाही. तुम्ही आता परत जा आणि आपापल्या कामाला लागा.''

बिचारा मंत्री एका कोपऱ्यात उभा राहून हा प्रकार लक्षपूर्वक बघत होता. राजा आता त्याच्याकडे वळून म्हणाला, ''माझ्या मनांत कोणता विचार आहे ते ओळखणारा माणूस शोधून काढा. एका महिन्याच्या आंत असा माणूस माझ्यासमोर आणून हजर करा. ते केलं नाहीत तर तुमची नोकरी जाईल.'' ही विक्षिप्त आज्ञा देऊन राजा वाड्यांत परत गेला.

मंत्री मात्र डोके धरुन विचार करीत बसला. घरी गेला नि आढ्याकडे बघत पडून राहिला. ''महाराजांचे मनांत काय आहे ते जाणणारा मनकवडा माणूस मी कुठे शोधत बसणार?'' दिवसभर हा विचार त्याला त्रास देत राहिला. ''उद्यां शोधायला सुरवात करीन'' असा विचार करीत त्याने झोपायचा प्रयत्न केला.

दुसऱ्या दिवशी तो सकाळी लवकर उठला आणि बाहेर पडला. जो कुणी वाटेत दिसला त्याला हा प्रश्न त्याने विचारला. सर्वांकडून नकारघंटाच ऐकू आली. ते अडाणी तरी होते नाहीतर त्यांना कुणाचे नांव तरी सुचवायचे नव्हते. राजाची नाराजी कशाला ओढवून घ्यायची उगीच? मंत्री बरेच दिवस हिंडत शोध घेत राहिला. पण त्याला कांही राजाला हवा तो माणूस मिळाला नाही.

मंत्र्याला चैन पडेना. त्याची तहानभूक हरपली व झोंप उडाली. तो विचारांत मग्न असा अंथरुणावर बसलेला दिसायचा. त्याची बायको जेवायला बोलवायची, पण त्याला घांस कांही घशाखाली उतरेना. त्याची ही कठीण अवस्था त्याच्या मुलीने बघितली. एके दिवशी तिने विचारले, ''बाबा, तुम्हाला कसली काळजी वाटतेय? तुमचा चेहरा पार उतरलाय. तुम्ही धड जेवत नाही, नीट झोंपदेखील तुम्हाला लागत नाही. काय ते मला सांगता कां?''

मंत्र्याने तिला कांहीच सांगितले नाही. एक दिवस सकाळीं मंत्री आंघोळीलादेखील जायला तयार होईना. आता मात्र मुलीला सहन करणे अशक्य झाले. ''बाबा, तुम्ही जर आज आंघोळ केली नाहीत नि जेवायला उठला नाहीत, तर आई आणि मीदेखील जेवणार नाही. नाहीतर तुम्हाला कसली काळजी आहे ते तुम्ही मला सांगा. कदाचित् मला त्याचे उत्तर देता येईल सुद्धां.'' तिने त्यांना अगोदर धमकावले व समजावले.

मंत्री उठून बसला. प्रथमच कुणीतरी त्याला दिलासा देऊन उत्तर शोधून काढायचं आश्वासन



देत होतं. गेले कित्येक दिवस त्याला सतावणारी समस्या त्याने तिला सांगितली. राजाची आज्ञा आणि राजाच्या मनांतले विचार जाणणारा माणूस अद्याप भेटला नव्हता ते त्याने तिला सांगितलं. तिने पित्याला विचारलं, ''आता किती दिवस उरले आहेत?''

''एकदोन दिवसच उरले आहेत.'' मंत्र्याने उत्तर दिले.

''मला नक्की दिवस सांगा, म्हणजे मी तो माणूस तिथे वेळेवर घेऊन येईन.'' मुलीने खात्रीपूर्वक सांगितलं, ''चला, आता उठा आणि अगोदर आंघोळ करुन आमच्याबरोबर जेवायला बसा.'' मुलीने त्याला बळजबरीने उठवले आणि आंघोळीसाठी अक्षरशः खोलीबाहेर ढकलले.

जेवताना मंत्री उतावीळपणे मुलीला म्हणाला, ''मला परवां राजासमोर हजेरी द्यायची आहे. तू त्या माणसाला केव्हां आणशील?''

''परवाच आणीन. घाबरुं नका. त्यापूर्वी मी त्याला शोधून काढीन आणि तो परवा तुमच्याबरोबर येईल!''

मंत्र्याची मुलगी कुठेही शोध घ्यायला गेली नाही. त्यांच्या शेळ्या व मेंढ्या राखणारा मेंढपाळ मुलगा होता त्याचा विचार तिच्या मनांत आला. या मुलाकडे त्याचे स्वतःचे तीन मेंढे होते. आणि तो स्वतः जन्मतः मुका नि बहिरा होता! मंत्र्याच्या मुलीने त्याला बोलावले, नि जेवायला वाढले. नंतर तिने त्याला खुणेने सांगितले कीं तिच्या वडिलांबरोबर त्याला राजाकडे हजेरी द्यायला जावे लागेल. त्याने होकारार्थी मान डोलावली.

राजाकडे जायची वेळ आली तरी मुलीने वडिलांना कोणत्या माणसाला बोलावणार ते सांगितले नाही. निघताना तिने त्या मेंढपाळाला बोलावलेले पाहून मंत्र्याला धक्काच बसला ''अग, हा तर बोलूं शकणार नाही!'' मंत्री कासावीस झाला.

''बाबा, तुम्ही याला बरोबर घेऊन जा, अगदी काळजी करुं नका. राजाच्या मनांत काय आहे ते ह्याला माहिती असेल!'' मुलीने निर्धाराने सांगितले.



मुलीच्या शब्दावर मंत्र्याचा विश्वास होता, म्हणून तो त्या मेंढपाळाला घेऊन गेला. ''चला विद्वान, चला माझ्याबरोबर!'' दोघेही राजवाड्याकडे निघाले.

मंत्र्याने आणलेला माणूस राजाला काय उत्तर देणार ते ऐकायला तुडुंब गर्दी जमलेली होती. मंत्री आल्याचा निरोप



आंत दिला गेला. राजा बाहेर येऊन आसनावर बसला. मंत्र्याने राजापुढे लवून वंदन केले. त्या गुराख्याने देखील लवून वंदन केले. राजा कांहीच बोलला नाही. त्याने फक्त आपला हात उंचावला आणि एक बोट दाखवले. त्या मुलाने दोन बोटे दाखवून उत्तर दिले. राजा किंचित हंसला आणि त्याने तीन बोटे दाखवली. गुराख्याने ''नाही'' अशा अर्थी मान वेळावली आणि पुन्हां दोन बोटे दाखवली. राजाचा चेहरा आनंदाने फुलला. तो मंत्र्याकडे वळून म्हणाला, ''तुम्ही चांगल्या माणसाला शोधून आणलं आहे. त्याने मला अगदी बरोबर उत्तर दिलं. मी तुमचं अभिनंदन करतो, मंत्रीमहाशय!''



''मी आपला आभारी आहे, महाराज! आपली हरकत नसेल तर आपण त्याला काय विचारलंत आणि त्याने काय उत्तर दिलं, हे इथें जमलेल्या सर्वांना आणि मलाही आपण खुलासेवार सांगावं ही नम्र विनंती करतो.'' मंत्र्याने पुन्हां एकदा लवून राजाला विनवलं.

''मंत्रीजी, ते अगदी साधं, सरळ होतं! जेव्हां मी एक बोट दाखवलं, तेव्हां मला विचारायचं होतं की इथला स्वामी व मालक मीच एकटा आहे. आणि त्याने दोन बोटे दाखवून सुचवलं कीं मी एकटा नव्हे, दुसरा स्वामी म्हणजे परमेश्वर-ती सर्वश्रेष्ठ शक्ती. या राज्यावर आणखी कुणाची सत्ता आहे कां, हे शोधून काढण्यासाठी मी तीन बोटे दाखवली. पण त्याने पुन्हां दोनच बोटे दाखवून सांगितले कीं ह्या राज्यावर फक्त दोघांची, परमेश्वराची आणि माझी सत्ता आहे. म्हणजे माझ्या मनांतला विचार त्याने अचूक ओळखला!''

मंत्री आणि मेंढपाळ, ह्या दोघांनाही राजाने नाण्यांनी भरलेल्या पिशव्या बक्षीस दिल्या व त्यांना निरोप दिला. घरी पोंचल्यानंतर आपल्या मुलीच्या मदतीने राजाने त्या मुलाला विचारले कीं राजाच्या मनांत काय आहे ते त्याने कसे काय ओळखले? त्या मुक्या मुलाने त्यांना खाणाखुणांनी समजावले, कीं राजाने त्याचा एक मेंढा विकत मागितला. त्यावर त्याने उत्तर दिले कीं राजाला द्यायचा तर एक कशाला, दोन मेंढेसुद्धां विकत द्यायला तो तयार होता. पण जेव्हां राजाने त्याचे तिन्ही मेंढे मागितले तेव्हां त्याने नकारार्थी मान जोराने हलवली आणि फक्त दोनच मेंढे विकायला तो तयार होता हे सांगितले!

मंत्री आणि त्याची मुलगी, दोघांनाही हंसू आवरेना.



# महासाध्वी

ब्रह्मदत्त काशीचा प्रजापालक राजा असताना राजधानीजवळील एका गांवातील संपन्न गृहस्थाच्या घरांत बोधिसत्वाचा जन्म झाला.

लहान वयांतच तो सर्व विद्यांमध्ये पारंगत झाला. योग्य वयांत आल्यानंतर आई-वडिलांनी त्याच्यासाठी काशी नगरीतील एका ठिकाणी लग्नाची बोलणी केली. सुजाता नांवाच्या एका मुलीबरोबर त्याचा विवाह करून दिला. सुजाता सौंदर्यवतीच नव्हे, तर गुणवतीही होती. ती पतीची व सासू-सासऱ्यांची सेवा करी.

बोधिसत्वसुद्धां तिच्यावर खूप प्रेम करीत असे. अशा रीतीने त्या दोघांची एक वाचा, एक विचार, होऊन ती गुण्यागोविंदाने रहात असत.

कांही काळ लोटल्यानंतर एके दिवशी सुजाता बोधिसत्वाला म्हणाली, "मला माझ्या माता-पित्यांना भेटून यावे असे वाटते आहे. ते वृद्ध झालेले आहेत. तुम्ही सोबत आलात तर दोघे जाऊन त्यांना भेटून येऊ या."

ते ऐकून बोधिसत्वाला आनंद झाला. "ठीक आहे. अवश्य जाऊन येऊ या. माझ्या मनांतसुद्धा बरेच दिवसापासून सासू-सासऱ्यांना भेटून येण्याची इच्छा आहे. घरांत महत्वाची कामें असल्यामुळे गप्प बसलो. नाही तर मीच आधी 'चल जाऊं या' म्हणून निघालो असतो." तो म्हणाला.

दुसरे दिवशी सकाळी निघायची सर्व तयारी झाली. आवश्यक असलेल्या सर्व वस्तू गाडीत घालून ते प्रवासास निघाले. सुजाता गाडीत बसली. बोधिसत्व गाडीवाल्याच्या जागी बसून गाडी हांकू लागला. काशीनगराच्या वेशीजवळ आल्यानंतर एका झाडाखाली गाडी सोडली. तेथील तळ्यांत हातपाय धुतले. सोबत आणलेली शिदोरी खाली. थोडा वेळ विश्रांती झाल्यावर परत गाडी जुंपली व काशीनगराच्या दिशेने जाऊ लागले.

बोधिसत्वाची गाडी नगरांत प्रवेश करणार तोच काशीराज ब्रह्मदत्ताची हत्तीच्या अंबारीवर बसून मिरवणूक निघाली होती. तो उत्सव बघण्याची इच्छा होऊन सुजाताने पतीची परवानगी घेतली व गाडीतून उतरुन ती पुढे पायी चालू लागली. बोधिसत्व गाडी हांकीत मागाहून येऊं लागला.

अंबारीवर बसलेल्या काशीराजाने अतिशय रूपवती व सौंदर्यवती अशा सुजाताला पाहिले. तिच्याशी विवाह करण्याची राजाला बुद्धी झाली. तिच्याबद्दल चौकशी केली असता ती 'अमुक-अमुक' माणसाची मुलगी असून, गाडीत बसलेली व्यक्ती तिचा पती असल्याचे समजले.

राजाच्या मनांत एक दुष्ट विचार आला. आधी या सुजाताच्या नवऱ्याची विल्हेवाट लावून मग हिच्याशी लग्न करून हिला राणी करूं या, असे त्याला वाटले. यासाठी त्याने एक बेमालूम योजना आखली.

राजाने आपल्या विश्वासांतील एका सैनिकाला जवळ बोलाविले व आपला मुकुट काढून त्याच्या हाती देत, "हा मुकुट, कुणाच्याही दृष्टीस पडणार नाही अशा रीतीने समोर दिसणाऱ्या त्या बैलगाडीत लपवून ये." म्हटले.

सैनिकाने बोधिसत्वाला दिसणार नाही अशी खबरदारी घेऊन 'किरीट' त्याच्या गाडीत ठेवला व येऊन राजाला सांगितले. पंधरा-वीस मिनिटांनंतर लोकांमध्ये एकच गोंधळ उडून गेला, "राजाचा मुकुट कुणीतरी चोरला" अशी बातमी सर्वत्र पसरली.

राजाने आपल्या सैनिकांना "मुकुट चोरणाऱ्याला शोधून धरुन आणा," अशी आज्ञा फर्मावली. एका सैनिकाला बोधिसत्वाच्या गाडीत राज-मुकुट सांपडला. त्याला चोर म्हणून धरून ओढत नेऊन राजापुढे उभे केले.



"माझ्या मुकुटाचे अपहरण करणारा हाच का तो?" चिडून राजाने विचारले. "याचा शिरच्छेद करा." राजाने आज्ञा दिली.

अशा तऱ्हेने राजाची दुष्ट योजना सफल झाली. सैनिकांनी बोधिसत्वाला कोरडे मारतमारत रस्त्यावरुन त्याची धिंड काढली व शहराबाहेर असलेल्या बलिपीठाकडे शिरच्छेद करण्यासाठी त्याला घेऊन गेले.

ही बातमी समजताच सुजाता दुःखी झाली, व पतीच्या मागेमागे जाऊ लागली. "तुमच्यावर हे संकट येण्यास मीच कारणीभूत झाले." असा ती विलाप करू लागली. बलिपीठाजवळ जाऊन

अतिशय वेदनेने "निरपराधी भोळ्या जिवांचे रक्षण करणारा देव उरला नाही का? दुष्टांचा त्रास असाच वाढत राहू देणार का?" असा आक्रोश करू लागली. महासाध्वी असलेल्या सुजाताचा असा विलाप चालला असता, स्वर्गलोकात देवेन्द्राचे सिंहासन डळमळू लागले.

"काय कारण झाले?" आश्चर्य वाटून देवेन्द्राने दिव्यदृष्टीने पाहिले. घडत असलेला घोर अन्याय त्याला दिसला.

इन्द्राने एक चमत्कार घडविला. राजा असलेल्या ठिकाणी बोधिसत्व व बोधिसत्व असलेल्या ठिकाणी राजा, असा अदलाबदल आपल्या महिमेने घडवून आणला.

हत्तीच्या अंबारीत बसलेला राजाच आहे असे प्रजेला वाटत होते. परंतु राजाच्या पोशाखांत असलेला बोधिसत्व तिथे होता. तसेच बलिपीठावर बोधिसत्वाचे कपडे घातलेला राजा आपल्या सैनिकांच्या ताब्यात होता!

हे रहस्य माहीत नसलेल्या सैनिकांनी आपल्या हातात बंदी असलेल्या माणसाचा राजाज्ञेप्रमाणे शिरच्छेद केला. प्राण जाताच बलिपीठावरील दुष्ट राजाला आपले स्वरूप प्राप्त झाले. तेव्हां तेथे गतप्राण होऊन पडलेला मनुष्य दुसरा-तिसरा कुणी नसून आपला राजाच आहे हे प्रजेच्या लक्षात आले. त्याबरोबर मोठा हल-कल्लोळ माजला. या विचित्र चमत्काराचे कारण काय म्हणून एकमेकांकडे पाहू लागले.

तेव्हां इन्द्र प्रत्यक्ष आला. त्याने बोधिसत्वाला व प्रजेला दर्शन देऊन घडलेला वृत्तांत सांगितला.

"आजपासून बोधिसत्व तुमचा राजा असून सुजाता पट्टराणी आहे!" असे सांगून अंतर्धान पावला.

दुर्मार्गी राजाच्या पापाचा घडा भरल्यामुळे बलिपीठावर त्याची आहुती पडलेली पाहून प्रजेला अत्यानंद झाला. इन्द्राच्या आज्ञेप्रमाणे बोधि-सत्वाचा राजा म्हणून व सुजाताचा महाराणी म्हणून अंगिकार केला.

त्या दिवसापासून काशीराज्यांत चारी दिशांना धर्म नांदू लागला. नियमितपण पाऊस पडून देश धनधान्याने बहरला.







# विष्णुपुराण

विभीषणासारखीच रावणाची पट्टराणी मंदोदरी-सुद्धां नवऱ्याला हितबोध करू लागली - "नाथ, नाककान कापले म्हणून म्हणा, रामाने लग्न कर म्हटले तर लग्न केले नाही म्हणून म्हणा, तुमच्या धाकट्या बहिणीला अपमान सहन झाला नाही म्हणून म्हणा, तुम्ही सीतेला एकटीला पाहून व ती असहाय स्थितीत असतांना, सोने उचलून न्यावे तसे, पशुपक्ष्यांना चोरुन न्यावे तसे, उचलून पळवून आणलेत तेव्हां ती किती दुःखी असेल, याची कल्पना तरी आहे कां तुम्हाला? शूर्पणखेसाठी प्रतिकार भावनेने सीतेला तुम्ही उचलून आणलेत, तिचा जो अपमान झाला त्याचा तिला किती राग असेल, कधी विचार केलात का?"

रावण म्हणाला, "होय मंदोदरी, हे मला आतां कळते आहे. परंतु ते कांही असू दे, हा रावण कधी मान वांकविणार नाही! तुझा पती भित्रा नाही! तूही भित्र्यासारखी वागू नकोस. तो राम काय करतो, हे मी पाहणारच आहे."

जंगलातले सर्व वानर एकत्र होऊन रामाला मदत करायला सिद्ध झाले, सुग्रीव, नील, अंगद, सुषेण, जांबुवंत इत्यादि प्रमुख सेनापती होऊन रामाला मदत करण्यास उभे ठाकले. हनुमान रामाच्या खास विश्वासांतला अंगरक्षक. सर्वांनी एकत्र येऊन मोठ्या सैन्यानिशी लंकेवर स्वारी करण्याची तयारी झाली.

हनुमानाने डोंगर व पर्वत उचलून आणले व ते समुद्रांत टाकले.

मोठमोठ्या वानर वीरांनी मोठे खडक व शिळा आणून टाकल्या तर लहान लहान वानरांनी दगडधोंडे आणून टाकले.



शंभर योजने दूर असलेल्या लंकेपर्यंत समुद्रावर पूल बांधण्याची तयारी सुरुं झाली. नील वानराने पूल निर्माण करण्याच्या कामाचे पर्यवेक्षण करण्याची जबाबदारी स्वतःवर घेतली.

विभीषणाने आकाशमार्गे येऊन रामाकडे शरणागती मागितली. रामाने त्याला अभयदान देऊन तुला लंकेचा राजा करतो, असे वचन दिले. त्याने लगेच समुद्राच्या पाण्याने त्याला लंकेचा राजा म्हणून अभिषेक केला.

रामाने समुद्रावर सेतू बांधून कोदंडावर रामबाण ठेवला व वानरसेना पाठीमागून निघाली. दोन्ही बाजूला लक्ष्मण व हनुमान चालत होते, अशा समारंभाने रामाने लंकेवर स्वारी करण्यासाठी प्रस्थान केले. विभीषण त्यांच्या मागून निघाला.

हेरांतर्फे रावणाला कळले की राम वानरसेना बरोबर घेऊन समुद्रपार करून आला आहे. रावण आश्चर्यचकित झाला. एका मानवाने वानरांचे सैन्य घेऊन समुद्रावर शंभर योजने लांब पूल बांधला आणि त्रिलोकाला थरथर कांपविणाऱ्या रावणासारख्याला जिंकून व ठार करून आपली बायको सीता हिला सोडवून आणले असे म्हणविणार! हे कसे साध्य होत आहे? असे होणार कां? घाबरण्याचे कारण काय? असा विचार करीत असलेल्या रावणाला मंत्री प्रहस्त म्हणाला - "शत्रूला वाटेतच तोंड देऊन त्याला सामान्य समजून युद्ध करणेच योग्य!"

रावण हंसून म्हणाला - "आपल्या कुंभकर्णाला त्याला हवा तितका आहार मिळत नाही. त्यांना लंकेत येऊ दे. सर्वजण सांपळ्यात सांपडल्यासारखे सांपडतील. माझ्या धाकट्या भावाला पोटभर आहार मिळेल."

राम आपल्या सर्व वानरसेनेसह समुद्र ओलांडून समुद्र पार करुन लंकेच्या किनाऱ्यावर उतरला.

लंकानगरी उंच पर्वताच्या टोकावर निर्मिलेली होती. पर्वताच्या अग्रभागी रावण एका मोठ्या महालांत रहात असे.

आपल्या महालांतून रामाचे सैन्य किनाऱ्यावर आले ते रावणाने पाहिले. सर्व किनाराभर मुंग्यांच्या रांगांसारखे वानर सैन्य व्यूहरचना करीत होते.

अंगदाला त्याच वेळी वीरोत्साह चढला. तो आकाशांत उडाला आणि रावणाच्या महालावर जाऊन उतरला. तो रावणाला म्हणाला -

"ए रावणा! मागे कधी तुला आपल्या शेपटीने गुंडाळून फेकणारा वाली आठवतो कां? त्याचा



मी मुलगा, अंगद! तू तेव्हांपासून आजपर्यंत त्याच्याशी गौरवयुक्त वागणूक करीत आलास. म्हणून मी सांगतो ते ऐक. अजून वेळ हातची गेली नाही. रामाशी वैर करायचे सोड. त्याला शरण जा. वानरसैन्य आणून राम काय करू शकेल, असे मनांत समजून घेऊं नकोस. वानरांत किती शक्ती असते हे पुन्हां तुला सांगण्याची गरज नाही!

रावणाला राग आला. त्याने तलवार उपसली. अंगदाने उडी मारुन रावणाचा किरीट लाथ मारुन खाली पाडला आणि परत वानर सैन्य होते तेथे तो सुखरूप येऊन पोचला.

वानरसैन्याने लंकेला वेढा दिला. सैन्यांत रावणाची बरीच माणसे ठार झाली आणि परिस्थिती चिंताजनक झाली. तेव्हां रावणाने कुंभकर्णाची झोप मोडली. त्याला युद्धाला चल म्हणाला -

कुंभकर्णाने घोर तपश्चर्या केली तेव्हां ब्रह्मदेवाने त्याच्या सर्व इच्छा फिसकटवून टाकल्या.

सहा महिने झोप पुरी झाली नाही, तर कुंभकर्णाचे बळ कमी होते. रावण संतापून म्हणाला - "तुला युद्ध करायचे असेल तर कर, नाही तर जाऊन झोप!"

निद्राभंग झाल्यामुळे चिडलेल्या कुंभकर्णाने वानरांना धरुन खायला सुरवात केली. तेव्हां रामलक्ष्मणांनी सतत युद्ध केले आणि त्या युद्धांत रामाने कुंभकर्णाचा वध केला.

त्यानंतर अनेक शूर राक्षसवीर त्या युद्धांत मरण पावले. तेव्हां रावणाचा मोठा मुलगा इंद्रजित युद्ध करायला आला.



रावणाला आपला थोरला मुलगा म्हणजे फार मोठा आधार वाटे. मेघांत शिरून त्याने इंद्राला जिंकले होते म्हणून त्याला मेघनाथ हे आणि इंद्राला जिंकणारा इंद्रजित, ही नांवे प्राप्त झाली होती.

शिवाय त्याला युद्धांतले मंत्रतंत्र चांगले अवगत होते. तो महामायावी म्हणून ओळखला जाई. चौदा वर्षे ब्रह्मचर्य राखून निद्रा व आहार घेतल्याशिवाय जो राहील त्या वीरपुरुषाच्या हातीच त्याला मरण असल्याचे विभीषणाने सांगितले.

इंद्रजिताने एका मायावी सीतेची निर्मिती केली आणि रामाला ती दिसेल अशा तऱ्हेने तिचे तुकडे तुकडे करून टाकले.

लक्ष्मणाने ती मायावी सीता आहे, तेव्हां भिण्याचे कारण नाही असे त्याच्या दादाला सांगितले.



त्यानंतर रावणाने विद्युत्जिव्हा नांवाच्या राक्षसाकरवी रामाचे डोके तयार करवून ते भाल्याला खोचले आणि ते सीतेला नेऊन दाखवायला सांगितले. परंतु सीतेला ते खरे वाटले नाही.

"असल्या नकलांचे कौशल्य पाहण्यापेक्षा रावणाची खरी डोकी जमिनीवर लोळत असलेली पाहण्याची वेळ जवळ येत आहे!" असे तिने म्हटले.

इंद्रजितने मेघांत लपून रामलक्ष्मणांवर नागास्त्राचा प्रयोग केला. गरुडमंताने सर्व नागांचा संहार केला आणि रामलक्ष्मणांना नागाच्या जाळ्यांतून वांचविले.

सीतारामांच्या सेवेत चौदा वर्षे कठोर ब्रह्मचर्य राखून निद्रा, आहार न घेता राहणाऱ्या लक्ष्मणाच्या हाती इंद्रजिताचे मरण लिहिले आहे. हे विभीषणने सांगितले. लक्ष्मण, विभीषण व हनुमंताने जाऊन कांही काळे बकरे बळी दिले आणि इंद्रजित यज्ञ करीत होता तो उध्वस्त केला. नंतर लक्ष्मणाने इंद्रजिताचा वध केला.

रावणाने पाताळलंकेचा अधिपती मैरावण याला रामलक्ष्मणांना कालीसमोर बळी द्यायला सांगितले.

रामलक्ष्मण झोपी गेले असतां मैरावणाने आपल्या मायेने त्यांना प्रतिमा करुन टाकले आणि पाताळलंकेत घेऊन गेला. तेथे त्यांना बली देण्यासाठी सर्व तयारी केली.

हनुमानाला ते सर्व कळले व तो पाताळ लंकेत गेला. तेथे द्वारपालक म्हणून पाहारा देत असलेल्या मत्स्यवल्लभाशी युद्ध करीत असतां सुवत्सला देवीने येऊन तुम्ही दोघे पितापुत्र असल्याचे त्यांना समजावून सांगून ते युद्ध थांबविले.

हनुमानाने सूक्ष्म रूप धारण करून व कालिका देवीच्या देवळांत शिरून रामलक्ष्मणांना उचलून खांद्यावर घेतले व तो बाहेर आला. रामलक्ष्मणांनी मैरावणाशी युद्ध केले.

रामाला आपले दैवत मानणाऱ्या चंद्रसेनेला मैरावणाने तुरुंगात टाकले. तिच्याकडून मैरावणाचे मरण कशात आहे हे हनुमंताला कळले व त्याने त्याचा विध्वंस केला. त्यानंतर रामाने मैरावणाला ठार केले.

रामाने चंद्रसेनेला आत्मतत्वाचा बोध केला व पुढच्या जन्मांत तिला विष्णूचा लाभ होईल, असा आशीर्वाद दिला.

मत्स्यवल्लभाला पाताळलंकेचा अधिपती नेमून व रामलक्ष्मणाला खांद्यावर घेऊन हनुमान लंकेला आला.

सर्व मायावी उपाय निष्फळ ठरल्यावर रावणाने शूरवीर योद्ध्यांना आणि चतुरंग सेनेला जन्म देणारा पाताळलंकायज्ञ प्रारंभ केला. विभीषणाला ते गुपित माहीत होते. म्हणून त्याने तो यज्ञभंग करायला रामाला सांगितले.

अंगदाने अदृश्यकरणी विद्येच्या सहाय्याने जाऊन मंदोदरीचे केस धरुन तिला ओढीत आणून तो रावणासमोर गेला. रावणाची यज्ञदीक्षा भंग झाली व यज्ञभंगही झाला.

शेवटी रावण हताश होऊन युद्ध करायला निघाला. त्या वेळी पुन्हां मंदोदरीने सीतेला रामाकडे पोंचती करायला रावणाला विनविले.

"रावण हा रावणच असणार!" अशी सिंहगर्जना करुन रावणाने दहा घोड्यांचा रथ तयार करविला व त्यांत बसून तो युद्धाला निघाला.

लक्ष्मणाने इंद्रजिताचा वध केला होता, म्हणून रावणाला त्याचा भयंकर राग होता. एकदां बंधमुक्त केल्यामुळे इंद्राकडून रावणाला परोपकार म्हणून शक्ति महायुधास्त्र मिळाले होते. ते रावणाने लक्ष्मणावर टाकले. ती शक्ती लागल्याने लक्ष्मण बेशुद्ध होऊन पडला.

हनुमंताने कांही क्षणांत हिमालयपर्वतावर जाऊन सूर्योदय होण्यापूर्वी संजीवनीबुटी आणली. त्यामुळे लक्ष्मण पुन्हां शुद्धीवर आला.

रामारावणाचे युद्ध चालू असतां इंद्राने मातली नांवाच्या आपल्या सारथ्याला एका दिव्य रथासह रामाकडे पाठविला.

रामरावणांचे भयंकर युद्ध झाले. त्यात रावणाची डोकी एकामागून एक जमिनीवर लोळून पडत,



तेव्हां ती पुन्हां जाऊन रावणाच्या धडावर चिकटू लागली.

तेव्हां विभीषणाने एक गुपित सांगितले. रावणाच्या पोटांत अमृतपात्र आहे. ते जोपर्यंत बाहेर येऊन पडत नाही, तोपर्यंत रावणाचा वध होणार नाही. रामाने ब्रह्मास्त्र टाकून ते काम केले.

रावणाचे एकच डोके राहिले व तो तसाच जमिनीवर आदळला.

अशातऱ्हेने रावणाचा भेद सांगितल्यामुळे विभीषणाला 'घरभेदी' असे नांव कायमचे पडले.

रावण रणांगणावर पडल्यावर लंकेच्या साम्राज्याचा ऱ्हास झाला आणि राक्षसांचे राज्य कायमचे नष्ट झाले.

विभीषण लंकेचा राजा झाला.

रावण आणि कुंभकर्णाच्या वधानंतर जय आणि विजय यांचा दुसरा जन्म संपला.

अशोकवनातून सीता आली.

राम तिला म्हणाला, ''सीते! मी त्या दुष्टाला शिक्षा केली व राजा म्हणून आपल्या कर्तव्याचे पालन केले. रावणाने तुला बळजबरीने उचलून लंकेला नेले. मी तुझा स्वीकार करून तुला अयोध्येला कसा घेऊन जाणार? आता तू तुला हवे असेल तिकडे जा!''

सीतेने तेथे असलेल्यांना आज्ञा दिल्या सारखी खूण केली, कीं अग्नि प्रज्वलित करा.

सीतेने रामाच्या चरणारविंदावर दृष्टी ठेवून नमस्कार केला आणि अग्नीत उडी टाकली. अग्नी भगभग करून जळू लागला.

त्या आगीतून अग्निदेवाने प्रकट होऊन सीतेला नवीन उमललेल्या कमळासारखे दोन्ही हातांत उचलून आणून रामाला म्हटले, ''रामा, सीताही अग्नीसारखी पवित्र आहे. तिचा स्वीकार कर!''

त्याच वेळी स्वर्गातून विमानांत बसलेला दशरथ सर्वांना दिसला. तो म्हणाला, ''बाळा, रामचंद्रा! सीता अग्निपरीक्षेत पवित्र म्हणून निघाली आहे. तू तिच्या बरोबर अयोध्येला जाऊन राज्य कर.'' असा त्याने आदेश केला. राम पुष्पक विमानांत सर्वांसह बसला आणि अयोध्येला प्रस्थान केले.





## वाचकांसाठी कथास्पर्धा

## सर्वोत्कृष्ट प्रवेशिकेला रु. २५०/-चे पारितोषिक

*खालील गोष्ट वाचा:*

धनीराम आणि जगतराम हे शेजारी होते. धनीराम श्रीमंत होता पण जगतराम मात्र गरीब होता. त्याला चार मुलगे होते. त्यांचे पालनपोषण तो मोठ्या कष्टाने करीत होता.

त्या चौघा मुलांपैकी एकाला दत्तक घ्यावे असे निपुत्रिक धनीरामाला वाटले. तो जगतरामाकडे गेला आणि त्याने मुलांची विचारपूस केली. नंतर त्याने आपली इच्छा बोलून दाखवली.

पण जगतराम गप्प राहिला. मुलाला 'दत्तक देण्याच्या कल्पनेवर त्याने कांहीच मत दिले नाही. धनीरामला आश्चर्य वाटले. ''अरे, तुझ्या एका मुलाला अशी सोन्यासारखी संधी मिळेल. ती तुला कां नको आहे?''

आता विचार करा:

- जगतराम गप्प कां बसला?
- धनीरामने हा विषय कां वाढवला नाही?
- या सूचनेच्या मागे धनीरामचा काय हेतू होता?
- जर धनीरामने ही गोष्ट मुलांना परस्पर सांगितली असती, तर त्यांची काय प्रतिक्रिया झाली असती?

तुमची प्रतिक्रिया १००-१५० शब्दांत लिहा व गोष्टीला समर्पक शीर्षक द्या. खालील कुपन भरुन त्याबरोबर तुमची प्रवेशिका पाठवा. पाकिटावर ''वाचा नि सुचवा'' असे जरुर लिहा.

**शेवटची तारीख : २८ फेब्रुवारी, २००५**

नांव ........................ वय ........

जन्मतारीख ........................ शाळेचे नांव ........................

घरचा पत्ता ........................

........................

........................ पिनकोड ........

**पालकांची सही** **स्पर्धकाची सही**

CHANDAMAMA INDIA LIMITED

82 Defence Officers Colony, Ekkatuthangal, Chennai - 600 097.



# अनोखी समज

**फार** फार पूर्वीची गोष्ट आहे ही! महोबा गांवात अनेक धनवंत राहात होते. त्याच गांवात रामगुप्त नांवाचा एक वाणी होता. त्याला दोन मुलगे होते. बापलेक मिळून लहानमोठे व्यापार करीत होते.

एके काळीं रामगुप्त खूप श्रीमंत होता. पण व्यापारांत त्याने आपली संपत्ती घालवली. आता त्याच्याजवळ राहात्या घराखेरीज संपत्ती म्हणून कांहीही उरले नव्हते. तरीदेखील तो निराश झाला नव्हता. आपले नशीब लौकरच उजळेल, या आशेने त्याने पुन्हां व्यापार सुरुं केला. पूर्वीसारखे आपण धनवान होउं, ही इच्छा मनांत प्रबळ होती.

महोबा गांव सधन होते म्हणून गांवावर वरचेवर दरोडे पडत. दरोडेखोर येणार आहेत अशी बातमी मिळाली कीं गांवकरी आपला पैसा अडका कुठेतरी पुरुन ठेवीत किंवा बरोबर घेऊन दुसऱ्या गांवी पळून जात.

एकदा अशीच परिस्थिती गांवावर आली. दरोडेखोर येणार असं समजल्याबरोबर सर्वांनी आपापली घरे रिकामी केली. पण रामगुप्त आपल्या मुलांना म्हणाला, "पोरांनो, मी कांही तुमच्याबरोबर येऊं शकणार नाही. दोन दिवस इथेंच कुठेतरी लपूनछपून राहीन. आपल्या मागीलदारी गोठ्यांत भरपूर जेवण व प्यायचे पाणी गवतामधे ठेवून द्या, आणि मग जा!"

त्यानंतर त्याच्या मुलांनी रामगुप्तला मोठ्या सफाईने गवताच्या गंजीमधे लपवले आणि ते गांवातून पळून गेले.

चोरदरोडेखोर गांवात आले. त्यांनी घराघरातून तपास केला. त्यांचा नायक एका आळीतून घोड्यावर बसून चालला होता. त्यांनी जी कांही लूट केली, ती दोन पोत्यांत भरुन घोड्याच्या पाठीवर लादली होती. त्या नायकाचे डोळे एका मोठ्या घरावर आणि त्याच्या मागील दारच्या अंगणावर रोखलेले होते. ते रामगुप्ताचेच घर होते.

टोळीचा नायक जेव्हां त्या घरांत घुसला, तेव्हां रामगुप्त कासावीस होऊन नायकाची हालचाल बघत होता.

नायकाने आपला घोडा गवताच्या गंजी-जवळच एका दगडाला बांधला आणि तो मोठ्या जोषांत त्या घरांत शिरला. घोड्याला भूक लागली होती, तो गंजीतले गवत खाऊं लागला.

ही संधी साधून रामगुप्त गंजीच्याबाहेर आला. त्याने घोड्याच्या पाठीवरची पोती खाली उतरवली आणि घोड्याची दोरी सोडून टाकली. ती पोती ओढत त्याने गंजीत लपवली आणि आपणही लपला. दोरी मोकळी झाल्यामुळे घोडा जरा दूर जाऊन गवतात चरायला लागला.

बराच वेळ त्या मोठ्या घरांत शोध घेऊन चोरांच्या नायकाच्या हातांत कांहीच लूट मिळाली नाही. तो बाहेर येऊन पाहातो तर घोडा दोरी तोडून दूर गेला होता आणि गवताळ रानांत चरत होता. त्याच्या पाठीवरची लुटीची पोती दिसत नव्हती.

त्या नायकाने वाटेंत तर पोती पडली नसतील ना, म्हणून साऱ्या अंगणात शोध घेतला. तेवढ्यांत त्याचे साथीदार तिथे येऊन पोंचले. त्यांना पाहून चोरांचा नायक त्यांना विचारुं लागला, "अरे, तुमच्यापैकीं ती पोती घोड्यावरुन खाली काढली कां?"

चोरांनी एकमेकांकडे सावधपणे पाहिले. त्यांच्या मनांत शंका उत्पन्न झाली की लुटीचा माल नायकानेच लपवला आहे व तो हे वेड पांघरतो आहे. त्या सर्व चोरांनी मिळून आपल्या नायकाला विचारलं, "या गांवात तर आपल्याखेरीज एकही माणूस नाही. पोती चांगलीच जड होती. ती नाहीशी कशी होतील?"

त्यानंतर सर्वांनी पोती शोधली, पण कुठेही ती दिसली नाहीत. चोरांच्या नायकाने ती पोती शोधून काढायची जबाबदारी स्वीकारली.

दुसऱ्या दिवशी महोबा गांवातून ते निघून गेले. दरोडेखोर गांवातून गेल्याची बातमी सारे समजल्या-बरोबर सारे गांवकरी परत गांवात आले. रामगुप्तने ती पोती आपल्या घरांत अगदी हुशारीने लपवली



२५ वर्षांपूर्वीची चांदोबात प्रकाशित झालेली कथा

होती. आपल्या मुलांनाही त्याने ही गोष्ट सांगितली नाही. टोळीच्या नायकाने ती पोती शोधायची जबाबदारी घेतली होती हे त्याला ठाऊक होते.

रामगुप्ताच्या अंदाजानुसार तो नायक घोड्यांचा व्यापारी होऊन त्या गांवात कांही दिवसांनंतर आला, आणि तिथल्या सधन लोकांबद्दल चौकशा करायला लागला.

नुकत्याच पडलेल्या दरोड्यानंतर आता कुणाची आर्थिक परिस्थिती सुधारलेली आहे, हे त्याला शोधून काढायचं आहे.

तो चोर त्याच्या घरी रात्री येऊं शकेल अशी रामगुप्तच्या मनांत शंका होती. मागल्या अंगणावर तो रात्रीच्या अंधारात नीट लक्ष ठेवून होता.

त्याच्या अंदाजाप्रमाणे रात्र झाल्यावर तो दरोडेखोर हळूंच अंगणात आला आणि घराच्या भिंतीलगत चिकटून खाली बसला. घरांतली मंडळी जर कांही बोलली तर ते ऐकायला मिळावं, हा त्याचा हेतू होता.

त्याला तिथे लपलेला पाहून रामगुप्ताने आपल्या मुलांना बोलावून मोठ्या आवाजांत सांगायला सुरवात केली, "मुलांनो, परवा मी गवताच्या गंजीतून कांही पेंढ्या ओढून काढीत होतो, तर त्या गवताच्या खाली दोन दागिन्यांची पोती मिळाली."

दोन्ही मुलांनी आश्चर्याने विचारले, "अस्सं? पण तुम्ही आम्हाला कांही बोलला कसे नाही?"

"मुलांनो, अरे ती पोती कुणाची आहेत, हे कळल्याशिवाय मी काय सांगणार? म्हणून मी ती सध्यां नीट लपवून ठेवली आहेत!" रामगुप्ताने सांगितले.

"कुठे लपवली आहेत?" मुलांनी विचारले.

"आपल्या विहिरींत टाकली आहेत" रामगुप्ताने उत्तर दिले.

दरोडेखोरांच्या नायकाला हे ऐकून फारच आनंद झाला. सगळीकडे नीजानीज झाल्यानंतर त्याने एक दोरी विहिरीवरच्या चाकाला बांधली आणि स्वतःच्या कमरेला दुसरे टोंक बांधले. तो विहिरींत उतरला.

लगेच रामगुप्तने आपल्या मुलांना खरी गोष्ट सांगितली. तिघांनी ती दोरी कोयत्याने कापली आणि वरुन दगड मारुन त्या चोराला ठार मारले. त्याचे प्रेत वर काढून ते बाहेरच्या शेतांत पुरले. त्यानंतर रामगुप्त जन्मभर धनिक बनून राहिला.





# आर्य

## अज्ञात राजकुमाराचे रहस्य

शांतिपुरची गादी बळकावणारा वीरसिंह शिकारीचे निमित्त करुन बंडखोरांचा शोध घेण्यासाठी अरण्यांत जातो. त्यांच्यावर वन्य पशू हल्ला करतात. एका सुंदर युवकाच्या आज्ञेवरुन ते प्राणी माघार घेतात. वीरसिंह चकित होतो व त्या तरुणाविषयी कुतुहल व्यक्त करतो. तितक्यांत जयनगरमधे खणताना एक सुवर्णमूर्ती मिळते. सुखदेव सरदार त्यासाठी एक मंदिर बांधायचा आदेश देतात.

चित्र : गाँधी अय्या















**Statement about Ownership of CHANDOBA (Marathi)**
Rule 8 (Form VI), Newspaper (Central) Rules, 1956

1. **Place of Publication**
   82 Defence Officers Colony
   Ekkatuthangal, Chennai-600 097
2. **Periodicity of Publication**
   MONTHLY
   1st of each calendar month
3. **Printer's Name**
   B. VISWANATHA REDDI
   **Nationality**
   INDIAN
   **Address**
   82 Defence Officers Colony
   Ekkatuthangal, Chennai-600 097
4. **Publisher's Name**
   B. VISWANATHA REDDI
   **Nationality**
   INDIAN
   **Address**
   82 Defence Officers Colony
   Ekkatuthangal, Chennai-600 097
5. **Editor's Name**
   B. VISWANATHA REDDI
   (Viswam)
   **Nationality**
   INDIAN
   **Address**
   82 Defence Officers Colony
   Ekkatuthangal, Chennai-600 097
6. Name and Address of individuals who own the newspaper
   Chandamama India Ltd.
   Board of Directors:
   1. P. Sudhir Rao
   2. Vinod Sethi
   3. B. Viswanatha Reddi
   82 Defence Officers Colony
   Ekkatuthangal, Chennai-600 097

*I, B. Viswanatha Reddi, do hereby declare that the particulars given above are true to the best of my knowledge and belief.*

(Sd.) B. VISWANATHA REDDI
1st March 2005 *Publisher*






# कमेरची सूचना

लक्ष्मणदास सिंहपुरींत राहात होता. त्याला तीन मुलगे व तीन मुली होत्या. सर्वांची लग्नें झाली होती आणि सगळेजण त्याच गांवात राहात होते. लक्ष्मणदासची एक तीव्र इच्छा होती कीं त्याची एखादी तसबीर असावी. पण त्यांच्या गांवात अशी चित्रें काढणारा कुणीही चित्रकार नव्हता. लक्ष्मणदासचे आपल्या नातवावर, शंकरवर फार प्रेम होते. शंकरने चित्रकलेचा अभ्यास करावा असं लक्ष्मणदास त्याला लहानपणापासूनच सांगत होता.

पण आपल्याला चित्रकलेंत मुळीच रस नाही असे शंकरने आजोबांना स्पष्टच सांगून टाकले. कोणत्याही परिस्थितींत ते चित्रकार होणार नव्हता. आता शंकर अठरा वर्षांचा झाला, तरीदेखील त्याला चित्रकलेची गोडी लागली नाही. जेव्हां लक्ष्मणदास खूप आजारी पडला. तेव्हां त्याने नातवाला सांगितले, "आता मी कांही फार दिवस राहाणार नाही. मरायच्यापूर्वी माझं एखादं चित्र असावं असं मला नेहमी वाटत होतं. पण ते माझं स्वप्न, आता केवळ एक स्वप्नच राहील." आजोबांचा आवाज अगदी केविलवाणा झाला होता.

शंकरने धीर एकवटून म्हटले, "तुमची इच्छा पूर्ण करायला मी आत्ताच शहरांत जातो, आणि तिथून एखाद्या चित्रकाराला घेऊन येतो."

नातवाचे हे आश्वासक शब्द ऐकून लक्ष्मणदास बेहद्द खूष झाला. त्याने नातवाला म्हटलं, "तुझा हा निर्णय बरोबर आहे, पण हे कळल्यानंतर लोक हंसतील, या वयांत ही इच्छा धरलेली ऐकून मला टोमणे मारतील. आपल्या कुटुंबात सुमारे तीसजण आहेत. तू त्या चित्रकाराला सांग कीं आपल्या साऱ्या परिवाराचे चित्र त्याने काढले पाहिजे. म्हणजे त्यांत माझे चित्र येईलच!"

शंकर शहरांत गेला. त्याने चित्रकाराला शंभर रुपये द्यायचे असे मनाशी ठरवले होते. पण चित्रकाराने सांगितले की ह्या कामासाठी दहा हजार रुपये अगोदर दिले, तरच तो हे काम करुं शकला असता. त्याचे म्हणणे होते कीं इतक्याजणांचे एकत्र

श्री रामकमल



चित्र काढायचे म्हणजे त्याच्यावर बरीच मेहनत करावी लागली असती. प्रत्येकाचा चेहरा स्पष्टपणे दाखवायचा म्हणजे कांही सोपे काम नव्हते. त्याची ही मागणी ऐकून शंकर गार पडला. आता त्याला कळले कीं त्याचे आजोबा त्याने चित्रकार व्हावे म्हणून इतका आग्रह कां धरीत होते ते! एवढी मोठी रकम देणे त्याला कांही शक्य नव्हते. नाईलाजाने तो सिंहपुरीला जायला निघाला. सुदैवाने त्यावेळी त्याची भेट कमेरशी झाली.

कमेरजवळ एक यंत्र होते. त्या यंत्रात पांढरे कापड ठेवायचे आणि मंत्रोच्चारण करीत जे दृश्य यंत्रासमोर दिसत असे, त्याची प्रतिमा त्या कापडावर चित्रासारखी उमटत असे. चित्रकारांनी काढलेल्या चित्रापेक्षां हे यंत्रातले चित्र जास्त स्पष्ट व सहजसुंदर दिसत असे.

"मला तुझ्या इच्छेबद्दल माहिती आहे. तुमच्या परिवाराचे चित्रांकन करण्यासाठी ह्या यंत्राचा उपयोग करता येईल. त्यासाठी जास्त नाही, फक्त पन्नास रुपये तू मला दे!" कमेरने सांगितलं.

शंकरला आनंद झाला. पण शंका वाटून त्याने विचारले, "हे यंत्र तुला कुठे मिळालं?"

कमेरने न चांचरता स्पष्ट उत्तर दिलं, "माझे मामा या मंत्रतंत्रात प्रवीण आहेत. वर्षापूर्वी त्यांनी हे यंत्र तयार केलं आणि मला दिलं. माझ्या साऱ्या नातेवाईकांना बरोबर घेऊन मीही सर्वांचे एकत्र असे एक चित्र काढले आहे. हे बघ!" असे म्हणून कमेरने एक कापडाचा तुकडा बाहेर काढला. त्यावरच्या चित्रांत प्रत्येकाचा चेहरामोहरा व छबी अगदी स्पष्ट व रेखीव दिसत होती. पण त्यांच्यापैकी एक माणूस असा होता कीं त्याचे चित्र पाहून हंसायलाच येत होते.

"हा असा विकृत दिसणारा माणूस कोण आहे?" शंकरने आश्चर्याने विचारले.

कमेरने हंसत म्हटले, "यांचं नांव आहे सुरुपी! मी जी चित्रे या यंत्रावर बनवतो, त्यांत कुणी ना कुणी एकजण आपल्याला असा अवश्य दिसेल."

क्षणभर विचार करुन शंकर पुढे म्हणाला, "माझ्या आजोबांची इच्छा आहे कीं त्यांच्या सबंध परिवाराचं एक चित्र बनवावं. त्यांची ही इच्छा पूर्ण करण्यासाठी मी कुठलाही त्याग करायला तयार आहे. फक्त मला चिंता वाटते ती एकाच गोष्टीची! कीं माझ्याऐवजी जर माझे आजोबा चित्रांत कुरुप दिसले तर त्यांना वाईट वाटेल."

"अगोदर तूच कबूल कर कीं मग तुझंच चित्र विकृत दिसेल." कमेर म्हणाला.

दोघेही सिंहपुरीला पोंचले. शंकरने आपल्या परिवारांतल्या सर्व मंडळींना त्या यंत्राचा महिमा सांगितला. त्या यंत्रातून आपले चित्र काढण्यासाठी सारेजण उतावीळ झाले होते.

बागेत सर्वजण एकत्र जमले. साऱ्यांनी चांगली वस्त्रे परिधान केली होती, आणि भरपूर दागदागिने अंगावर घालून साऱ्याजणी नटल्या होत्या.

आपले यंत्र घेऊन कमेर सर्वांच्यासमोर उभा राहिला. त्या यंत्रात त्याने एक पांढरेशुभ्र कापड घातले, आणि डोळे मिटून मंत्रोच्चारण केले. नंतर डोळे उघडून ते वस्त्र त्याने शंकरला दिले. त्यांतली आपली छबी पाहून शंकर उदास झाला. त्याचे चित्र पाहून रागावलेला माणूसदेखील हंसत सुटला असता. जवळ असलेले इतर लोक चित्र पाहायला उत्सुक होतेच. ते गडबड करु लागले. शंकरने ते चित्र त्यांना दिले, आणि तो स्वतः दूर जाऊन उभा राहिला.

कमेरने शंकरची पाठ प्रेमाने थोपटली व म्हटले, "तुझ्या आजोबांचं चित्र पाहायची तुला तीव्र इच्छा होती ना? आवडली कीं नाही त्यांची छबी?"

"मी त्यांचं चित्र पाहिलंच नाही. माझी छबी खराब दिसली, तेव्हां माझं मनदेखील दुःखी झालं. आता हे सगळेजण माझी टिंगल करतील!" शंकर म्हणाला. त्यावर मोठ्याने हंसून कमेरने त्याला सांगितले, "तू तुझ्या आजोबांसाठी एवढा मोठा त्याग केलास खरा; पण आश्चर्याची गोष्ट म्हणजे तू त्यांची तसबीर पाहिलीच नाहीस; तू फक्त स्वतःचीच तसबीर बघितलीस. आता तिकडे बघ!"

शंकरने आपल्या कुटुंबातल्या इतर लोकांकडे निरखून पाहिलं. प्रत्येकजण स्वतःचेच चित्र पाहाण्यांत रमला होता व खूष होत होता. इतरांच्या चित्राकडे पाहाण्यांत कुणालाच रस नव्हता.

तेव्हां कमेर शंकरला म्हणाला, "पाहिलंस ना, आजूबाजूच्या कोणाही व्यक्तीच्या चित्राकडे कुणाचं लक्ष नसतं. प्रत्येकजण फक्त आपलेच चित्र पाहण्यांत गुंग होतो. मनुष्यस्वभाव असाच असतो. म्हणून तुझे चित्र बिघडलेले दिसले, तरी तुझी टिंगल करतील असं मुळीच मनांत आणू नकोस." कमेरचे हे शब्द ऐकून शंकरची खिन्नता नाहीशी झाली. आता त्याचा चेहरा शांत झाला व मनोमन तो आनंदून गेला. त्याने कमेरला ठरल्यापेक्षां जास्त पैसे दिले आणि त्याला प्रसन्न मनाने निरोप दिला.





# मेहनतीचं फळ

**त्या** रात्री सगळ्या मुलांनी लवकर जेवणें आटोपली आणि आजीजवळ गोष्ट सांगायचा हट्ट मुलांनी धरला. आजीने सगळ्यांकडे प्रेमाने बघितले आणि गोष्टीला सुरवात केली.

फार वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. गंगापुरांत रतन नांवाचा एक शेतकरी राहात होता. त्याच्याकडे चार एकर जमीन होती, पण त्यांतली दोन अेकर जमीन ओसाड आणि खडकाळ होती. रतनला दोन मुलगे होते जेव्हां ते दोघे मोठे झाले आणि आता काम करण्याच्या योग्य अशा वयाचे झाले, तेव्हां रतनची पत्नी वारली.

रतनचा मोठा मुलगा वीर अत्यंत आळशी होता. त्याच्या वडिलांनी त्याला समजावण्याचा खूप प्रयत्न केला, पण कांही उपयोग झाला नाही. वीर वेळेवर जेवायचा, गांवात टवाळकी करायचा, आणि पुन्हां रात्री यथेच्छ जेवून झोपी जायचा. पण धाकटा मुलगा माणिक हा मात्र फार मेहनती होता. तो वडिलांना कामांत मदत करीत असे.

कांही वर्षे उलटली आणि अचानक रतन आजारी पडला. त्याने अंथरुण धरले. एके दिवशी त्याने माणिकला जवळ बोलावले आणि पाणावलेल्या डोळ्यांनी म्हटले, "पोरा, मी आता कांही फार दिवस राहाणार नाही. तुझी मला काळजी नाही. पण तुझ्या भावाची मात्र मला फार फार चिंता वाटते. तू माझी एक इच्छा पूर्ण करशील?"

"सांगा बाबा, तुम्हाला जे हवंय तेच मी करीन." मणिकने म्हटलं. त्यावर रतन त्याला म्हणाला, "बाळ, तू कष्टाळू आहेस. परमेश्वर हा कष्टकऱ्याचा पाठीराखा असतो. म्हणून ती खडकाळ जमीन तू घे. माझी खात्री आहे कीं तू मेहनत करुन ती ओसाड जमीन कसशील आणि त्यांत सोन्याचे पीक काढशील. ती शेतीची चांगली जमीन आहे, ती तुझ्या भावाला दे. जरूर पडेल त्यावेळी त्याला मदत करीत राहा." असं म्हणून रतनने डोळे मिटले. त्याला सुखाचे मरण आले होते.

त्यानंतर पित्याने सांगितल्याप्रमाणे माणिकने दोन एकरांची सुपीक जमीन व राहाते घर थोरल्या भावाच्या स्वाधीन केले. तो स्वतः त्या ओसाड जमिनीत एक खोपटे बांधून राहायला लागला व रात्रंदिवस तिथे कष्ट करुं लागला.

माणिकच्या ओसाड शेताच्या हद्दीलगत एक आंवळ्याचे झाड होते. त्या झाडावर एक देवी राहात होती. खडकाळ ओसाड जमिनीत माणिक अविश्रांत मेहनत करीत होता. ते पाहून त्या देवीला त्याची दया आली. त्याच्या मेहनतीचे त्याला चांगले फळ मिळावे, असा ती त्याला आशिर्वाद देत होती. माणिकने ती जमीन साफसूफ केली. दगडगोटे काढून ती नीट नांगरली आणि त्यांत बियाणे पेरले. प्रत्येक बीने रोप धरले आणि शेतांत चांगले पीक तरारले.

इकडे वीरने आपल्या शेताची देखरेख व इतर जबाबदारी दुसऱ्यावर सोंपवली, आणि स्वतः मात्र रिकामटेकडा राहून गप्पाटप्पांत फालतू वेळ घालवत बसला. त्याच्या शेतापेक्षां माणिकचे शेत जास्त चांगले दिसत होते आणि चांगले पीक उभे राहिलेले होते. एके दिवशी जेव्हां वीर माणिकच्या शेतावरुन जात होता, तेव्हां ते बहरलेले शेत पाहून तो चकित झाला. त्याने लगेच माणिकला बोलावले आणि प्रेमाचे नाटक करीत तो म्हणाला, "भाऊ, आपल्या बाबांनी तुला ओसाड जमीन देऊन तुझ्यावर फार मोठा अन्याय केला आहे. तो मला सहन होत नाही. त्यापेक्षां आपण जर आपल्या शेतांची अदलाबदल केली तर ते जास्त योग्य होईल रे!"

भावाच्या मनांत ईर्षा निर्माण झाली आहे. हे माणिकच्या लगेच ध्यानांत आले. पण, त्याला वडिलांची शेवटची इच्छा आठवली आणि त्याने आपले हिरवेगार सुंदर शेत थोरल्या भावाला दिले. माणिकच्यावर जो अन्याय झाला त्याची कथा



गांवाचा प्रमुख भूषण याच्यापर्यंत पोंचली. तो नाराज झाला. त्याने ताबडतोब वीरला बोलावून घेतले आणि सांगितले, "वीर, तू आपल्या भावाच्या चांगुलपणा फायदा घेतो आहेस आणि भावावर फार मोठा अन्याय करतो आहेस. पुन्हां जर अशी चूक केलीस तर लक्षांत ठेव. मी तुला जास्तीत जास्त कठोर शिक्षा देईन." त्याने कडक शब्दांत वीरला सुनावले.

दुसऱ्या दिवशी भूषण स्वतः माणिकच्या झोंपडीकडे गेला आणि त्याने विचारले, "ठीक आहेस ना?" त्यानंतर त्याने तांदळाचे एक पोतें झोंपडीत आणवले आणि ते तिथे ठेवीत भूषण म्हणाला, "माणिक, मी हे तांदूळ तुला दान देतोय असं मात्र समजूं नकोस हां! माझी पत्नी आणि मी, आमची दोघांची इच्छा आहे की आमची मुलगी चंदना हिचे लग्न तुझ्याशी व्हावे. माझ्या मुलीलाही

चित्रकथा क्र.२ - श्री ललिता

तू पसंत आहेस. तिच्याशी लग्न करुन तुम्ही दोघेही आमच्याजवळच राहावे.''

भूषणचे हे प्रेमळ शब्द ऐकून माणिकचे डोळे पाणावले. त्याने नम्रपणे म्हटले, ''हे पाहा साहेब, आपल्या मुलीशी विवाह करायला माझी ना नाही. पण आज माझी परिस्थिती चांगली नाही. माझ्या पत्नीसाठी एखादी चांगली साडी घेण्याचीदेखील माझी आज कुवत नाही. मी वर्षभर मेहनत करीन, थोडे फार पैसे कमावीन आणि त्यानंतरच तुमच्या मुलीशी विवाह करुं शकेन.''

माणिकचा हा स्वाभिमान पाहून भूषण फारच खूष झाला. देवीही त्याच्यावर प्रसन्न झाली. दुसऱ्याच दिवशी आंब्याचे रोप लावावे म्हणून माणिक जमीन खणत होता, आणि त्याला जमिनींत सोन्याच्या मोहरांचा एक हंडा मिळाला. तो हंडा घेऊन तो तडक भूषणच्याकडे गेला आणि त्याने सारी हकीकत सांगितली.

भूषण जास्तच खूष झाला नि म्हणाला, ''हे बघ माणिक, एखाद्या वनदेवीने तुझ्यावर प्रसन्न होऊन तुला हे बक्षीस दिलं असावं, आता तू माझ्यापेक्षांही जास्त सधन झाला आहेस. आता तर माझ्या मुलीशी लग्न ठरवायला तुझी कांही हरकत नाही ना?''

माणिकने आपली संमती दिली. हे सगळं वीरच्या कानावर गेलं. आपल्या चुकीच्या वागणुकीबद्दल त्याला पश्चात्ताप वाटायला लागला. तो माणिकला भेटून म्हणाला, ''अरे भाऊ, मेहनतीचं फळ काय असतं, ते आज मला समजलं. तुझे कष्टाचे फळ लुबाडून मी फार मोठं पाप केलंय. माझी दोन एकर जमीन आहे तीही तू घेऊन टाक. मी तुझ्याकडे नोकरी करीन आणि मेहनत करुन सुखाने जगीन.''

माणिकने भावाला मिठी मारली आणि प्रेमभराने म्हटले, ''दादा, आपण दोघेजण मिळून शेतांत कष्ट करुं या. जे कांही असेल, ते यापुढे आपल्या दोघांचं आहे.''

आजींने गोष्ट संपवली आणि पुढे म्हटले, ''मुलांनो, तुम्हालाही वीरच्या प्रमाणे आता समजलं असेल कीं मेहनतीचं फळ किती आनंद देतं ते! मेहनत म्हणजे कामावर तुमची श्रद्धा असायला हवी. काय?'' मुलांनी आनंदाने जोरांत उत्तर दिले, ''आजी, यापुढे आम्ही देखील रोजचा अभ्यास व लेखन-वाचन अगदी मनःपूर्वक, श्रद्धेने, करुं!''







# अस्वल्या मांत्रिक

## 16

*(अस्वल्या मांत्रिकाने दुर्मुखराजाला क्षमा केली. तो मायामर्कटाचा शोध घेऊं लागला. अंगरक्षकांनी सांगितले कीं मायामर्कट जीवगुप्ताबरोबर आहे. कालीवर्माबरोबर मांत्रिक तिकडे जायला निघाला. तेवढ्यांत उग्रदंड राक्षसाने मायामर्कटावर दगडी गदा फेकली. तो त्यांतून वाचला आणि घोड्यावर स्वार झाला. त्यानंतर....)*

जेव्हां उग्रदंड राक्षसाने पाहिले की मायामर्कटाला गदेमुळे जखम न होता तो बांचला आणि घोड्यावर बसला, तेव्हां उग्रदंड बेभान झाला. त्याने पुन्हां हातांत गदा घेतली आणि नेम धरुन ती फेकली. पण गदा घोड्याच्या डोक्याला लागली. तो जोराने खिंकाळत सैरभैर पळत सुटला, आणि या गडबडीत तो दुसऱ्या घोड्यावर आपटला. त्या घोड्यावरचा सैनिक धाडदिशी खाली पडला. मायामर्कटाने या संधीचा फायदा घेतला व तो त्या घोड्यावर स्वार होऊन नगराच्या दिशेने जाऊं लागला. उग्रदंड त्याचा पाठलाग करील म्हणून मायामर्कटाने अगोदरच जीवगुप्त मंत्र्याला म्हटले, ''जीवगुप्त, तुझी प्रत्येक खेळी चुकीची ठरली. मी सरळ चंद्रशिलानगराकडे जातो आहे. तिथे महाराज जितकेतूंना सारी माहिती सविस्तर सांगेन, आणि नगराच्या सुरक्षिततेची सारी व्यवस्था करीन.''

किल्ल्याच्या बाहेर निघालेले अस्वल्या मांत्रिक आणि कालीबर्माला बघून जीवगुप्त मंत्री भीतीने



थरथर कांपायला लागला. ते दोघे त्याच्याच दिशेने येत होते. त्याने मायामर्कटाला म्हटलं, "जरा थांब रे! महाबलशाली राक्षस आणि अलौकिक शक्तिचा स्वामी अस्वल्या मांत्रिकाखेरीज आता चंद्रशिला नगरीला कोणीतरी वांचवू शकेल कां? माझं ऐक. आपण दोघेजण इथून सरळ अरण्यांत पळून जाऊं."

"मंत्रीजी, असला पळपुटेपणा भेकड माणसे करतात. मी तुमच्यासारखा मित्रा नाही. कोणत्याही परिस्थितीत जितकेतु महाराजांना मला तावडतोब भेटलंच पाहिजे. त्यानंतरच अस्वल्या मांत्रिक आणि कालीवर्माला मारुन टाकण्याची योजना ठरवता येईल." असे म्हणून मायामर्कटाने नगराच्या दिशेने वेगाने घोडा दौडवला.

उग्रदंड राक्षस दांतओठ खात चिडून म्हणाला, "अरे मंत्री, ना मी तुझ्या सैनिकांचा शत्रू आहे, ना तुमच्या मांडलिक सूर्यभूपतीचा! कालीवर्माला फांसावर चढवण्याची कल्पना तूच सांगितली होतीस. मी तुलाच चांगली कडक शिक्षा देईन. अगोदर घोड्यावरून खाली उतर."

उग्रदंडाचे बोलणे पूर्ण होण्याअगोदरच जीवगुप्त मंत्र्याने घोड्याला सावध केले आणि तो सैनिकांना ओरडून सांगू लागला, "हा राक्षस आपल्या सर्वांवर तुटून पडेल आणि मारुन टाकील. ज्याला आपले प्राण वांचवायचे असतील, त्या सर्वांनी माझ्याबरोबर यावे." असं म्हणून मंत्री नगराच्या दिशेला जायला लागला.

सूर्यभूपती व सैनिक जीवगुप्ताच्यामागून जायला निघत होते. तितक्यांत उग्रदंडाने एका घोड्याचा पाय पकडला आणि ओढला. घोडा आणि त्याच्यावर बसलेला सैनिक, दोघेही खाली पडले. उग्रदंडाने त्या सैनिकाची मानगूट पकडली आणि त्याला वर उठवून म्हटले, "मला वाटतं, तुझे हातापाय अजून तुटलेले नाहीत. तेव्हां तू अरण्यांत पळून जा. तिकडे नगरापेक्षां जास्त सुरक्षित आहे."

तितक्यांत अस्वल्या मांत्रिक आणि कालीवर्मा तिथे पोंचले. नगराच्या दिशेने पळणाऱ्या सैनिकांना पाहात कालीवर्मा म्हणाला, "उग्रदंडा, मंत्र्या-बरोबरच्या सर्व सैनिकांना तुम्ही सोडून दिलंत आणि या बावळ्याला पकडलंत? तुम्ही जीवगुप्ताला सोडायला नको होतंत."

उग्रदंड राक्षस निराशेने मटकन खाली बसला आणि आपली गदा दूर फेंकत तो म्हणू लागला, "अस्वल्या मांत्रिका, त्या मायामर्कटाकडून मी फार वाईट बातमी ऐकली. त्याचं म्हणणं होतं कीं तांत्रिक मिथ्यामिश्रानेच माझ्या थोरल्या भावाला मारुन टाकलं होतं. त्याच्या बोलण्यावर कितपत विश्वास ठेवायचा?"

अस्वल्या मांत्रिकाने विचारलं, "तुझ्या भावाचं नांव काय?"

"कालदंड! हे नांव तू यापूर्वी कधी ऐकलं होतंस कां? त्याचं घरदेखील तुम्ही सांगितलेल्या भल्लूकपाद पर्वतावरच आहे." उग्रदंडाने सांगितलं.

अस्वल्या मांत्रिकाने नकारार्थी मान हालवीत म्हटले, "उग्रदंडा, तो मांत्रिक माझ्या गुरुला मारायला उठला आहे. आणि त्याच्यासाठी कोणत्याही क्षुद्र माणसाची मदत तो घेतो आहे. त्याने कांही लोकांना आपल्या मंत्रशक्तीने बांधून ठेवले आहे आणि तो त्यांच्याकडून काम करवून घेतो आहे. कालदंड नांवाचा राक्षस मी ओळखत नाही. पण हा मायामर्कट थोड्याफार मंत्रशक्ती जाणतो. त्याच्या बोलण्यावर विश्वास ठेवू नकोस."

उग्रदंडाने एकवार आपले शरीर झटकले आणि उभा राहून तो म्हणाला, "माझा थोरला भाऊ जिवंत आहे, ह्यावर माझा पूर्ण विश्वास आहे. कांही वर्षांपूर्वी ब्रम्हपुत्रा नदीच्या खोऱ्यांत असलेल्या कांही नवीन मांत्रिकांना घाबरुन तो तिथून निघून गेला. त्यांच्या मंत्रतंत्रापुढे माझी गदा निरुपयोगी आहे. तुझा गुरु मंत्रतंत्रशक्तीमधे त्यांच्यापेक्षां खूप समर्थ आहे असं तू म्हणतो आहेस, म्हणून मी तुझ्याबरोबर त्या प्रदेशांत येईन आणि त्या दुष्टांचा सर्वनाश करण्यांत तुला सर्व तऱ्हेची मदत करीन."

त्याच्या बोलण्यावर मांत्रिक आणि कालीवर्मा अतिशय खूष झाले. त्यांनी त्याला सांगितले, "उग्रदंडा, आपण आता लौकरच त्या अस्वलपाद पर्वताच्या प्रदेशांत जाऊं. परंतु, त्यापूर्वी त्या मायामर्कटाकडून तो मंत्रदंड आपल्याला मिळवायचा आहे. आणि दुष्ट जितकेतु राजाला शिक्षा करायची आहे."



अस्वल्या बधिक हत्तीवर होता. त्याने "भैरव" अशी आरोळी ठोकली आणि तो नगराच्या दिशेने जायला लागला.

मायामर्कटाने घोड्याला टांच दिली आणि भरधांव वेगाने जात तो चंद्रशिला नगराच्या वेशीवर पोंचला. त्याला पाहून दोन्ही पहारेकऱ्यांनी आश्चर्य व्यक्त करीत म्हटले, "अरे वा! माकडदेखील घोडेस्वार बनले कीं काय? विश्वासच बसत नाही." दोघांनी घोडा पकडला आणि पुढे विचारले, "अरे ए वानरा, बोलता येतं कीं नाही?" आणि त्यांनी मायामर्कटाची शेपटी पकडली.

मायामर्कट जोरांत किचकिचत बोलला, "अरे अधम पहारेकऱ्यांनो, मी कांही साधासुधा वानर



नाही. मंत्रतंत्र शक्ती जाणणारा मी प्रतिमती आहे. बाजूला व्हा. आपल्या महाराजांना एका मोठ्या संकटातून मला वांचवायचे आहे.''

दोघांपैकी एक पहारेकरी हे शब्द ऐकून स्तंभित झाला. दुसरा पहारेकरी धीर करुन पुढे सरसावला आणि मर्कटाच्या डोक्यावर तलवारीचे पाते रोखीत म्हणाला, ''तू मांत्रिक अस नाहीतर तांत्रिक अस! मला त्याच्याशी कांही देणंघेणं नाही. आधी माझ्याबरोबर आमच्या प्रमुखाकडे चल'' आणि त्याने मर्कटाच्या घोड्याचा लगाम पकडायचा प्रयत्न केला. पण मायामर्कटाने मंत्रदंडाने तलवार बाजूला सारली. मंत्रदंडाचा स्पर्श झाल्यामुळें तलवार जळून गेली आणि बघताबघता तिचे भस्म झाले.

पहारेकरी भीतीने ओरडायला लागले आणि मागे सरले. ''जय तांत्रिक गुरु'' असे ओरडत मायामर्कट पुढे जाऊं लागला.

नगराच्या वेशीजवळ थोड्याच अंतरावर प्रमुख पहारेकरी इतर सैनिकांबरोबर बोलण्यांत गर्क होता. पहारेकऱ्यांचा ओरडा ऐकून त्याने वळून पाहिले. घोड्यावर बसून जोराने जाणारा मायामर्कट पाहून त्याने लगेच आपली तलवार उपसली आणि धावतच एका घोड्याजवळ जात प्रमुख पहारेकरी म्हणाला, ''सावधान! शत्रूराजाचा कुणीतरी गुप्त हेर आपल्या राजधानीत घुसला आहे, असं वाटतंय. त्याचा लगेच पाठलाग करा आणि त्याला पकडा.''

प्रमुख पहारेकरी घोड्यावर स्वार झाला आणि मायामर्कटाजवळ जाईपर्यंत मायामर्कट पुढे दूर जात होता. लौकरच तो राजवाड्याजवळ पोचला. त्याच वेळीं राजवाड्यासमोरच्या उघड्या मैदानांत एक मदारी माकडाचा खेळ करुन दाखवत होता. जमलेले लोक तो खेळ पाहून हंसत होते. घोड्यावर बसलेला एक वानर आपल्याच दिशेने येतो आहे, हे पाहून तिथला जमाव टाळ्या पिटायला लागला. लोक म्हणूं लागले, ''वा रे वा! माकडे देखील आता घोडेस्वार बनायला लागली वाटतं! पण त्यांना खेळवणारा हा आहे तरी कोण गारुडी?''

मदारीने मायामर्कटाला एकवार नीट निरखून बघितले आणि तो स्वतःशीच म्हणूं लागला, ''या माकडाला कांही खास शिक्षण दिलेलं दिसतंय. त्याचप्रमाणे त्याच्यांत कांही विशेष प्रतिभा उपजतच असली पाहिजे. हा हनुमानासारखाच वानरदेव असेल असं वाटतं. याच्या निरनिराळ्या करामती पाहिल्या कीं लोकांची चांगलीच करमणूक होईल आणि आपल्या पुढ्यांत बराच पैसा खुळखुळेल. हा वानर जर माझ्या मालकीचा झाला तर किती चांगले होईल!'' असा विचार करीत त्याने



मायामर्कटाला पकडण्यासाठी दोरीचा फांस करुन त्याच्यावर फेकला. मायामर्कट खाली पडला आणि त्याच्या हातांतला मंत्रदंड दूर जाऊन पडला.

मदारी आनंदाने फुलला, खूष झाला. त्याने मायामर्कटाचे दोन्ही कान पकडून त्याला वर उठवले आणि म्हटले, ''बघ, आता मी तुझा मालक आहे. माझं सांगणं ऐकलं नाहीस तर तुझी शेपटी कपड्यांत गुंडाळीन आणि तिला आग लावीन.''

मायामर्कटाने दांत विचकले आणि झर्रकन एक नजर सर्वांकडे टाकीत तो म्हणाला, ''अरे, मी कांही एखादा सामान्य वानर नाही. अद्भुत शक्तींनी भारलेला मी एक मांत्रिक आहे. तुमचा जीवकेतू राजा संकटात अडकणार आहे. मी त्यांना सावध करायला आलो आहे. माझा अपमान करण्याचं धाडस दाखवून तू फार मोठी चूक करतो आहेस. मी तुझे मस्तक उडवून टाकीन माझा मंत्रदंड कुठे आहे?'' असं ओरडत तो उठून उभा राहिला.

त्याचे शब्द ऐकून मदारी एकदम घाबरुन गेला. त्याच्या पाळलेल्या अस्वलाच्या गळ्यांतली लोंबणारी दोरी ओढत तो म्हणाला, ''हा कोणी पिशाच्च वानर आहे असं दिसतंय. एक प्राणी दुसऱ्या प्राण्यावर कबजा करुं शकतो. चल तू, हो पुढे आणि या माकडाला जरा मजा दाखव.''

अस्वलाने आपले तोंड उघडले आणि तो मर्कटावर तुटून पडला. मायामर्कट जोरजोराने ओरडत म्हणाला, ''मी जितकेतू राजाचे हित जपण्यासाठी आलो होतो. ते अस्वल्या मांत्रिकाच्या पंज्यात अडकणार आहेत.'' हे बोलत असताना त्याने अस्वलाच्या तावडीतून आपली सुटका करुन घेतली आणि संधी मिळेल तेव्हां अस्वलाला तो



चावायला लागला. तिथे जमलेल्या लोकांनी मर्कटाच्या बोलण्याकडे लक्ष दिले नाही. त्याचे बोलणे धड कुणी नीटपणे ऐकलेदेखील नाही. ते म्हणायला लागले, ''अरे, हा वानर तर माणसा-सारखा बोलतोदेखील! कांही कां असेना, दोघांची कुस्ती बघण्यासारखी आहे.'' ते सारेजण अस्वल वानराच्या लढाईची गंमत पाहायला लागले.

तितक्यांत घोड्यावर स्वार झालेला पहारेकऱ्यांचा प्रमुख सरदार तिथे आला. तलवार म्यानांतून बाहेर काढीत तो म्हणाला, ''इथे काय चाललंय? ही कसली करमणूक? चला निघा इथून.''

त्यानंतर त्याने मदारीकडे वळून म्हटले, ''हा वानर शत्रूराजाच्या गुप्तहेर आहे. आपल्या अस्वला-कडून त्याला मारुन टाकायचा विचार आहे कां तुझा? सावधान. ह्याला प्रथम जिवंत पकडला पाहिजे आणि राजाच्याजवळ घेऊन गेलं पाहिजे.''

सरदाराने असं म्हटल्याबरोबर मदारीने अस्वल्याच्या गळ्यांत बांधलेली दोरी खेंचली. मायामर्कटाला जखमा झाल्या होत्या. तो कण्हत-कण्हत म्हणाला, "मी आलो आहे तुमच्या राजाचे रक्षण करायला! ही गोष्ट मी तुम्हाला पुन्हांपुन्हां सांगतो आहे. तुमच्या राजावर संकट येणार आहे. एक बलवान राक्षस आणि मंत्रशक्तींचा एक शक्तीमान स्वामी, तुमच्या राजाच्या जीवावर उठले आहेत. मी म्हणून तुमच्या राजाला सावध करायला आलो आहे. पण तुम्ही सारेजण तर माझा अपमान करायलाच इथें बसला आहात कां? तुमच्या राजालाच माझ्याकडे बोलवून घ्या. तुम्ही मला काय समजलात? मी एका महान मांत्रिकाचा शिष्य आहे. माझा मंत्रदंड कुठे आहे?" असं म्हणून तो आपला मंत्रदंड शोधायला लागला.

मायामर्कटाच्या बोलण्यावर चिडून जाऊन सरदाराने त्याला विचारले, "अरे, शत्रूच्या हेरा, काय म्हणालास तू? आमच्या महाराजांनी तुझ्याकडे यायचं? आमच्या महाराजांचा अपमान करायची तुझी हिंमत तरी कशी झाली? ते काय एका माकडाच्या आमंत्रणावरुन इथें येतील कीं काय? आत्ता तुला पकडतो आणि महाराजांकडे घेऊन जातो. तेच याचा निवाडा करतील." नंतर त्याने मदारीला सांगितले, "मदारी, तू आपल्या अस्वलाला सांग कीं या वानराला आपला बंदी बनव. या गुप्तचर वानराला आपण दोघे मिळून महाराजांकडे नेऊं या."

मदाऱ्याचा इशारा मिळाल्याबरोबर अस्वल मायामर्कटावर तुटून पडले आणि त्याने त्याला पकडले. त्याने मर्कटाला आपल्या पाठीवर घेतले आणि आपल्या मालकाच्या मागोमाग ते राजवाड्याच्या दिशेने चालायला लागले. लोक खूष झाले आणि उत्साहाने टाळ्या पिटत तेही त्यांच्या मागून जायला लागले.

माया मर्कट ओरडायला लागला, "मांत्रिक गुरु, आता तुम्हीच मला वांचवू शकाल, माझा मंत्रदंड कुठे गेला?" कांहीतरी विचार करीत तो पुढे स्वतःशीच बोलला, "ठीक आहे, मला राजाकडे घेऊन चला. मीदेखील त्यांना भेटायला आणि सावध करावे म्हणून आलो आहे. मंत्रदंडाच्या मदतीने मी एकटाच महाराजांना दुष्ट लोकांपासून वांचवूं शकतो. पण माझा मंत्रदंड आहे तरी कुठे?"

(क्रमशः)





वेताळ कथा

# धर्मदासच्या शक्ती

निश्चयाचा पक्का विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला, त्याने शव झाडावरुन उतरवले आणि ते खांद्यावर घेऊन तो स्मशानाकडे जाऊं लागला. तेव्हां शवाच्या आंत लपलेल्या वेताळाने विचारलं, "राजन्, तुझे ईप्सित साध्य होण्यासाठी तू घेत असलेले कष्ट पाहून मला कौतुक वाटतं. तू यांत यशस्वी होणार आहेस कां, याचा विचार तू केला आहेस कां? तसं मला वाटत नाही. तू इतके कठोर परिश्रम कां करतो आहेस? मी तुला धर्मदासची कहाणी सांगतो. त्याला आपला भावाला शक्ती देता आली नाही, किंवा आईची इच्छा पूर्ण करता आली नाही. तूही त्याच्याप्रमाणे अपयशी होऊं नयेस, म्हणून मी तुला त्याची गोष्ट



सांगतो. म्हणजे चालताना तुला थकवाही वाटणार नाही.'' आणि वेताळ गोष्ट सांगू लागला.

शैलवर गांवात वीरदास हा एक शेतकरी होता. चार एकर जमिनीचा मालक होता. त्याला तीन मुलगे होते.

धाकटे दोघे रामदास व कृष्णदास हे भोळसट होते. थोरल्या धर्मदासला शेती करायची आवड नव्हती.

त्याला गुरुकुलांत राहून शिक्षण घ्यायचे होते. पण वीरदासने त्याला होकार दिला नाही. धर्मदास घरांतून निघून गेला. त्याचा पुढे कांहीच ठावाठिकाणा लागला नाही.

कांही वर्षांनंतर वीरदास खूप आजारी पडला; त्याची वाचा बंद झाली. मोठमोठ्या वैद्यांनी चिकित्सा केली आणि या रोगावर कोणतेही औषध सांपडले नाही. रामदास व कृष्णदासांना लोक फसवत राहिले. त्यांचं सगळीकडून नुकसान होत होतं, कर्जाचा डोंगर वाढला आणि शेवटी घर व शेत विकायची वेळ आली.

तोपर्यंत धर्मदासने सर्वश्रेय नांवाच्या गुरुजींच्याकडे राहून शिक्षण घेतले. त्यांनी धर्मदासला अनेक विषयांचे ज्ञान दिले व कांही अद्‌भुत शक्तीही दिल्या.

त्यांच्या आधाराने त्याला त्याच्या घरची वाईट परिस्थिती समजली. त्याने गुरुजींना त्याचा उपाय विचारला.

गुरु सर्वश्रेयने त्याला सांगितले, ''तुझं शिक्षण पूर्ण झालंय. तुझ्या विद्येचा उपयोग इतरांचे कल्याण होईल त्यासाठी कर. मला माहीत असलेल्या सर्व विद्या मी तुला शिकवल्या आहेत. त्या सर्व शक्तींचा वापर इतरांच्या भल्यासाठी करायचा आहे. आणि तुझ्या आईची संमती घेऊनच माझ्या आदेशाचे पालन कर, त्यांत तुझे हित आहे. माता गुरुपेक्षांही जास्त मोठी असते. तू लगेच शैलवरला घरी जा, आणि तुझी जबाबदारी पार पाड. तुझ्या मातेची अनुमती घेऊनच गांवाबाहेर जा. तुझ्या अद्‌भुत शक्ती तुझ्या परिवारांतल्या कुणा एखाद्याला देऊं शकलास कीं त्यानंतरच तू त्यांना सोडून जाऊं शकतोस. त्यापूर्वी नाही!''

त्याप्रमाणे धर्मदासने घरी जाऊन सर्वांना धीर दिला आणि भावांना मदत केली. रामदासला शेतींत सल्ला दिला आणि कृष्णदासला धान्याचे



दुकान उघडून दिले. शेत बहरले आणि दोघांनाही फायदा झाला. लोक बोलूं लागले कीं धर्मदासला अमोघ शक्ती प्राप्त झालेली आहे. हळूं हळूं त्याच्या आईचाही इतरांच्या सांगण्यावर विश्वास बसला. लोकांचा धर्मदासवर विश्वास बसला. त्याच्या आईला आनंद झाला. तिने सांगितले, ''आता तू तुझ्या वडिलांच्या आजारावर उपाय कर आणि त्यांना पुन्हां बोलता येईल असे कांहीतरी होऊं दे!''

''आई, त्यांना पुन्हां बोलता यावे म्हणून विद्युतद्वीपांत असलेल्या तुळशीच्या रोपाचे मूळ हवे आहे. पण माझ्या गुरुंची आज्ञा आहे कीं मी एकदा गांवातून बाहेर गेलो कीं मला परत येता येणार नाही. म्हणून मी कृष्णदासला सोबत घेऊन जातो. वाटेत माझ्या अद्‌भुत शक्ती मी त्याला देईन आणि त्याच्याबरोबर ते औषधी मूळ पाठवीन. तुझी अनुमती असेल तर मी निघतो.'' धर्मदास म्हणाला.

त्यावर त्याची आई म्हणाली, ''ठीक आहे. जाऊन या. गुरुची आज्ञा मातृप्रेमापेक्षां मोठी नसते.''

धर्मदास कृष्णदासला घेऊन निघाला. गांवाबाहेर येऊन कृष्णदासने आपल्या मोठ्या भावाला म्हटलं, ''दादा, तुझी अद्‌भुत शक्ती मलाही मिळाली तर हवी आहे.''

''विद्युतद्वीपाला आपण पोंचेपर्यंत जर तुला तसा विश्वास वाटला तरच तुला त्या शक्ती मिळतील.''



तेवढ्यांत एक बैलगाडी त्यांच्यानजीक आली व थांबली. धर्मदासने भावाला म्हटलं, ''विद्युतद्वीपाला पोंचेपर्यंत तुला पायी चालणेच आवश्यक आहे. तू पाठोपाठ ये.'' आणि तो स्वतः गाडीत चढून बसला.

कृष्णदास दुपारपर्यंत चालतच होता. त्याचा भाऊ एका झाडाखाली बसलेला त्याला दिसला. तो खूप थकला होता.

भूकही लागली होती. पाय ठणकत होते. तितक्यांत शैलवरला परत जाणारा त्यांच्याच गांवातला बापट तिथे आला नि म्हणाला, ''मला खूप भूक लागलीय. पण मला एकट्याने जेवायला आवडत नाही आणि तसा माझा नेम आहे!''

असं म्हणून त्याने शिदोरीचे बोचके बाहेर काढले. त्यांत चविष्ट पदार्थ भरपूर होते. धर्मदासने



लगेच सांगितलं, "माझ्या भावाला एका महान कार्यासाठी सोबत घेऊन जातो आहे. ते पुण्यकार्य पूर्ण होत नाही, तोवर त्याला उपवास करावा लागेल."

असं म्हणून धर्मदासने बापटबरोबर भोजन केले. थोड्या वेळानंतर बापट निघून गेला. धर्मदास भावाला म्हणाला,

"आता अंधार पडायला लागला आहे. मी भरपेट जेवलो आहे, म्हणून मला खूप झोंप येतेय. नियमानुसार तुला झोंपता येणार नाही. तू जागा राहा आणि नीट पहारा कर. त्यांतच दोघांचे हित आहे." असं म्हणून तो गाढ झोंपी गेला.

कृष्णदास रात्रभर जागत राहिला आणि पहाटे धर्मदास जागा झाला. दोघे भाऊ पुन्हां चालायला लागले, आणि एका मोठ्या नदीच्या किनाऱ्यावर पोंचले. नदीकांठी नाव होती, पण नावाडी नव्हता. नदीच्या पात्रांत मधोमध एक बेट होते व एक मोठा खडक होता. त्यावर अचानक वीज चमकली. तो चमत्कार दाखवून धर्मदास भावाला म्हणाला, "तेंच विद्युतद्वीप आहे. ते दिवसाही कधीकधी चमचमते, म्हणून त्याचे नांव विद्युत-द्वीप पडले."

तेवढ्यांत नावाडी तिथे आला, नि हंसत-मुखाने म्हणाला, "मी विद्युतद्वीपावर जातोय. तुम्हाला यायचं असलं तर दोघेही चला."

धर्मदासने भावाला सांगितले, "वडिलांचे नांव घेऊन नदीच्या पात्रांत उडी मार आणि पोहत-पोहत त्या खडकावर जा. मी तिथे तुझी वाट पाहातो."

कृष्णदासने तसे केले. तो आता फारच थकला होता. त्याला धाप लागली नि तोंडातून शब्द फुटेना. तोपर्यंत धर्मदास नावेत बसून तिथे पोंचलेला होता.

कृष्णदासने जरा दम टाकला आणि नंतर दोघेही तुळशीच्या रोपाचे मूळ शोधायला निघाले. एके ठिकाणी त्यांच्याच गांवातला गोपी कुठलेतरी रोप काढण्यासाठी कुदळीने तिथे खणत होता.

या दोघांच्या तिथे येण्याचे कारण कळले तेव्हां त्यांना मदत व्हावी म्हणून त्याने आपली कुदळ त्यांना देऊं केली.

कृष्णदास कुदळ घेणार त्यापूर्वीच धर्मदासने त्याला रोखले. "तुळशीचे मूळ हातानेच उकरुन



अलगद काढायला हवे असा नियम आहे, आणि तो तू मोडूं नकोस."

थोड्या वेळाने आणखी पुढे गेल्यानंतर त्यांना तुळशीची मोठमोठी रोपे दिसायला लागली. जरी हात चांगलेच दुखत होते, तरीदेखील कृष्णदासने हाताने झाड उखडून मूळ बाहेर काढले. थोरल्या भावाने त्याचे खूपच कौतुक केले.

"तुझी पितृभक्ती खरोखरी प्रशंसनीय आहे. माझ्यांत कांही अद्भुत शक्ती असल्याच, तर यापुढे त्यांतल्या निम्म्या शक्ती तुझ्या झाल्या आहेत. आता तू हवेंतून उडत उडत घरी पोंचू शकशील."

पण तसं झालं नाही. कृष्णदासने खूप प्रयत्न केला, पण त्याला कांही उडता येईना. धर्मदासने उसासा सोडीत म्हटले, "मला वाटतं कीं माझ्या शक्तीवर तुझा अजून विश्वास नाही. काय करणार? बाबांना बरे वाटेल म्हणून तू तुळशीचे मूळ महत्प्रयासाने आणलेस, ही अभिमानाची गोष्ट आहे. तू घरी जा आणि ही मुळी बाबांना खायला दे आणि त्यांची वाचा परत येऊं दे. मी माझ्या गुरुजींच्या आज्ञेचे पालन करायला जातो आहे."

नदीच्या कांठावर दोघे पोंचले आणि त्यांचे मार्ग वेगळे झाले. कृष्णदास उत्साहाने घरी पोंचला. तुळशीची मुळी खाल्ल्यामुळे त्याचे वडील वीरदास यांची प्रकृती पूर्ववत झाली आणि त्यांना बोलता येऊं लागले.

कृष्णदासला वाटले कीं ते मूळ आणताना



किती त्रास सोसावा लागला त्याची सविस्तर हकीकत जर जनक, बापट, आणि गोपी, यांनी स्वतःच सांगितली तर ते जास्त चांगले ठरले असते. "धर्मदास कांही साधासुधा मनुष्य नव्हे. मी स्वतःच्या डोळ्यांनी त्याला उडताना पाहिलंय. मी गांवी परत येत होतो, तेव्हां झाडाखाली धर्मदास दिसला. गांठोडे उघडतो तो भरपूर चविष्ट पदार्थ दिसले."

बापट सांगत होता, तितक्यांत मधेच गोपीने तोंड उघडले, "कृष्णदास नावेतून परत येत होता, तेव्हां आमच्यामागून धर्मदास पाण्यावरुन चालत येत होता ते मीही पाहिलं."

कृष्णदास गोंधळून गेला. मोठ्या भावाने हे सर्व केलं, तरीही त्याचे मोठेपण आपल्याला कसं कळलं नाही, असा विचार त्याचे मन कुरतडूं

लागला. त्याचा स्वार्थ व अहंकार याच्यामुळे झालं होतं, हे लक्षांत येताच त्याला फार पश्चात्ताप झाला.

दुसऱ्याच क्षणीं त्याच्या शरीरांत कांही अद्‌भुत शक्ती प्रवेश करीत आहेत, असा भास त्याला झाला.

ही गोष्ट सांगून वेताळाने विचारले, "राजन्, कृष्णदासला भावाच्या शक्तींची ओळख कां पटली नाही? विद्युतद्वीपाला जायच्यापूर्वी आईनी सांगितलं होतं कीं परत आल्यानंतर सारेजण एकत्र आनंदात राहूं, आणि गुरुची आज्ञा मातेच्या प्रेमापेक्षां कांही मोठी नसते. पण धर्मदास घरी परतला नाही. हे मातेच्या आज्ञेचे उल्लंघन नाही कां? माझ्या या शंकांची उत्तरे माहीत असूनदेखील जर तू मौन पाळलेस, तर तुझ्या डोक्याची शंभर शकले होतील."

विक्रमार्कानि म्हटले, "धर्मदास आपल्या धाकट्या भावाला आपल्या कांही शक्ती देणार होता. पण त्याच्या प्रयत्नावर कृष्णदासचा विश्वास नव्हता. तुळशीचे मूळ आणायचे ठरल्या क्षणापासून त्याचा अहंकार बळावला होता. म्हणून त्याला थोरल्या भावाचे महत्कार्य समजले नाही. शिवाय तो भोळाही होता. अशा अद्‌भुत शक्ती वाटेल तेव्हां, नि वाटेल त्याला, देता येत नसतात.

कोणत्याही मातेला आपला मुलगा जवळ राहाना असेच नेहमी वाटत असते. पण धर्मदासच्या आईच्या मनांत स्वार्थी इच्छादेखील होत्या. पतीचे दुखणें बरें व्हावे व घरांतली सुबत्ताही तिला वाढायला हवी होती. परंतु धर्मदास मात्र लोक कल्याणासाठी घराबाहेर पडला होता. तेही आपल्या कौटुंबिक जबाबदाऱ्या पूर्ण केल्यानंतरच! जरी त्याने आपल्या मातेची इच्छा पूर्ण केली नाही, तरी तो अपराधी ठरत नाही. कारण त्याचा जनकल्याणाचा हेतू उच्च कोटीचा हेतू होता."

राजाचे मौन-भंग करण्यांत वेताळ सफल झाला आणि शवासहित अदृश्य होऊन पुन्हां झाडावर जाऊन बसला.

*(आधार : 'वसुंधरा'ची रचना)*








## गुलाम राज्यकर्ते



देशांचे व राज्यांचे राज्यकर्ते हे सम्राट, खलिफा, सुलतान व नवाब यापैकी एखाद्या नांवाने ओळखले जातात. पण भारतांत एके काळी गुलाम घराण्याचे राज्य होते, ही गोष्ट नवलाईची वाटते ना? हे कसे काय घडले? इ.स. ११९२मधे अफगाणिस्तानांतल्या महंमद घोरीने पंजाबवर स्वारी केली. परंतु त्याला अफगाणिस्तान सोडून इकडे हिंदुस्तानांत राहायचे नव्हते. म्हणून त्याने आपला विश्वासू गुलाम, कुतुबुद्दीन ऐबक, याला दिल्लीचा सुभेदार नेमले. त्या काळांत दिल्ली ही पंजाब प्रांताचा एक भाग होती. ऐबक व त्याच्या वंशजांनी दिल्लीवर जवळजवळ तीनशे वर्षे राज्य केले. त्यांना गुलाम वंशाचे राजे म्हणतात. कुतुबुद्दीन ऐबकने आपल्या विजयाचे स्मारक म्हणून ७८ मीटर्स उंचीचा कुतुबमिनार दिल्लींत बांधला.

## यश, प्रसिद्धी आणणारे मणी



रुद्राक्ष, या तपकिरी रंगाच्या मण्याची औषधी व आध्यात्मिक गुणवत्ता प्रथम ऋषीमुनी व संतांनी ओळखली होती. हे मणी धातूच्या तारेंत गुंफून गळ्यांत घालतात, किंवा जपमाळ म्हणून वापरतात. या मण्यांवरच्या रेषा (मुखे) च्या संख्येवरुन त्यांचे वर्गीकरण करतात. पांच रेषांचा किंवा मुखांचा पंचमुखी हा सर्वांत अधिक संख्येने सांपडतो. २१ मुखांचा रुद्राक्ष क्वचितच आढळतो. एकमुखी मणी यशदायी व प्रसिद्धी देणारा असतो, आणि चौमुखी विद्यादायी असतो. तीन मुखांचा मणी चांगले आरोग्य देतो.

देशविदेशी लोककथा (मलेशिया)

# निसर्गाच्या प्रेमाचे गुपित

अंकसा हा एक गरीब तरुण होता. एके दिवशी घरांत त्याला खायला कांहीच नव्हते. म्हणून मध्यान्हीच्यावेळी तो अरण्यांत गेला. कांहीतरी फळे मिळतील व आपली भूक भागेल असे त्याला वाटले. त्याला लौकरच एक फळझाड दिसले. त्यावर एकच फळ होते. ते फळ अत्यंत स्वादिष्ट प्रकारचे होते. अगदी वरच्या फांदीवर फळ होते. शेंड्यापर्यंत चढावे तर झाडाचा बुंधा फारच



लहान होता. ते झाड खाली वाकवून फळ काढता आले असते किंवा दगड मारुन तरी फळ पाडता आले असते.

तेवढ्यांत अंकसाला एक आवाज ऐकू आला. तो सांगत होता कीं झाडाच्या मुळापाशी जर खणले तर अंकासला बरेच कांही, गरजेपेक्षांदेखील जास्त मिळेल. अंकसाने तसं केलं आणि त्याला एक सोन्याची लगड मिळाली. त्या जागी आणखी बरेच सोने असावे असे अंकसाला वाटले, पण त्याने जास्ती खणून पाहिले नाही. तो बाजारांत गेला, आणि त्याने त्या लगडीचे लहान तुकडे करुन घेतले. त्यांतला एक तुकडा विकून त्याने बैलगाडी विकत घेतली. धान्य व इतर गरजेच्या वस्तू त्यांत घालून तो आपल्या झोंपडीकडे परत गेला.

दुसऱ्या दिवशी त्याने कांही गवंडी बोलावले आणि त्या अरण्याच्याजवळ स्वतःसाठी एक घर बांधायला सुरवात केली. बांधताना घर मोठे बांधले गेले. इतके मोठे की तो जणूं राजवाडाच वाटायला लागला. अंकसा त्या झाडाजवळ गुपचूपपणे जाई आणि मुळापाशी खणून दरवेळी थोडे थोडे सोने घेऊन येई. त्याचे घर तयार झाल्यानंतर त्याने बरेच नोकर ठेवले. अनेक लोकांना त्याने घरालगत जागा देऊन तिथे राहायला सांगितले.



अंकसाने नंतर लग्न केले. त्याला एक सुरेख मुलगा व मुलगीही झाली. त्याचे कुटुंब सुखा-समाधानांत नांदत होते. त्याचे वैभव पाहून जवळच्याच राजाला भीती वाटली की एक दिवस अंकसा राज्य बळकावेल. म्हणून अंकसाच्या निर्वंश करायचे त्याने ठरवले. त्याने राजाकडे ज्योतिषाच्या वेषांत दोन हेर धाडले. त्यांनी राजाचा विश्वास संपादन केला. राजाने त्या खोट्या ज्योतिषांना आपल्या मुलांचे भविष्य सांगायची विनंती केली. दोघांनी कांहीतरी अडमतडम् गणिते केल्यासारखे नाटक केले. आणि गंभीर चेहरा करुन राजाला सांगितले की ही दोन्ही मुलें राजा व राणीच्या मृत्यूला कारणीभूत होतील. त्याचप्रमाणें त्यांच्यामुळे आसपासचे नागरिक देखील मरण पावतील. या दोन्ही मुलांना जर अरण्यांत धाडले तरच सर्वांचे प्राण वांचतील. राजाला वाईट वाटले. त्याने नाईलाजाने मुलांना झोपेचे औषध दिले आणि त्यांना एका घोडागाडींत ठेवून अरण्याच्या पलीकडे समुद्रालगत एका दगडावर सोडून देण्यांत आले.

सूर्य उगवला तेव्हां दोन्ही मुलांना जाग आली. रडण्याऐवजी ती सूर्योदयाचा देखावा पाहाण्यातच ती दोघे रमली. आपल्या आईवडिलांनी आपल्याला निसर्ग पाहाण्यासाठी इकडे आणले असावे असे त्यांना वाटले. समुद्राच्या लाटा, किनाऱ्यावरची फुलें, फळे, पाहून दोघेही फारच खूष होते. निसर्गाचे सौंदर्य अनुभवीत व त्याचे कौतुक करीत ते अरण्यांत दिवसभर खेळत होते. त्यांनी



गोड फळे खाल्ली व झऱ्याचे पाणी प्यायले. संध्याकाळ झाली तशी पुष्पनीला, भावाला-कर्माला म्हणाली, "आपले नोकर बहुधा रस्ता चुकले असावेत. म्हणून इथें कुणी आलेले नाहीत."

अंधार झाल्याबरोबर त्यांच्यासमोर एक महाल चंद्रप्रकाशांत झगमगताना दिसला. "बाप रे, इतका वेळ हा कसा आपल्याला दिसला नाही?" ती दोघे त्या जादूच्या महालांत शिरली, त्याबरोबर एक प्रेमळ आवाज त्यांना आंत यायला सांगत होता. आंत त्यांच्यासाठी जेवण तयार होते. "पण इथे यजमान कोण आहेत?" कर्माने विचारले. "मी निसर्ग देव आहे. तुम्हाला माझा समुद्र आवडला, झाडे आवडली आणि तुम्ही माझ्या वातावरणांत रमलात. म्हणून मलाही तुम्ही

आवडला आहात. मी प्रसन्न झालो आहे. आता तुम्हाला काय वरदान हवे ते मला सांगा. खूप संपत्ती हवी कीं निसर्गाचे गुप्त प्रेम हवे आहे?'' त्या अदृश्य देवतेने विचारले.

''निसर्गाचे गुप्त प्रेम हवे!'' दोघांनी एकदम उत्तर दिले.

''उत्तम! निसर्ग नेहमीच तुमचा पाठीराखा राहील.'' त्या आवाजाने आशिर्वाद दिला.

''धन्यवाद हो!'' दोन्ही मुलांनी नमस्कार केला, जेवण केले व ती झोंपी गेली. सकाळी ते जेव्हां उठले तेव्हां तिथें महाल नव्हता. उलट क्रूर चेहऱ्याचे कांही चोर त्यांच्याभोवती उभे होते. ''चला, आता तुम्ही आमचे गुलाम आहात.'' एक चोर म्हणाला.

''आम्ही तुमची आज्ञा ऐकायला कांही बांधील नाही.'' कर्माने धीटपणे सांगितले.

''बांधील नाही काय? उर्मट लेकाचा!'' असं म्हणून त्याने आपला चकचकीत सुरा काढला.

पण तितक्यांत एक गर्जना ऐकू आली. इतर चोर भिऊन पळाले. पण सुरा घेतलेल्या चोरावर



अरण्यांतून आलेल्या सिंहाने झडप घातली व त्याला ओढत झाडींत नेले.

सगळीकडे शांतता पसरली. कर्मा आणि पुष्पनीलाला मात्र जराही भीती वाटत नव्हती. निसर्गदेवता त्यांचे रक्षण करीत होती हे त्यांना ठाऊक होते. ते किनाऱ्यावर खेळत, हिंडत होते. दूरवर समुद्रांत एक जहाज उभे होते. त्याचा सारंग व नाविक किनाऱ्यावर आले. या मुलांनी त्यांना विचारले, ''आम्हाला आमच्या घरी जायचे आहे. तुम्ही न्याल कां आम्हाला?'' कर्माने त्यांना आपली माहिती व गांवाचे नांव सांगितले. सारंगाने त्यांना न्यायचे कबूल केले.

दोघेही जहाजावर चढले आणि जहाज मार्गस्थ झाले. जमीन दिसेनाशी झाल्यावर सारंगाने पुष्पनीलाशी लग्न करायचा प्रस्ताव मांडला आणि कर्माला आपला दास होण्यास फर्मावले.

''तुमच्याशी, एका खोटारड्याशी लग्न? शी!'' पुष्पनीला रागाने म्हणाली. त्याबरोबर सारंग संतापला. त्याने तिला उचलले आणि सरळ भर समुद्रांत फेकून दिले. आणि त्या सर्वांच्यादेखत एका मोठ्या देवमाशाने तिला गिळले. कर्माला सारंगाने दरडावले,'' माझा दास हो नाहीतर मर!''

कांही क्षणांतच वादळी वारे सुटले, लाटा उसळल्या आणि त्या जहाजाचे दोन तुकडे झाले. जहाजावरचे सारंग व नाविक जहाजासकट बुडाले. कर्मा मात्र एक फळीला धरुन पाण्यावर



तरंगत होता. कांही मासे ती फळी ढकलताहेत असं त्याला दिसलं, नि तो बेशुद्ध झाला. आपण एका म्हातारीच्या झोंपडीत आहोत हे त्याला शुद्धीवर आल्यानंतर समजले. ''तीन दिवसांपूर्वी तू किनाऱ्यावर वाहात आलास. देवानेच तुला इथे माझ्या सोबतीला धाडले आहे.'' ती आनंदाने सांगत होती. कर्माची तिने शुश्रूषा केली होती. त्याला समाधान वाटले, पण आपल्या बहिणीचा डोळ्यादेखत मृत्यू त्याला कांही विसरता येईना. झोपडीच्या आसपासची जागा साफ करुन त्याने तिथे बाग केली, फळझाडे लावली. वर्षभर तो तिथे राहिला.

''पोरा, आपल्या युवराजाचं लग्न आहे आणि वरातीची मिरवणूक पाहायला आपण जाऊं या.'' तिने सांगितलं. राज्यांत नवीन आलेल्या नागरिकांसाठी एक वेगळा मंच उभारला होता कर्माला तिथे प्रवेश मिळाला. राजरथ तिथून जवळून होता. अचानक मिरवणूक मंचाजवळ थांबली.

''माझा भाऊ, कर्मा!'' सुंदर नववधू उद्गारली, आणि लगेच युवराजाच्या सैनिकांनी गर्दीतून वाट काढीत कर्माला रथापाशी आणले. माशाने गिळलेली आपली बहीण जिवंत असून तीच नववधू आहे हे समजायला कर्माला जरा वेळ लागला.

त्या देवमाशाने तिला गिळली खरी, पण किनाऱ्यावर आणून तोंडातून बाहेर टाकली. युवराज सकाळी फिरायला किनाऱ्यावर आला होता. त्याने तिला राजवाड्यांत नेले व तिला औषधपाणी केले. तिने वर्षभर भावाची वाट पाहिली. त्यानंतर युवराजाने तिच्याशी लग्न ठरवले.

आता कर्मा राजाचा सल्लागार झाला. कांही दिवसानंतर त्याने सैन्य घेऊन आपल्या आईवडिलांचा शोध घेतला. त्या दुष्ट शत्रूराजाने त्यांचे सर्वस्व हिरावून घेतले होते व अंकसा व पत्नी भिकेला लागले होते. कर्माने त्यांना आपल्या नव्या गांवी आणले व कांही महिन्यानंतर त्या दुष्ट राजावर हल्ला करुन त्याचा पराभव केला, आणि कर्मा तिथला राजा झाला.

''प्रत्येक संकटातून निसर्गदेवाचे गुप्त प्रेम आपल्याला वांचवत आले नाही कां?'' नेहमी बोलताना ही भावंडे कृतज्ञतेने असा उल्लेख करीत असत.

*- एम.डी.*



# नाचण्याची शिक्षा!

हिरालालचे आईवडील वारले तेव्हां तो जेमतेम दहा वर्षांचा होता. ती दोघे शेतांत काम करीत असताना त्यांच्यावर वीज कोसळली. त्यांचा मालक जमीनदार होता. त्याला या मुलाची दया आली. त्यानंतर हिरालाल जमीनदाराच्या घरी राहायला लागला. तिथे त्याला तिन्ही वेळेला जेवण आणि त्या भल्या मोठ्या वाड्यांत एका कोंपऱ्यात निजायला जागेची सोय झाली. जमीनदाराची बायको सुस्वभावी होती, पण ती हिरालालकडून घरकाम करून घेऊं लागली. त्याला कोणतेही काम करायला सांगितले तरी तो ते लगेच करीत असे. त्याला जेवण मिळत होते आणि घरांतली मंडळी विश्रांति घेत, तेव्हां विश्रांतिही मिळत होती ना! म्हणून तो कधीही कुरकुरला नाही. दोन वर्षांनंतर हिरालालची प्रकृति सुधारली व तो थोराड, बळकट, दिसूं लागला. जमीनदाराला वाटले की आता ह्याला शेतांत कामाला लावावे. नाहीतरी हिरालालचे आईवडील वारल्यानंतर त्याने आणखी दोघेजण शेताच्या कामावर ठेवले होते. जमीनदाराने त्यांतला एकजण कमी केला, आणि त्याचे काम करायला हिरालालला सांगितले.

आता हिरालालला सकाळपासून संध्याकाळ-पर्यंत सतत काम करावे लागायचे. घरून निघताना त्याचे जेवण त्याला जमीनदारीणबाई बांधून देत होती. शेतांतला दुसरा मजूर आळशी होता. मधूनमधून तो सतत पान खायला म्हणून झाडा-खाली सांवलीत बसायचा. पानाचा डबा बरोबर तो बाळगीत होताच. हळूहळू तो हिरालालवर काम सोंपवून आरामशीरपणे झोंपही काढायला लागला. मालकांकडे या बाबतीत तक्रार न करणे यांत



शहाणपणा होता. पण आता यापुढे जमीनदाराकडे राहून शेतांत कामं करायचे नाही, असा निर्णय त्याने घेतला. तो दुसरीकडे कुठेतरी जाऊन स्वतंत्र-पणे राहाणार होता.

एके दिवशी सकाळीं उठून त्याने आपल्या



कपड्यांचे एक गांठोडे बांधले आणि तो जमीनदारासमोर जाऊन उभा राहिला. शेतावर जातांना घालायचे मळखाऊ कपडे त्याच्या अंगावर नव्हते, ते पाहून जमीनदाराला आश्चर्य वाटले. खांद्यावरचे बोचके पाहून त्याने हिरालालला विचारले, "काय झालं? तू रे कुठे निघालास, हिरालाल?" जमीनदाराला दुसरा कामसू नोकर मिळेल कीं नाही याची चिंता होती.

"बाबूजी, गेली पांच वर्षे तुम्ही मला सांभाळलंत त्याबद्दल मी कृतज्ञ आहे. आता माझा मार्ग मला शोधला पाहिजे. तुम्ही माझ्यासाठी जे कांही केलंत ते मी कधीही विसरणार नाही."

"ते ठीक आहे. पण हिरालाल, तू मला सांग, तू कुठे जाणार आहेस?" आपला राग आणि निराशा दोन्ही सांवरत जमीनदाराने विचारले.

"बाबूजी, मी बनारसला जाणार आहे. तिथें कांहीतरी काम शोधीन. बनारस हे मोठं गांव आहे, या खेड्यापेक्षां मोठं आहे असं कुणीतरी सांगितलंय. तेव्हां तिथे कांहीतरी काम मिळेलच."

"अरे पण हिरालाल, बनारस इथून खूप दूर आहे हे तुला माहीत आहे कां? तिथे जायला खूप दिवस लागतील. तोपर्यंत तू काय करशील?" जमीनदाराने त्याला विचारले.

"त्याचाही मी विचार केलाय. गेल्या पांच वर्षांचा माझा पगार जर तुम्ही मला दिलात तर ती मोठीच मदत होईल." हिरालालने सांगितले.

जमीनदार चकित झाला. थोडा वेळ विचार करुन त्याने विचारले, "पण तुला खरोखरीच इथून जायचे मनांत आहे कां?"

"होय मालक. मी तसं नक्की ठरवलंय." हिरालालच्या आवाजांत निर्धार होता.

"ठीक आहे तर, जशी तुझी मर्जी!" असं म्हणून जमीनदार आंत गेला, आणि त्याने पांच चांदीचीं नाणी आणून हिरालालच्या हातांत दिली.

"ही घे नाणी, एका वर्षासाठी एक नाणे-हा तुझा पगार आहे. तुला जायचेच आहे तर जरुर जा. पण एक लक्षांत ठेव; तुला जर परत यावंसं वाटलं तर तू केव्हांही आपल्या इथे घरी परत येऊं शकतोस." जमीनदाराने त्याला सांगितले.

हिरालालला नवल वाटले. त्याने घरांत दोन वर्षे घरकाम केले होते, आणि नंतरची तीन वर्षे शेतांत ढोरमेहनत केली होती. त्यामानाने हे वेतन फारच कमी होते. पण त्याने आता याबाबतीत जास्ती वाद घालायचा नाही असे ठरवले. कारण जमीनदाराचे घर कायमचे सोडायचे असा निर्णय त्याने आता पक्का केला. त्याने जमीनदाराचे आभार मानले, आणि त्यांना नमस्कार करुन त्यांचा निरोप घेतला. तो



घराबाहेर पडणार तितक्यांत जमीनदाराची बायको रोजच्यासारखी जेवणाची पोटळी घेऊन आली. "हे घे, हिरालाल, आजचा दिवस तुला पुरेल ही शिदोरी!"

हिरालालने आणखी लवून तिला नमस्कार केला; तिच्या चेहऱ्याकडे त्याने कृतज्ञतेने पाहिले, आणि तो निमूटपणे तिथून बाहेर पडला. त्या घरांतल्या सुखसोयींचा त्याला मोह वाटला नाही. बनारसला जायला किती दिवस लागतील हेदेखील त्याला माहीत नव्हते. तो चालतचालत जात होता. त्याने बनारस नगरीबद्दल खूप ऐकले होते. आपले भाग्य तिथे उजळेल असा त्याला विश्वास वाटत होता.

संध्याकाळ झाली तेव्हां मात्र त्याला थकवा आला. त्याने आसपास न्याहाळून पाहिले. पाय पसरुन झोपावे म्हणून त्याने एका मोठ्या वडाच्या झाडाच्या प्रशस्त छायेंत जागा शोधली. जवळच एक म्हातारा जमिनीवर पडला होता आणि झोपायचा प्रयत्न करीत होता. त्याच्या केसांच्या जटा डोक्यावर बांधून त्याने त्यांची गांठ मारली होती. त्याच्या अंगावरचे कपडे अगदी जीर्ण, फाटलेले होते.

हिरालालला पाहून म्हातारा उठला आणि त्याने संभाषण सुरुं केले. हिरालालने त्याला आपली सारी कहाणी सांगितली व आता बनारसमधे काम शोधायचे हीच महत्वाकांक्षा आहे, तेही सांगितले म्हाताऱ्याच्या चेहऱ्यावर फिकट हास्य उमटले. "मुला, शेवटी तू आलास हे बरं झालं. इतके दिवस माझे ज्ञान कुणाला तरी द्यावे म्हणून मी वाट पाहात होतो."

'द्यावे' हा शब्द ऐकल्यावर हिरालालला शिदोरीची आठवण झाली. जमीनदाराच्या दयाळू बायकोने दिली होती, ती पोटळी त्याने बाहेर काढली, व त्यांतले थोडे अन्न त्या म्हाताऱ्याला दिले. दोघांनीही शांतपणे जेवण केले. जेवतांना हिरालालच्या मनांत विचार आला कीं हा म्हातारबाबा आपल्याला कोणती ज्ञानाची पुंजी देणार आहे?

"तू खूप चालून आला आहेस आणि दमला आहेस. तेव्हां आज विश्रांति घे. सकाळी उठून ताजातवाना असशील, तेव्हां जे कांही मला सांगायचे आहे ते मी तुला सांगीन." म्हाताऱ्याने सांगितले व तो आडवा होऊन गाढ झोपी गेला. हिरालालही आपल्या जागेवर गेला. त्याचे गांठोडे तिथे होते. हिरालाललाही लौकरच झोंप लागली.

दुसऱ्या दिवशी सकाळी उठल्यानंतर दोघेही बराच वेळ बोलत होते. त्यावेळेस म्हातारबाबानेही आपली कर्मकहाणी सांगितली. त्याचा संसार आणि सांसारिक गोष्टींची विरक्ती कशी निर्माण झाली तेही त्याने सांगितले. "आता माझ्याजवळ फक्त ही एकच वस्तू आहे." आणि त्याने आपल्या



पिशवीतून एक चंदनी बांसरी बाहेर काढली व हिरालालला दिली.

त्या मुलाने ती हातांत घेऊन म्हटले, ''पण आजोबा, मला कांही ही वाजवायला येत नाही.''

''अरेच्च्या! मी त्याच्याबद्दल अजून तुला कांहीच सांगितलेलं नाही.'' म्हातारबाबाने खुलासा केला. ''ऐक! तू नुसती ही बांसरी तोंडाशी धरून फुंक मारायची, त्यांतून आपोआप संगीत बाहेर पडतं. आणि जे कुणी हे संगीत ऐकतात, ते लगेच नाचायला लागतात. अशी त्या संगीताची अद्भुत शक्ती आहे. पण ही बांसरी जादूची आहे, असं म्हणूं नकोस. कारण त्यांतून दुसरी कोणतीही जादू बाहेर पडत नाही. जे कुणी हे संगीत ऐकून नाचायला लागतात, ते थांबतच नाहीत! तू बांसरीतून फुंक मारायचे बंद करशील, तेव्हांच ते नाचायचे थांबतील. तू या संगीताचा आनंद त्यांना दिल्याबद्दल ते तुला त्यानंतर कांहीतरी मोबदला देऊं पाहातील. अशा रीतीने ही बांसरी तुझ्या साऱ्या गरजा पुरवील.''



हिरालालने त्या बाबासमोर साष्टांग नमस्कार घातला, त्याचे आशिर्वाद घेतले आणि तो आपल्या मार्गाने जाऊं लागला. अचानक त्याला एका पक्ष्याचे मंजुळ गाणें ऐकूं आले. त्याला बांसरी वाजवण्याची इच्छा झाली. आपली बांसरी कुणीतरी ऐकतंय, हे त्याला अगोदर माहीत नव्हतं. पण त्याला एक दांडगट मनुष्य बांसरीच्या संगीताच्या तालावर नाचायला लागलेला दिसला.

हिरालालला आनंद झाला आणि तो बांसरीत फुंक मारीत राहिला. तो दांडोबाही नाचत राहिला. बराच वेळ नाचल्यानंतर तो थकून गेला, आणि हिरालालनेही बांसरी थांबवली. त्या माणसाने जवळ येऊन हिरालालला मिठीच मारली. ''मला कधीही इतका आनंद झाला नव्हता. ही घे तुला बक्षीस!'' असे म्हणून त्याने एक थैली उघडली. त्यांत रत्नहार, बांगड्या, आंगठ्या व कर्णभूषणें, चमकत होती.

तो इसम पुढे म्हणाला, ''मी चोर आहे आणि ही सगळी माझी अनेक घरांतून केलेली चोरीची कमाई आहे. पण आता मी चोऱ्या करायचे सोडून देणार आहे. या धनाचा मला आता कांही उपयोग नाही. तेव्हां ही सारी तू घे. तुझ्या ती उपयोगी पडतील.''

हिरालालकडून कांही उत्तर मिळावे याची वाट न बघता त्याने ती थैली हिरालालच्या हातांत ठेवली, आणि तो तिथून घाईघाईने निघून गेला. हिरालाल स्तंभित होऊन बघूनच राहिला. थोड्या वेळानंतर तो भानावर आला आणि पुढे वाटचाल करीत



राहिला. अचानक हातीं आलेले हे घबाड त्याने आपल्या गांठोड्यांत नीट सुरक्षितपणे ठेवले आणि तो पुढे निघाला.

दुर्दैवाने, हिरालाल निरागस आणि कोंवळ्या वयाचा होता. चोर हा कधी फार वेळ गप्प राहात नाही. बिबळ्याला जसे आपले ठिपके बदलायला आवडत नाही, तसंच ह्या चोराचं झालं होतं. तो हिरालालला सोडून पळून गेला खरा, पण आता आपण दिलेलं जवाहीर या मुलाकडून परत कसं मिळवायचं, याचा तो विचार करूं लागला. त्याने प्रथम ती बांसरीच चोरायचे ठरवले. पण त्याला कांही ती वाजवता येत नव्हती. तेव्हां आता हिरालालकडची रत्नांची थैली हस्तगत करणे, एवढाच पर्याय शिल्लक होता. पण ती चोरी वाटता कामा नये ही देखील अडचण होती.

चोर तोपर्यंत पुढच्या खेड्यांत जाऊन पोंचला होता. त्याने आपण एक व्यापारी आहोत असे सोंग केले आणि तो चोर थेट गांवातल्या सरपंच्याच्याच घरीं गेला. त्याने कांहीतरी गोष्ट रचून सांगितली आणि शेवटी थाप मारली.'' त्या लबाड मुलाने मला फ़सवलं आणि माझे जवाहीर चोरले आहे. माझा पार सत्यानाश झाला हो!'' आणि त्याच्या डोळ्यांतून नक्राश्रू पाझरायला लागले.

''अहो, घाबरूं नका हो! त्या मुलाला या खेड्यांतूनच पुढे जावं लागेल. इथे तो आला कीं आपण त्याला चांगला धडा शिकवूं.'' सरपंचाने चोरावर विश्वास ठेवून म्हटले. नंतर त्याने गांवातले कांही धडधाकट गांवकरी निवडून, त्यांच्यावर त्या मुलाला पकडून सरपंचाकडे आणण्याची कामगिरी सोंपवली.

त्या खेड्याच्या सीमेवर गर्दी पाहून हिरालालला जरा आश्चर्य वाटले. पण जवळ गेल्यानंतर त्यांच्या हातातले भाले नि दंडुके बघून त्याला धक्काच बसला त्यांच्याशी दोन हात करणे किंवा वाद घालणे शक्य नव्हते, म्हणून हिरालाल निमूटपणे त्यांच्या स्वाधीन झाला. त्यांनी त्याचे हात बांधले, आणि जवळजवळ त्याला ओढतच त्यांनी सरपंचासमोर नेले.



''महाशय, मी काय केलंय?'' हिरालालने नम्रपणे विचारले.

''जसं कांही तुला कांहीच ठाऊक नाही! या माझ्या मित्राची थैली तू चोरली आहेस. त्यांतली रत्ने कुठे आहेत? ती अगोदर बाहेर काढ.'' सरपंचाने त्याला दरडावीत म्हटले.

''मी काढतो ना, पण त्याआधी माझे बांधलेले हात तरी सोडायला सांगा.'' हिरालाला धिटाईने म्हणाला गांवकऱ्यांनी त्याचे हात मोकळे केले. हात

सुटल्याबरोबर हिरालालने सर्वांत आधी ती बांसरी बाहेर काढली आणि तोंडाशी धरून त्यांत फुंक मारली. झालं, अत्यंत मधुर संगीत सुरुं झालं, आणि तिथे जमलेले सारेजण अगदी सरपंच व व्यापाऱ्याच्या वेषांतला चोरसुद्धां, सगळेच त्या तालावर नाचायला लागले. पण त्यापूर्वी तो चोर ओरडला, ''नको, त्याला बांसरी वाजवायला देऊं नका. तो कधी थांबायचाच नाही.''

हा नवा मित्र असं कां म्हणतो आहे ते कांही सरपंचाला कळलं नाही. म्हणजे हे दोघे पूर्वी भेटलेले होते कां? त्या शिवाय हा मुलगा बांसरी वाजवतो हे त्या व्यापाऱ्याला कसं काय कळलं? तोपर्यंत गांवातले इतर लोकही गोळा झाले आणि त्या संगीताने मोहून जाऊन तेही नाचायला लागले. हिरालाल बांसरीत फुंक मारीत राहिला.

''थांबा, थांबा, कृपा करून थांबा! माझा गुन्हा मी कबूल करतो.'' चोर अखेरीस ओरडला.

हिरालालने बांसरी ओठांपासून दूर केली. चोर धापा टाकीत नाचायचा थांबला. इतर लोकही थांबले. त्यांना चोराने आपण होऊन सांगितले. ''हा मुलगा चोर नाही. मीच लोकांचे दागदागिने चोरत होतो. त्याच्या थैलींत असलेले सारे दागिने मीच त्याला देऊन टाकले होते. त्याने बांसरी वाजवायची थांबवावी म्हणून मी ते दिले होते. त्याने मला शिक्षा केली आहेच, आणि आता तुम्हाला कुणाला त्रास होऊं नये इतकीच माझी इच्छा आहे!''

सरपंचाने सुटकेचा निश्वास टाकला. तोपर्यंत हिरालालने आपल्या गांठोड्यांत नीट ठेवलेली ती थैली बाहेर काढली. त्याने ती सरपंचाच्या पुढ्यांत आणून ठेवली. ''ह्याने ही थैली मला देताना चोरी करणे सोडून दिल्याचे सांगितले होते. आता तुमच्या सर्वांच्या साक्षीने 'चोरी करणार नाही' अशी शपथ घ्यायला त्याला लावा. म्हणजे त्याचे नवे चांगले आयुष्य पुन्हां सुरुं होईल.''

चोर तिथून निघून जाईपर्यंत ते गांवकरी गप्प होते. त्यानंतर त्यांनी हिरालालचे टाळ्या वाजवून अभिनंदन केले. ''तूच आमचा नेता हो! या गांवात तू कायमचाच आमच्याबरोबर राहा!''

सरपंच म्हणाला, ''हो रे हो! हिरालाल, अगोदर तू आमच्याबरोबर जेवायला चल. त्यानंतर तुझ्यासाठी नवीन घरांत राहाण्याची व्यवस्था आम्ही करुं.''

हिरालालला आनंद झाला. आता बनारसला जायची लांबलचक वाट शोधायची जरुरी राहिली नव्हती.





## वाचकांसाठी कथास्पर्धा
## सर्वोत्कृष्ट प्रवेशिकेला रु. २५०/-चे पारितोषिक

*खालील गोष्ट वाचा:*

चंदनसिंग आणि मोहन सिंग हे दोघे शेजारी होते. चंदनसिंग गरीब शेतकरी होता आणि मोहनसिंग एक सधन जमीनदार होता. एके दिवशी चंदनसिंगला शेतांत एक खूप मोठा भोपळा दिसला. त्याने तो तोडला आणि राजवाड्यांत नेऊन राजाला तो भेटीदाखल दिला. दरबाऱ्यांनी चंदनसिंगच्या शेतीची प्रशंसा केली आणि त्याला योग्य इनाम द्यावे अशी राजाला विनंती केली. राजाने त्याला शंभर सोन्याच्या मोहोरा बक्षीस दिल्या.

मोहनसिंगला जेव्हां ही बातमी कळली तेव्हां तो चकित झाला. एका मोठ्या भोपळ्याला जर राजाने शंभर मोहोरा दिल्या, तर आपण राजाला हत्तीच भेट दिला तर राजा हजार मोहोरा देणार नाही कां? मोहनने एक हत्तीचे पिल्लूं भरमसाट किंमतीला विकत घेतले, आणि ते घेऊन तो राजवाड्यांत गेला व राजाला भेट दिले. दरबारी गप्प बसले होते. ''आता ह्याला मी काय बक्षीस देऊं?'' राजाने मंत्र्याला विचारले.

- मंत्र्याने त्यावर काय उत्तर दिले असेल असे तुम्हाला वाटते?
- राजाने काय निर्णय घेतला?

तुमची प्रतिक्रिया १००-१५० शब्दांत लिहा व गोष्टीला समर्पक शीर्षक द्या. खालील कुपन भरून त्याबरोबर तुमची प्रवेशिका पाठवा. पाकिटावर ''वाचा नि सुचवा'' असे जरुर लिहा.

**शेवटची तारीख : ३१ मार्च, २००५**

नांव .................................................... वय ....................

जन्मतारीख .................................... शाळेचे नांव ....................................

घरचा पत्ता ................................................................................

................................................................................

.................................................... पिनकोड ....................

पालकांची सही                                        स्पर्धकाची सही

CHANDAMAMA INDIA LIMITED
82 Defence Officers Colony, Ekkatuthangal, Chennai - 600 097.



# तेथे पाहिजे जातीचे

**पूर्वी** एकदा विरुपसेन हा मगधाचा राजा असताना बोधिसत्वाने एका हत्तीच्या रूपांत जन्म घेतला होता. तो पांढराशुभ्र हत्ती ऐरावतासारखा दिसायचा. म्हणून मगधराजाने त्याला आपला प्रमुख हत्ती मानले.

एका पर्व दिनी मगधाचे राज्य स्वर्गालाही लाजवील असे सजविले होते. राजधानीमध्ये एक वैभवसंपन्न मिरवणूक काढायचे आयोजन झाले होते. म्हणून त्या श्वेतहत्तीला चांगले नटविले होते. सुसज्ज सैनिक मागेपुढे असलेल्या, हत्तीच्या नटलेल्या अंबारीमध्ये बसलेल्या राजाची मिरवणूक निघाली.

राजमार्गाच्या दुतर्फा उभे असलेले लोक मोठ्या उत्साहाने, "अहाहा! या गजराजाची चाल तर बघा! याच्या दमदार चालीचा डौल पाहता, एखाद्या सार्वभौम राजाचे वाहन होण्यास साजेसा आहे!" असे त्या हत्तीच्या गुणांचे कौतुक करुं लागले.

लोक हत्तीची स्तुती करीत असलेले पाहून राजाच्या मनांत आले - "राजा म्हणून माझा गौरव करण्याऐवजी हे लोक हत्तीचीच स्तुती करीत आहेत म्हणायचे! एकही माणूस अंबारीत विराजमान झालेल्या माझ्याकडे पहायला तयार नाही! सर्वांची दृष्टी या हत्तीवरच खिळली आहे. याची शिक्षा म्हणून कांहीतरी उपाय योजून या हत्तीची विल्हेवाट लावली पाहिजे."

दुसऱ्या दिवशी सकाळी राजाने माहुताला बोलाविले. व "काय रे, तो पांढरा हत्ती चांगला प्रशिक्षित आहे काय?" असे विचारले.

"त्याला योग्य प्रशिक्षण देऊन अंबारीचा हत्ती मीच बनविले, प्रभू!" माहूत म्हणाला.

"काय की! तुझ्या सांगण्यावर माझा विश्वास नाही. नुसता अहंकारी व मानी हत्ती असावा अशी मला शंका वाटते आहे." राजा म्हणाला.

"तसं काही नाही, प्रभू!" माहूत म्हणाला.



"बरं, तूं सांगितल्याप्रमाणे जर चांगल्या तालमीत वाढलेला तो हत्ती असेल तर तूं त्याला समोरच्या पर्वतशिखरावर चढवूं शकशील कां?" राजाने विचारले.

"चढवूं शकतो, महाप्रभू!" असे म्हणून माहुताने क्षणभरांत त्या अंबारीच्या हत्तीला पर्वतशिखरावर चढविले.

राजा कांही दरबाऱ्यांना बरोबर घेऊन मागाहून पर्वतावर चढला. शिखराचा थोडासा भाग सपाट होता व पुढे कुशाग्र सुळा होता. राजाने "हत्तीला तिथे थांबव," असे माहुतास सांगितले.

"तूं याला कसे प्रशिक्षित केले आहेस, बघूंया! हत्तीला तीन पायांवर उभे कर!" राजा म्हणाला.

लगेच माहुताने हत्तीच्या मस्तकावर अंकुश ठेवले व त्याला सावध करीत म्हणाला - "बाबा रे! महाराजांची आज्ञा आहे, तीन पायांवर उभा रहा बरे!" हत्तीने तसेच केले.

राजा, "अहा! छान!" असे म्हणाला. व "आतां पुढच्या दोन पायावर उभा राहूं शकतो कां बघ." अशी आज्ञा दिली.

माहुताचा इशारा मिळताच हत्ती पुढच्या दोन पायांवर उभा राहिला.

"हेही छान आहे! आतां मागच्या दोन पायांवर उभे रहायची आज्ञा दे!" राजा म्हणाला. त्यासरशी हत्ती मागच्या दोन पायांवर उभा राहिला.

"एका पायावर उभा राहूं शकतो कां?" म्हणून राजाने माहुताला विचारले.



हत्ती एका पायावर सहज उभा राहिला. नाना तऱ्हेने त्रास दिला तरी हत्ती पर्वतशिखरावरुन खाली पडला नाही, हे पाहून राजाच्या मनाचा जळफळाट झाला. "एवढीशी तालीम दिली तर कोणताही हत्ती हे सारे करुं शकेल आणि एक परीक्षा घ्यावी म्हणतो!" राजा म्हणाला.

"जशी आपली आज्ञा! ती परीक्षा कोणती, महाप्रभू!" माहुताने विचारले.

"हत्ती जसा आपल्या पायांनी या पर्वतशिखरावर चढला तसाच अधांतरी हवेत चालेल असे कर. ही माझी आज्ञा आहे!" राजा म्हणाला.

ते ऐकतांच राजाचा दुष्ट हेतू माहुताच्या लक्षांत आला. परंतु थोडेसुद्धा न डळमळता माहुताने हत्तीच्या कानांत हळूच असे सांगितले - "बाबा रे! तू या पर्वतशिखरावरुन घसरुन खाली

पडावेस म्हणून राजाने हा कट रचला आहे. त्याला तुझे मूल्यांकन करता आले नाही. तुझ्यांत जर अद्वितीय शक्ती असेल, तर तूं असाच या कड्यावरून पुढे हवेत चालत जा.''

अद्‌भुतशक्तींचा महिमा असलेला तो हत्ती पर्वतशिखरावरुन तसाच पुढे गेला व अधांतरी तरंगत जाऊ लागला. तेव्हां माहूत असे म्हणाला - ''हे राजा! हा हत्ती असामान्य अशा दैवीशक्तींचा अंश असून तुझ्यासारख्या गाजरपारख्याच्या अंबारीचा प्रमुख हत्ती होण्याच्या योग्यतेचा नाहीच नाही! किंमत न जाणणारे तुझ्यासारखे मूर्ख, अशा हत्तीलाच नव्हे तर, अमूल्य अशा कोणत्याही गोष्टीला गमावून बसतात. मूर्ख स्वतःच्या अविवेकाची प्रौढी दहा लोकांमध्ये मिरवीत असतात.''

हवेत चालत जात हत्ती काशी राजाच्या उद्यानात अधांतरी उभा राहिला. हे पाहून काशीचे पौरजन आनंदाने ते दृश्य पहाण्यासाठी उद्यानाभोवती गोळा झाले.

ही वार्ता राजाच्या कानीं आली. काशीराज त्वरेने राजोद्यानात आला व हत्तीकडे पहात हात जोडून म्हणाला - ''गजराजा! तुझ्या येण्यामुळे माझे राज्य पावन झाले. खाली उतरून ये, अशी मी प्रार्थना करतोय!''

राजाने असे म्हणताच हत्तीच्या रूपांत असलेला बोधिसत्त्व खाली आला. राजाने विचारले असता माहुताने घडलेली हकिगत सांगितली. ती ऐकून काशी राजाला व तिथे जमलेल्या नागरिकांना अत्यानंद झाला.

राजाने हत्तीला शृंगारले व त्याच्यासाठी सुंदर गजशाला बनविली. व त्याची उत्तम व्यवस्था राखायची सोय केली. त्यानंतर राज्याचे तीन समान भाग केले. एक भाग हत्तीच्या रूपांत असणाऱ्या बोधिसत्वाच्या पोषणाकरिता नेमून दिला. दुसरा भाग माहुताला दिला व तिसरा स्वतःसाठी ठेवला.

बोधिसत्त्वाने काशीराज्यात पाऊल टाकताच काशी राजाचे ऐश्वर्य, धन-संपदा व वैभवाची दिवसेदिवस अभिवृद्धी होऊ लागली. त्याची कीर्ती दशदिशांमध्ये पसरली.







# विष्णुपुराण

रामाचा राज्याभिषेक झाल्यावर तो लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न यांच्या मदतीने राज्यकारभार पाहू लागला. रामाची कारकीर्द सुरु होतांच प्रजा सर्व प्रकारे सुखी झाली.

एकदां एका खेडेगावात राहणारा एक ब्राह्मण आपल्या पांच वर्षांच्या मुलाचे प्रेत घेऊन राजद्वारी आला आणि रडूं लागला. त्याचा तो एकुलता एक मुलगा होता. त्याचे अकाली मरण झाल्याने तो रडत होता. त्याच्या म्हणण्याप्रमाणे राजा जर उत्तम प्रकारे राज्यकारभार पहात असेल तर मुलाला असे अकालमरण येणेच शक्य नाही. इक्ष्वाकु वंशात असे पूर्वी कधी घडलेच नाही. रामाच्या राज्यांतच देश या दशेला पोंचला आहे.

रामाला ते कळल्यावर त्याने फार चिंतित होऊन आपल्या मंत्र्यांना आणि वसिष्ठादी ऋषिवर्यांना बोलाविले आणि त्यांना ब्राह्मणाच्या मुलाचे अकालमरण झाल्याचे सांगितले. त्यावर नारदाने शंबुक नांवाचा एक शूद्र तपश्चर्या करीत असून ते कार्य युगधर्माविरुद्ध असल्या कारणाने बालक मरण पावल्याचे सांगितले.

राम लक्ष्मणाला म्हणाला - ''तू जाऊन त्या ब्राह्मणाचे सांत्वन कर आणि त्या मुलांचा देह तेलांत सुरक्षित बुडवून ठेव.'' नंतर तो धनुष्यबाण घेऊन पुष्पक विमानात बसला आणि पश्चिम, उत्तर आणि पूर्व दिशांकडील देश फिरून पाहिला. नंतर तो दक्षिणेकडे गेला. तेथे त्याने एका सरोवरांत डोक्यावर उभा राहून तपश्चर्या करीत असलेल्या एका माणसाला पाहिले.

राम पुष्पक विमानांतून उतरला आणि तलवार उपसून त्याने शंबूकाचे डोके उडविले. शंबूकाचे

१५. रामराज्य



डोके डोळे उघडून रामाला पाहून म्हणाले - "राघवा! मरण हे अटळच आहे. तू त्याला कारण झालास, एवढेच! वर्णाश्रम धर्माच्या बंधनात सांपडलेल्या निरनिराळ्या वर्णाचा जो समाज आहे, त्याचा तू राजा आहेस. राजा हा प्रजेचा सेवक असतो. त्या कर्तव्यकर्माचे तू पालन केलेस. म्हणून तुला वाईट वाटून घ्यायचे काही कारण नाही. तुला कोणतेही पाप यामुळे लागणार नाही. मी आपल्या जाती व वृत्ती पलीकडचा एक योगी आहे! विष्णूकडून सायुज्य मुक्तीचा लाभ मला होत आहे." असे सांगून त्याने डोळे मिटले.

शंबुकाची बायको कपिला रामाला म्हणाली - "हे सीतापती! राजाच्या कर्तव्याचे पालन करीत असतांना तुझ्यासमोर पुढे नवेनवे प्रसंग येतील. त्यांची ही सुरवात, नांदी आहे! मी माझ्या पतीबरोबर आनंदाने जात आहे. तू दृढचित्त होऊन आपल्या कर्तव्याचे पालन कर!" असे सांगून तिने पतीच्या चितेवर उडी टाकून सहगमन केले.

राम परत येत असतांना वाटेत घुबडाचे एक झाड होते. त्याच्या ढोलीत एक घार शिरली होती. तिला शिक्षाच म्हणून रामाने तिच्या डोक्यात एक चापटी मारली. त्या पाठोपाठ त्या घारीचे रूप बदलले, आणि ब्रह्मदत्त नांवाचा राजा शापमुक्त होऊन गेला.

विश्वामित्राने रामाच्याकडे येऊन, शकुंत नावाच्या राजाने अपमान केला होता, म्हणून त्याचा वध करावा म्हणून आज्ञा केली. राम लगेच गुरुची आज्ञा शिरसावंद्य मानून शकुंतलचा वध करण्यास निघाला.

हनुमंताची आई अंजनादेवी हिने शकुंताला आश्रय दिला. हनुमानाने आईचा मान राखण्यासाठी रामनामाचा जप करीत डोळे रामबाणाला मिटून निधड्या छातीने तोंड दिले. रामाने सोडलेला बाण हनुमंताच्या छातीत लीन झाला.

ज्यांच्यामुळे रामहनुमान यांचे हे वैर झाले, त्या विश्वामित्रांनी शकुंताला क्षमा केली आणि तेथून निघून गेले.

एकदां मध्यरात्रीच्या सुमारास एक कुत्रा रामाच्या शयनगृहाजवळ आला आणि न्याय मिळावा म्हणून त्याने आर्तनाद केला. रामाने लगेच येऊन कुत्र्याच्या जखमेतून रक्त वहात होते ते थांबविले.

कुत्रा म्हणाला, "गेल्या जन्मी मी पुजारी होतो म्हणून कुत्रा म्हणून जन्मलो, निष्कारण मला



मारणाराला पुजारी म्हणून नेमावे, हीच त्याला योग्य शिक्षा होईल." त्याची जखम भरली गेली व तो कुत्रा आनंदाने परत गेला.

राज्यव्यवस्था उत्तम तऱ्हेने चालली होती, इतकी की कोणत्याही प्राण्याला सुद्धा त्रास होऊ नये याची काळजी राम बाळगीत असे. "अशा राज्यात परक्याच्या घरांत राहून आलेल्या पत्नीला घरांत घ्यायचे लाजिरवाणे काम करणे राजकर्त्या रामासारख्याला कसे शोभते?" असे दुर्वचन एका सामान्य माणसाच्या तोंडून बाहेर पडले.

म्हणून रामाने लक्ष्मणाला सांगितले, "सीतेला जंगलात पोंचवून सोडून ये." राम पुढे म्हणाला, "लक्ष्मणा, विचार कर, एक सामान्य माणूस म्हणाला तर कित्येकजण मनांत असूनही बोलत नसतील, असे नाही कां वाटत तुला? राज्य म्हणजे जमीन नव्हे, जमिनीवर राहणारी प्रजा आहे! त्या न्यायाने व धर्माने रक्षण करणे म्हणजे तलवारीच्या धारेवर चालण्यासारखे आहे. स्वार्थाला येथे जागा नाही. हृदयाला दगडासारखे कठोर करुन कर्तव्य पालन करावे लागते!" असे लक्ष्मणाला सांगून त्याने पाठविले.

"मुनिपत्नीबरोबर रहावेसे वाटते आहे," असे सीता एकदां म्हणाली होती त्याची आठवण करुन देऊन लक्ष्मणाने सीतेला रथांत बसवून देऊन अरण्यांत सोडले. पण त्याला वाईट वाटले व तो म्हणाला - "हनुमंताने तेव्हां संजीवनी आणून मला कशाला वांचविले?" असे म्हणत त्याने आपली छाती बडवून घेतली.



वाल्मीकि मुनी सीतेला आपल्या आश्रमांत घेऊन गेले. आश्रमांत सीतेला लवकुश ह्यांचे सुंदर जुळे झाले.

अयोध्येत अनावृष्टीमुळे दुष्काळ पडला. सीतेच्या विरहाने आधीच दुःखी झालेल्या रामाला "अश्वमेध यज्ञ करावा" असे थोरामोठ्यांनी सांगितले. सीतेची सुवर्णमूर्ती करुन रामाने यज्ञदीक्षा घेतली.

वाल्मीकी ऋषींनी रचलेले रामायण गात लवकुश अयोध्येला आले. मुनिबालक म्हणून त्यांचे वर्णन करण्यात आले होते. रामाच्या मनांत त्यांच्याविषयी वात्सल्य भाव उत्पन्न झाला. रामाने त्यांना अनेक भेटवस्तू दिल्या.

यज्ञाश्व जात असतां लवकुशांनी त्याला धरून आश्रमांत बांधून ठेवले व त्याला सोडले नाही.

शत्रुघ्न घोड्याला सोडविण्यासाठी ससैन्य आला. त्याला व नंतर भरत आणि लक्ष्मणाला सुद्धां युद्धाला आलेले असताना लवकुशांनी घायाळ केले. शेवटी स्वतः रामाला युद्ध करावे लागले.

आईचे स्मरण करून लवकुशांनी रामावर बाण सोडला. राम सुद्धां बेशुद्ध होऊन पडला. सीतेने स्वतः येऊन रामाला शुद्धीवर आणले. सर्वजण त्यानंतर एकामागून एक शुद्धीवर आले.

वाल्मीकींनी लवकुशांना व सीतेला रामाकडे सोंपविले. राम सीतेसह सिंहासनावर बसला व लवकुशांना मांडीवर घेतले. त्याने त्यांना युवराजपद दिले.

नंतर रामाने सीतेला तिचे पावित्र्य अयोध्यावासियांसमोर सिद्ध करायला सांगितले.

सीता अयोध्या नगरीच्या केंद्रस्थानी उभी राहून आकाशाकडे पाहून अयोध्येत पाऊस पडावा अशी प्रार्थना करुं लागली. त्या पाठोपाठ आकाश मेघाच्छादित झाले व मोठा पाऊस पडला.

नंतर सीता भूमातेकडे पहात म्हणाली - ''आई, रघुवंशाचे कुलदीपक आपल्या वडिलांकडे पोंचले. आतां मला कसलीच इच्छा उरली नाही. आतां मला पोटात घे!''

जमीन थोडीशी हादरली आणि दुभंगली. दिव्य कांती चहूकडे पसरली. भूदेवी रत्नजडित सिंहासनावर बसून प्रगट झाली. तिने सीतेला आपल्या उराशी धरले आणि भूगर्भात अदृश्य झाली. पुष्पवृष्टी झाली. आणि दुभंगलेली जमीन पुन्हां एक झाली.





रामाने जमिनीला भेदून टाकतो म्हणून धनुष्य हातात घेतले. तेव्हांच आकाशवाणी झाली - ''रामा, भूदेवीवर राग काढणे हिताचे नाही. सीता भूमीतून अवतरली होती आणि आता परत भूमीत अंतर्धान पावली.''

मुलांची काळजी घेत रामाने अनेक वर्षे राज्य केले. एकदां यमधर्मराज ब्राह्मण रूपे आला. म्हणाला, ''तुला एक दैवी रहस्य सांगावयाचे आहे. लक्ष्मणाला पाहाऱ्यावर ठेव. त्याने कोणाला आत येऊ दिले तर त्याला मृत्युदंड मिळेल, असे सांग ''रामाने ते मान्य केले. लक्ष्मण द्वारपालकाचे काम करीत होता. यम आपल्या स्वस्वरूपात प्रगट होऊन म्हणाला - ''तुझे अवतारकार्य संपले आहे. तू वैकुंठाला विष्णु होऊन रहा.''

त्याचवेळी दुर्वास ऋषी येऊन म्हणाले - ''तत्क्षणीं मला आंत जाऊ दिले नाही तर मी रघुवंशालाच शाप देईन.'' म्हणून लक्ष्मणाने त्यांना आत जाऊ दिले, आणि सरयू नदीत बुडून तो मरण पावला.

रामाने लवकुशांचा राज्याभिषेक करून दिला आणि राज्यकारभार त्यांच्या हातात दिला.

तो श्रावणाचा महिना होता. शरयू नदीला पूर आला होता. त्या दिवशी पौर्णिमा होती व चंद्रग्रहणही होते.

मंगलवाद्ये वाजत होती. भरत व शत्रुघ्न दोन्ही बाजूंनी चालत होते. राम सरयू नदीवर निघाला. प्रजा रामाच्या मागून चालत होती.

रामाने नदीत प्रवेश केला. पाठोपाठ दोघे भाऊ सुद्धा पाण्यांत उतरले. त्याच वेळी ग्रहण सुटले



आणि पूर्णचंद्रबिंब दिसू लागले. आकाशातून त्याच वेळी पुष्पवृष्टी झाली. साम, देवगांधार, हिंदोळ वगैरे राग निरनिराळ्या वाद्यांवर व वीणेवर वाजू लागले. दिशा दुमदुमू लागल्या.

त्या समयी चांदणे लख्ख पडले होते. पुष्पवृष्टी होत होती. सरयू नदीच्या लाटांवर फुले तरंगत होती. सरयू नदी जणुं कांही फुलांबरोबर खेळत होती.

त्यापूर्वीच लक्ष्मण शेषनाग होऊन व सीता लक्ष्मी होऊन विष्णूच्या स्वागतास उभे होते. भरत व शत्रुघ्न शंखचक्र होऊन तयार होते. विष्णु रामावतार संपूर्ण करून वैकुंठलोकी पोचला. लक्ष्मी पाय चेपू लागली आणि शेषनागाच्या शय्येवर विष्णु पहुडला.

रामाने उत्तम मानवावतार घेऊन पित्याच्या आज्ञेचे पालन केले. वनवासास गेला. कार्यसिद्धी

शत्रुघ्न घोड्याला सोडविण्यासाठी ससैन्य आला. त्याला व नंतर भरत आणि लक्ष्मणाला सुद्धां युद्धाला आलेले असताना लवकुशांनी घायाळ केले. शेवटी स्वतः रामाला युद्ध करावे लागले.

आईचे स्मरण करुन लवकुशांनी रामावर बाण सोडला. राम सुद्धां बेशुद्ध होऊन पडला. सीतेने स्वतः येऊन रामाला शुद्धीवर आणले. सर्वजण त्यानंतर एकामागून एक शुद्धीवर आले.

वाल्मीकींनी लवकुशांना व सीतेला रामाकडे सोंपविले. राम सीतेसह सिंहासनावर बसला व लवकुशांना मांडीवर घेतले. त्याने त्यांना युवराजपद दिले.

नंतर रामाने सीतेला तिचे पावित्र्य अयोध्यावासियांसमोर सिद्ध करायला सांगितले.

सीता अयोध्या नगरीच्या केंद्रस्थानी उभी राहून आकाशाकडे पाहून अयोध्येत पाऊस पडावा अशी प्रार्थना करुं लागली. त्या पाठोपाठ आकाश मेघाच्छादित झाले व मोठा पाऊस पडला.

नंतर सीता भूमातेकडे पहात म्हणाली - ''आई, रघुवंशाचे कुलदीपक आपल्या वडिलांकडे पोंचले. आतां मला कसलीच इच्छा उरली नाही. आतां मला पोटात घे!''

जमीन थोडीशी हादरली आणि दुभंगली. दिव्य कांती चहूकडे पसरली. भूदेवी रत्नजडित सिंहासनावर बसून प्रगट झाली. तिने सीतेला आपल्या उराशी धरले आणि भूगर्भात अदृश्य झाली. पुष्पवृष्टी झाली. आणि दुभंगलेली जमीन पुन्हां एक झाली.





रामाने जमिनीला भेदून टाकतो म्हणून धनुष्य हातात घेतले. तेव्हांच आकाशवाणी झाली - ''रामा, भूदेवीवर राग काढणे हिताचे नाही. सीता भूमीतून अवतरली होती आणि आता परत भूमीत अंतर्धान पावली.''

मुलांची काळजी घेत रामाने अनेक वर्षे राज्य केले. एकदां यमधर्मराज ब्राह्मण रूपे आला. म्हणाला, ''तुला एक दैवी रहस्य सांगावयाचे आहे. लक्ष्मणाला पाहाऱ्यावर ठेव. त्याने कोणाला आत येऊ दिले तर त्याला मृत्युदंड मिळेल, असे सांग ''रामाने ते मान्य केले. लक्ष्मण द्वारपालकाचे काम करीत होता. यम आपल्या स्वस्वरूपात प्रगट होऊन म्हणाला - ''तुझे अवतारकार्य संपले आहे. तू वैकुंठाला विष्णु होऊन रहा.''

त्याचवेळी दुर्वास ऋषी येऊन म्हणाले - ''तत्क्षणीं मला आंत जाऊ दिले नाही तर मी रघुवंशालाच शाप देईन.'' म्हणून लक्ष्मणाने त्यांना आत जाऊ दिले, आणि सरयू नदीत बुडून तो मरण पावला.

रामाने लवकुशांचा राज्याभिषेक करून दिला आणि राज्यकारभार त्यांच्या हातात दिला.

तो श्रावणाचा महिना होता. शरयू नदीला पूर आला होता. त्या दिवशी पौर्णिमा होती व चंद्रग्रहणही होते.

मंगलवाद्ये वाजत होती. भरत व शत्रुघ्न दोन्ही बाजूंनी चालत होते. राम सरयू नदीवर निघाला. प्रजा रामाच्या मागून चालत होती.

रामाने नदीत प्रवेश केला. पाठोपाठ दोघे भाऊ सुद्धा पाण्यांत उतरले. त्याच वेळी ग्रहण सुटले



आणि पूर्णचंद्रबिंब दिसू लागले. आकाशातून त्याच वेळी पुष्पवृष्टी झाली. साम, देवगांधार, हिंदोळ वगैरे राग निरनिराळ्या वाद्यांवर व वीणेवर वाजू लागले. दिशा दुमदुमू लागल्या.

त्या समयी चांदणे लखख पडले होते. पुष्पवृष्टी होत होती. सरयू नदीच्या लाटांवर फुले तरंगत होती. सरयू नदी जणुं कांही फुलांबरोबर खेळत होती.

त्यापूर्वीच लक्ष्मण शेषनाग होऊन व सीता लक्ष्मी होऊन विष्णूच्या स्वागतास उभे होते. भरत व शत्रुघ्न शंखचक्र होऊन तयार होते. विष्णु रामावतार संपूर्ण करून वैकुंठलोकी पोचला. लक्ष्मी पाय चेपू लागली आणि शेषनागाच्या शय्येवर विष्णु पहुडला.

रामाने उत्तम मानवावतार घेऊन पित्याच्या आज्ञेचे पालन केले. वनवासास गेला. कार्यसिद्धी



# भुकेचे औषध

एकदा एका देशांत दुष्काळ पडला. त्या देशाच्या राजाने मंत्री व सरकारी अधिकाऱ्यांची बैठक बोलावली आणि सांगितले, ''आपल्या देशांत दुष्काळाने थैमान घातले आहे. रोज भूकबळींची संख्या वाढते आहे. भुकेचा प्रश्न कायमचा सोडवण्यासाठी मी वैद्यांना सांगून असे कांही अदभुत औषध तयार करवणार आहे कीं ते घेतले कीं भविष्यकाळांत कुणाला भूकच लागणार नाही!''

राजाचे बोलणे सर्वांनी ऐकले, पण त्यावर कुणीही आपले मत दिले नाही. राजाला आपली सूचना आवडली नाही तर काय करायचे?

परंतु वृद्ध मंत्री सुबुद्धि यांनी उभे राहून आपले मत सांगितले, ''महाराज, दरवर्षी देशांत कोणत्या ना कोणत्या प्रदेशांत दुष्काळ पडतोच. तो जर दूर करायचा असेल तर पाण्याचे सिंचन करायच्या सुविधा वाढवल्या पाहिजेत, आणि देशांत हिरवी कुरणें दिसली पाहिजेत. पण नुसत्या भुकेच्या औषधाने दुष्काळ थांबवणे अशक्य आहे.''

''त्यांत काय अशक्य आहे, ते मी पाहातोच!'' राजा चिडून मंत्र्याला म्हणाला. त्यानंतर राजाने मंत्र्याची सूचना फेटाळत म्हटले कीं हे मंत्री प्रत्येक गोष्टीत अडथळा आणीत असतात. त्यावर कांहीही बोलणे इतर सर्वांनी टाळले, आणि राजाच्या सूचनेची मुक्तकंठाने प्रशंसा केली.

त्यानंतर राजाने देशांतल्या सर्व वैद्यांना निमंत्रणे धाडली व त्यांना आज्ञा दिली, ''तुम्हाला सर्वांना मी एका महिन्याची मदत देतो आहे. तेवढ्या अवधीत भूक मिटवणारे औषध तुम्ही तयार करायला हवे.''

हे ऐकून सगळे वैद्य चकित झाले. त्यांच्यापैकी एकाने म्हटले, ''महाराज, क्षमा करावी. भूक थांबवणारे औषध कोणत्याही वैद्यकी ग्रंथात दिलेले नाही.''

''तर मग या सगळ्या वैद्यांना तुरुंगात टाका!'' राजाने आज्ञा केली.

त्यावेळी एक म्हातारा पुढे येऊन बोलला, ''महाराज, आपण या सर्व वैद्यराजांना तुरुंगात पाठवूं नका. मी एका आठवड्याच्या आंत भुकेचे औषध तयार करून देतो.

''वा, वा! वैद्यराज असावा तर असा!'' राजाने प्रसन्न होऊन सर्व वैद्यांना घरीं पाठवले. त्यानंतर कांही दिवसांतच तो म्हातारा राजाच्याकडे आला. ताडफळाएवढे औषध तो बरोबर घेऊन आला होता. त्याने राजाला सांगितले, ''महाराज, प्रत्येक माणसाने हे फक्त चिमूटभरच चूर्ण तोंडात टाकायचे आहे. त्यानंतर त्याला जन्मांत कधीही भूक लागणार नाही.''

राजाने त्या म्हाताऱ्याचा सत्कार केला व ते औषध साऱ्या नगरांत वाटले. पण राजवाड्यांतल्या कुणीही ते औषध खाल्ले नाही. म्हणून त्या सर्वांना नेहमीसारखीच भूक लागत होती. पण लौकरच बातमी आली कीं नगरवासियांपैकी कुणालाच भूक लागत नाही. तेव्हां वृद्ध मंत्र्याने राजाला समजावून सांगितले, ''महाराज, लोकांनी काम करणे सोडून दिले आहे. त्यांना आता भूक लागत नाही. म्हणून ते सारा वेळ करमणूक व झोप यांतच दिवस घालवतात.''

''पण सर्वांत मोठी चिंता म्हणजे भूक – तिचे निवारण तर झाले ना?'' राजा उत्साहाने म्हणाला.

चार दोन दिवसानंतर मंत्र्याने पुन्हां येऊन राजाला माहिती दिली, ''महाराज, नागरिकांनी आपापले काम, व्यवसाय करणे सोडून दिले आहे. विणकर कापड विणत नाही, न्हावी इतरांची दाढी करीत नाही. सगळ्या वस्तूंची टंचाई जाणवूं लागली आहे. आधी बाजारांत धान्य मिळेनासं झालं होतं, आता कुठलीच वस्तू मिळत नाही. आणि मिळालीच तर सोन्याच्या मोलाने किंमत द्यावी लागते,'' हे ऐकून राजा गप्प बसला.

थोड्या दिवसानंतर मंत्री पुन्हां येऊन राजाला सांगू लागला, ''महाराज, लोक कायदे मोडतात. साऱ्या देशांत अशांतता वाढली आहे.''



२५ वर्षांपूर्वीची चांदोबात प्रकाशित झालेली कथा

मंत्र्याची ही बातमी ऐकून राजा संतापला व म्हणाला, "जनता अशी हरामखोर झाली आहे कां? सेनेला तयार ठेवायला सेनापतींना सांगा."

"महाराज, आता आपल्याकडे सेनाच कुठे राहिली आहे? बहुतेक साऱ्या सैनिकांनी आपली नोकरी सोडून दिली, व ते निघून गेले आहेत." मंत्र्याने उत्तर दिले.

तितक्यांत घाबरलेला सेनापती तिथे आला आणि सांगू लागला, "महाराज, आपला शत्रू चंड-प्रचंड आपल्या सेनेसह हल्ला करायला आला आहे, आणि त्याने राजधानीलाही वेढा घातला आहे."

"आता काय करायचं? तुम्हीच सांगा!" राजा म्हणाला.

"शत्रूच्या स्वाधीन होण्याखेरीज आपल्या-जवळ कांहीच उपाय राहिलेला नाही." सेनापतीने अगदी थंड स्वरांत उत्तर दिले. शत्रूचे सैनिक येऊन पोंचले आहेत हे ही त्याने सांगितलं. शत्रू सैनिकांचा नेता तिथें टपकला व म्हणाला, "महाराज, आपले राज्य आता आमच्या ताब्यांत आले आहे. आपण विनाकारण आमच्याशी लढून आपले प्राण संकटात घालूं नयेत."

"आता कसली आली आहे लढाई? भुकेच्या औषधाने ही परिस्थिती निर्माण केली आहे. आता मी तुमचा कैदी आहे." असं म्हणून राजा पुढे आला.

तो म्हातारा वैद्य पुढे येऊन म्हणाला, "महाराज, मी अगोदरच सांगितलं होतं कीं भूक मिटवण्याचे औषध, हेच या साऱ्या अनर्थाचे मूळ आहे. पण आपण माझे म्हणणे ऐकले नाहीत!"

"म्हणून तर त्याची फळं भोगतो आहे!" राजाने उत्तर दिले.

"आता आपल्याला खरी परिस्थिती समजली आहे, हे पाहून आम्हाला फारच आनंद वाटतो आहे."

हे बोलत असतानाच वैद्याने आपली वेशभूषा बदलली. तो वृद्ध वैद्य म्हणजे मंत्री सुबुद्धिच होता.

"महाराज, आपण मला क्षमा करा. आपल्यामार्फत चांगल्या योजना अंमलात आणता याव्यात, या हेतूने आम्हीच हे नाटक केलं होतं. शत्रूचे सैनिक म्हणून आपलेच सैनिक उभे होते, आपण कोणाचेही बंदी नाहीत. देशाच्या संपत्तीचा योग्य उपयोग होईल अशा योजना आंखायला हव्यात, आणि देशांत हरितक्रांती निर्माण करून दुष्काळाचे संकट निवारायला हवं!" वृद्ध मंत्री सुबुद्धि यांनी राजाला समजावून सांगितले.










# सर्वोत्तम कथा

## स्वार्थी वृत्ती



जागा बदलूनही उपयोग होण्यासारखा नव्हता. ते चोर म्हणजे माझे सख्खे भाऊच! तिघेही भाऊ वरचेवर येऊन आमच्या वडिलांची संपत्ती मीच लुटली म्हणून मला बरेच दिवसापासून सतावत होते. एकदा कपाटाची चावी माझ्या उशाखाली ठेवली. मला चोरी होणार हा अंदाज असल्याने मी दागदागिने अंथरुणाखाली लपवले. त्या दिवशी पहिला भाऊ चोरी करायला आला, आणि हात हालवत गेला.

दुसऱ्या दिवशी मी चावी कपाटावरच ठेवली. कपाटाला कुलूप घातले नव्हते. अंथरुणाखालीच दागिने ठेवल्याने यावेळीही ते सुरक्षित राहिले.

तिसऱ्या भावाने चोरीच्या वेळी अंथरुणासकट सर्व झाडून काढले. चावी मी खिळ्यालाच अडकविली होती. पण दागिने मी कपाटाखाली लपविले होते. त्या बुद्धूला ते दिसलेच नाहीत!

प्रत्येकवेळी चोरी झाली म्हणून मीच टाहो फोडला. त्यामुळे त्यांचा समज आपल्यापैकीच एकाने दागिने पळविले असा झाला. माझ्या भावांनाच मी पकडणार कसे? पुढे काय करुं कळत नाही.

कृष्णकुमार : आता तू घाबरु नकोस. त्या तिघांना आता एकमेकाबद्दल संशय येत राहील. ते तिघेही एकमेकाबद्दल धुसफुसत रहातील आणि इकडे तुझे दागदागिने सुरक्षित रहातील!

कु. भाग्यश्री दत्तात्रय मोडक,
२९५, मारुती गल्ली, अनगोळ, वि.पि. पॉलीटेक्निक कॉलेज,
जि. बेळगांव - ५९० ००७. कर्नाटक.





# साहसी तरुण

राजा विजयेंद्र, सिंधु नदीकांठच्या महेंद्रपुरी राज्याचा राज्यकर्ता होता. त्यावेळी, उत्तरेकडल्या प्रांतातल्या पर्वतराजींत हूण ही रानटी जमात महेंद्रपुरीवर वरचेवर आक्रमण करीत असे.

म्हणून विजयेंद्रवर्मा हे आपल्या सेनेमधे असे पराक्रमी व साहसी तरुण, कीं जे राज्याच्या रक्षणासाठी आपले प्राण देण्यास तयार होते, त्यांची भरती करीत असत. पण त्यापूर्वी त्यांचे प्रधानमंत्री त्या तरुणांच्या पराक्रमाची व साहसाची परीक्षा घेत असत.

एक दिवस एक वीस वर्षाचा तरुण राजाच्या दर्शनासाठी आला. त्याचे विचित्र हावभाव पाहून त्याची गंमत करण्याच्या हेतूने पहारेकऱ्यांनी त्याला विचारले, "महाराजांकडे तुझं काय रे काम आहे?" त्या तरुणाला समजले कीं पहारेकरी त्याची टर उडवायची संधी शोधतो आहे. त्याने नाराजीने उत्तर दिले, "माझी डाव्या बाजूची मिशी उजव्या बाजूच्या मिशीपेक्षां लहान आहे, म्हणून तुम्ही लोक हंसता आहात ना? त्याच्यामागे एक फार मोठी लंबीचौडी कथा आहे." त्यावर पहारेकरी हंसतच म्हणायला लागला, "सांग तरी काय आहे ती कथा?"

त्या तरुणाने म्यानांतून तलवार काढली, व तिच्या मुठीवर हात ठेवीत तो म्हणाला, "प्रत्येक लुंग्यासुंग्याला ही कथा नाही सांगता येणार. ती फक्त महाराज किंवा त्यांचे प्रधानमंत्री यांनाच मला सांगायची आहे. मला पुढे जाऊं देता कीं नाही?"

त्या पहारेकरी स्तब्ध राहिले. त्यांनी एका पहारेकऱ्याला ही बातमी प्रधानमंत्र्याला सांगण्यासाठी धाडले. मंत्र्याने त्या तरुणाला बोलावून घेतले.

मंत्र्याकडे निर्भयपणे पहात तो तरुण उद्‌गारला, "आपणच प्रधानमंत्री आहात कां?"

"हो हो, मीच प्रधानमंत्री आहे. तुझं नांव काय? तू कशासाठी आला आहेस? मंत्र्याने विचारले.

त्या तरुणाने खाली वाकून मंत्र्याला प्रणाम केला आणि म्हटले, "महामंत्रीजी, माझं नांव नरसिंह वर्मा आहे. महाराज पराक्रमी व शूर तरुणांची आपल्या सेनेत भरती करीत आहेत असं कळलं, हूणांशी

धर्माधिकारी

लढायला व राज्याचे रक्षण करण्याचे काम करायला त्यांना धाडसी तरुण हवे आहेत; त्या कामासाठी मी इथे आलो आहे.

"म्हणजे लढवय्या होऊन हूणांशी युद्ध करावे या हेतूने तू इथे आलेला आहेस! पण तुझ्या मिशा पाहिल्या कीं शत्रूचा कुणीही सैनिक तुझ्याशी लढायला आणि तुझ्यावर वार करायला संकोचून जाईल, बावचळेल!" मंदस्मित करीत प्रधानमंत्री म्हणाला.

"महामंत्रीजी, माझ्या मिशा अशा कां आहेत, त्याच्यामागे एक लांबच कहाणी आहे." नरसिंहवर्मा म्हणाला. मंत्र्याने त्यावर म्हटले, "ती कहाणी थोडक्यांत सांग!"

आपला घसा साफ करीत नरसिंहवर्मा म्हणाला, "मी देशभक्त आहे. माझ्या नसानसांतून देशभक्ती पुरेपूर भरलेली आहे. मी जिवावर उदार होऊन पुढे सरसावलो आणि हूण सरदाराच्या शिबिरांत घुसलो.

तो व्याघ्राजिनावर अस्वलाचे कातडे पांघरुन बसला होता. त्याच्या चारी बाजूंनी तलवारी व शस्त्रें घेतलेले सैनिक उभे होते. मी कोण आहे हे त्यांनी विचारण्या अगोदरच मी हूणांच्या सरदाराला सांगितले, "जे कुणी तुम्हाला बघतील, त्यांना शंका वाटेल कीं तुम्ही कुत्रा आहात कीं कोल्हा? आमच्या राज्यावर हल्ला करण्याचे तुमचे हे धाडस? तुम्हाला..." आणि माझे बोलणें पूर्ण होण्याअगोदरच त्याने मला मारून टाकण्याची आज्ञा त्याच्या सैनिकांना दिली. एका सैनिकाने ताबडतोब माझ्या गळ्याकडे नेम धरुन आपली तलवार फेंकली! पण त्याचा नेम चुकला आणि माझी डाव्या बाजूची मिशी तलवारीच्या घावाने अर्धीच कापली गेली. मी दुसऱ्याच क्षणीं तिथून वेगाने पळत सुटलो. मला पकडण्याचे त्यांचे प्रयत्न फोल ठरले."

"वा वा, पण हे सगळं झालं तरी केव्हां?" मंत्र्याने विचारले. "ही फार पूर्वीची गोष्ट नाही. घटकाभरापूर्वीच हे सारं घडलं होतं!" नरसिंहवर्माने न लटपटता सांगून टाकलं.

प्रधानमंत्री खळखळून हंसला आणि म्हणाला, "आता महाराजांना हवा आहे एक विदूषक, दरबारी विदूषक. चल माझ्याबरोबर नि महाराजांना भेट!" आणि मंत्र्याने त्याला बरोबर दरबारांत नेले.







# धैर्ये साहसे लक्ष्मी!

रात्रीची जेवणे झाल्यानंतर सगळी मुले सावित्री आजीच्या आजूबाजूला बसली आणि गोष्ट सांगायचा आग्रह करूं लागली. आजी गोष्टीला सुरवात करणार तितक्यांत नागबाबूने सूर्यच्या-कडे बोट दाखवून म्हटले, "आजी, आज ना, हा शाळा सोडून घरी पळून आला. कां ते माहिती आहे कां तुला? सुंदरने मास्तरांकडे तक्रार केली कीं त्याचे नवीन पेन कुणीतरी चोरले. मास्तरांनी सगळ्यांच्या पिशव्या तपासल्या. ह्याने आपल्या पिशवींत हात घातला तर हाताला पेनसारखंच कांहीतरी लागलं. झालं, हा भीतीने कांपतच बाहेर पळून गेला. खरी गोष्ट म्हणजे गोपीने पेन चोरलं होतं आणि सूर्यच्या दप्तरांत टाकलं होतं!"

आजीने सूर्यकडे बघत म्हटले, "बाळा सूर्या, तू ते पेन चोरलं नव्हतंस ना? मग तू पळून कां गेलास?" सूर्य म्हणाला, "आजी, मला सारेजण चोर म्हणतील, म्हणून मी घाबरलो."

"विद्वानांनी म्हटलं आहे, "धैर्ये साहसे लक्ष्मी!" आज मी हीच गोष्ट सांगते. नीट ऐका हं!" असं म्हणून आजीने गोष्ट सांगायला सुरवात केली.

"फार पूर्वीच्या काळांतली गोष्ट आहे ही. श्रीधर आणि विमल नांवाचे दोघे मित्र गुरुगृही शिकत होते. दोघेही नुसतेच हुशार नव्हते, नम्रदेखील होते. म्हणून गुरुंचे दोघांवरही फार प्रेम होते. शिक्षण संपल्यावर घरी जायची वेळ आली तेव्हां गुरुजींनी त्यांना सांगितलं.

"मुलांनो, फार पूर्वी एका मोठ्या महाराजावर कष्टांशी सामना करण्याची वेळ आली. त्यांच्याबरोबर दीर्घकाळ अष्टलक्ष्मी होत्या, त्यांना साथ देत होत्या, त्या साऱ्या एकेक करुन सोडून जाऊं लागल्या.

"धनलक्ष्मी, धान्य लक्ष्मी, विजयलक्ष्मी... अशा साती देवता महाराजाला सोडून निघून गेल्या. त्याचे त्याला फारसे दुःख झाले नाही. तो घाबरला नाही किंवा चिंतित झाला नाही. पण



शेवटी जेव्हां धैर्यलक्ष्मी त्याला सोडून जाऊं लागली, तेव्हां त्याने तिला म्हटले, ''माते, इतर लक्ष्मी मला सोडून गेल्या, त्याची मला चिंता नाही. पण तुझ्याशिवाय माझे जीवन निरर्थक आहे. तू जर राहिलीस तर मला तेवढे पुरेसे आहे. तुझ्या साथीने मी माझे गेलेले वैभव, संपत्ती, मान, सन्मान, सारे कांही परत मिळवीन.''

राजाचे बोलणे ऐकून धैर्यलक्ष्मीचे हृदय कळवळले. तिने राजाला आश्वासन दिले, ''पुत्रा, मी नेहमी तुझ्याबरोबर राहीन.''

धैर्यलक्ष्मीचा पाठिंबा असल्यामुळे राजाने लौकरच आपले गेलेले वैभव पुन्हां मिळवले. म्हणून वडील माणसे नेहमी सांगतात.'' धैर्ये साहसे लक्ष्मी. मनुष्याला संकटातून केवळ धैर्यच वांचवते. म्हणून कोणत्याही परिस्थितीत तुम्ही धीर सोडता कामा नये. म्हणजे मोठेपणी तुम्हीही श्रेष्ठ बनाल.'' गुरुने आशिर्वाद देताना सांगितले.

गुरुजींचा आशिर्वाद घेऊन दोघेही शिष्य राजधानीला जायला निघाले. राजधानीच्या हद्दीजवळ पोचेपर्यंत अंधार होऊं लागला. थोड्या अंतरावर ते जातात, तोवर त्यांना तिथे एक खानावळ दिसली. दोघेही आंत गेले. तिथल्या मालकाने त्यांचे प्रेमाने स्वागत केले. एकेक रुपया घेऊन त्यांना जेवण दिले व त्यांची राहाण्याचीही सोय केली.

मध्यरात्रीच्या सुमारास, अचानक तिथे गडबड सुरुं झाली. हे दोघे दचकून उठले. श्रीधरने जवळच उभा असलेल्या एका इसमाला विचारले, ''काय झालंय? कसली गडबड चाललीय?''

''असं सांगताहेत कीं राजाच्या अंतःपुरांत चोरी झाली आणि ते चोर या बाजूला आले. त्यांना शोधत राजाचे शिपाई आले आहेत. ते सगळ्याच लोकांची तपासणी घेत आहेत.'' तो इसम म्हणाला.

''ते ठीक, आम्हाला त्याच्याशी कांही देणंघेणं नाही.'' असं म्हणून श्रीधर व विमल निर्धास्तपणे बसले होते. थोड्या वेळानंतर सैनिक त्यांच्याजवळ आले, त्यांची पूर्ण चौकशी केली आणि त्यांना आपापल्या पिशव्या उघडून दाखवायला सांगितले. सैनिकांनी जेव्हां त्या दोघांच्या पिशव्या तपासल्या, तेव्हां श्रीधरच्या पिशवींत त्यांना नवरत्नांचे दोन हार दिसले. ते पाहून श्रीधर व विमलला धक्काच बसला.

''सैनिकांनी या दोघांना 'हे राणीसाहेबांचे



हार आहेत. तुम्ही दोघेही चोर आहात. तुमच्या टोळीतले इतर चोर कुठे लपले आहेत?''

या दोघांना तर भीतीने घाम फुटला. स्वतःला सावरुन श्रीधरने म्हटले, ''आम्ही चोर नाही. आम्ही गाढ झोपलो होतो. त्यावेळेस कुणीतरी हे दागिने माझ्या पिशवींत टाकले असतील.''

पण सैनिकांनी त्याच्या सांगण्यावर विश्वास ठेवला नाही आणि दोघांना काठीने मारायला सुरवात केली. विमलने कशीतरी आपली सुटका करुन घेतली आणि तो शिताफीने निसटला व पळून गेला. सैनिकांनी श्रीधरच्या हातांत बेड्या ठोकल्या आणि दुसऱ्या दिवशी त्याला राजासमोर हजर केले.

राजा यशवंतसिंह फार विचारी होता. त्याने श्रीधरची सविस्तर हकीकत शांतपणे ऐकून घेतली आणि म्हटले, ''जर तुम्ही खरोखरीच निर्दोष असलात तर तुझ्या मित्राला पळून जायची काय आवश्यकता होती?''

या प्रश्नाला उत्तर देताना श्रीधरने गुरुकुलांतून निघण्यापूर्वी गुरुने जो उपदेश दिला होता, त्याबद्दल सांगितले आणि म्हटलं, ''महाराज, माझा मित्र विमल ह्याच्या मनांत भीती निर्माण झाली कीं त्याला निश्चितच शिक्षा होईल. म्हणून तो भिऊन पळाला. तो निर्दोष आहे. देवाची शपथ घेऊन मी हे सांगतो. जर आपण मला सोडून दिलंत तर मी खऱ्या चोरांना पकडून आपल्यासमोर हजर करीन. आपल्याला वाटल्यास आपण माझ्या-बरोबर कुणाला तरी पाठवा.''

राजाला श्रीधरचा विश्वास वाटला. तो म्हणाला,



''ठीक आहे. संध्याकाळपर्यंत तू इथेच थांब. माझा माणूस तुझ्याबरोबर येईल.''

संध्याकाळीं शेखर नांवाचा गृहस्थ येऊन श्रीधरला भेटला. श्रीधरने त्याच्याजवळ आपली शंका व्यक्त करीत म्हटले, ''ज्या खानावळींत आम्ही उतरलो होतो, तिथल्या मालकाचा मला संशय येतो. तो चोरांना सामील असावा व त्यांच्या-कडून आपला वांटा वसूल करीत असावा.'' आणि त्याने आपली योजना शेखरला सांगितली.

नंतर ते दोघेजण बाजारांत गेले आणि त्यांनी कांही सामान खरेदी केले. ते घेऊन दुसऱ्या दिवशी सकाळीच ते त्या खानावळींत गेले व त्यांनी एक खोली भाड्याने घेतली. श्रीधरने वेष बदलला होता म्हणून त्या मालकाने कांही त्याला ओळखले नव्हते. श्रीधर व शेखरने आपापल्या पिशव्यांतून

कांही नकली दागिने काढले, आणि ते व्यापाऱ्यां-प्रमाणे आपरांत पैशाबद्दल बोलत राहिले.

रात्रीचे जेवण झाल्यानंतर श्रीधर व शेखरने झोपेचे सोंग केले व ते घोरायलाही लागले. साधारण मध्यरात्रीच्या सुमारास कांही नवीन माणसें तिथे आल्याचा आवाज आला. खानावळ-मालक त्यांच्याशी अगदी हळू आवाजांत बोलत होता. या दोघांच्या लक्षांत आलं कीं तो त्यांच्याबद्दलच त्या लोकांना सांगत होता. त्यानंतर मात्र ह्या दोघांना गाढ झोप लागली आणि सकाळी उठून ते बाहेर पडले.

ही खानावळ राजधानीच्या सीमेलगत होती, त्यामुळें तिथून बाहेर पडल्यावर थोड्याच अंतरावर निर्जन वाट होती. श्रीधर व शेखर थोडे दूर चालत गेले होते, तेवढ्यांत तीन चोरांनी त्यांच्यावर हल्ला केला. त्यांना असं कांहीतरी घडेल ही कल्पना होतीच, म्हणून ते त्यांच्याशी दोन हात करायला तयार होते. दोघांनी आपल्या मुठींत लाल तिखटाच्या पुड्या बंद करुन ठेवल्या होत्या, त्या उघडल्या आणि चोरांच्या तोंडावर त्यांतली पूड फेकली. दुसऱ्याच क्षणीं, चोरांचे ओरडणे, किंचाळणे, ऐकूं येऊं लागले. श्रीधरने ताबडतोब आपल्या थैलीमधून दोरी काढली आणि शेखरच्या मदतीने चोरांचे हातपाय बांधले. त्यानंतर त्यांनी खानावळ मालकाशी गोडगोड बोलून त्याला राजाकडे आपल्याबरोबर नेले. राजाने त्याला अगदी कडक शिक्षा केली."

आणि नंतर आजीने हंसत हंसत मुलांना विचारले, "पाहिलंत पोरांनो, धाडसी श्रीधरने केवढा मोठा विजय मिळवला? श्रीधरच्याबरोबर शेखर नांवाचा जो तरुण होता, तो दुसरा तिसरा कुणी नव्हता; स्वतः युवराजच होता. त्यानंतर शेखरने आपल्या पित्यापाशी श्रीधरच्या धाडसीपणाची खूप स्तुती केली, आणि त्याला आपला सल्लागार नेमावा, अशी शिफारस केली. विमल जरी पळून गेला होता तरी त्यालाही पकडून राजाच्या दरबारांत हजर केले गेले. आता सांगा पाहू, या कहाणीमधून तुम्ही मंडळी काय शिकलात आणि तुम्ही नेहमीच काय लक्षांत ठेवाल?"

सगळ्या मुलांनी टाळ्या वाजवून मुक्तकंठाने म्हटलं, "धैर्ये साहसे लक्ष्मी!"







# अस्वल्या मांत्रिक

## 17

*(कालीवर्मा आणि अस्वल्या मांत्रिकापासून मायामर्कट वांचला आणि मंत्रदंडासहित नगरांत पोंचला. तिथे राजवाड्यासमोरच्या मदारीचे अस्वल त्याच्यावर चालून गेले. त्यावेळी तिथे आलेल्या पहारेकऱ्यांच्या सरदाराने मर्कटाला अस्वलाबरोबर बांधले आणि त्यांना राजाकडे घेऊन गेला. त्यानंतर...)*

**राजभवनच्या** पायऱ्यांजवळ पहारेकऱ्यांच्या सरदाराने तलवार उचलली आणि मागेमागे चालत येणाऱ्या लोकांना त्याने थांबायला सांगितले. नंतर तो मदारीला म्हणाला, "बघ, महाराज अजून दरबारांतच कामांत असावेत असं वाटतं. तुझ्या विचित्र अस्वलाला तिथें घेऊन जाणे उचित होणार नाही. त्याच्या पाठीवर जो वात्रट वानर बसला आहे, त्याला आपल्या खांद्यावर घे आणि माझ्यामागून तू राजाकडे चल. येशील ना?"

सरदाराचा कोरडा, रुक्ष स्वर ऐकून मदारी जरासा नाराज होत म्हणाला, "तुम्हाला मला कांही रागावायचं, बोलायचं असेल तर अगदी पाहिजे तेवढं रागवा. पण माझ्या या पाळलेल्या अस्वलाचा अपमान मात्र करूं नका. अनेक राजे, सरदार, मांडलिक व पंडितांनी त्याच्या हुशारीचे नेहमी कौतुकच केलेले आहे. हे विसरुं नका कीं रामायणांत सेतू बांधायच्यावेळी ह्याचा एक पूर्वजही तिथे उपस्थित होता! हे ताडपत्र हाच त्याचा पुरावा आहे." असं म्हणून आपल्या कपड्यांतून त्याने एक ताडपत्रांचा ग्रंथ बाहेर काढला.

पहारेकऱ्यांचा सरदार जोरजोराने हंसत सुटला व म्हणाला, "ही वंशावळ राजाच्या दरबारांतल्या



पुरोहितांना नंतर दाखवा आणि इनाम मिळवा. प्रथम त्या बदमाष वानराला, शत्रूच्या गुप्तहेराला खांद्यावरुन खाली उतरवा."

मदारी नाराजीने अस्वलाजवळ गेला आणि त्याची पाठ थोपटत म्हणाला, "माझ्या शूर मित्रा, या वानराला आधी खाली उतरव." नंतर त्याने मायामर्कटाच्या कमरेला बांधलेली दोरी खेंचली.

अस्वल ओरडायला लागला आणि माया-मर्कटाची कंबर पकडून ते त्याला खाली उतरवणार तेवढ्यांत मर्कटाने किचकिचत खाली उडी मारली आणि म्हणायला लागला,

"ऐका, अस्वल्या मांत्रिकाकडून तुमच्या राजाचे फार मोठे नुकसान होणार आहे. कुठे आहे तुमचा राजा? माझा मंत्रदंड कुठे आहे?"

त्याचे बोलणे ऐकून तिथे जमलेले लोक टाळ्या वाजवायला लागले.

एका माणसाने माकडाला एक लांब काठी दाखवीत म्हटले, "हा बघ कीं तुझा मंत्रदंड! दाखव आता आपलं अद्भुत कार्य!"

मायामर्कटाने लगेच लाठी काढून घेतली आणि ती जमिनीवर सरळ उभी केली. नंतर एक उडी मारुन तो त्या काठीवर चढून एका पायावर उभा राहिला. मायामर्कट म्हणाला, "अरे मूर्खांनो, अशा चमत्कार कुणाला करता येईल कां? तुमचा राजा व राज्य, लौकरच संकटात सांपडणार आहे, धोक्याची घंटा वाजायला लागलेली आहे, आणि तरीदेखील तुम्हीलोक जादूटोण्यामधे गंमती पाहाण्यांत दंग आहात. किती नालायक आहात तुम्ही?"

पहारेकऱ्यांचा सरदार मायामर्कटापाशी आला. एकाच पायावर उभा असणाऱ्या मर्कटाला तो म्हणाला, "अरे, तू खराच शत्रूचा गुप्तहेर नाहीस ना? ज्या अस्वल्या मांत्रिकाची भीती तू वारंवार बोलून दाखवतो आहेस, ते खरं आहे कां?"

मायामर्कटाने मोठ्या चपळाईने खाली उडी मारली, आणि सरदाराच्या हातांतली तलवार काढून घेतली. त्याने आपल्या कमरेला बांधलेली दोरी कापून काढली आणि चिडून विचारले, "मूर्खांनो, मी किती शक्तिशाली आहे ते समजलं कां? माझ्यांत प्रचंड ताकद आहे. तुमच्या राजाला ताबडतोब इथें बोलवा."

पहारेकऱ्यांच्या सरदाराबरोबर तिथें हजर असलेले सगळेजण भीतीने गांगरले होते. मायामर्कट हातांतली तलवार नाचवत सरदारा-जवळ येऊन म्हणाला, "अरे अे नंदीबैला, तू माझी आज्ञा ऐकली नाहीस कां?"

सरदाराची घाबरगुंडी उडाली होती. तो



थरथरत म्हणाला, "महाराज दरबारांत आहेत. अशा वेळी मी त्यांना इथे बोलावण्याची हिंमत कशी करणार? ते माझा शिरच्छेद करतील!"

"ठीक आहे तर! मीच स्वतः त्यांच्याकडे जाईन. वाटेतून दूर हो!" मायामर्कटाने आज्ञा केली. सरदार निमूटपणे पायऱ्या चढून पुढे आला. मर्कटही त्याच्याबरोबर गेला. पण जिथें लोकांची गर्दी जमलेली होती, ती मात्र तिथेच खिळलेली होती. या दोघांच्या मागून जाण्याचे धैर्य त्यांच्यात नव्हते.

त्यावेळी जितकेतू राजा सिंहासनावर बसून ज्येष्ठ मंडळींशी बोलण्यांत गर्क होता. अचानक हा पहारेकऱ्यांचा सरदार राजांसमोर गेला आणि कांपऱ्या आवाजांत म्हणायला लागला, "महाराज, क्षमा करावी. माझ्यामागून हातांत तलवार घेतलेला, वानरासारखा दिसणारा जो येतो आहे, तो महाशक्तिमान आहे. आपल्या राज्यावर जे संकट येऊं घातले आहे, त्याबद्दल आपल्या सावध करण्यासाठी तो येतो आहे."

जितकेतू व दरबारांतले लोक मायामर्कटाला बघून चकित झाले. आणि नंतर मात्र त्याचे विचित्र रूप पाहून मोठमोठ्याने हंसायला लागले.

सिंहासनाच्या बाजूलाच दोघे मंत्री उभे होते. त्यांच्याकडे बघत जितकेतू राजा म्हणाला, "आमचे मुख्यमंत्री जीवगुप्त यावेळी इथे नाहीत. ते असते तर बरं झालं असतं." आणि राजाने सरदाराला गंभीरपणे प्रश्न केला, "अरे भित्र्या, एका सामान्य माकडाला तू नगरवेशीचे दार तर उघडलेस, आणि वर त्याला इथे आमच्यासमोर तू स्वतःच काय घेऊन आलास? जर खरोखरीच



शत्रूचे सैनिक वेशीजवळ येऊन पोंचले असते, तर तू काय केलं असतंस कुणास ठाऊक! तुझा शिरच्छेद करा, अशी मी आज्ञा देतो. नगराचा मुख्य चौकीदार दिरिसेन वनांमधे या आज्ञेची अंमलबजावणी करील."

राजाच्या आज्ञेचे स्वागत करीत सर्वांनी टाळ्या वाजवल्या. तोपर्यंत मायामर्कट राजाकडे व दरबाऱ्यांकडे डोळ्यांची पापणीदेखील न हलवता एकटक बघत होता. तो एकदम ओरडून म्हणाला, "जय तांत्रिक गुरु!"

आणि जितकेतू उपस्थितांना उद्देशून माया मर्कट म्हणाला, "आपण शांत राहा. माझे म्हणणे लक्ष देऊन ऐका. मी कांही सामान्य माकड नाही, मी एका महान मांत्रिकाचा मुख्य शिष्य आहे. माझं नांव प्रांतिमती आहे. आता कालीवर्मा नांवाचा एक धाडसी वीर आणि अस्वल्या नांवाचा एक मांत्रिक, हे दोघेही तुमच्या नगरावर हल्ला करायला



येत आहेत. हे तुम्हाला सांगून सावध करण्यासाठी मी इथे आलो आहे.''

मायामर्कटाच्या या बोलण्यामुळे दरबारांत एकच खळबळ उडाली. राजा जितकेतू कांही वेळ स्तब्ध होता. नंतर त्याने सिंहासनावरुन उतरताना मायामर्कटाला म्हटले, ''तुझ्या बोलण्याच्या पद्धतीवरुन हे स्पष्टच दिसतंय कीं तू कांही सामान्य वानर नाहीस. आता राहिली सावध राहाण्याची गोष्ट!

त्या कालीवर्माला आणि त्याच्या साथीदारांना पकडून इथें आणण्यासाठी तर मी आमचे मुख्यमंत्री जीवगुप्त आणि त्याच्या बरोबर कांही सैनिक पाठवले आहेत. ते कुठे आहेत? त्यांची काय बातमी आहे?''

मायामर्कटाने हंसून उत्तर दिलं, ''त्या सार्‍यांना कालीवर्माने आपल्या तलवारीने आणि अस्वल्या मांत्रिकाने आपल्या मंत्रदंडाने''... आणि तो एकदम थांबला. भेदरलेल्या नजरेने इकडे तिकडे बघत तो म्हणूं लागला, ''जय तांत्रिक गुरु! माझा मंत्रदंड कुठे आहे?'' आणि तिथून उडी मारुन थोडया अंतरावर उभ्या असलेल्या सरदाराजवळ गेला आणि त्याने त्याचा गळा धरला.

मर्कटाच्या पंजातून आपली सुटका करण्याचा प्रयत्न सरदाराने करुन पाहिला आणि तो म्हणाला, ''मर्कटमहाराज, मंत्रदंडाची मला कुठे आहे माहिती? महाराज, तुम्ही माझे प्राण वांचवा.''

तिथे दरबारांतल्या दोघा बळकट सरदारांनी मायामर्कटाची कंबर व हात पकडून धरले आणि सरदाराची सुटका केली. त्यांनी मर्कटाला सांगितलं, ''हे पहा, या राज्यांत माणसांचा प्राण घेण्याचा अधिकार फक्त महाराजांनाच आहे. असली बळजबरी करणे न्यायाला धरुन नाही. शांत व्हा!''

मायामर्कटाने संतापाने दांतओठ आवळले व त्यांना म्हटले, ''राजा जितकेतू, जे सांगायचं ते मी थोडक्यांत सांगतो. ऐका तुम्ही इथे नगराच्या वेशीवरची दारे बंद करुन सिंहासनावर आरामांत बसला आहात आणि आपले मनोरंजन करीत आहात. म्हणून नगराच्याबाहेर काय चाललंय त्याची तुम्हाला अजिबात कल्पना नाही. तुमचा मुख्य चौकीदार आता अस्वल बनला आहे. तो कालीवर्मा आणि अस्वल्या मांत्रिकाबरोबर आहे. त्यांच्याबरोबर एक राक्षसही आहे. ते सगळेजण तुमच्या नगरावर हल्ला करणार आहेत.''

राक्षस हा शब्द ऐकल्याबरोबर चक्रावून जाऊन जितकेतूने म्हटले, ''आजवर मी नुसते



राक्षसांबद्दल ऐकले होते, पण कधी पाहिले मात्र नव्हते.''

त्याचे हे बोलणे ऐकून मायामर्कट जोरजोराने हंसला आणि म्हणाला, ''तर मग तुमची ही इच्छादेखील लौकरच पूर्ण होईल. पण त्या भयंकर राक्षसाला पाहिल्यानंतर तुमचे प्राणपाखरुं उडून जाईल.''

जितकेतू राजाचे दोन्ही मंत्री भीतीने थरथर कांपत होते आणि एकमेकांकडे बघत राजाला विचारुं लागले, ''महाराज, आपण या संकटातून कसे काय वांचणार?''

''मी राजा आहे आणि म्हणून हा प्रश्न खरं म्हणजे मीच तुम्हाला विचारायला हवा! तुम्ही मंत्रीपदावर राहाण्याच्या लायकीचे नाहीत. या क्षणीं मी तुम्हाला दोघांना त्या पदावरुन काढून टाकतो आहे. जर माझा मुख्यमंत्री जीवगुप्त इथे असता तर त्याने खूप विचार केला असता. आणि संकटातून वांचण्याचा उपाय सुचवला असता.''

त्यानंतर जितकेतू मायामर्कटाकडे आला. तिथूनच सर्व उपस्थितांना संबोधून राजा म्हणाला, ''मांत्रिकांच्याबरोबर राक्षसदेखील आपल्या नगरावर हल्ला करायला येत आहेत. तुम्हीच सांगा की आपण आता काय करायचे? त्यांच्यापासून आपले संरक्षण कसे करायचे?''

कुणीही कांहीही सुचवले नाही. हल्लेखोर नगरांत प्रवेश करण्यापूर्वी आपण पळून कसे जायचे, आपली जीववस्तू, पैसाअडका कसा बरोबर न्यायचा, याच काळजींत प्रत्येकजण होता.

कुणीही कांहीच उत्तर दिले नाही, हे पाहून



आणि त्यांची बिकट परिस्थिती जाणून राजा मायामर्कटाला म्हणाला, ''तुझे रुप वानराचे असले, तरी तुझी बुद्धि मी व माझा मंत्री जीवगुप्त यांच्यासारखीच तीक्ष्ण आहे. त्या राक्षसाने बहुधा माझ्या मंत्र्याला गिळून टाकले असावे. ह्या क्षणापासून मी तुलाच माझा मुख्य मंत्री नेमतो आहे. शत्रूचा संहार करण्याची, किंवा राज्याच्या संरक्षणाची एखादी योजना सुचव आणि ती लगेच अंमलात आण.'' असे म्हणून राजाने मर्कटाचा हात पकडला आणि त्याला सिंहासनाजवळ आणले.

दरबारांत टाळ्यांचा कडकडाट झाला. मायामर्कटाने आपली तलवार तोंडात धरली आणि दोन्ही हात वर उचलले; जसा कांही तो त्यांना अभयदान देत होता!

तो कांही बोलणार होता तितक्यांत त्याची तलवार तोंडातून खाली पडली. मायामर्कटाने

खाली न वाकता शेपटीने तलवार उचलून घेतली आणि तो सर्वांना उद्देशून कांहीतरी बोलण्यापूर्वीच सभाद्वारापाशी गडबड सुरुं झाली. सर्वांनी त्या दिशेकडे पाहिले.

फाटके कपडे, डोक्यावर पागोटे नाही, अशा अवस्थेंत जीवगुप्ताने दरबारांत प्रवेश केला. त्याच्यामागून सूर्यभूपती मांडलिक आणि दोन सैनिक दरबारांत आले. जीवगुप्ताला बघून कांहीजण ओरडले, ''प्रधानमंत्री जिवंत आहेत, त्यांना राक्षसाने गिळलेलं नाही.''

मायामर्कटाने नाराज होऊन तलवार वर उचलीत म्हटले, ''अरे, नगरांतल्या मूर्ख प्रमुखांनो, थोड्याच वेळापूर्वी खुद्द महाराजांनी मला प्रधानमंत्री नेमले आहे! इतक्या लौकर ते विसरलात कीं काय?'' नंतर जितकेतूकडे वळून तो म्हणाला, ''महाराज, तुमचा काय विचार आहे? आता तुमचा प्रधानमंत्री मी आहे, कीं शत्रूकडे पाठ फिरवून पळून आलेला हा जीवगुप्त आहे?''

''आमच्या राज्याचा प्रधानमंत्री हा मर्कटच आहे. आणि हा माझा अढळ निश्चय आहे. या क्षणापासून जीवगुप्त राज्यांतला एक सर्वसाधारण नागरिक आहे.'' जितकेतू राजाने घोषणा केली.

जीवगुप्ताने चटकन म्यानांतून तलवार काढली आणि मायामर्कटाकडे रागारागाने बघत तो म्हणाला, ''हा नालायक मूर्ख वानर, चंद्रशिला नगराचा प्रधानमंत्री आहे काय? उग्रदंड राक्षसाच्या गदेच्या तडाख्यांतून मीच ह्याला एकवेळ वांचवला होता. आता मीच याचे डोके धडावेगळे करतो.'' असं म्हणून तो मर्कटाकडे वळला.

जितकेतूने नाराजीने म्हटले, ''जीवगुप्ता, थांब हा कांही साधासुधा वानर नाही. हा भ्रांतिमती नावाचा एक महान मांत्रिक आहे.''

''याने अरबल्या मांत्रिकाचा मंत्रदंड चोरला आहे. कुठे आहे तो मंत्रदंड? त्याच्याखेरीज हा अतिसामान्य वानरासारखाच आहे. माझ्या तलवारीने मी आत्ता ह्याचे डोके आणि शेपटी छाटून टाकतो बघा!'' असं म्हणून जीवगुप्त मायामर्कटावर तुटून पडला.

''जय तांत्रिक गुरु!'' असे ओरडत माया-मर्कटाने आपली शेपूट जोराने गोल फिरवली. जीवगुप्ताची तलवार खेंचून घेतली आणि आपली तलवार वर उचलली. *(क्रमशः)*





वेताळ कथा

# रसराजा रसिक राजा

निश्चयाचा महामेरु विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ आला. त्याने शव खाली उतरवून खांद्यावर घेतले आणि तो स्मशानाच्या वाटेने जाऊं लागला. तेव्हां स्मशानाच्या आंत लपलेल्या वेताळाने विचारले, ''राजन, या भयंकर स्मशानात आपले लक्ष्य साधण्यासाठी तू किती कठोर श्रम करीत आहेस. तुझे हे परिश्रम वांया जातील हा विचार तुझ्या मनांत कधी आला नाही कां? कारण राज्यकर्त्यांच्या आज्ञा कुणीही डावलूं शकत नाही, असा त्यांच्या मनांत अहंकार भरलेला असतो. रसराजा नांवाच्या कवीच्याबाबतीत वीरांग राजाने जो व्यवहार केला, तो अगदी निरर्थक होता. त्याची कहाणी मी सांगतो ती ऐक म्हणजे तुला



चालताना थकवा वाटणार नाही.'' आणि वेताळ त्यांची गोष्ट सांगू लागला.

''वीरांग हा सिंधूर देशाचा राजा होता. त्याला कवितेमधे विशेष अभिरुची होती. एकापेक्षां एक सरस कविता ऐकायला म्हणून दसऱ्याच्या दिवशी देशांतल्या नामवंत कवींना तो निमंत्रण पाठवीत असे, नि त्यांचा सत्कार करीत असे. पण चांगले वा वाईट काव्यांतला फरक त्याला स्वत:ला सांगता येत नव्हता, म्हणून दरबारांतल्या कवींच्या सल्ल्यानुसार निर्णय घेण्याचे काम राजाने महामंत्र्यावर सोंपवले होते. सन्मान केलेल्या कवींच्या कविता ऐकून त्यांत कांही विशेष गुण राजाला आढळले नाहीत. दरबारांतल्या कवींनाही त्या नीरस, दिशाहीन आणि उथळ वाटत होत्या. त्यांची समजूत होती कीं या कवींना 'उत्तम' म्हटले तर आपले दरबारांतले पद त्यांना मिळायचे! या भीतीने ते कवी, नवोदित कवींपैकी साधारण प्रतिभेच्या कवींचीच सन्मानासाठी निवड करीत होते.

दोन वर्षांनंतर वीरांगने महामंत्र्याला बोलावून विचारले, ''दिवसेदिवस आपल्या देशांतल्या कवितेची पातळी खाली जाते आहे. याचं काय कारण असावं?'' ''महाराज, आपण कित्येक महाकाव्यें वाचलेली आहेत. आपल्या दरबारी कवींपेक्षां श्रेष्ठ कवी देशांत नाहीत. आपल्या सत्कारामुळें नवीन कवींनाच प्रोत्साहन मिळते, पण त्यामुळें श्रेष्ठ काव्यनिर्मिती होते असं नाही.'' महामंत्र्याने सांगितले.

राजा विचारांत पडला. अंत:पुरांत गेल्यावर राजाने राणीला या विषयाबाबत सांगून म्हटले, ''अर्थहीन कवितांना प्रोत्साहन देणे, आणि त्या कवींचा सत्कार करणे निरर्थक आहे ना?''

राणीने नकारार्थी मान हालवीत म्हटले, ''हजार वर्षांत सूर्याचे तेज क्षीण होते कां? आणि जरी क्षीण झाले तरी ते आपल्यासारख्यांना कसे कळावे? मला वाटतं महान कवी प्रत्येक काळांत होत असतात, पण त्यांची प्रतिभा ओळखू शकणारे स्वामी फार थोड्या काळांत असतात.''

चकित होऊन राजा राणीला म्हणाला, ''तुझी ही तुलना म्हणजे एक महान कविताच आहे. माझी राणी इतकं सुंदर बोलू शकते, इतके चांगले विचार मांडू शकते हे मला अद्याप माहीत नव्हतं. आत्तापर्यंत मी देशांतल्या महान कवींना ओळखलंच नव्हतं. ही माझी चूक आहे. आता आधी मला तुझा सत्कार करायला हवा!''

त्यावर राणी लगेच म्हणाली, ''महाराज, माझे



बोलणे आपल्याला फार श्रेष्ठ वाटले असले तर आपण माझा नव्हे, पण माझी दासी नीला, हिचा सत्कार करावा. कारण हे वाक्य तिचे आहे!''

वीरांग जास्तच आश्चर्यचकित होऊन म्हणाला, ''माझ्या देशांतली एक दासी इतका उत्तम विचार व्यक्त करते, ह्याचा मला फार आनंद वाटतोय. तिने हे कोणत्या संदर्भात म्हटलं, ते तरी सांग!''

''दोन दिवसांपूर्वी मी नीलाशी बोलत होते. ती म्हणत होती कीं जसेजसे माझे वय वाढते आहे, तसे तसे माझे सौंदर्य जरा कमी होऊं लागले आहे. सूर्याचे तेज हजार वर्षांनंतर थोडे कमी होते हे मानायला तिने नकार दिला. आणि जरी तेज कमी झाले तरी ते कांही सामान्यांना कळत नाही.'' राणीने म्हटलं.

वीरांगने नीलाला बोलावून घेतलं आणि तिची खूप स्तुती केली. ती घाबरुन म्हणाली, ''महाराज, कमळाचा जन्म होतो त्याचं श्रेय चिखलाला जात नाही. कमळ हे अजून ब्रम्हाचं आसन आहे, पण ते सृष्टिकर्ता होऊं शकत नाही. ब्रम्हाने वेदांताची रचना केली, पण म्हणून त्यांची पूजा केली जात नाही. मी ज्या ओळी सांगितल्या, त्या माझ्या नाहीत. एका महिन्यापूर्वी रसराजा नांवाचे एक महाकवी आपल्या नगरांत आले आहेत. ते आमच्या घरी राहातात. मी जे कांही बोलले, ते त्यांचेच विचार आहेत.''

राजाला या खुलाशाचे नवल वाटले, नि त्याने विचारले, ''ते रसराजा नुसते मोठे कवी नाहीत, महान पंडितदेखील असावेत असं वाटतं. त्यांना सांग कीं मला त्यांना लगेच भेटायचं आहे.''



नीलाने रसराजाला राजाची आज्ञा सांगितली. त्यांनी हंसून म्हटलं, ''राजाला सांग कीं मला त्यांचा निरोप मिळाला. जेव्हां माझ्या कानांना चालता येईल, तेव्हां त्यांना मी अवश्य भेटेन.''

नीला जेव्हां ही गोष्ट महाराजांना सांगत होती, तेव्हां राणी तिथे शेजारीच उभी होती. रसराजाला काय सांगायचं आहे ते राजाला कळलं नाही. त्यावर राजा वीरांग राणीला म्हणाला, ''हा रसराज निरोप ऐकतो पण भेटायला येत नाही. हे सांगायचा त्याचा हेतू इतकाच कीं मी स्वतः त्याच्याकडे जायचं आणि त्याला निमंत्रण द्यायचं!'' आणि नीलाकडे वळून राजाने विचारलं, ''त्यांना विचारून सांग कीं मी त्यांना केव्हां भेटूं शकतो ते!''

नीलाने हे रसराजाला जेव्हां सांगितलं तेव्हां तो म्हणाला, ''दिवसभर मी लिहीत बसतो.



माझ्याकडे फक्त रात्रीच वेळ असतो. त्यावेळी मी कांही श्रोत्यांना माझ्या कविता ऐकवतो, राजाला सांग कीं त्यांना भेटायला कांही मला वेळ नाही."

नीलाची ही बातमी ऐकून राजा एकदम नाराज झाला. त्याने कडवटपणे नीलाला म्हटले, "त्यांना सांग की उद्याच रसराजाने मला भेटलं पाहिजे." नीलाने हेही रसराजाला सांगितलं. कोणतीही चलबिचल न होता त्याने उत्तर दिलं, "मला जे आवडतात, त्यांना मी भेटतो. त्याबाबतीत मी स्वतंत्र आहे. त्यासाठी मला अपराधी ठरवून शिक्षा दिली गेली, तर तो दुष्टपणा होईल. आणि जो राजा अन्यायाने वागत राहातो, त्या देशाचं ते दुर्भाग्य होऊन बसतं!"

या उत्तराची राजाला मुळीच अपेक्षा नव्हती. तो थक्क झाला. नीलाही बोलताबोलता थबकली.

वीरांगने ते पाहून तिला विचारलं, "आमच्या दोघांच्यामधे तू दूतीचे काम करते आहेस. त्यामुळे तुला कांही मनस्ताप तर होत नाही ना?"

नीलाने लगेच म्हटलं, "महाराज, असं कांही नाही. आपण रसिक राजा आहात. रात्रीं रसराजा आपल्या कविता सर्वांना ऐकवतात. त्यावेळी आपण वेष पालटून तिथे यावे आणि त्यांची कविता ऐकावी. अर्थात हे आपल्याला पटलं तरच!"

वीरांग राजाला नीलाची ही कल्पना योग्य वाटली. त्या रात्री राणीला न सांगता तो एका सामान्य नागरिकाच्या वेषांत नीलाच्या घरी गेला. रसराजाचे काव्यवाचन व गायन ऐकून राजा वीरांग तर फारच प्रभावित झाला. रसराजा एक महान कवी आहे हे त्याला पटलं. एकेक श्रोता आपल्या शंका कवीला विचारत होता आणि रसराजा मोठ्या प्रेमाने त्यांच्या शंकांना उत्तरे देत होता. त्याचे विवरण ऐकून, रसराजा एक उत्तम पंडित आहे हेही राजाला जाणवलं. कांही वेळानंतर राजा उभा राहिला, पण काय विचारावं तेच त्याला कळेना.

तेव्हां रसराजाने त्याच्याकडे बघत म्हटले, "संकोच करुं नका. आपली शंका मोकळेपणाने विचारा." "आमच्या वीरांगराजाने उत्तम कवींचा सन्मान करायची प्रथा सुरुं केली आहे. आपली कविता व पांडित्य फार श्रेष्ठ प्रतीचे आहे. तरीदेखील आपल्याला सरकारी सन्मान अद्याप मिळाला नाही. आपण ह्याचं कारण सांगू शकाल कां?" राजाने आपली शंका व्यक्त केली.

"राजाला वाटलं असेल कीं माझी कविता व ज्ञान त्या योग्यतेचे नाही, इतकंच!" रसराजाने म्हटलं.

"आमच्या महाराजांनी आपली कविता अजून ऐकली नसेल. आपण एकदा राजाला भेटायला गेलात तर बरं होईल." वीरांगने म्हटलं.

रसराजाने हंसून म्हटलं, "सन्मान मिळवावा अशी जर माझी इच्छा असती तर मी अवश्य राजाकडे जाऊन म्हटलं असतं, "महाराज, माझा सन्मान करा, पण आता राजालाच माझा सन्मान करायची घाई होतेय. तेव्हां, ते स्वतःच इथे आले आणि आपली इच्छा त्यांनी प्रकट केली तर ते जास्त ठीक होईल!"

रसराजाचे बोलणे ऐकून तिथे उपस्थित असलेले सर्व लोक हंसायला लागले. वीरांगचा चेहरा पडला. त्याने हळू आवाजात म्हटलं, "राज्यकर्त्यांना कितीतरी कामे असतात. आपणच त्यांच्याकडे जाणं हे तर्कसंगत व योग्य होईल!"

"अशा कामांत गुंतलेल्या राजाला कसं समजणार कीं उत्तम कवी कोण आहे?" रसराजाने विचारले.

"ती जबाबदारी सांभाळण्यासाठी महामंत्री आणि दरबारी कवी आहेत ना! आपण त्यांना भेटावे." वीरांगने सुचवले.

रसराजाने पुन्हां हंसत सांगितले, "आपल्या सांगण्याचा हा अर्थ होतो कीं मी स्वतः जाऊन त्यांना भेटून सांगू कीं महाशय, मी उत्तम कवी आहे, माझा सन्मान करावा! म्हणजे अशा स्थितीत मी केवळ एक कवी आहे, उत्तम कवी नाही. कुणाकडे कांही मागून घेणं, त्याला दान



म्हणतात. आपले राजा सन्मानाचे दान करतात. असल्या सन्मानापासून उत्तम कवी दूर राहातात. त्यांना असले सन्मान पसंत नसतात. जर तुम्ही मला उत्तम कवी मानत असाल, तर माझा सन्मान झाला नाही, याचाच आनंद माना!"

वीरांग तिथून निमूटपणे निघून गेला. दुसऱ्या दिवशी त्याने महामंत्र्याला म्हटले, "राणी-साहेबांची दासी नीला, हिच्या घरी रसराजा नांवाचा एक महाकवी पाहुणा म्हणून आलेला आहे. तुम्ही व दरबारी कवी जाऊन त्यांना भेटा आणि त्यांच्या प्रतिभेबद्दल आवश्यक ती माहिती काढून या."

महामंत्री व दरबारी कवींनी राजाच्या आज्ञेचे पालन केले. परत येऊन महामंत्रींनी राजाला सांगितले, "महाराज, आपल्या दरबारी कवींना वाटलं कीं रसराजाच्या कवितांमधे फारशी शक्ती

नाही, त्या पोकळ आहेत. राजसन्मान मिळण्यासाठी रसराजा सर्वस्वी अयोग्य आहे.''

महामंत्र्याचे बोलणे ऐकून वीरांगला राग आला, पण तो न दाखवता राजा म्हणाला, ''मी स्वतः रसराजाची कविता ऐकली आणि मी मंत्रमुग्ध झालो होतो.'' आणि नंतर राजाने सर्वांना काय घडलं ते सविस्तर सांगितलं सार्‍या दरबारी कवींनी शरमेने माना खाली घातल्या आणि राजाची क्षमा मागितली.

राजाने मंत्र्याकडे सूचक नजरेने पाहिलं. असं कां होत होतं त्याचं खरं कारण आता राजाला समजलं होतं. मंत्र्याने नम्रपणे उत्तर दिलं, ''महाराज, मी नेहमी दरबारांतल्या कवींवर विश्वास ठेवत आलो, म्हणून ही चूक झाली. ते इतके स्वार्थी असतील, अशी माझी कल्पना नव्हती.''

त्यानंतर राजा जेव्हां अंतःपुरांत गेला तेव्हां दासी नीला राणीला सांगत होती, ''राणीसाहेब, रसराजा कवींना महाराजांचे दर्शन घ्यायची इच्छा आहे. माझ्यामार्फत त्यांनी त्यासाठी परवानगी मागितली आहे.'' हे बोलणे ऐकून राजाने नीलाला सांगितलं, ''मी स्वतः येऊन त्यांना भेटीन व निमंत्रण देईन.'' हे ऐकून राणीला फारच आश्चर्य वाटलं. वेताळाने ही गोष्ट सांगून म्हटले, ''राजन्, कवी रसराजा हा वाजवीपेक्षां जास्त अहंकारी आहे हे स्पष्ट दिसतंय. तो सन्मानास पात्र आहे हे मान्य असलं तरी त्याची निवड झाली नाही, ही नजरचूक असू शकते. पण स्वतः जाऊन त्याला निमंत्रण देण्यांत राजाचा काय हेतू आहे? माझ्या या शंकेचे उत्तर माहीत असूनही जर तू गप्प राहिलास तर तुझ्या डोक्याची शंभर शकले होतील.''

विक्रमार्क म्हणाला, ''रसराजा दुराभिमानी नाही किंवा अहंकारीही नाही. दरबारी कवींचा डाव होता तो उघडकीस आणायचा, हाच केवळ त्याचा हेतू होता. रसराजाने ठीक सांगितलं कीं सन्मान हा गौरव आहे, दान नव्हे! हे सत्य राजाला अखेरीस समजले, म्हणून राजाने स्वतः त्याला आमंत्रण देण्याचा निर्णय घेतला. राजा वीरांग केवळ राजाच नसून एक रसिक राजा आहे.''

राजाचे मौन भंग करण्यांत सफल झालेला वेताळ शवासहित गायब झाला आणि पुन्हां झाडावर जाऊन बसला.

*(आधार - ''वसुंधरा'' यांची रचना)*








## ज्यूडोचे मूळ आहे केरळांत!



कलरीपयट्टु ही केरळची प्रसिद्ध युद्ध कला आहे. त्याचा प्रभाव व कांही मूळतत्वें ही केरळच्या अनेक नृत्यशैली व नाट्यकलेंत आपल्याला दिसतात. अगदी कथकलींत देखील!

कलरीपयट्टुची नृत्यवैशिष्ट्यें कोलकली, वेलकली आणि यात्राकली या नृत्यप्रकारांत दिसून येतात. पांचव्या शतकांत बोधीधर्म नांवाच्या बौद्धभिक्षूने ही कलरीपयट्टुची कला चीनमध्यें प्रस्तुत केली. ही शिकवण्यासाठी त्याने शाओलिन हे मंदिर निवडले. कालांतराने या कलेतूनच ज्यूडो, कराटे आणि कुंग फूसारख्या युद्धकला निर्माण झाल्या.

## आणखी एक अलेक्झांडर

इसवी सनापूर्वी ३२७ मधें ग्रीक विजेता अलेक्झांडरने हिंदुस्तानवर आक्रमण केले ते आपल्याला माहीत आहे. एक हजार वर्षांनंतर दुसर्‍या एका राज्यकर्त्याने स्वतःला दुसरा अलेक्झांडर मानले होते. तो होता खिलजी वंशातला तिसरा शासक अल्लाउद्दीन खिलजी सुलतान! १२९० नंतर तो दिल्लीवर राज्य करीत होता. या वंशातला तो सर्वांत कर्तबगार होता. त्याने गुजरात व माळवा ही राज्ये धुळीला मिळवली आणि चित्तोड व रणथंबोरचे किल्ले जिंकले. या यशामुळे त्याने स्वतःला इस्कंदर-इ-सानी हा किताब घेतला आणि तशा नांवाची सोन्याची नाणी पाडली.



देशविदेशीच्या दंतकथा (बॅबिलॉन)

# देव फार खात होता!

राजाच्या राजवाड्याच्या मागे एक टेकडी होती आणि त्या टेकडीवर राज्यांतले प्रमुख मंदिर होते. तिथला देव हा जागृत होता - इतका जागृत कीं रोज भक्तांनी अर्पण केलेले नैवेद्य, मिठाई, फळें, हे सगळं तो खात असे. देवळाच्या पुजाऱ्याने राजाला सांगितले कीं इतरांसमोर नैवेद्य खायला देवाला संकोच वाटतो, म्हणून स्वादिष्ट पदार्थ बनवून संध्याकाळच्या पूजेनंतर देवाच्या मूर्तीसमोर ठेवले जात. नैवेद्य दाखवल्यानंतर मंदिराचे दरवाजे बंद होऊन कुलुपें लावली जात.



सकाळी लोक दर्शनाला येण्यापूर्वी, - त्यांत अनेक वेळा राजघराण्यांतली मंडळी व कधीमधी खुद्द राजा स्वतःही उपस्थित असत-पुजारी मंदिराची दारे उघडत. सकाळच्या सूर्याचे किरण गाभाऱ्यांत पडत आणि त्या उजेडांत नैवेद्याची तारें रिकामी झालेली दिसत. कधीकधी देवाला खूप भूक असे, सगळे पदार्थ संपलेले असत. जे पदार्थ चविष्ट नसत, त्यांची भांडी तशीच असत, किंवा आणि तो पदार्थ नुसता चिवडलेला असे. देवाला चांगलेच पदार्थ फक्त आवडतात, अशी लोकांची भावना झाली होती.

देवासाठी स्वयंपाक करण्यासाठी राजाच्या मुदपाकखान्यांत एक विशेष भाग होता. मंदिरा-साठी रोजचे भोजन तिथेच शिजवले जात होते. बाकीचे पदार्थ इतर दरबारी व सामान्य लोकांकडून अर्पण केले जात असत.

हा चमत्कार पाहायला आसपासच्या राज्यांतले राजेरजवाडे, व सरदार यांना निमंत्रणे जात, व ते पाहून पाहुणेमंडळी फारच प्रभावित होत होते. "ज्यांच्या राज्यांत असे जागृत दैवत आहे, तो राजा किती भाग्यवान!" पाहुणे म्हणत.

राजाला अधूनमधून प्रमुख पुजारी सांगत असे कीं देवाला कांही विशिष्ट पदार्थ हवे होते! ही मागणी पूर्ण करण्याची आज्ञा राजा सेवकांना देई; आणि ते पदार्थ निगुतीने बनवले जात. एके दिवशी





डॅनियल नांवाचा एक विद्वान गृहस्थ राजाबरोबर बोलत होता. तिथें मुख्य पुजारी आला आणि राजाशी कांहीतरी खाजगी बोलायचे आहे असं म्हणायला लागला. पण राजा डॅनियलबरोबरच्या बोलण्यांत रंगला होता. त्याला हा व्यत्यय आवडला नाही. म्हणून आंतल्या दालनांत जाऊन बोलण्यापेक्षां तो पुजाऱ्याला म्हणाला, "तुम्हाला जे कांही सांगायचे असेल ते इथेच सांगा. या गृहस्थावर विश्वास ठेवा. तुम्ही जे मला सांगाल त्याबद्दल ते कांहीही इतरांपाशी बोलणार नाहीत." राजा म्हणाला.

पण पुजारी हेका सोडेना. राजाशी एकांतातच बोलायचे आहे म्हणून तो हटून बसला. राजाने नाराजीने त्याला दुसऱ्या दालनांत नेले व थोड्या वेळानंतर राजा डॅनियलकडे परत आला. त्याचा चेहरा त्रासिक झालेला होता. "त्या पुजाऱ्याला खास कांहीच सांगायचं नव्हतं. आपली चर्चा त्याने उगीचच रोखली. बरं तर...."

"सरकार, जर ते विशेष कांही नव्हतं, तर पुजारी काय म्हणाले ते आपण मला सांगाल कां?" डॅनियलने विचारलं.

"आज रात्रीं देवाला रोजच्यापेक्षां दुप्पट प्रसाद हवा आहे, आणि त्यांतही कांही खास पक्वान्न! तेवढंच!" राजाने उत्तर दिलं.

"तो असं सांगणार हो मी अपेक्षा केली होती!" मोठ्याने हंसून डॅनियल म्हणाला.

"तुम्हाला हे कसं कळलं?" राजाने थक्क होऊन विचारलं. डॅनियल मनकवडा होता हे राजाला माहीत होतं. पण पुजाऱ्याच्या मनांत काय होतं ते या विद्वानाला कळलं असावं, यावर राजाचा विश्वासच बसेना.

"सरकार, मला जे सत्य जाणवतंय ते मी सांगितल्याबद्दल आपण मला क्षमा करावी. कारण त्यामुळे आपण व इतर हजारो लोकांना मनस्ताप होईल." डॅनियलने नम्रपणें सांगितले. त्यामुळे राजाची उत्सुकता जास्तच चाळवली गेली. राजाने त्याला सांगायचा आग्रह केला. तेव्हां डॅनियलने सांगितले कीं त्या रात्रीं मंदिराला कुलुपें लावण्यापूर्वी डॅनियलला गाभाऱ्यांतल्या मूर्तीला तीन प्रदक्षिणा घालण्याची परवानगी देण्यांत यावी. म्हणजे दुसऱ्या दिवशी सकाळीं तो राजाला सविस्तर उत्तर देईल. डॅनियलला तशी परवानगी राजाने आनंदाने दिली.

पण अंधारात डॅनियलने गाभाऱ्यांत एकट्यानेच प्रदक्षिणा घालायच्या ही कल्पना पुजाऱ्याला कांही आवडलेली दिसली नाही. पण राजानेच या



प्रस्तावाला मान्यता दिली होती, म्हणून त्याचा नाईलाज झाला.

त्या दिवशीं संध्याकाळीं राजा व डॅनियलच्या उपस्थितीत मंदिराचे दरवाजे बंद करण्यांत आले. "आज देवाला जो हवा तो भोग तयार केलेला आहे. आवडला म्हणजे मिळवलं! माझ्या खास आचाऱ्याने तो बनवला आहे. आणि हा आचारी म्हणजे जगांतला सर्वोत्कृष्ट बल्लवाचार्य आहे. त्यामुळे आज मला कांही त्याच्या हातचे जेवण मिळाले नाही!" राजा म्हणाला. "सरकार, आज आपण पुजारी व त्यांचे पाहुणे यांच्यासाठी आपल्या आवडीचे भोजन खाऊं शकला नाहीत, ही तर दुर्दैवी बाब आहे."

"मी काय बोलतो ते कांही वेळा ज्ञानी मंडळीनादेखील समजत नसेल. मी कांही माझ्या स्वयंपाक्याला पुजारी व त्यांच्या पाहुण्यासाठी स्वयंपाक करायला सांगितला नव्हता. देवासाठी भोग बनवण्यांत तो गुंतला होता." राजा म्हणाला.

डॅनियल कांही न बोलता नुसताच हंसला. राजाने नाराज होऊन आणखीनच भिवया उंचावल्या.

सकाळच्या प्रसन्न वेळी राजा, डॅनियल व कांही चौकस सरदार, यांच्या उपस्थितींत मंदिराची कुलुपे काढली गेली. देवासाठी खास बनवलेले पदार्थ अदृश्य झाले होते. पण कुण्या भक्ताने प्रसाद म्हणून दिलेले कांही पदार्थ अर्धवट खाल्लेले होते. तो भक्त तिथे होताच. तो हळहळला, "आम्ही दिलेले पदार्थ कांही देवाला आवडले नाहीत!!" डॅनियल पुन्हां हंसला.

"हे बघा, तुम्ही जे बोललात ते सिद्ध तरी करून दाखवा, कां केलंत ते सांगा, नाहीतर शिक्षा भोगायला तयार व्हा!" राजाने कठोर स्वरांत आज्ञा केली.

"सरकार, ही दगडी मूर्ती प्रसाद खाते याच्यावर तुमचा खरंच विश्वास आहे कां? जर या मूर्तीत खरोखरीच देव असेल तर आपल्यासारखी त्याला हांव असेल कां? आणि रोजच्यापेक्षां जास्त प्रसाद, जो भक्तिभावाने अर्पण केलेला असतो, तो आणखी मागेल कां?" डॅनियलने विचारले.



"डॅनियल, तुम्ही आंधळे आहात कां? देवाला जे चांगलं दिसलं ते त्याने सगळं संपवलंय. तुम्ही पाहात आहात ना?" राजाने विचारलं.

"सरकार, मी देवाचा अपमान करीत नाही, पण देवाच्या नांवाखाली जे लबाडी करीत आहेत, त्यांच्याकडे फक्त बोट दाखवतो आहे. ही मेणबत्ती हातांत धरा आणि माझ्या मागोमाग आपण यावं; कारण मूर्तीच्यामागे अद्याप अंधार आहे."

डॅनियलने राजाला मूर्तीच्या पाठीमागच्या बाजूला नेले आणि जमिनीवरचे पावलांसे ठसे लक्षपूर्वक पाहाण्यास सांगितले. जमिनीवर राखेचा पातळसर थर होता.

ते ठसे गाभाऱ्यांतल्या सर्वांत जास्त अंधार असलेल्या कोपऱ्यापर्यंत गेलेले स्पष्ट दिसत होते. त्या कोपऱ्यांतल्या भिंतीचे दगड हलवून पाहिल्यानंतर तिथेंच एक चोरदरवाजा असल्याचं आढळून आलं. तिथून मागेच पुजाऱ्याच्या घरापर्यंत वाट होती.

"ह्याचा अर्थ काय?" राजाने विचारले.

"सरकार, दररोज रात्रीं पुजारी आणि त्याच्या घरांतली मंडळी गाभाऱ्यांत येतात आणि प्रसादावर ताव मारतात! काल त्यांच्या घरी कांही खास पाहुणे आलेले मला माहीत होतं, त्याच्या सुनेचे आईवडील आले होते. साहजिकच, त्यांना जेवण जास्त हवं होतं आणि खास पदार्थ हवे होते. म्हणून मी संध्याकाळीं तीनदा प्रदक्षिणा घालताना थोडीशी राख सगळीकडे शिंपडली. तुम्ही पाहिलेले ठसे पुजारी व त्याच्या कुटुंबियांच्या पावलांचे आहेत." डॅनियलने खुलासा केला.

"अरे देवा! देवाच्या नांवाखाली अशी लबाडी इतके दिवस चालली तरी कशी?" राजाला आश्चर्य वाटले.

"सरकार, आपल्याला लागते त्यापेक्षां किती-तरी जास्तपटीने व अनंतकाळ देवाला मूर्खांशी व भामट्यांशी जमवून घ्यावे लागते. मग त्याची कारणे कांही कां असेनात! हरकत नाही, निदान आता तरी सत्य परिस्थिति उघडकीस आली आहे!" डॅनियल म्हणाला. *(एम्.डी.)*

















# चतुर सूनबाई



रामनाथपुरममधल्या एका श्रीमंत व्यापाऱ्याने आपल्या मुलाचे नांव भाग्यनाथन असे ठेवले होते. मोठेपणी हा मुलगा आपल्या संपत्तीचा वारस होईल व व्यवसाय छान सांभाळील, असे त्या पित्याला वाटले. पण मुलगा फारच मूर्ख निघाला. सारा वेळ मित्रांशी खेळण्यांत तो दंग असे. ते मित्र त्याची तोंडावर स्तुती करीत आणि पाठीमागे त्याला मूर्ख, बावळट ठरवून त्याची टिंगल करीत.

व्यापारी साहजिकच निराश झाला होता. "आपण म्हातारे झालो तरी भाग्या कांही कमावील असं कांही मला वाटत नाही," एके दिवशी तो पत्नीला म्हणाला. "पण तुम्ही तरी त्याला कधी आजपर्यंत धंदा-व्यवसायाबद्दल कांही शिकवलंत कां?" तिने उलट विचारले. रात्री जेवायला बसल्यावर व्यापाऱ्याने मुलाला जरा कठोर स्वरांत सांगितले, "हे बघ, भाग्यनाथ, उद्यांपासून तू माझ्याबरोबर दुकानांत यायचंस. आता तू धंद्याला लाग, म्हणजे वेळ पडली की तुला आपला सारा कारभार सांभाळता येईल."

दुसऱ्या दिवशी भाग्या वडिलांच्याबरोबर गेला. पण दिवसभर दुकानांतले इतर नोकर, किंवा गिऱ्हाईकें, यांच्याशी सटरफटर गप्पा मारण्यांत त्याने वेळ घालवला. तिसऱ्या दिवशी दुकानांत गर्दी होती. त्यामुळे व्यापाऱ्याला भाग्याला कुणीतरी बोलावले व तो केव्हां निघून गेला, हे समजले नाही. भाग्या नंतर परत आला. चौथ्या दिवशी, भाग्या दुकानांतून बाहेर पडला तो परत आलाच नाही.

कांही दिवसानंतर भाग्याची आई म्हणाली, "आपण त्याचे लग्न करुन टाकूं, म्हणजे तो घरी राहील आणि अंगावर जबाबदारी पडली कीं सुधारेल."

व्यापाऱ्याला नवल वाटले पण त्याने ही कल्पना मान्य केली. तो म्हणाला, "तू योग्य मुलगी बघत राहा, तोपर्यंत आपण त्याला आणखी एक संधी देऊं या. तू उद्या त्याला तीन रुपये दे. एक रुपया जेवणासाठी, एक रुपया नदींत टाकण्यासाठी, आणि उरलेल्या तिसऱ्या रुपयामधून त्याने कांहीतरी खायला, कांहीतरी प्यायला, कांहीतरी पेरायला, कांहीतरी उगवायला, आणि कांहीतरी गोठ्यांतल्या गाईला घालायला, असं आणायला सांग."

आईने भाग्यनाथला दुसऱ्या दिवशी तीन रुपये दिले व कसे खर्च करायचे तेही सांगितले. तो थेट बाजारपेठेंत गेला नि त्याने रुपयाभराची भजी घेतली. खाताखाता तो नदीच्या कांठावर गेला. खिशांतला रुपया बाहेर काढून त्याने नदींत टाकावा म्हणून हातांत धरला. 'या वाहात्या पाण्यांत हे नाणं टाकणे हा शुद्ध मूर्खपणाच नाही कां?' असा विचार त्याच्या मनांत आला. पण आईने तर तसंच करायला सांगितलेलं होतं. तो जवळच एका दगडावर विचार करीत बसला. त्या जागेवरुन नदीचं पात्र सुरेख दिसत होतं.

कुणीतरी शेजारी उभं आहे अशी जाणीव त्याला झाली. मंदिरांतल्या पुजाऱ्याची मुलगी, भागीरथी तिथें उभी होती. हा तरुण कसल्यातरी काळजींत आहे हे तिला समजलं. "तुम्ही जीवबिव द्यायला इथे आला नाहीत ना?" तिने अर्धवट गंमतीत, थट्टेत, विचारलं.

तिचा भाऊ हरी, हा भाग्याचा मित्र होता.



"नाही ग भागीरथी! हा रुपया नदींत टाकावा कीं नाही, त्याचा मी विचार करतोय."

"तू खरंच कसला विचार करतो आहेस रे?" तिने हंसून विचारले.

भाग्यनाथने तिला सारी कथा सांगितली. तिने लक्षपूर्वक ऐकली आणि हंसली. "तो रुपाया नदींत टाकू नकोस. तुझ्या आईची खरी इच्छा होती कीं तो रुपाया तू स्वतःसाठी खर्चू नयेस. तो तिला परत नेऊन दे."

"आणि उरलेल्या रुपायांत पांच वस्तू कशा काय मी आणूं?" भाग्याने भोळेपणाने विचारले.

आता मात्र मी खदखदून हंसली, "अरे, तू तरी कमाल करतोस हं! तुझ्या आईला कलिंगड हवं होतं. त्यांत खायला प्यायला, पेरायला, वाढवायला, आणि गाईसाठी खाणंदेखील मिळतंच कीं!"

"हे मला कधी कळलंच नव्हतं हं, भागीरथी!" भाग्या दगडावरुन उठत म्हणाला.

"चल तर. मी तुझ्यासाठी चांगले रसाळ कलिंगड निवडून देते." ती म्हणाली.

जेव्हां त्याने आईला कलिंगड दिले, ती धावतच पतीकडे गेली ति म्हणाली, "पाहिलंत, भाग्या आता किती शहाणा झालाय तो! आता तो बावळट राहिलेला नाही हं!"

"त्याला इकडे बोलाव," व्यापाऱ्याने तिला सांगितले; व भाग्याला विचारले," तुला नक्कीच कलिंगड घ्यायचे सुचले नसणार. दुसऱ्या कोणीतरी तुला तसा सल्ला दिला असेल कोणी सांगितलं?"

भाग्याने खरं काय ते सांगितलं." ती हरीची बहीण भागीरथी होती."

"अरे, आपल्या गुरुजींची मुलगी होय? ती खरंच हुशार आहे. आणखी काय सांगितलं तिने?" व्यापाऱ्याने मुलाला विचारले.

"नदींत रुपाया टाकूं नकोस म्हणून सांगितलं. हा घ्या!" मुलाने रुपायाचे नाणे पित्याला दिले.

भाग्या बाहेर गेल्यावर व्यापारी बायकोला म्हणाला, "भाग्यासाठी आपल्याला नवरी मिळाली."

"ही गुरुजींची मुलगी कां?" पत्नीने खात्री करुन घेतली.

"नाहीतर कोण? ही मुलगी हुशार आहे नि चतुरही आहे. आपल्या भोळ्या भाग्याला ती छान सांभाळेल." व्यापाऱ्याला आनंद झाला होता.

भाग्याचे आईवडील तिच्या आईवडिलांना भेटले आणि त्यांनी भागीरथीला मागणी घातली. झालं, लग्न ठरले नि झाले.

लग्नाच्या दुसऱ्या दिवशी भाग्याला कांही दुकानांत जायची इच्छा नव्हती. पण भागीरथीने आग्रहाने त्याला वडिलांच्या बरोबर पाठवले. दुकानांत भाग्या अस्वस्थ होता, नि व्यापारी खुषींत होता. त्याने भाग्याला घरी पाठवले.

आठवड्यानंतर भाग्यनाथ रीतीनुसार पत्नीला घेऊन सासुरवाडी गेला. तिला तिथे सोडून तो परत दुकानांत गेला. आणि त्याने कामांत लक्ष घातले. पित्याला वाटले कीं आपली कुवत ओळखण्यासाठी आपण भाग्याला संधी दिली पाहिजे.

दुसऱ्या दिवशी भाग्याला वडिलांनी सांगितले





सोंगट्यांचा खेळ सुरुं झाला. दिव्याचा मंद उजेड होता. पहिले दोन्ही डाव भाग्या जिंकला. साहजिकच त्याला स्फुरण चढले. तिसऱ्या डावांत ती स्त्री जिंकली. चौथ्या डावांत भाग्याची सरशी होत आली होती. तितक्यांत तिच्या मांजराने दिवा पाडला आणि दिवा

कीं शेजारच्या गांवात जाऊन दुकानांत ठेवण्यासाठी कांही माल निवडून आणायचे काम भाग्याने करावे. वडील त्याला खरेदीसाठी पैसे व सोबतीला एक नोकर देणार होते. रात्रीं त्या गांवातच मुक्काम करुन दुसऱ्या दिवशी परत यावे असेही त्यांनी भाग्याला सांगितले.

सकाळीच उठून भाग्या एका नोकरासह छकड्यांत बसून निघाला. त्या गांवात पोंचेपर्यंत दुपार झाली. त्यांनी छकडा परत पाठवून दिला. दोघांनीही बाजारांत फेरफटका मारला व मालाची चौकशी केली. नंतर त्यांनी मुक्कामासाठी एक खानावळ शोधली. एक तरुण स्त्री ती खानावळ चालवत होती.

तिने भाग्या व त्याच्या नोकराला जेवायला वाढले. तिने सहजपणें त्यांना रात्री 'जुगाराचे खेळ खेळायचे असले तर खेळूं या' असे सुचवले. आता भाग्या एक सधन व्यापारी होता, थोडे पैसे जिंकता आले तर त्याला हवेच होते! रात्रीं

लावायला वेळ लागला. दिवा लावल्यानंतर पशाचे पारडे फिरले आणि ती स्त्री पुन्हां जिंकली. खेळ चालूं असताना पुन्हां मांजराने दिवा पाडला आणि दर वेळेला ती स्त्री जिंकत राहिली. तिने मांजराला खूण केली कीं मांजर दिवा पाडायचे. हे भाग्याला कांही समजले नाही. भाग्याचे सगळे पैसे संपेपर्यंत खेळ चालूं राहिला.

दुसऱ्या दिवशी त्या स्त्रीने सांगितले कीं तिचे देणे चुकते करण्यासाठी त्या नोकराने परत घरी जाऊन पैसे घेऊन यावे. आणि नोकर पैसे परत आणेपर्यंत भाग्याने तिला स्वयंपाकघरांत व बागकामांत मदत करावी!

दोन दिवस झाले तरी या दोघांचा पत्ता नाही, म्हणून भाग्याचे आईवडील काळजींत होते. तिसऱ्या दिवशी तो नोकर गांवी पोंचला. तो उपाशी होता आणि पार थकून गेला होता.

इकडे भागीरथी भाग्या येईल म्हणून थांबली होती, ती वाट न बघता घरी परत आली. तिनेही



नोकराची हकीकत ऐकली. नोकराबरोबर तिने त्या गांवी भाग्याला परत आणायला जायचे ठरवले. तिने पुरुषाचा वेष घेतला.

त्या गांवी पोंचल्यानंतर नोकराने तिला त्या खानावळींत नेले. भागीरथीने त्याला त्या घोडागाडींतच बसून राहायला व जरा दूर अंतरावर जाऊन गाडी थांबवायला सांगितले. नोकराने भागीरथीला त्या खानावळ मालकिणीने व तिच्या मांजराने भाग्याला कसे फसवले होते ते सांगितले होतेच. भागीरथीने एक उंदीर रुमालांत गुंडाळून घेतला होता. तिने एक दुसरी खोली तिथे भाड्याने घेतली. बोलण्याच्या ओघांत आपल्याला सोंगट्यांचा जुगार खेळायला फार आवडतो असे सांगितले. त्या मालकिणीला लोभ सुटला. रात्रीं जेवणानंतर खेळ सुरुं झाला. पुरुषवेषांतली भागीरथी त्या खानावळ-मालकिणीपेक्षां हुशारीने खेळत होती. जेव्हां त्या स्त्रीने आपल्या पाळलेल्या मांजराला खूण केली, त्यावेळी तिने आपल्या शालींत लपवलेला उंदीर हळूंच बाहेर सोडला. ते मांजर उंदराच्या मागे धावले. ती स्त्री प्रत्येक डाव हरत गेली. भागीरथीजवळ नाण्यांचा ढीग जमला. भाग्यनाथ हरला होता त्यापेक्षां जास्त रकम जमा झाली.

दुसऱ्या दिवशी सकाळी भागीरथी बाहेर पडली आणि तिने ते पैसे नोकराजवळ दिले. त्या बाईचे

देणे होते ते चुकते करायला आणि भाग्याला मोकळे करायला सांगितले. त्या मालकिणीने लगलीच पैसे घेतले आणि हा नवा पाहुणा परत येण्याची ती वाट पाहूं लागली. तिला खेळांत जिंकायचे होते ना! भाग्या नोकराबरोबर गाडीजवळ गेला. भागीरथीला गाडींत बसलेली पाहून भाग्या चकित झाला. त्यांच्या नोकराने त्यांची योजना काय होती ते सांगितले. तिघेही बाजारांत गेले. कांही दिवांपूर्वी भाग्यनाथने पसंत केलेला माल त्यांनी विकत घेतला आणि ते घरी जायला निघाले.

त्यांना पाहून व्यापारी व त्याची बायको यांना फारच आनंद झाला. भागीरथीने सविस्तर हकीकत सांगितली. ती ऐकून सासरा एवढंच म्हणाला, "हा भाग्यनाथ कधी बदलणार नाही. पण आपली सूनबाई मात्र आपला पैसाअडका नीट सांभाळील."



# ध्रुवीकरण पत्र

बजरंग राय हे जमीनदार, उमेदवारांचे व्यवहारज्ञान आणि त्यांचा प्रामाणिकपणा स्वतः तपासून घेत व नंतरच त्यांना ग्रामाधिकाऱ्याची नोकरी देत असत. त्यांतले कांहीजण लांचखोर आहेत असं जमीनदारांना समजले. त्यांपैकी नवीनचंद्र हा ग्रामाधिकारी फारच लोभी व लांचखाऊ होता अशी बातमी गुप्तहेरांनी आणली. जमीनदाराने ताबडतोब दिवाणजीला बोलावून नवीनचंद्राची सगळी माहिती गोळा करायला सांगितले. दिवाणजीला समजले कीं नवीनचंद्र अतिशय भ्रष्ट अधिकारी आहे.

आठवड्याभरांत नवीनचंद्राची बदली समस्तपुरला केली. त्या गांवातले लोक भांडत नसत. चोरीचहाडी नव्हती. गांव नेहमी शांत, समाधानी असे. अशा गावांत नवीनचंद्राला पाठवले कीं लांचलुचपतीची संधीच त्याला मिळणार नाही असा दिवाणजीचा विचार होता.

एक महिना झाला तरी नवीनचंद्राकडे तक्रार घेऊन एकही नागरिक आला नाही. त्याचे त्याला फार दुःख झाले. लांच घेतल्याशिवाय त्याला चैन पडेना.

एके दिवशी तो सकाळच्यावेळी खिडकीपाशी उभा राहून रहदारी बघत होता. दोन माणसे आवाज चढवून वादविवाद करीत जात होते. नवीनचंद्राने ओरडून त्यांना बोलावून विचारले, "रस्त्यावरुन जाताना तुम्ही दोघेजण एवढे भांडत कां होता?" ते दोघेही हळू आवाजांत म्हणाले, "साहेब, आम्ही दोघेही जिवलग मित्र आहोत. आम्ही चर्चा करीत होतो कीं यंदा उडदाची डाळ महाग होईल कीं मुगाची डाळ?"

"ठीक आहे. दोघांनीही दहादहा रुपये द्या. तुम्ही दोघे मित्र आहात याचं मी ध्रुवीकरण पत्र देतो." नवीनचंद्राने सांगितलं.

*– काशीराम*



## वाचकांसाठी कथास्पर्धा
## सर्वोत्कृष्ट प्रवेशिकेला रु. २५०/-चे पारितोषिक



खालील गोष्ट वाचा:

जौनपूरच्या जमीनदाराला आपल्या कोषागारासाठी एक पहारेकरी नेमायचा होता. त्यासाठी वीर आणि वसंत, ह्या दोन तरुणांच्या नांवाची शिफारस जमीनदाराकडे आली. चांचणी घेण्यासाठी म्हणून त्याने वीरला एका रात्री पहारा करायला सांगितले. दुसऱ्या दिवशी सकाळीं उठून त्याने वीरला बागेत काम करायला सांगितले. वीर अगदी मन लावून बागकाम करीत होता ते जमिनदाराने पाहिले.

दुसऱ्या रात्रीं कोषागारावर पाहारा करण्याची वसंतची पाळी होती. सकाळ झाल्यावर त्यालाही बागेत कामासाठी धाडण्यांत आले. दुपारी जमीनदार वसंत काय करतोय ते पाहायला गेला. तर वसंत एका झाडाखाली गाढ झोंपलेला होता.

संध्याकाळी, जमीनदाराने वसंतची नेमणूक केल्याचे जाहीर केले. जमीनदाराच्या बायकोला याचे आश्चर्य वाटले व तिने त्याचे कारणही विचारले.

- जमीनदाराने काय उत्तर दिले असेल?
- वसंतला पसंत करण्याचे त्याचे काय कारण होते?

तुमची प्रतिक्रिया १००-१५० शब्दांत लिहा व गोष्टीला समर्पक शीर्षक द्या. खालील कुपन भरुन त्याबरोबर तुमची प्रवेशिका पाठवा. पाकिटावर "वाचा नि सुचवा" असे जरुर लिहा.

**शेवटची तारीख : ३० एप्रिल, २००५**

नांव .................................................. वय ..........

जन्मतारीख .................... शाळेचे नांव ....................

घरचा पत्ता ..................................................

..................................................

.................................................. पिनकोड ..........

पालकांची सही स्पर्धकाची सही



# अपात्रदान

मगधचे राज्य सुसंपन्नस्थितीत असतां एकदा बोधिसत्व त्या राजाच्या दरबारी कोषाध्यक्ष म्हणून काम करीत असत. त्यावेळी ऐंशी कोटी बराह किंमतीच्या मालमत्तेचे ते स्वामी होते.

काशीराज्यांत त्याच सुमारास श्रीवत्स नांवाचा एक धनिक रहात असे. त्यांच्याकडेही ऐंशी कोटी बराहांपेक्षा अधिक संपत्ती होती. ते दोघे कोट्याधीश जीवश्च मित्र होते.

एकदा श्रीवत्सचे दुर्भाग्य बळावले व व्यापारामध्ये तोटा झाल्यामुळे, त्याला आपल्या साऱ्या संपत्तीला मुकावे लागले. तो दरिद्री झाला. त्या दुस्थितीत त्याला आपला मित्र बोधिसत्व आठवला.

श्रीवत्स आपल्या पत्नीसमवेत पायी मगधदेशीं पोचला व त्याने बोधिसत्वाची भेट घेतली. बोधिसत्वाने सामोरे जाऊन त्याचे क्षेम विचारले.

त्यावर श्रीवत्स रडत म्हणाला - "बोधिसत्वा, माझे वाईट दिवस आले आहेत.

मी भिकारी झालो आहे. अशा स्थितीत माझी मदत करणारा तुझ्याशिवाय दुसरा कुणी नाही. या विश्वासानेच मी इथवर आलो आहे."

"प्रिय श्रीवत्सा! तूं कशाचीही चिंता करूं नकोस. आपत्काळीं तू योग्य ठिकाणीच आलेला आहेस!" बोधिसत्वाने असे सांगून श्रीवत्सचे सांत्वन केले.

नंतर त्याने आपल्या संपत्तीचा अर्धा वाटा म्हणजे चाळीस कोटी बराह आपल्या मित्राला दिले. त्याच्या जोडीला, आपल्या सेवकांपैकी अर्धे सेवकही त्याच्या ताब्यात दिले.

कांही काळानंतर मगधांत अराजकता माजली. त्याचा परिणाम म्हणून बोधिसत्वाला आपल्या पदाबरोबर धनालाही मुकावे लागले. त्यांच्या वाट्याला गरिबी आली. तेव्हां या परिस्थितीतून तारून नेईल असा श्रीवत्स शिवाय दुसरा कुणी त्यांना आठवेना. 'संकटकाळी मित्रच मदतीला धावून येतो' या विश्वासाने पत्नीसमवेत त्यांनी काशीची वाट धरली.

काशी नगराच्या सीमेवर पोचल्यानंतर आपल्या पत्नीला झाडाच्या सांवलीत बसवून बोधिसत्व म्हणाले - "तूं इथे निवांतपणे विश्रांती घे, व कांही काळजी करूं नकोस. मी माझ्या परममित्राची भेट घेऊन, तुला नेण्याकरितां गाडी व सेवक पाठवून देतो." असे सांगून बोधिसत्व निघाले.

श्रीवत्साच्या घरी पोचल्यावर द्वारपालकाला, 'आपण कोण' हे सांगून मालकाला वर्दी देऊन येण्यास सांगितले. द्वारपाल आंत जाऊन परत आला व "मालकाने आंत बोलाविले आहे", असे बोधिसत्वाला सांगितले.

श्रीवत्सने बोधिसत्वाला आपादमस्तक पाहिले व म्हणाला - "हं, कसं काय येणं झालं?"

ते ऐकून "मी तुझे दर्शन घेण्यासाठी आलोय." असं सांगून बोधिसत्वाने दृष्टी खाली वळविली. श्रीवत्सने परत विचारले- "कुठे उतरला आहेस?"

"अजून तरी कुठे उतरलो नाही. तूर्त माझ्या पत्नीला नगराच्या सीमेवर झाडाखाली सोडून आलो आहे." बोधिसत्व म्हणाले.

"माझ्या घरी तुला रहाता येणार नाही! मूठभर धान्य देतो, ते नेऊन पेज शिजवून पी!" श्रीवत्सने कठोरतेने सांगितले.

एका सेवकाने तात्काळ एक ओंजळभर तांदूळ आणून बोधिसत्वाच्या झोळीत टाकले. बोधिसत्व ते घेऊन पत्नीकडे आले. त्यांना पाहून पत्नी म्हणाली - "तुमच्या प्राणप्रिय मित्राने काय काय दिलंय, बघूं बरं?"

"मित्रवर्य श्रीवत्सने ओंजळभर तांदुळ देऊन आपली ब्याद टाळली आहे!" बोधिसत्वाने शांतपणे उत्तर दिले.

"तुम्ही ते कसे घेतलेस? आपण दिलेल्या चाळीस कोटी बराहांचा हा मोबदला काय?"



पत्नी तावातावाने म्हणाली. रडकुंडीला आलेल्या आपल्या पत्नीची समजूत घालीत बोधिसत्व निर्विकार मनाने म्हणाले - "कांही झालं तरी, मित्रांमध्ये शत्रुत्वाची भावना येऊं नये म्हणून मी ते धान्य शांतपणाने स्वीकारलं!"

पती-पत्नींचा वार्तालाप सुरुं असता एक सेवक त्या वाटेने जात होता. श्रीवत्सला, पूर्वी बोधिसत्वाने दिलेल्या सेवकांपैकी तो एक होता. त्याने आपल्या मालकाला ओळखलं व येऊन पायावर लोटांगण घातलं. नंतर आश्चर्य वाटून म्हणाला - "आपण इथे कसे आलांत?"

बोधिसत्वाने सगळा वृत्तांत ऐकविला. तो ऐकून त्या सेवकाला अतोनात दुःख झाले. नंतर त्याने आग्रहाने बोधिसत्व व त्यांच्या पत्नीला आपल्या घरी नेले. चांगले आदरातिथ्य केले. रहायला एक खोली दिली. त्यानंतर त्याने आपल्या साथीदारांना ही घटना ऐकविली.

हळू हळू कोट्याधीश असलेल्या श्रीवत्सच्या मित्रद्रोहाची बातमी काशीराजाच्या कानांवर गेली. राजाने बोधिसत्वाला बोलावून विचारले - "तुम्ही श्रीवत्सला चाळीस कोटी वराह दिलेत, हे खरे आहे कां?" बोधिसत्वाने घडलेला सारा वृत्तांत राजाला ऐकविला. तो ऐकून राजाने श्रीवत्सला बोलावून घेतले व विचारले - "कायरे! या सज्जना-कडून तू आर्थिक सहाय्य घेतलेस, हे खरे नां?"

"होय महाराज!" श्रीवत्सने कांपऱ्या आवाजांत उत्तर दिले.

"त्या सहाय्याची परतफेड करण्याची तुझी तऱ्हा फारच छान आहे!" राजा म्हणाला.

ते ऐकून श्रीवत्सने लाजेने मान खाली घातली. राजाने आपल्या मंत्रीवर्गाशी सल्ला मसलत करून 'श्रीवत्सची सारी संपत्ती बोधिसत्वाला देण्यात येईल' असा निर्णय दिला.

त्यावर बोधिसत्वाने राजाला विनंती केली - "महाराज! मला दुसऱ्यांच्या संपत्तीचा लवलेश ही नको आहे. माझे धन मला मिळाले तर त्यांतच मला समाधान वाटेल!"

राजाने श्रीवत्सकडून चाळीस कोटी वराह परत देवविले व बोधिसत्वांना "अपात्र दान करूं नये." असा सल्ला दिला. अशा रीतीने बोधिसत्व परत धनवान झाले व पुढे बराच काळ पर्यंत दान-धर्म करीत सुखांत राहिले.







# विष्णुपुराण

सत्ययुग आणि त्रेतायुगानंतर द्वापर युग सुरु झाल्यावर राक्षस मानव रूप धारण करून पृथ्वीवर जन्मले आणि सर्वत्र राहू लागले. ते भूमीला भार होऊ लागले तेव्हां भूदेवीने विष्णूकडे जाऊन रक्षण करण्यास प्रार्थना केली.

विष्णू अभयदान देत म्हणाला - "देवी, मी कृष्णावतार घेऊन तुझे दुःख कष्ट दूर करीन."

आदिकालापासून विष्णूचा हाडवैरी अशा कालनेमी नांवाच्या राक्षसाने कंस होऊन जन्म घेतला. तो मथुरेचा राजा उग्रसेन याचा मुलगा झाला.

सुरासुरांच्या युद्धांत राक्षसांचा नायक होऊन युद्ध करणारा विप्रचित्त मगध देशाचा जरासंध राजा झाला. त्याने अनेक राजांना कैद करून आणून भैरवाला त्यांचा बळी दिला. कंस हा जरासंधाचा जांवई.

उग्रसेनाच्या धाकट्या भावाची मुलगी देवकी आणि यदुवंशाचा राजा वसुदेव यांचा विवाह झाला. कंस त्यांना रथात बसवून निरोप देत असतां आकाशवाणी झाली - "देवकीच्या पोटी जो आठवा मुलगा होईल त्याच्या हाती कंसाचा वध होईल."

कंस देवकीचा वध करू लागला तेव्हां वसुदेवाने मध्ये पडून कंसाला वचन दिले की तिचे आठवेच अपत्य नाही तर सर्वच अपत्यें तुला सोंपवीन. त्याने त्याप्रमाणे सहा अपत्ये कंसाला सोंपविली.

देवकी सातव्या वेळी गरोदर झाली तेव्हां विष्णूचा अंश असा आदिशेष पिंडरूपे असतांना तो वसुदेवाची दुसरी बायको रोहिणीच्या पोटांत गेला. नंतर विष्णूने नंदगोपाची बायको यशोदा हिच्या पोटी मुलगी होऊन जन्म घेण्यास योगमायेस सांगितले.

१६. कृष्णावतार



त्यानंतर ती आठव्या वेळीं गरोदर झाली तेव्हां कंसाने तिला वसुदेवासह तुरुंगात ठेवले.

श्रावण महिन्यातील कृष्णपक्षांत अष्टमीच्या दिवशी चंद्र रोहिणी नक्षत्रात असताना मध्य-रात्रीच्या वेळी सर्व पहारेकरी गाढ निद्रेत असताना देवकी प्रसूत होऊन विष्णू कृष्णरूपे जन्मला. तुरुंगाची दारें आपोआप उघडली.

विष्णूच्या आज्ञेने वसुदेव तान्ह्या मुलाला घेऊन यमुना नदी पार करून घेऊन गेला. त्याच वेळी सर्व निद्रावस्थेत असतां यशोदा प्रसूत झाली व तिला एक मुलगी झाली. यशोदेच्या जवळ निजलेल्या त्या मुलीला उचलून घेऊन तिच्या जागी वसुदेवाने कृष्णाला ठेवून दिले.

तुरुंगात पोंचतांच सर्व दारे बंद झाली आणि मुलगी नुकतीच जन्मल्यासारखी मोठ्याने रडली.

कंसाने तिला दगडावर आपटण्यासाठी उचलतांच ती निसटून आकाशांत खदखदां हंसून म्हणाली - ''अरे कंसा, तुला ठार करणारा सुखरूप आहे रे!'' नंतर दुर्गादेवी होऊन ती अंतर्धान पावली.

कंसाला राग आला व त्याने वसुदेव देवकीच्या सहा मुलांना त्यांच्यासमोरच ठार केले.

नारद कंसाकडे येऊन म्हणाला - ''कंसा, तू उग्रसेनाचा मुलगा नाहीस, तू कालनेमी आहेस! तुझा वध करणारा विष्णू सुरक्षित आहे, हे ऐकलेच आहेस.''

उग्रसेनाशी विवाह झाल्यानंतर, विरह दुःखाने त्याची राणी एकटी असतां एका राक्षसाने उग्रसेन रूपे जाऊन तिला फसविले. तेव्हां कालनेमीने तिच्या गर्भात प्रवेश केला व कंस होऊन तो जन्मला होता.

कंसाने उग्रसेनाला तुरुंगात टाकून स्वतः सिंहासन बळकाविले. त्याने सर्व राक्षसांना एकत्र केले. त्याने पूतना राक्षसिणीला सर्व तान्ह्या मुलांना ठार कर म्हणून सांगितले. ती गांवोगांव फिरत तान्ह्या मुलांना ठार करीत एक सुंदर स्त्रीचे रूप घेऊन कृष्णाला दूध पाजू लागली. कृष्णाने तिचे दूध पीत असताना तिचे सर्व रक्तच शोषण करून कृष्णाने तिचा जीव घेतला.

भोंवऱ्याच्या रूपांत आलेल्या तृणावर्त राक्षसाने कृष्णाला आकाशांत उडवून नेले. त्याला आणि गाडीच्या रूपांत कृष्णाला ठार करण्यास आलेल्या शकटासुराला बालकृष्णाने ठार केले.

बालकृष्ण बालक्रीडा करी, ते पाहून यशोदा माता त्याच्या खट्याळपणाचे सुद्धां कौतुक करी



असे. कृष्णाच्या बाललीला पाहून सर्व गोकुळच आनंदित झाले.

एकदां कृष्णाचा खट्याळपणा पाहून यशोदेने त्याला उखळाला बांधून ठेवले. कृष्ण उखळा-सकट दोन वृक्षांमध्ये जाऊन अडकला आणि दोन्ही वृक्ष उखळ ओढल्याने उपटले गेले. त्या वृक्षांचे दोन गंधर्व प्रगट झाले. ते दोघे शापाने वृक्ष झाले होते.

त्याने एकदां माती खाल्ली, म्हणून रागावून आईने तोंड उघडायला सांगितले. त्याने तोंड उघडून विश्वरूपच दाखविले.

कालिया नागाच्या फणांवर तांडव नृत्य करून त्याचे मर्दन केले.

गोकुळांतील सर्व लोक वृंदावनला जाऊन राहू लागल्यावर गोवर्धन पर्वताची पूजा करू लागले. त्याचा देवेंद्राला राग आला. त्याने वज्रायुध टाकून बीजांपाठोपाठ वृष्टी सुरु केली. तेव्हां कृष्णाने गोवर्धन पर्वत आपल्या करंगळीवर उचलून धरला, आणि सर्व गोपी गोपालांचे रक्षण केले. त्यामुळे इंद्राचा गर्व-भंग झाला.

कृष्ण वेणुगोपाल होऊन गोवृंदाला चरायला नेऊं लागला. त्याचे वेणुगान ऐकून सारे वृंदावन डोलूं लागे.

कृष्ण-बलरामांना ठार करण्यासाठी कंसाने धनुर्यागाचे निमित्त काढून त्यांना मथुरेला बोलावून आणविले. त्यांना ठार करण्यासाठी कंसाने केलेले सर्व कट फुकट गेले. कृष्णाने कंसाला त्याच्या सिंहासनावरून केस धरून खाली ओढले आणि मुष्टि प्रहार करून ठार केले.



वसुदेव, देवकी, आणि उग्रसेन यांना घातलेल्या हातकड्या काढून सोडविले. त्यानंतर कृष्णाने उग्रसेनाला मथुरेच्या गादीवर पुन्हा बसविले.

कृष्ण व बलराम दोघे यदुवंशाचे तरुण पुढारी झाले.

आपल्या मुलीचे सर्व ऐश्वर्य व वैभव हस्तागत करणाऱ्या गुंडांना-म्हणजे कृष्णबलरामांना चांगला धडा देण्याच्या हेतूने जरासंधाने तेवीस अक्षौहिणी सैन्यासह मथुरेवर स्वारी केली. कृष्णाने जरासंधाचा पराभव करून त्याला पळवून लावले.

यवन व म्लेंच्छ जातीचा राजा कालयवन नांवाच्या राक्षसाला कृष्णाच्या विरुद्ध जरासंधाने मथुरेवर पाठविले.

कृष्ण कालयवनच्या हाती न फंसता मुचिकुंद झोंपत असलेल्या गुहेत शिरून लपून बसला.

मुचिकुंद हा इक्ष्वाकु वंशीय मांधाता याचा

मुलगा. तो मोठा राजा होता. त्याने देवांना युद्धांत पुष्कळ सहाय्य केले होते. देवांनी त्याला वर मागायला सांगितले. तेव्हां द्वापार-युगांत कृष्णाचे दर्शन होईल, तेव्हां तुला सिद्धी मिळेल असे सांगितल्यावरुन तोपर्यंत निद्रा द्यावी, व निद्राभंग करणाऱ्याचा मी पाहताच शेवट व्हावा व तो भस्म व्हावा, हा वर मागितला.

कालयवनने मुचकुंदला कृष्ण समजून त्याला लाथ मारली. मुचकुंदची झोप मोडली. त्याने डोळे उघडून पाहतांच कालयवन भस्म झाला.

कृष्णाने मुचकुंदला दर्शन दिले. त्याने त्याला बदरिकाश्रमात जाऊन तपश्चर्या केल्यास मोक्षप्राप्ती होईल असे सांगितले.

जय विजय हे तिसऱ्या वेळी जन्म घेऊन कृष्णाचे शत्रू झाले. त्यांची या जन्मीची नांवे अनुक्रमे शिशुपाल व दंतवक्त्र अशी होती.

चेदि देशाचा राजा दमघोष याच्या पोटी शिशुपाल चार हात व तीन डोळे या स्वरूपांत जन्मला. कोणी त्याला उचलून घेतले आणि तिसरा डोळा आणि दोन हात अदृश्य झाले तर त्याच्याच हाती त्याला मृत्यू येईल, अशी आकाशवाणी झाली. कृष्ण व बलराम यांची सात्वती ही नात्याने आत्या लागत होती. त्यांना ध्यायला तिने सांगितले. कृष्णाने उचलून घेतांच मुलगा साधारण मुलासारखा झाला. त्याचे दोन हात व एक डोळा नाहीसे झाले.

"शिशुपालने शंभर वेळा जरी कांही गुन्हा केला तरी त्याला माफ कर," असे सात्वती कृष्णाला म्हणाली. कृष्णाने तसे तिला वचन दिले.

शिशुपालने राजा झाल्यानंतर जरासंधाशी मैत्री करून अत्याचार सुरू केले. त्याचा धाकटा भाऊ दंतवक्त्र, तोही त्याच्या बरोबर अत्याचार करू लागला.





जरासंध पुन्हां पुन्हां मथुरेवर स्वारी करू लागला तेव्हां त्याचा पुष्कळवेळा पराभव करून कृष्णाने त्याला पळवून लावले, आणि दुष्ट राजांची खोड मोडली.

कृष्णाने समुद्राजवळ थोडीशी जागा मागून घेऊन समुद्रामध्ये विश्वकर्म्याकडून सुरक्षित अशी द्वारका नगरी बांधविली. त्यानंतर त्याने त्या ऐश्वर्य संपन्न नगरीत आपल्या सर्व नातेवाईकांना पाठविले.

जरासंध अगदी शेवटी शिशुपाल, दंतवक्त्र, पौंड्रक, वगैरे राजांना मदतीला बोलावून मथुरेवर चालून आला. त्याने मथुरेला वेढा दिला.

त्यापूर्वीच कृष्णाने या देवांना व मथुरेच्या प्रजेला द्वारकेला पाठविले, आणि स्वतः प्रवर्षण गिरीवर गेले आणि पर्वताच्या शिखरावर पोचले.

जरासंध वगैरेंनी प्रवर्षण गिरीला चारी बाजूनी आग लावून जाळून टाकले. कृष्ण व बलराम आकाशमार्गे सुरक्षितपणे द्वारकेला येऊन पोचले.

जरासंध व शिशुपाल, कृष्ण व बलराम जळून गेले असतील असे समजून परत जात असताना, कृष्णाने द्वारकेहून शंख वाजविला. तो ऐकून दोघे चकित होऊन परस्परांच्या तोंडाकडे पाहू लागले.

शिशुपालने सूड उगविण्यासाठी मथुरेला आग लावली आणि नगरीला जाळून टाकले.

जरासंधाने द्वारकेवर स्वारी करण्यासाठी जहाजांत व पडावात बसवून सैन्य पाठविले. परंतु एक मोठे तुफान आले आणि सर्व जहाजे व पडाव बुडून गेले.

जरासंधाला किनाऱ्यावर उभे राहून सर्व



पहाण्याशिवाय गत्यंतर उरले नाही. तो त्या तुफान लाटा पहात राहिला.

तेवढ्यांत त्याला कृष्णाच्या तोंडचे पूर्वजांचे कथन व गडगडाटी हास्य ऐकू आले, व समुद्राच्या मध्यावर एका डोंगरावर उभे राहून हंसताना कृष्ण दिसला.

"जरासंधा, तुला माझे कांहीही वाईट करता येणार नाही, हा समुद्र द्वारकेपर्यंत तुला नेऊंच शकणार नाही. तुझ्या नशिबी माझ्या हातून मरण लिहिलेले नाही. आता थोड्या दिवसानंतर तुझी माझी भेट फिरून होईल."

विदर्भ राजाची मुलगी रुक्मिणी, लक्ष्मीच्या रूपे जन्माला आली होती. तिने लहानपणीच कृष्णाला मनापासून वरलेले होते.

तिचा मोठा भाऊ रुक्मी हा कृष्णाच्या शत्रु-पक्षाला जाऊन मिळाला होता, व त्याने रुक्मिणीचा

विवाह राजा शिशुपाल ह्याच्याबरोबर करण्याची तयारी चालविली होती.

तेव्हां रुक्मिणीने ही गोष्ट समजताच कृष्णाकडे निरोप पाठविला की ह्या लग्नांत अडथळा आणून कृष्णाने स्वतः आपल्याशी लग्न करावे.

लग्नापूर्वी रुक्मिणी दुर्गामातेची पूजा करून परत येत असताना कृष्णाने रुक्मिणीला रथांत आपल्या हाताचा आधार देऊन बसविले. व समोरून येत असलेले रुक्मि, शिशुपाल व जरासंध यांना तोंड दिले.

तेवढ्यांत बलराम आपल्या यादव वीरांचे सैन्य घेऊन कृष्णाला येऊन मिळाला. कृष्णाने शिशुपालाला मारून टाकले. जरासंधाला बलरामाने पराभूत करून परत पाठविले. आणि सर्व शत्रुसैन्याला हैराण करून सोडले.

जेव्हां विजय मिळवून कृष्णाने शंख वाजविला, व रुक्मिणीला रथांत बसवून तो घेऊन जाऊं लागला, तेव्हां वाटेत रुक्मिने कृष्णाला थांबविले. परंतु कृष्णाने रुक्मिला बंदिवान केले, व त्याचे मुंडन करून त्याला त्याच्या नशिबावर सोडून दिले. परंतु त्यानंतर मात्र रुक्मिने फिरून कधी कृष्णाकडे डोके वर करून पाहिले नाही.

क्षत्रियांना साजेल असा रुक्मिणीचा कृष्णाच्या बरोबर विवाह अत्यंत दिमाखाने झाला.

कृष्णावर स्यमंतक मणि चोरल्याचा व सत्राजितचा भाऊ याला मारल्याचा आरोप लावला गेला. हा आरोप खोटा आहे हे दाखवून देण्याकरीता कृष्ण त्या मण्याच्या शोधार्थ निघाला, जंगलात एका गुहेत त्याला तो मणी दिसला.

तेव्हां जांबुवानाशी युद्ध करून त्याने तो मणी हस्तगत केला व त्याची मुलगी जांबुवती हिच्याबरोबर विवाह केला. आणि तो मणि सत्रजितच्या हातांत देऊन त्याने भूदेवीच्या रूपांत असलेली सत्राजितची मुलगी सत्यभामा हिच्याबरोबर सुद्धा विवाह केला. त्यानंतर कृष्णाने एका पाठोपाठ मित्रविन्द, कालिन्दी, लक्षणा, भद्र व नाग्नजिती, अशा बायकांबरोबर विवाह केले. ह्या आठ बायकांच्या बरोबर अष्ट सिद्धी प्राप्त करून कृष्णाने द्वारकेला राजधानी करून यादवांचा राजा बनून राज्य केले.





# विनयचे शास्त्रज्ञान

वेणुशर्मा एक प्रसिद्ध वैद्य होते. त्यांच्याच गांवात नव्हे, तर आसपासच्या गांवातून देखील त्यांना मान होता. रोगाचे निदान करण्यांत त्यांचा हातखंडा होता. एके दिवशी रोगी तपासून त्यांना औषधे, सल्ला देऊन ते घरांत जात होते. तितक्यांत एक विशीचा उमदा तरुण तिथे आला. त्याने शर्मांना नम्रपणे प्रणाम केला.

वेणुशर्मांना वाटले कीं कांहीतरी आजार झाला असेल, म्हणून हा आला आहे. त्यांनी कांही विचारण्याअगोदर त्या तरुणाने सांगितले, ''माझं नांव विनय आहे. गेली दहा वर्षे मी नामवंत वैद्यांच्या सेवेत राहिलो आहे. वैद्यकशास्त्रासंबंधीचे बरेच ग्रंथही मी वाचलेले आहेत. आता आपली सेवा करुन रुग्णांची तपासणी करायला शिकायची इच्छा आहे. आपण कृपा करुन आपली संमती व आशिर्वाद द्यावेत.''

त्याच्या बोलण्याची पद्धत पाहून त्याच्यामधे विद्या कमी व दांभिकपणा जास्ती असावा, असे वेणुशर्मांना वाटले. त्यांनी त्या तरुणाला म्हटले, ''तू केव्हांही मला मदत करायला सुरवात करुं शकतोस. आत्ताच मला निरोप मिळालाय कीं शरभने त्याच्या घराच्या मागील दारी असलेल्या केळीची पाने कापताना स्वतःचा हात कापून घेतला. त्याला लगेच उपचार करायला हवेत. तूच सांग पाहूं कीं आता यावर काय उपाय करावा?''

विनय घाबरत म्हणाला, ''मी सगळे ग्रंथ अतिथीगृहांत ठेवून आलो आहे. अशा अपघातांत चरक किंवा सुश्रुत काय म्हणतात, ते पाहून येतो.'' नि जायला वळला. वेणुशर्मा त्याला म्हणाले, ''तू चरक नि सुश्रुताचे ग्रंथ वाचून नंतर उपचार केलेस, तर तोपर्यंत शरभच्या जखमेतून बरेच रक्त वाहून जाईल, आणि तो परलोकाची वाट धरेल. त्यापेक्षां तू आणखी कांही काळ ते वैद्यकी ग्रंथ मनःपूर्वक वाचत राहाशील तर जास्त बरे होईल!''

*- रमेश पाठक*





# देवापेक्षां मानव श्रेष्ठ

रत्नाकर देशावर राजा मणिकंठ राज्य करीत होता. त्याच्या कर्तबगारीमुळे राज्य चहूंबाजूंनी खूप विस्तारले, व त्यामुळे राज्याच्या टोकाला दूरवर राहाणाऱ्या लोकांच्या सुखदु:खाची माहिती राजाला समजणे कठीण होऊन बसले. या समस्येवर कांही उपाय सुचवावा असे राजाने मंत्र्यांना विचारले. देशाचे चार प्रमुख भाग करावेत आणि एकेका भागावर एक योग्य, समर्थ, अधिकारी नेमावा असे मंत्र्यांनी सुचवले. राजाने ही सूचना अंमलात आणली.

चारी विभागांतले राजाचे अधिकारी दर महिन्याला आपापल्या प्रदेशांतल्या प्रजाजनांच्या अडचणींचा उल्लेख करीत. म्हणजे त्यांचे निवारण होईल अशी त्यांची भावना असे.

अधिकाऱ्यांची राजावर श्रद्धा होती आणि राजा योग्य तेच करील असा भक्तीभाव होता. पण त्यामुळें जरा गोंधळ होऊं लागला. प्रत्येक अधिकाऱ्याला वाटत होतं की त्याचा विभाग इतर तीन प्रांतांपेक्षां जास्त समृद्ध व्हायला हवा. आणि लोकांची मते मिळवण्यासाठी त्यांनी प्रांतीय भावना निष्कारणच जागृत केली.

त्याशिवाय, एका विभागांत जन्मलेल्या लोकांना दुसऱ्या विभागांत जाण्याची अधिकाऱ्यांनी मनाई केली. राज्याच्या उत्तरभागांत चांगला कापूस पिकत होता, पण दक्षिणभागांतले विणकर जास्त कुशल व दक्ष होते. जेव्हां राज्याची विभागणी झाली नव्हती, तेव्हां उत्तरेचा कापूस दक्षिणेच्या विणकरांना सहज मिळत होता. आता उत्तरेच्या अधिकाऱ्याने आपल्या भागांतल्या लोकांनीच कापड विणण्याची कला शिकावी असा आग्रह धरला. म्हणजे तिथला कापूस तिथेच वापरता आला असता! म्हणून दक्षिण विभागाच्या अधिकाऱ्याने शेतकऱ्यांना इतर पिकांऐवजी कापसाची लागवड करावी असा तोडगा काढला जिथे चांगला कापूस पिकत होता, तिथे विणकर चांगले नव्हते. आणि जिथे चांगले विणकर होते, तिथे चांगला कापूस मिळेनासा झाला. साहजिकच कापडाचा दर्जा घसरायला लागला.

हीच गोष्ट उद्योग व्यापाराबद्दलची होऊं लागली. देशांत पूर्वेला लोखंडाच्या चांगल्या खाणी होत्या. पण उत्तम लोहार पश्चिमेच्या प्रांतात होते. पूर्वेच्या अधिकाऱ्यांनी आपल्याकडचे लोखंड पश्चिमप्रांतात पाठवण्यावर बंदी घातली, आणि आपल्या लोकांनाच लोहारकामाचे शिक्षण द्यायला सुरवात केली. साहजिकच, पश्चिमेच्या प्रतिनिधीला जास्त किंमतीला इतर देशांतून लोखंड मागवायची पाळी आली.

राजधानींत राहाणाऱ्या राजाला जी माहिती त्याचे अधिकारी देत होते, त्यावरुन आपापल्या विभागाची उन्नती करण्यासाठी ते खूप प्रयत्न करीत होते. पण देशाचा विकास कांही होत नाही हे राजाला कळत होतं. पण कुठे चुकतंय ते कांही राजाच्या लक्षांत येत नव्हतं. राजाने हे प्रतिनिधी नेमले त्याला पांच वर्षे उलटून गेली होती. पण देशाची प्रगती कांही पूर्वीसारखी होत नव्हती.

याचे कारण जाणून घेण्यासाठी राजाने राजधानीमधे अनेक सभांची व्यवस्था केली. एका चर्चासत्रांत सगळ्या व्यापाऱ्यांनी सांगितलं कीं, गेल्या पांच वर्षांमधे व्यापार खूप वाढला आहे. त्याचप्रमाणे उद्योगपतींनी सांगितलं कीं उद्योगधंदे पहिल्या मानाने खूपच विस्तारले आहेत. त्यांची सगळ्यांची भाषणें ऐकून राजाला



समजेना कीं ही उन्नती बघून त्याने खूष व्हावं कीं देशाचा विकास होत नसल्यामुळे, देशाची चिंता करावी!

शेवटी एके दिवशी पंडितांची एक सभा झाली. त्या सभेंत शशीभूषण नांवाच्या एका पंडिताने आपली असाधारण प्रतिभा दाखवली, आणि राजाकडून पुरस्कारदेखील मिळवला.

पुरस्कार देतेवेळी राजाने शशिभूषणला विचारले, ''पंडितजी, मी आपल्या विद्वत्तेविषयी प्रश्न विचारणार नाही. पण बरेच दिवस एक समस्या माझ्या मनाला भेडसावते आहे. आपण त्याचं समाधानकार उत्तर देऊं शकाल कां?

''विचारावं महाराज! मी जरुर आपल्या समस्येला उत्तर देण्याचा यथाशक्ती प्रयत्न करीन.'' शशिभूषणने उत्तर दिलं.

२५ वर्षांपूर्वीची चांदोबात प्रकाशित झालेली कथा

"या विश्वाची निर्मिती परमेश्वराने केलेली आहे, म्हणून आपण परमेश्वराला सर्वापेक्षां मोठा मानतो. पण त्याच्यापेक्षां इतर कुणी श्रेष्ठ आहे कां?"

"कां नसावा महाराज? परमेश्वरापेक्षांदेखील श्रेष्ठ मानव आहे!" शशिभूषणने चटकन उत्तर दिले. राजाने चकित होऊन म्हटले, "नुसतं उत्तर देऊन आपली जबाबदारी संपणार नाही. ते आपल्याला सिद्ध करुन दाखवावं लागेल."

शशिभूषणने नम्रपणें सांगितलं, "मी अनुभवानेच हे उत्तर दिलेले आहे, महाराज! परमेश्वराने माझ्या कपाळावर विद्या मिळवावी असे लिहीलेले होते. त्यामुळे उत्तर प्रदेशांत मी शिक्षक म्हणून मुलांना विद्यादान करीत होतो. पण मी पूर्व प्रदेशाचा नागरिक होतो, त्यामुळे माझी नोकरी गेली. मी शिकलेली विद्या दान करण्याचे माझे व्रत होते, त्यावर पाणी सोडावे लागले. सध्यां मी शेतकरी आहे. परमेश्वराने जे माझ्या कपाळावर रेखलं होतं, ते बदललं कीं मानवाने! आता आपणच सांगावं, या दोघांत श्रेष्ठ कोण आहे?"

शशिभूषणचे बोलणे ऐकून राजाचे डोळे उघडले. ज्या राज्यांत एकजुटीने राहायची पद्धत होती, ती बदलून त्याचे चार भाग करण्यांत आले होते.

याबद्दल मंत्र्यांशी राजाने चर्चाही केली. त्यांनी सांगितलं, "महाराज, मोठ्या राज्याचे लहान प्रांतात विभाजन करण्यांत कांही चूक नाही. पण प्रांतीय भावना प्रखर झाली हे अयोग्य ठले. कारण त्या त्या प्रांताचा अधिकारी तिथला स्थानिक रहिवासी नेमला गेला. जर एका प्रांतातला रहिवासी दुसऱ्या प्रांतात अधिकारी नेमला गेला असता, तर अशी वाईट स्थिती उद्‌भवली नसती. त्यांच्या बदल्या कराव्यात, म्हणजे आंतर-विभागीय स्पर्धा नष्ट होईल आणि एकमेकांशी सहकार व सहयोगाची भावना वाढेल." राजाने हा सल्ला अंमलात आणला आणि देशाच्या उन्नतीचा मार्ग खुला केला गेला.



21

# आर्य

जयनगरामध्ये एका पडक्या मंदिराच्या बाजूला खोदताना कनकदुर्गेची मूर्ती मिळते. ती सरदाराजवळ असून एका नव्या मंदिरात तिची स्थापना होणार आहे. अपहरणकर्त्या वीरसिंहाची दृष्टी सोन्याच्या लालसेने मूर्तीवर आहे. सेनापती जवरसिंह आणि त्याचे सैनिक सरदाराच्या महालाला वेढा घालतात. रक्तपात टाळण्यासाठी सरदार मूर्ती नेण्यास मान्यता देतो. नावेतून मूर्ती नेताना वादळ होते. आणि मूर्ती नावेतून अदृश्य होते.

अज्ञान राजकुमाराचे रहस्य

चित्र : गांधी अप्पा

जेव्हां वीरसिंह जवरसिंहाशी बोलतो आहे, तेव्हां...

महाराज, अमरसिंहाला आपली भेट हवी आहे.

त्याला आंत पाठवा.

प्रमुख हेर आंत येतो!

काय बातमी आहे अमरसिंह?

महाराज, सुवर्णमूर्ती...

हो, कुठे आहे? मिळाली ना?

मूर्ती सुखदेव सरदाराकडे परत गेली आहे. उद्यां नवीन मंदिरात तिची स्थापना होईल.

सुखदेववर हल्ला करुन मूर्ती आणायची कां?

नाही, तो मूर्खपणा ठरेल. आपण मंदिरात जाऊं आणि स्थापनेपूर्वी मूर्ती बळजबरीने घेऊन येऊं. मी स्वतः तिथे जाईन.










# सर्वोत्तम कथा

## हजरजबाबी स्वयंपाकी :

त्यावर मान हलवत शंकर म्हणाला, "होय महाराज! मी आपल्या मेव्हण्यांसाठी स्वयंपाक बनवीन."

त्याचं हे उत्तर ऐकून चकित होत राजा अर्जुनसिंगाने विचारले, "अरे, पण तू तर राणीसाहेबांना म्हणालास की, मी फक्त राजासाठीच स्वयंपाक करतो? मग आता शंभर मोहोरांसाठी दुसऱ्या कुणाचा स्वयंपाक करण्यास कसा तयार झालास? काय भानगड आहे ही?"

यावर शंकर उत्तरला, "यांत माझी काय चूक महाराज? 'राजाचा स्वयंपाकी' या नात्याने मी राणीसाहेबांच्या कामाला नकार दिला.

पण आता आपल्या आज्ञेचे पालन करायचे म्हणून मी त्या कामाला तयार झालो. 'मालकाची आज्ञा एका स्वयंपाक्याने मोडली' ही गोष्ट आपला अपमान झाल्यासारखी होईल ना? म्हणूनच मी मान्यता दर्शविली."

या उत्तराने आणखीनच खूष होऊन राजाने शंभरच्या ऐवजी दोनशे मोहरा शंकरला देवविल्या.

कु. पूर्वा संजय सबनीस
अनंत इंग्लिश स्कूल, 'विठाई',
३३७/१४, गडकर आळी, सातारा - ४१५ ००२.



# माणसाचा शाप

प्रताप शहरांत गेला होता. परत आल्यावर त्याच्या आईने, जयाने मुलाला विचारले, "केळ्याचा घड आज लवकर विकला कां?"

प्रताप कष्टाळू होता. घराच्या मागच्या बाजूला त्याने केळीची रोपे लावली होती. केळ्याचे घड पिकले की ते घेऊन तो शहरांत ते विकायला जात होता. त्यांतून त्याला किमान शंभर रुपये तरी मिळत.

प्रतापच्या पत्नीने, विमलाने त्याच्यासाठी प्यायला पाणी आणले आणि ती हळूच म्हणाली, "उद्यां मुलांच्या शाळेंत पैसे भरायचे आहेत." "हो, हो, माहीत आहे. कित्येक महिने राबराबून आज कांही पैसे मिळालेत. छे, कसलं हे आयुष्य; हे सारं माझं नशीब फुटकं, म्हणून होतंय!" असं म्हणत प्रतापने खिशांतले पैसे विमलाच्या हातांत दिले.

त्याची आई त्याला म्हणाली, "अरे, हे काय बोलणं रे तुझं? इतका चिडतोस कशासाठी?" "मग काय बाबांनी जे केलं, त्याचं कौतुक करूं?" प्रतापने नाराजीने म्हटलं.

जयाने चकित होऊन त्याला विचारलं, "अरे, तुझे वडील जाऊन दहा वर्षे झाली आणि आज तू त्यांच्यावर कां राग काढतो आहेस?"

"आई, जे कांही झालं होतं ते तुला चांगलं माहीत आहे. बाबांच्या मित्राने, नरसिंहाने पंधरा वर्षांपूर्वी इथलं त्याचं शेत विकलं आणि तो शहरांत निघून गेला. त्याने बाबांना बरोबर येण्याचा सल्ला दिला होता. पण त्यांना त्यांचं जन्मगांव सोडून कुठेही जायची इच्छा नव्हती. नरसिंहाने शहरांत व्यापार केला व भरपूर पैसे कमावले. आता आपल्याकडे फक्त चार एकर जमीन तेवढी आहे. त्यांतून पांचजणांचा खर्च चालवाला लागतो. बाबांनी व्यापार केला असता तर ही कुतरओढ झाली नसती."

आईने एक मोठा सुस्कारा सोडला नि म्हटले, "ते आपल्या हातांत नसतं रे बाळा! परमेश्वर जेवढं देतो, त्यांत आपण समाधान मानायला हवं!"

"उगीच उपदेश करूं नकोस आई! नरसिंहाचा मुलगा गोविंद माझ्याच वयाचा आहे ना? तो किती



सुखांत आहे, माहीत आहे? शहराच्या रस्त्यावर असलेल्या जंगलात ऋषीश्वर मुनींचं दर्शन करायला तो बग्गींत जात होता. मला पाहून त्याने मला मोठ्या प्रेमाने बग्गींत बसवले. त्याचे ते वैभव पाहून माझं मन अगदी जळफळतंय बघ!'' प्रताप आपल्या असहाय्य परिस्थितीवर चिडून बोलत होता.

मुलाचा राग पाहून जया गप्प बसली. त्या रात्रीं विमलाने पलंगावर पडलेल्या प्रतापला विचारले, ''तुम्ही देखील त्या ऋषीश्वर मुनींचं दर्शन घ्यायला जा कीं! कदाचित त्यांच्या आशिर्वादाने तरी आपलं जीवन सुधारेल!'' प्रतापला पत्नीचा विचार पटला. दुसऱ्याच दिवशी सकाळी उठून तो ऋषीश्वरच्या दर्शनाला गेला.

प्रतापला बघून ऋषीश्वरने विचारले, ''पुत्रा, खूप दिवस दुखी दिसतो आहेस. काय कारण आहे?''

प्रतापने आपली अडचण सांगितली आणि पुढें म्हणाला, ''आपला भक्त गोविंद हा पूर्वी आमच्याच गांवात राहात होता. त्याच्या वडिलांनी त्याला लाखो रुपये आणि बरीच संपत्ती दिली होती. माझ्या वडिलांनी जे कांही दिलं. ते नसल्यातच जमा होतं. मी असल्या जिण्याला आता अगदी विटलो आहे.''

ऋषीश्वरने हंसून त्याला सांगितलं, ''अरे, आयुष्यांत उतार-चढाव हे नेहमी असतातच. पण तुझ्या वडिलांनी जी संपत्ती तुला दिली आहे, ती तू अद्याप ओळखलेली नाहीस. ती संपत्ती आहे चांगली प्रकृती! तू भरपूर मेहनत करतोस, पोटभर जेवतोस. घरांतल्या सगळ्यांचे तुझ्यावर प्रेम आहे. यापेक्षां आणखी चांगले भाग्य कोणते असते? तरीसुद्धां तुझ्या मनांत जो असंतोष निर्माण झाला आहे, तो तुझ्या मित्राला तू पाहिल्यानंतरच झालेला आहे. तोपर्यंत तुझी कांहीही तक्रार नव्हती. तू प्रसन्न होतास, सुखी होतास. गोविंदच्या बाबतीत जर तुला खरी परिस्थिती कळली तर तुझ्या मनांतली खदखद नाहीशी होईल.

''गोविंद तर सुखच सुख उपभोगतो आहे. त्याला कसली आली चिंता?'' प्रतापने विचारलं.

''तर मग ऐक. संपत्ती, वैभव व ऐश्वर्य यांच्याबरोबर येणाऱ्या सर्व रोगांची तो या वयांतच शिकार झाला आहे. लाखों रुपयांची संपत्ती आहे, पण काय उपयोग? त्याला गोड पदार्थ खाता येत नाहीत, कारण त्याला मधुमेह आहे. जेवणांत त्याला मीठ वर्ज्य आहे, कारण त्याला रक्तदाब आहे. सारखा थकवा येतो, पाय दुखतात म्हणून तो चार पावलेदेखील चालू शकत नाही. त्याबरोबरच व्यापारांत कामाचा बोजा असल्यामुळे रात्री त्याला झोंप येत नाही. औषधें आणि मनाला शांती मिळावी म्हणून तो वरचेवर इथें येत असतो.'' ऋषीश्वरनी सांगितलं. ते ऐकून प्रताप थक्क झाला.

ऋषीश्वरनी पुढें त्याला सांगितलं, ''तुला हवं असेल तर मीही तुला श्रीमंत बनवूं शकेन. तुझं सध्यां चालू असलेलं जीवन तुला चालेल, कीं मनस्वास्थ घालवून तडफडत जगत, श्रीमंत माणसाचं जिणं तुला हवंय? तूच काय तो निर्णय घे.'' असं म्हणून त्यांनी प्रतापच्या डोक्यावर हात ठेवला. प्रतापने चटकन डोळे मिटले.

त्याच्या डोळ्यासमोर तो एका दालनांत मोठ्या पलंगावर झोपलेला होता. घरभर नोकरचाकर फिरत होते. समोर फळें मिठाईची तारें, भरलेली होती. पण प्रयत्न करुनदेखील त्याला पलंगावरुन उठता येईना. नोकरांना हांक मारण्याइतके त्राण त्याच्या शरीरांत नव्हते.

मोठ्या कष्टाने तो उठला आणि त्याने एक पाऊल टाकले तर तो खाली पडला. त्याने त्याच्या पत्नीला आणि आईला हांक मारली, तर त्या दोघी नोकरांना हाका मारुं लागल्या.

''नको, नको, मला नको असलं आयुष्य!'' असं मोठ्याने ओरडत त्याने डोळे उघडले. त्याने पाहिलं तर समोर ऋषीश्वर हंसतमुखाने बसले होते.

प्रताप त्यांना म्हणूं लागला, ''आपण माझे डोळे उघडलेत. मला करोडपतीच्या यातना नको आहेत. मला माझी पत्नी, हवी, ती माझ्या सुखदुःखाची वांटेकरीण आहे. मला माझी आई हवी आहे. तिला मी तिच्या प्राणांपेक्षांही प्रिय आहे; माझी दोन गोजिरवाणी मुले बघितली कीं माझ्या मनाला शांती मिळते.''

''पुत्रा, मी तुझा निर्णय ऐकून खूष झालो आहे. संतुष्टपणा, आरोग्य, आनंद - या गोष्टी माणसासाठी अत्यंत आवश्यक आहेत. त्यापुढे पैशाची रास व्यर्थ आहे. आणखी एक गोष्ट! माणसासाठी सतत ईर्षा म्हणजे एक शाप आहे. तुझ्या मित्राकडे, गोविंदकडे बघितल्यावरच तुला ही भावना जाणवली. आता ती विरली आहे. आता यापुढे तुझ्या घरांत आनंदीआनंद पसरेल.'' असं म्हणून त्यांनी आशीर्वाद दिला.

प्रतापने विनम्रपणे ऋषीश्वरच्या पायावर डोकें ठेवून प्रणाम केला आणि तो समाधानाने घरी परत गेला.





# वाईटाचं फळ वाईटच मिळतं!

मुलांनी रोजच्याप्रमाणे लवकर जेवणें उरकली आणि सावित्रीच्या आसपास बसून त्यांनी आग्रह धरला, "आजी, गोष्ट सांग ना!" तेव्हां रघू हा लहान मुलगा म्हणाला, "आजी, असं म्हणतात कीं वाईट करुं नये, आपलं वाईट होतं! माझे आजोबा आमच्या बाबांना सांगत होते कीं चलपतीच्या बाबतीत तसंच घडलं. पण त्याचा अर्थ काय ते कांही मला कळलं नाही. आजी, तूच सांग ना!"

आजीने रघूकडे प्रेमाने बघितलं आणि ती म्हणाली, "इतक्या लहान वयांत तुला हे सगळं लक्षांत राहातं की रे! ही खरंच मोठी चांगली गोष्ट आहे. वाईट करुं नये, आपलं वाईट होतं - ह्याचीच गोष्ट मी सांगते. नीट लक्ष देऊन ऐका हं सगळेजण!" आणि आजी गोष्ट सांगू लागली.

फार पूर्वीच्या काळांतली गोष्ट आहे ही! मुंगेर गांवात केशव हा एक शेतकरी होता. बायको, चार मुले, आईवडील - हा त्याचा परिवार होता. केशवच्या कुटुंबातल्या प्रत्येकजण घरासाठी कांही ना कांही काम करीत होता, म्हणून त्यांचे आयुष्य सुरळीतपणे चालले होते.

केशवच्या घरासमोरच श्यामचे घर होते. केशवचे सुखी कुटुंब पाहून श्याम मत्सराने जळत होता. श्यामची मोठी मुलगी सीता आणि केशवची मोठी मुलगी लक्ष्मी, या दोघी एकाच वयाच्या होत्या. दोघीजणींचे आता लग्नाचे वय झाले होते.

एके दिवशी उजाडताच केशवच्या घरासमोर एक घोडागाडी येऊन थांबली. ती गाडी पाहूनच तिचा मालक सधन असेल असे कळत होते. केशवची एक दूरचा नातलग माधव, त्याची पत्नी व मुलांच्यासह, त्या गाडीतून खाली उतरला. सहासात वर्षांपूर्वी माधव कांही कामासाठी केशवच्या घरीं सहकुटुंब आला होता आणि दोन दिवस राहिला होता. त्यावेळी केशवच्या घरांतले वातावरण आणि त्यांची राहाणी माधवला फार आवडली होती. केशवच्या मुलीचा, लक्ष्मीचा चुणचुणीतपणा आणि समजूतदार स्वभाव बघून माधव व त्याच्या पत्नीने लक्ष्मीला आपली सून करुन घ्यायचीच असा निश्चय केला होता. या कामासाठीच ते इकडे आलेले होते.

जेव्हां श्यामला समजलं कीं एक पैसादेखील हुंडा न देता लक्ष्मी आता लखपतीची सून होणार आहे, तेव्हां तो अस्वस्थ झाला, व त्याला चैन पडेना. कांही करुन हे लग्न होऊं द्यायचं नाही, असा त्याने निश्चय केला. श्याम केशवच्या घरी गेला, माधवची त्याने विचारपूस केली आणि माधवला तो आपल्या घरी घेऊन आला.

श्याम त्याच्याशी खूप गोडगोड बोलला आणि म्हणाला, "माधवराव, केशव अतिशय भला, सज्जन माणूस आहे, आणि लक्ष्मी तर फारच छान, देखणी मुलगी आहे. पण बोलूं नये, ती एखाद्या डागाळलेल्या फळासारखी आहे. तिला आंकडी येते. ही गोष्ट लपवून तिचं लग्न करायचा घाट त्यांनी घातलेला दिसतोय. आता वैद्याने सांगितलंय कीं लग्न झालं कीं तिचा हा रोग कमी होऊन जाईल."

त्याच दिवशी संध्याकाळी माधव कुटुंबियां-सहित परत जाण्याची तयारी करायला लागला. श्यामचा शेजारी भूषण याला माधव कां परत जातो आहे, ते ठाऊक होतं. हा भूषण पैशाचा अत्यंत लोभी होता. श्यामच्या मत्सरी स्वभावाचा अंदाज घेऊन त्याच्याकडून पैसे उकळण्याची भूषणने एक योजना आंखली.

त्याप्रमाणे त्याने श्यामला एकांतात सांगितले, "बघता बघता हाती आलेली लक्ष्मी निघून गेली बघ. जाऊं दे. तुझ्या मुलीसाठी - सीतासाठी मी



एक मुलगा शोधलाय. त्याचं नांव गोविंद. या जगांत त्याची एक आजी तेवढी आहे, बाकी कुणी नाही. तिच्याजवळ लाखो रुपयांची पुंजी आहे. तिचं म्हणणं असं कीं गोविंदने स्वतःच्या पैशाच्या बळावर कांहीतरी व्यापारउद्योग सुरुं करावा. तरच ती तिची संपत्ती त्याला देईल. आता गोविंदच्यात तशी हिंमत आहे, पण जवळ पैसा नाही. त्याचं म्हणणं आहे कीं हुंडा म्हणून दहा हजार रुपये मागायचे आणि त्या रकमेतून व्यापार सुरुं करायचा."

भूषणच्या या कल्पनेमुळे श्यामच्या मनांत आशा पालवली. त्याला वाटलं कीं दहा हजार हुंडा दिला तर श्रीमंत जांवई मिळेल, आणि त्याच्या आजीची सारी संपत्ती त्याला मिळेलच. त्याने लागलीच या प्रस्तावाला होकार दिला. एका आठवड्याच्या आंतच भूषणच्या घरी सीता व

आजीच्या गोष्टी - ४ ललित जोशी

गोविंद यांनी एकमेकांना पसंत करण्याचा कार्यक्रम गुपचूपपणे पार पडला. सीताला पाहून गोविंद इतका खूष झाला कीं त्याने आपली आंगठी तिला भेट म्हणून दिली. श्यामनेही आनंदाने गोविंदच्या इच्छेनुसार त्याला ते दहा हजार रुपयेही दिले.

गोविंद गेल्यानंतर तिसऱ्याच दिवशी सकाळी शहरांतून आलेल्या माधवबरोबर केशव श्यामच्या घरी आला. इकडच्यातिकडच्या गप्पा झाल्यावर माधवने श्यामला विचारले, "सीताचे लग्न गोविंदशी कधी होणार आहे?"

माधव असं कांही विचारील ह्याची श्यामला कल्पनाच नव्हती. कारण श्यामला वाटत होतं कीं ही गोष्ट कुणालाच माहीत नाही. माधव पुढे हंसून म्हणाला, "तू जे दहा हजार रुपये दिलेस ते वाटताना गोविंद आणि भूषण यांच्यात जोराचा वाद चालला होता. सुदैवाने मी त्याच वाटेने मागून चाललो होतो, म्हणून मला ही बातमी समजली. मी जरा गांवात चौकशी केली तर मला कळलं कीं गोविंद शहरांतला एक पट्टीचा लबाड मनुष्य आहे. भूषणने त्याची मदत घेऊन तुम्हाला फसवले आहे आणि तुमचे पैसेही लुबाडले.

आता ते दोघेही तुरुंगात आहेत." श्यामने लाजेने मान खाली घातली. तेव्हां माधवने त्याला विचारले, "आता सांग श्याम, लक्ष्मीला आंकडी येते हे तू मला सांगितलं होतंस. पण ते खरं आहे कां?"

श्यामने सावकाश उत्तर दिलं, "नाही, ते खरं नाही. मी तुम्हाला खोटंच सांगितलं होतं."

"म्हणूनच तुला ही शिक्षा मिळाली. म्हणतात ना, दुसऱ्याचं वाईट करुं नये, आपलंच वाईट होतं! हेच ते उदाहरण याच्यापुढे तरी शेजाऱ्यांशी चढाओढ किंवा हेवा करुं नकोस. त्या दोषांपासून दूर राहा!" असं म्हणून माधवने श्यामच्या खांद्यावर थोपटले.

गोष्ट संपवून आजीने म्हटलं, "पाहिलंत मुलांनो, लबाड श्यामवर काय परिस्थिती आली? तो स्वतःच एका लबाड माणसाच्या जाळ्यांत अडकला. पैसेही गेले आणि जगांत छी थू झाली ती वेगळीच! म्हणून असल्या वाईट विचारांपासून आपण दूर राहिलं पाहिजे."

"हो आजी" असं म्हणून सर्व मुलांनी आनंदाने टाळ्या वाजवल्या.







# भल्लूक मांत्रिक

## 18

(मायामर्कटने जितकेतु राजाच्या नगरीवर होणाऱ्या हल्ल्याची सूचना दिली. राजाने जेव्हां ऐकलं कीं हल्ला करणाऱ्यांत एक राक्षसदेखील आहे, तेव्हां राजाने माया मर्कटाला आपला प्रधानमंत्री नेमले. जीवगुप्त मंत्र्याने मायामर्कटावर तलवारीने वार करायचा विचार केला, पण मर्कटाने त्याची तलवार खेंचली, आणि जीवगुप्तावर आपली तलवार उपसली. त्यानंतर...)

**मा**यामर्कटाने जीवगुप्तावर तलवार उपसली, ह्यामुळे राज्यसभेंत गोंधळ माजला. राजा जीवकेतु झटकन पुढे गेला, आणि मर्कटाचा हात पकडून त्याला थांबवीत राजा म्हणाला, "अरे मर्कट मंत्री! घाई करुं नकोस, सभेंत रक्तपात झाला तर त्यामुळे राज्याचे नुकसानच होईल. मी जीवगुप्ताला मृत्यु-दंडाची शिक्षा सुनावली आहे. ती अंमलात आणण्याचा अधिकार नगराचा मुख्य वधिक ह्यालाच असतो. हा आमच्या राज्याचा नियम आहे." राजाचे हे शब्द ऐकल्याबरोबर माया-मर्कटाने आपली तलवार म्यानांत ठेवली, आणि जीवगुप्ताकडे वळून तो म्हणाला, "अरे जुन्या मंत्र्या! तू आत्ता मृत्यूच्या दाढेतून वांचला आहेस, तेव्हां ह्या क्षणींच तू हे राज्य सोडून निघून जा."

जीवगुप्ताने जमिनीवर पडलेली तलवार हातांत घेऊन ती म्यान केली. राजा आणि मायामर्कटाकडे एकवार रागाने बघून तो म्हणाला, "महाराजांचं म्हणणं आहे कीं त्यांनी मला शिरच्छेदाची शिक्षा



ठोठावली आहे. पण हा मर्कट मला हे राज्य सोडून जायला सांगतो आहे.'' आणि दरबाऱ्यांकडे वळून त्याने विचारलं, ''हे प्रमुख नागरिकांनो, आता मी काय करावे हे तुम्हीच सांगाल कां?''

दरबारी मंडळी बुचकळ्यांत पडली. आता राजाच्या आज्ञेचं समर्थन करायचं कीं नव्याने मंत्री झालेल्या मर्कटाचं करायचं? तितक्यांत सूर्यभूपती सभागृहांत पोंचला, आणि जितकेतुला प्रणाम करुन म्हणाला, ''महाराज! माझं नांव सूर्यभूपती आहे. या जीवगुप्ताला आपण क्षमा करुन सोडून द्यावं. आपल्या राज्यावर हल्ला करणाऱ्यांमधे उदयगिरीचा राजा दुर्मुखही आहे. म्हणून आपण प्रथम राजधानीचं रक्षण करायची व्यवस्था करावी.''

दुर्मुखचं नांव ऐकून जितकेतु राजा चकित झाला. थोड्या दूर अंतरावर उभा असलेल्या नगरवेशीच्या पहारेकरी सरदाराला म्हणाला, ''ह्या क्षणींच नगराची वेस बंद करा आणि शत्रूपासून नगराचे रक्षण करा. आपल्या सेनापतीला माझी आज्ञा सांगा कीं ताबडतोब सैनिकांना एकत्र करुन किल्ल्याच्या बुरुजांवर आणि खंदकावर संरक्षणाची व्यवस्था करा!''

''जी आज्ञा, महाराज!'' असं म्हणून तो सरदार तिथून निघून गेला.

त्यानंतर जितकेतूने सूर्यभूपतीला विचारलं, ''तू त्या दुर्मुखराजाला ओळखतोस कां? तो मोठी सेना घेऊन येतो आहे कीं काय?''

सूर्यभूपतीने चिंताग्रस्त चेहरा करुन म्हटले, ''महाराज! मी बराच काळ दुर्मुखराजाचा मांडलिक होतो. पण शेवटी राज्य नीट न चालवण्याच्या कारणावरुन मी बंड केले, आणि आमचे राज्य ताब्यांत घेतले. या बंडात राजाच्या अनेक सैनिकांनी मला मदत केली होती. पण सध्यां मात्र कालीवर्मा नांवाचा एक क्षत्रिय तरुण, अस्वल्या मांत्रिक, अस्वलासारखा दिसणारा आणखी एक माणूस, अरण्यांतले चोर, दरोडेखोर, या सर्वांनी मिळून माझ्या किल्ल्यावर हल्ला केला, आणि मला माझ्या राज्यांतून पळवून लावले. त्या दुर्मुखचे हे पाठीराखे म्हणजे हीच सगळी दुष्ट माणसे आहेत. नाहीतरी दुर्मुखजवळ कांही मोठी सेना नाहीच!''

सूर्यभूपतीचे बोलणें ऐकून जितकेतू राजा घाबरला, आणि मायामर्कटाला म्हणाला, ''मर्कट-मंत्री! सूर्यभूपतीच्या सांगण्याप्रमाणें भले शत्रूची संख्या कमी असेल, पण ते खूप शूर आणि



शक्तीमान असले पाहिजेत. किल्ल्याच्याबाहेरच्या नगराचे रक्षण कसे करायचे ते आपण नंतर पाहू. आधी आपल्या या किल्ल्याचे संरक्षण करायचा उपाय शोधायला हवा.''

हे सारे ऐकून मायामर्कट राजाला सांगू लागला, ''हे राजा! किल्ल्याच्या संरक्षणाची आपण मुळीच काळजी करु नये. तो अस्वल्या मांत्रिक आणि त्याचे साथीदार सूर्यभूपतीच्या किल्ल्यांत कसे शिरले हे माहीत आहे कां तुम्हाला? त्यांच्या किल्ल्याचे दरवाजे त्यांनी जाळले आणि नंतर ते आंत घुसले. म्हणून आपण सर्वांत आधी किल्ल्याचं रक्षण करण्यावरच लक्ष दिलं पाहिजे.''

राजाने स्वीकृती दिल्यासारखी मान हालवून सूर्यभूपतीला म्हटले, ''सूर्यभूपती, तुम्ही आपल्या किल्ल्याच्या दरवाज्यांचे रक्षण करण्याबाबत लक्ष दिलं नव्हतं, म्हणून किल्ला तुमच्या हातून गेला. तेव्हां आता आमच्या किल्ल्याचं रक्षण करायची जबाबदारी मी तुमच्यावर सोंपवतो. जर तुम्ही समर्थपणे ही जबाबदारी पार पाडलीत तर मी तुम्हाला माझा पहिला सरदार नियुक्त करीन आणि तुमचा योग्य तो सत्कारही करीन.''

त्याला प्रत्युत्तर म्हणून सूर्यभूपती म्हणाला, ''जी आज्ञा महाराज!'' आणि तिथून निघून गेल्यानंतर जीवगुप्त मंत्री उंच स्वरांत विचारायला लागला, ''महाराज, सांगावं! आता माझी काय स्थिती मानायची? मी माझ्या मंत्रीपदावर आहे कीं नाही?''

हा प्रश्न ऐकल्याबरोबर मायामर्कट जोराने



किचकिचत म्हणाला, ''अहो, माजी मंत्रीजी, तुमचं पद तर केव्हांच गेलंय! तुमचं मस्तक आणखी कांही दिवस धडावर शाबूत नक्की राहील. पण आता यावेळी तुम्ही या दरबारांतून निघून जा.''

यानंतर सूर्यभूपती, जीवगुप्त, आणि नगरांतल्या प्रमुख व्यक्ती सभागृहाच्या बाहेर गेल्या. जेव्हां सगळेजण सभागृहाबाहेरचा प्रांगणात पोंचले, तेव्हां पाठीमागून मायामर्कट वेगाने जिन्याजवळ धावला, आणि हातांत तलवार घेऊन आपली शेपूट जोराने हालवीत बोलला, ''माझा मंत्रदंड कुणीतरी चोरलाय. जो कुणी तो मला परत आणून देईल, त्याला महाराज आपले अर्धे राज्य देतील आणि राजकन्येशी त्या माणसाचा विवाह होईल.''

हे ऐकून सारेच स्तंभित झाले. पण जीवगुप्त



मात्र विकट हास्य करीत बोलला, ''ह्या मर्कटाला हेही ठाऊक नाही कीं महाराजांना मुलगीच काय, एकही मूल नाही!''

मंत्र्याचे हे शब्द ऐकून सगळेजण हंसायला लागले. तेवढ्यांत जितकेतू राजा तिथे येऊन पोंचला. मायामर्कटाने राजाच्याकडे रागावून बघत विचारले, ''हे राजन्! आपणदेखील कसे राजा आहात? आपल्याला अजून एकही संतान नाही?''

''मर्कटामात्य! याबद्दल मी नंतर सांगीन. प्रथम तू हे सांग कीं तो मंत्रदंड तुला इतका आवश्यक आहे? त्यांत कांही खास बात आहे कां? त्याच्याशिवाय आपण शत्रुराजांना पराजित करुं शकणार नाही कां?''

''राजन्! आपण हा कसला प्रश्न विचारलात? ज्याच्या हाती हा मंत्रदंड असेल त्याला या जगांत अशक्य असं कांहीही असणार नाही. तो केवळ आपल्या सिंहासनाचंच नव्हे, तर आपल्या प्राणांचंदेखील रक्षण करील.'' मर्कटाने उत्तर दिलं.

त्याचबरोबर जितकेतुने हात वर करुन म्हटले, ''मला मुलगी नाही म्हणून याबद्दल कुणी शंका विचारण्याचं कारण नाही. मी एक मुलगी दत्तक घेईन आणि मंत्रदंड आणून देणाऱ्याशी तिचे लग्न लावून त्याला अर्धे राज्यही देईन.''

हे ऐकल्यावर सर्व उपस्थित मंडळींना आनंद झाला. त्यापूर्वी वन्यवासी तरुणाने पाळलेल्या अस्वलाचा खेळ पाहाण्यासाठी तिथें बरेच लोक गोळा झाले होते. त्यापैकी दोन तरुण बैरागी दिसत होते. राजाचे शब्द ऐकून ते बावचळल्या-सारखे झाले. त्यांच्यापैकी एकाने आपल्या झोळीकडे हात नेला, पण दुसऱ्याने त्याचा हात धरुन त्याला म्हटले, ''अरे शिष्या, घाई करायची नसते. अगोदर आपल्या गुरुजींचा विचार घेतला पाहिजे.'' आणि लगेच दोघेही तिथून निघून गेले.

कांही प्रमुख नागरिकांनी राजाला सल्ला दिला कीं मंत्रदंड आणून देणाऱ्याला मिळणाऱ्या इनामाबद्दल साऱ्या नगरात दवंडी पिटवावी. नंतर जेव्हां सारेजण तिथून जाऊं लागले, तेव्हां अचानक एक बाण किल्ल्याच्या भिंतीवरुन वेगाने आला आणि त्याच्यामधोमध पडला.

जमावांतला एकजण तो बाण उचलायला पुढे आला, तोंच मायामर्कट ओरडला, ''थांबा!'' आणि त्याने पळतपळत जाऊन तो बाण हातांत घेतला. त्याची परीक्षा घेण्यासाठी त्याने आपल्या धारदार दांतांनी तो तोडून दूर फेकला व पुढे म्हणाला, ''या बाणाची मी जी दशा केली, तीच दशा माझ्या शत्रूंचीदेखील मी करणार आहे.'' आणि तिथेच मागेपुढे फिरत त्याने विचारलं, ''माझा मंत्रदंड कुठे आहे?''

तेवढ्यांत एक मोठा दगड किल्ल्याच्या भिंतीवरुन आंत येऊन राजवाड्याच्या भिंतीवर आदळला. त्याच्या प्रहाराने भिंतीला मोठी भेग पडली.

हे नवेच संकट उभे राहिलेले पाहून जितकेतु आपादमस्तक थरथर कांपायला लागला. आणि त्याने आश्चर्याने विचारले, ''इतका मोठा दगड किल्ल्याच्या बाहेरुन आंत फेंकणारा कांही सामान्य मनुष्य नसावा, राक्षस असावा! मर्कटामात्य! असल्या राक्षसांशी लढून आपण जिवंत तरी राहूं कां?''

ज्या नागरिकांनी दगड येऊन पडताना पाहिले होते, ते पळून जाऊं लागले. राजाला धीर देत मायामर्कट म्हणाला, ''हे राजा! आपण चिंता करुं नये. ब्रह्मपुत्रेच्या डोंगरघाटींत असल्या महान शक्तीमान राक्षसांना माझे गुरु मिथ्यामिश्र यांनी आपले नोकर म्हणून ठेवलेले आहेत.''

तेव्हां राजाने घाबरुन विचारले, ''मंत्रीजी, तर मग त्यांना इथें बोलावून तुम्ही, माझे राज्य व मी, आम्हाला या संकटातून बांचवू शकाल?''

मायामर्कट हंसून म्हणाला, ''राजन्! आपण किती भोळे आहात! तुम्हाला काय वाटतं कीं तुमच्यासारख्या लहान राज्याच्या राजाला



वांचवण्यासाठी सर्वश्रेष्ठ मांत्रिक असलेले माझे गुरु तो नदीकांठ सोडून इकडे येतील कीं काय? त्यांच्या मंत्रशक्तीच्या बळावर ते प्रथम हा लोक आणि नंतर वरचा लोकदेखील जिंकायला जाणार आहेत. पण भल्लूकपाद नांवाची एक तुच्छ व्यक्ती त्यांना थांबवते आहे. त्यांचाच शिष्य या वेळी आत्ता किल्ल्याच्याबाहेर आलेला अस्वल्या मांत्रिक आहे.''

मर्कटाचे हे शब्द ऐकून जितकेतुच्या मनांत शंका उत्पन्न झाली कीं कुणी दोघे मांत्रिक कांहीतरी अपूर्व शक्ती मिळवण्यासाठी, त्याच्यासारख्या लोकांचा उपयोग करीत आहेत. आपल्या सिंहासनाच जर रक्षण करायचं असेल तर अस्वल्या मांत्रिकाचा वध करायलाच हवा! म्हणून किल्ल्याच्या सुरक्षेची जबाबदारी मर्कटावर सोंपवण्यापेक्षां आपण स्वतःच घ्यावी. असा

विचार करुन राजा मर्कटाला म्हणाला, ''मर्कट-मंत्री, किल्ल्याच्या भिंतीवरुन प्रथम शत्रू किती अंतरावर आहे ते आपण पाहिलं पाहिजे. सैनिकांनाही सज्ज राहाण्याची सूचना द्यायला हवी.'' असं सांगून राजा जवळच्या बुरुजाकडे जायला लागला.

मायामर्कटही ''माझा मंत्रदंड कुठे आहे?'' असे ओरडत राजाच्या पाठोपाठ जाऊं लागला.

त्यानंतर राजा व मायामर्कटाने किल्ल्याच्या भिंतीवरुन बाहेरच्या मैदानाकडे पाहिले. किल्ल्यानजीक घोड्यावर कालीवर्मा, म्हशीवर अस्वल्या मांत्रिक, हत्तीवर अस्वल्या वधिक, उग्रदंड राक्षस आणि थोडेसे सैनिक त्यांना दिसले.

ते पाहून राजा आपादमस्तक थरथर कांपत म्हणाला, ''अहो मंत्री! इतर लोकांचं कांही मी सांगू शकत नाही, पण त्या राक्षसाकडे बघून खरोखरीच मी मात्र खूप घाबरलोय. याला आपण जिंकणं शक्य तरी आहे कां?''

''आपली वडील मंडळी म्हणतात कीं जे मानवाला शक्य होत नाही, ते मंत्राने साध्य करता येतं. पण जो मंत्र सहजसाध्य नाही, तिथे तंत्र वापरणं शक्य असतं. अरे बाप रे! माझा मंत्रदंड कुठे आहे?'' असं म्हणून मायामर्कट इकडेतिकडे उड्या मारीत मंत्रदंड शोधू लागला. मर्कटाचा आवाज ऐकून तो वन्यवासी तरुण हत्तीवरच उभा राहिला, आणि मर्कटाच्या दिशेने त्याने बाण रोखून लावला व म्हटले, ''अरे भ्याड माकडा! हा बघ, हा घे तुझा मंत्रदंड - बाणाच्या रुपाने येतो आहे.'' आणि त्याने बाण सोडला. बाण सर्रकन येऊन मर्कटाच्या गुडघ्याला लागला.

बाणामुळे घायाळ झालेला मर्कट तोंडावरच खाली पडला. परंतु ''तांत्रिक गुरु!'' असे ओरडून तो पुन्हां झटकन उभा राहिला. त्याने तो बाण दोन्ही हातांनी ओढून काढत म्हटले, ''अरे, या भ्रांतिमतीला तुझा बाण कांहीही करुं शकत नाही.'' आणि तो बाण त्याने कालीवर्मा व अस्वल्या मांत्रिकाकडे फेंकला. पुन्हां एकदा किचकिचत तो किंचाळला, ''कुठे आहे माझा मंत्रदंड?'' *(क्रमशः)*





वेताळ कथा

# दलपतीची कहाणी

निश्चयाचा पक्का विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला. झाडा-वरुन त्याने प्रेत खाली उतरवले आणि खांद्यावर घेतले, व स्मशानाच्या दिशेने तो जाऊं लागला. तेव्हां प्रेतांत लपलेल्या वेताळाने म्हटलं, ''राजन्, इतक्या दीर्घ प्रयत्नांनंतरदेखील मला अजून तुझे लक्ष्य काय आहे ते समजत नाही. इतके कष्ट घेतो आहेस, जीव धोक्यांत घालतो आहेस, पण त्याचा कांहीही फायदा होत नाही. तू जर हे सारं स्वतःच्या हितासाठी करीत असतास, तर ते योग्य होतं. पण तू हे इतर कुणातरी व्यक्तीसाठी इतके कठोर परिश्रम करतो आहेस. तुला जर यांत यशस्वी व्हायचं असेल तर एक उपाय सुचवतो. डोळे मिटून तू दलपती नांवाच्या एका तरुणाचं अनुकरण कर. तो अत्यंत कपटी, धोकादायक व हजरजबाबी



होता. पण तुझ्यांत या गुणांचा अभाव आहे. हे गुण अंगी असले तरच तुला यश मिळेल. त्याची कहाणीच मी तुला सांगतो.'' आणि वेताळाने दलपतीची कहाणी सांगायला सुरवात केली.

लक्ष्मीपूरपासून जरा दूरवर कामापूर गांव होते, तिथे गजपती नांवाचा एक व्यसनी माणूस होता. जुगारांत त्याने सारे कांही गमावले होते. किती तरी लोकांचे कर्ज त्याला फेडायचे होते. शेवटी लोकांनी कंटाळून गजपतीला तंबी दिली कीं एका निश्चित तारखेच्याआंत जर त्यांच्या रकमा परत दिल्या नाहीत, तर ते त्याला न्यायालयांत खेंचतील व कठोर शासन देवबतील. घाबरून गजपती लक्ष्मीपुरला पळून आला. तिथें त्याला कुणीतरी सांगितलं कीं दूरच्या अरण्यांत भरपूर सोने आहे, तेव्हां तिथें जाऊन त्याने नशिबाची परीक्षा पाहावी. तो तिथून त्या अरण्यांत गेला आणि फिरत राहिला. थकवा आल्यावर एका झाडाच्या सांवलीत बसला.

तिथें त्याचा डोळा लागला. कांही वेळानंतर जोरांत आरडाओरडा सुरुं झाला. तो त्या दिशेने पुढे गेला तर त्याला तिथे एक घर दिसले. दार उघडेच होते म्हणून तो सरळ आंत गेला. तिथें त्याला जमिनीवर एक तरुण निजलेला दिसला. त्याच्या शेजारी हिरवी साडी नेसलेली एक तरुणी बसलेली होती.

या अरण्यांत भुते आहेत हे गजपतीला ठाऊक नव्हते. तिथे ही इतकी सुंदर तरुणी बसलेली पाहून त्याला नवल वाटले. त्याने विचारले, ''काय झालं?''

''घराच्याबाहेर उभे राहून याने पाणी मागितलं. मी त्याला आंत बोलावले. आंत येताच मला पाहून तो बेशुद्ध पडला.'' त्या तरुणीने खुलासा केला.

तिचा आवाज फारच भसाडा व कर्कश होता. तिचे बोलणे ऐकून गजपती एकदम भेदरला आणि म्हणाला, ''तुझा हा आवाज ऐकून कुणीही घाबरेल!''

''हो, तू म्हणतोस ते बरोबर आहे. इतक्या दिवसानंतर माझ्याशी धिटाईने बोलणारा तू पहिलाच तरुण मला भेटला आहेस. ह्याला शुद्धीवर आण आणि त्याच्याशी बोलत राहा. तोपर्यंत मी तुमच्या दोघांसाठी जेवण आणते.'' असं म्हणून ती बाजूच्या खोलीत गेली.

गजपती त्या तरुणाजवळ बसला आणि त्याने त्याच्या तोंडावर थोडे पाणी शिंपडले. त्याला धीर देत गजपती म्हणाला, ''आता डोळे उघड पाहूं! घाबरुं नकोस, मी आहे तुझ्याबरोबर!''

त्या तरुणाने डोळे उघडले आणि क्षीण आवाजांत त्याने प्यायला पाणी मागितले.

गजपतीने त्याला प्यायला पाणी दिले आणि विचारले, ''एक मुलीला पाहून तू बेशुद्ध झालास? इतका भित्रा आहेस तर अरण्यांत यायचं तरी कशाला?''

त्या तरुणाने आपलं नांव चलपती आहे असं सांगितलं. तो पुढे म्हणाला, ''ही कांही साधीसुधी मुलगी दिसत नाही. डाकीण आहे, म्हणून मी घाबरलो. मी लक्ष्मीपुरांत राहातो. या अरण्यांत भुतेखेते आहेत हे मला माहीत आहे.''

गजपती चकित झाला. त्याने विचारले, ''अरे, माहीत होतं तर आलास कशाला या अरण्यांत?''

चलपतीने खुलासा केला, ''माझी आई अचानक खूप आजारी पडली. वैद्याने म्हटलं कीं हा नवीन प्रकारचा रोग आहे. जर या रोग्याला काळा आंबा खायला दिला तर हा रोग बरा होऊं शकतो. काळा आंबा हा फार गुणकारी आहे आणि सिरीपुरमधे तो मिळतो, हे मला माहीत होतं. तिथें जायचं म्हणजे या अरण्यांतूनच जावं लागतं आणि इथे भुते असतात हे ही मला ठाऊक आहे. पण मला भुतांची भिती वाटते.''

असूं दे. तुझ्या आईसाठी औषध आणायला इकडे आला आहेस ना? किती चांगली गोष्ट आहे ही! तुझं कौतुक केलं पाहिजे.'' गजपती म्हणाला.

चलपती खूष होऊन पुढे सांगू लागला, ''भीती होती, तरीदेखील या घराजवळ आलो नि पाणी प्यायला मागितलं. तेव्हां आंतून आवाज आला, ''इथे पाण्याला कांही कमी नाही. आंत ये नि हवं तितकं पाणी पी!'' हा आवाज वयस्कर बाईचा वाटला. आंत आलो तो हिरवी साडी नेसलेली, केसांच्या दोन जटा बांधलेली एक तरुणी



दिसली. ती डाकीण आहे हे मी ओळखलं, नि मी घाबरुन बेशुद्ध पडलो. कसंही करुन मला वांचव आणि इथून घेऊन जा!'' चलपती काकुळतीने म्हणाला.

ती तरुण स्त्री म्हणजे भूत आहे, हे जेव्हां गजपतीला समजलं, तेव्हां तोही थरथर कांपायला लागला. त्याच वेळी हिरवी साडी नेसलेली ती तरुणी तिथे आली. तिच्या हातांत मिठाईची थाळी होती. तिने हंसून म्हटलं, ''तर तुम्हाला दोघांना वाटतंय कीं मी भूत आहे म्हणून! मग या थाळींत मी काय तुमच्यासाठी नरमांस आणलंय कीं काय?'' आणि ती जवळ आली. दोघेही जोराने किंचाळले, आणि पुन्हां बेशुद्ध झाले.

नेमका त्याच वेळी दलपती नांवाचा एक तरुण त्या मार्गाने जात होता. त्याने हे किंचाळणे ऐकले. तो सिरीपुर गांवात राहात होता. उषा



नांवाच्या एका मुलीवर त्याचे प्रेम होते. पण उषाचे आईवडील अडून बसले होते. जो कुणी एक हजार सोन्याच्या मोहरा देईल, त्याच्याशीच उषाचे लग्न होईल असे त्यांनी ठरवले होते. दलपतीपाशी कांही इतके धन नव्हते. त्याच्या ज्योतिषावर विश्वास होता. म्हणून आपला विवाह उषाबरोबर होईल कीं नाही, हे ज्योतिष्याला विचारण्यासाठी तो गेला होता.

गजपतीची कुंडली पाहून ज्योतिषी म्हणाला, ''ज्या मुलीवर तुझं प्रेम आहे, तिच्याशी तुझं लग्न होण्याची बरीच शक्यता आहे. आजच अरण्यांतल्या वाटेने तू लक्ष्मीपुरला जा. तिथल्या राममंदिरात पूजा कर. जातायेताना वाटेत कांही प्रकृतिला त्रासबीस झाला तर साऱ्या रोगांवर रामबाण उपाय म्हणून एक काळा आंबा खा. तुझ्याबरोबरही कांही काळे आंबे घेऊन जा. लोक म्हणतात कीं त्या अरण्यांत भुतेडाकिणी आहेत. तू धाडसाने त्या वाटेने जाऊं शकशील कां?''

''मी कुंडलीवर विश्वास ठेवतो, भुताखेतांवर विश्वास ठेवत नाही, ''दलपतीने उत्साहाने म्हटलं.

त्यानंतर, दलपतीने आपल्या घराच्या मागच्या अंगणात असलेल्या आंब्याच्या झाडावरुन कांही काळे आंबे तोडले आणि ते पिशवींत भरले. लक्ष्मीपुरला जायला त्याने अरण्यांतली वाट धरली. थोड्या अंतरावर गेल्यानंतर त्याला गजपती व चलपतीचे ओरडणे ऐकूं आले.त्या आवाजाच्या दिशेने दलपती त्या घराकडे गेला. आंत गेल्यानंतर दोन तरुण बेशुद्ध पडलेले त्याला दिसले आणि त्यांच्या बाजूला हिरवी साडी नेसलेली एक तरुणी खाली मान घालून बसली होती. तिचे सौंदर्य पाहून तो थक्कच झाला आणि त्याने विचारले, ''काय झालं? कोण आहेस तू?''

''मला नाही माहीत मी कोण आहे ते. मी इथे कशी आले तेही मला माहीत नाही. या दोघांना मी भूत वाटले. कदाचित, खरंही असेल ते!'' त्या तरुणीने म्हटलं.

दलपतीने तिच्याकडे शंकेखोरपणे बघून विचारले, ''भुतखेते नसतातच. तू माणूसच आहेस, पण कांहीतरी रोगाने तू आजारी आहेस. म्हणून तुझा भूतकाळ तुला आठवत नाही. तुझा आवाजही कर्कश झालाय. माझ्याजवळ काळा आंबा आहे. तो खाल्ला कीं कोणताही आजार बरा होता. हा अगदी रामबाण उपाय आहे. तो खाल्लास तर तुला पूर्वीचे दिवस आठवतील.''

ती घाबरुन बोलली, ''मी आजारी नाही. काळा आंबा मला खाला येणार नाही. या दोघांना घेऊन तू इथून ताबडतोब निघून जा.''

दलपतीने नकारार्थी मान हालवीत म्हटले, ''तू भूत आहेस त्यावर माझा विश्वास नाही बसत. मी तुला हा काळा आंबा खायला लावणारच. त्यानंतरच मी इथून निघून जाईन.'' असं म्हणून पिशवींतून त्याने एक आंबा काढला.

तो आंबा पाहिल्यावर ती आणखीनच घाबरली व म्हणाली, ''आंतल्या खोलींत सोन्याच्या मोहरांच्या थैल्या भरलेल्या आहेत. तुला हवी तितकी संपत्ती घेऊन जा.''

तिच्या बोलण्याकडे लक्ष न देता दलपतीने आणखी एक आंबा काढला आणि ती ओरडत बाजूच्या खोलीतून पळून गेली. दलपती तिच्या मागोमाग त्या खोलींत गेला. ती तरुणी तिथे नव्हती, पण तिथे सोन्याच्या मोहरांनी भरलेल्या खूप थैल्या होत्या.

दलपती खोलीच्या बाहेर आला आणि गजपती व चलपतीच्या चेहऱ्यांवर त्याने थोडे पाणी शिंपडले. दोघेही थोड्या वेळांत शुद्धीवर आले व उठून बसले. त्याने आपली ओळख करुन दिली आणि त्यांचीही माहिती करुन घेतली.

जसं चलपतीला समजलं कीं दलपतीजवळ काळे आंबे आहेत, तसा तो फारच खूष झाला. त्याने दलपतीकडून एक फळ घेतले नि म्हटले, ''तू फार धीट आहेस. भुतालादेखील घाबरवून पळवून लावलेस तू!''

दलपतीने जेव्हां खात्रीपूर्वक सांगितले कीं ती भूत नाही, तेव्हां गजपतीने प्रश्न केला, ''तर मग ती हिरव्या साडीतली तरुणी इथे कशी राहाते? आणि ती अदृश्य कशी झाली?''



''मी ऐकलंय कीं अवंतीचा राजा जेव्हां युद्धांत हरला होता, तेव्हांपासून त्यांचे कुटुंब, वारसदार याच अरण्यांत राहातात. हे गुपित कुणाला माहीत असावं अशी त्यांची इच्छा नाही. ती अवंतीची राजकन्या असली पाहिजे. लोकांना दूर ठेवण्यासाठीच ती आपण भूत असल्याचे नाटक करते, असं मला वाटतं.'' दलपतीने म्हटलं.

''आमचं मत तुझ्या मतापेक्षां निराळं आहे. पण आता आम्ही काय करावे ते तूच सांग ना!'' त्या दोघांनी दलपतीला विचारलं.

आणि दलपतीच्या सांगण्यानुसार तिघांनी सोन्याच्या मोहरांची एकेक थैली उचलून घेतली. हे रहस्य आणखी कुणालाही कळता कामा नये, हाही निर्णय त्या तिघांनी मिळून घेतला. तिथून निघाल्यानंतर गजपती सरळ कामापुरला निघून गेला.

जेव्हां चलपती आणि दलपती लक्ष्मीपुरला पोंचले, तेव्हां गांवातल्या लोकांनी त्यांना घेरले आणि अरण्यांतल्या भुताखेतांसंबंधी अनेक प्रश्न विचारुन भंडावून सोडले. दलपतीने त्यांना सांगितले, "तिथली भुते फारच भयानक आहेत. यापुढे मी कधीही त्या अरण्यांत जाणार नाही. मी लांबच्या रस्त्याने सिरिपुरला निघून जाईन."

वेताळाने ही कहाणी ऐकवल्यानंतर विक्रमार्काला विचारले, "राजन्, जेव्हांपासून दलपतीला अरण्यांत गजपती आणि चलपती भेटले, तेव्हांपासून प्रत्येक बाबतीत दलपती लबाडी करतो आहे. त्या दोघांना त्याने सांगितले कीं भुतेखेते नसतातच. पण त्याने गांवकऱ्यांना सांगितले कीं तिथे महाभयंकर भुते आहेत. तिथे यापुढे जाण्याचा प्रश्नच येणार नाही, असंही म्हणाला. हा खोटारडेपणा, किंवा फसवणूक नाही कां? म्हणजे भुताखेतांवर त्याचा खरोखरी विश्वास आहे कीं नाही, ते समजतच नाही. माझ्या या शंकांची उत्तरे माहीत असूनही तू गप्प बसलास, तर तुझ्या मस्तकाची शकले होतील."

विक्रमार्काने उत्तर दिले, "कोणत्याही व्यक्तींमधे जन्मतःच दैवी शक्ती नसतात. या कल्पना त्यांचे आईवडील, शेजारी व नातेवाईकांच्या बोलण्यावरुन निर्माण होतात. पण दलपतीवर याचा कांही एक परिणाम झाला नाही. अरण्यांत भुते आहेत यावर चलपतीचा विश्वास होता. म्हणून ती हिरव्या साडीतली तरुणी पाहिल्यावर लगेच तो बेशुद्ध झाला. जेव्हां गजपतीला त्या तरुणीने सांगितले कीं मी भूत आहे, तेव्हां गजपती बेशुद्ध पडला. पण दलपतीचा असल्या गोष्टींवर विश्वास नव्हता, म्हणून त्याने तिला एक तरुण स्त्री समजूनच तिच्याशी बोलणे सुरुं केले. पण गांवकऱ्यांना मात्र त्याने सांगितलं कीं त्या अरण्यांत भयंकर भुतेखेते आहेत. त्याच्यामागे एक हेतू होता. दलपतीला माहिती होतं कीं अवंतीचा राजपरिवार त्या अरण्यांत अज्ञातवासांत राहूं इच्छित होता. त्यांचे हे रहस्य लोकांना समजले तर त्या परिवारावर संकट येऊं शकले असते. ते त्याने टाळले, म्हणून दलपती लबाड, खोटा आहे ही समजूत चुकीची आहे. तो नुसताच हजरजबाबी होता हे ही समजणें योग्य नाही.

राजाचे मौनभंग करण्यांत सफल झालेला वेताळ शवासहित अदृश्य झाला, आणि पुन्हां झाडावर जाऊन बसला. *(तुलसी यांची रचना)*








## देवांचे नृत्य



**ए**का मणिपुरी दंतकथेनुसार, देव आपले कामधाम सोडून पंधरा दिवस मौजमजा करण्यासाठी वेळ काढतात. मणिपुरी लोक या दिवसांत लाई-हरोबा हा उत्सव साजरा करतात. (लाई-देव आणि हरोबा-मौज) हा एप्रिल-मे मधे असतो. शिवाने एक मोठे सरोवर पाहिले व आपले त्रिशूळ त्यावर रोखले. झालं, सरोवर आटले. देवाने सात देव आणि सात देवतांना स्वर्गातून जमिनीवर माती आणायला सांगितली, आणि त्या जागेवर पसरली. हे काम पूर्ण झाल्यानंतर, या जागेवर त्या देवदेवतांनी सात दिवस आणि सात रात्रीं, सतत नृत्य केले. सर्पांचा देव, नागदेव आपला मणी घेऊन तिथे हजर होता. त्या मण्याच्या प्रकाशांत तो परिसर उजळून निघाला. म्हणून त्या जागेला मणीपुर हे नांव मिळाले.

## पहिले मुस्लिम बांधकाम

दिल्लीमधे एक मशीद आहे. फारसी भाषेंत तिचे नांव आहे "दमात-उल-इस्लाम." ही कुतुबमिनार जवळ असून भारतांतील ते पहिले मुस्लिम बांधकाम आहे. दिल्लीचा सुभेदार कुतुबुद्दिन याने पृथ्वीराजचा पाडाव केल्यानंतर ही इमारत बांधली. रायपिठोराचा किल्ला जमीनदोस्त केल्यानंतर त्यातले कोरीव स्तंभ व इतर सामानाचा उपयोग या मशिदीसाठी केला गेला. तेव्हां पासून इंडोमुस्लिम स्थापत्यकला या नांवाची नवी शैली निर्माण झाली.



देशविदेशीच्या दंतकथा (जावा)

# आभाळांतून भाग्य

शेंकडो वर्षांपूर्वी जावा बेटांत (हे आज इंडोनेशियाचा भाग आहे) अनेक राज्ये होती. त्यापैकी एका राज्याचे राजचिन्ह कोंबडा होते. त्याच्यामागे एक कहाणी आहे.

त्या राज्याच्या युवराजाला कोंबड्यांची झुंज लावायची फार आवड होती. त्याचे सवंगडी जिथे कुठे मिळतील तिथून चांगले कोंबडे घेऊन येत, आणि त्यांना झुंजायचे शिक्षण देत होते. अधून-मधून, राजवाड्याच्या मागल्या अंगणात हा खेळ उघड्यावरच होत होता.

या उनाड मुलांच्या खेळापायी आपले चांगले कोंबडे गमवायचे, हे कांही नागरिकांना आवडत नव्हते. पण त्याबद्दल राजाकडे तक्रार कशी करणार? या खेळामागे कारणीभूत होता युवराज, त्यांचा भावी राजा! पण एकदा काय झालं, राजा वेष पालटून गांवांतून हिंडत असताना, आपल्या मुलाचे मित्र बळजबरीने एका शेतकऱ्याचा कोंबडा घेऊन जाताना राजाने पाहिले. हे काम युवराजांसाठी करतो आहोत, असे ते मित्र मोठ्या अभिमानाने सांगत होते. राजाला वाईट वाटले. लोकांशी बोलल्यानंतर हा प्रकार वरचेवर होत होता, हे त्याला समजले.

राजा वाड्यावर परत आला आणि त्याने तावडतोब आपल्या एकुलत्या एक मुलाला, राजपुत्राला हद्दपारीची शिक्षा दिली. राजा अतिशय संतापी व कडक होता, त्यामुळे या शिक्षेचा फेरविचार करावा, हे सांगण्याचे धाडस कुणाला झाले नाही. राजपुत्राला राजवाडा सोडून जावेच लागले. राज्याची हद्द ओलांडून तो अरण्यांत जाईपर्यंत राजाचे गुप्तहेर युवराजाच्या मागावर होते. त्यांनी तो हद्दपार झाल्याची खात्री करून घेतली.



अरण्यांत आता अंधार पडायला लागला. कुठे जावे ते युवराजाला समजेना तो शूर, धीट होता, तरी रानटी जनावरांचे आवाज ऐकून तो अस्वस्थ होता.

त्याला एका झोंपडीतून येणारा अंधुकसा उजेड दिसला. त्याने जाऊन दार वाजवले. एका तरुण मुलीने दार उघडले व त्याला नखशिखान्त न्याहाळले. युवराजाने आपली दुर्दैवी कथा तिला सांगितली, पण आपण या राज्याचे युवराज आहोत, हे मात्र सांगितले नाहीं. तिला त्याची दया आली व तिने त्याला आसरा दिला. तिचे आईवडील याच अरण्यांत राहून वनौषधी वनस्पती गोळा करीत व त्या वैद्यलोकांना पुरवीत असत. एकदा नावेतून नदीपार जात असताना नाव उलटली व त्या अपघातांत ती दोघेही बुडून मरण पावली. त्या मुलीला कुठे जावे ते कळेना, म्हणून ती तिथेच एकटी राहून तिच्या आईवडिलांप्रमाणे वनौषधी जमवीत राहिली.



राजपुत्र तिथेच राहूं लागला आणि नंतर त्याने तिच्याशी लग्न केले. तो सशक्त व बुद्धिमान होता. तो हरणें, पक्षी, पकडायचा, आणि ते लाकूडतोड्यांना विकायचा. त्याचबरोबर पत्नीलाही औषधी वनस्पती गोळा करण्यांत मदत करायचा.

असेच दिवस जात होते. एका दिवशी अरण्यांत आलेल्या लांकूडतोड्यांकडून राजा मरण पावल्याची बातमी राजपुत्राला कळली. ''हे बघ, मी कांही दिवसांसाठी नगरांत जाऊन येतो. आणि पाहूं या, कदाचित आपले भाग्य त्यानंतर लौकरच पालटेल.'' तो पत्नीला म्हणाला. ''पण लौकर या हं... नंतर काय होणार ते तुम्हाला माहीत आहेच.'' ती लाजून त्याला म्हणाली. कारण लौकरच ती आई होणार होती.

राजपुत्राने हंसून होकार दिला आणि तो नगराकडे निघाला. जेव्हां नागरिकांना राजपुत्र परत येताना दिसला, तेव्हां त्यांनी समाधान व्यक्त केले. तो गादीचा एकमेव वारस होता. त्याला हद्दपार केल्यानंतर राजाने दुसऱ्या कुणालाही वारस नेमलेले नव्हते.

साहजिकच, राज्याभिषेक समारंभ लगेच झाला व इतरही औपचारिकविधी व संस्कार सुरुं झाले. त्या सगळ्या गडबडीत नव्या राजाला या आदरसत्काराच्या कार्यक्रमांतून अरण्यांत परत जाण्याइतकी उसंत मिळाली नाही.

त्याचवेळी नदीला अचानक प्रचंड पूर आला आणि ते अरण्य पाणीमय झाले. राजपुत्राच्या



पत्नीला दूरच्या भागांत जाऊन एका गुहेत आश्रय घ्यावा लागला. त्या भागांत राहाणाऱ्या कांही दयाळू, मोळीविक्या मजुरांनी व त्यांच्या बायकांनी तिचे बाळंतपण केले, व तिने एका गोजिरवाण्या मुलाला जन्म दिला.

इकडे राजा अरण्यांत बायकोला भेटायला गेला. त्याला तिला आश्चर्यचकित करायचे होते, पण त्याला ती दिसली नाही. त्यांची छोटी झोपडीही नष्ट झालेली होती.

इकडे त्याची पत्नी छोट्या बाळाला घेऊन गुहेबाहेर येऊन बसली होती. आणि त्याच्या डोक्यावरून एक मोठा पक्षी उडत गेला. त्याच्या चोंचीतले एक चिमुकले कोंबडीचे पिलूं जवळच खाली पडले. तिने ते पिलूं उचलले, त्याला पाणी, पाजले व त्याला जवळ घेतले. तिच्या मुलाबरोबरच ते पिलूंही वाढूं लागले. तो डौलदार आणि गुटगुटीत कोंबडा पाहिला कीं बघणारे स्तिमित होऊन जात. असा देखणा कोंबडा अद्याप कुठेही आढळला नव्हता, अगदी परीकथेमधेसुद्धां! तो कोंबडा गुहेबाहेर अंगणात फिरत राही, आणि जवळ येणाऱ्या पक्ष्यांना व जनावरांना हाकलून लावीत असे.

त्या काळांत नव्या राजाने आपला जुना खेळ, कोंबड्याच्या झुंजी लावण्याचा छंद, सुरु केला. अर्थात, आता मात्र तो जाहीररित्या होऊं लागला. नागरिकांचे कोंबडे हिरावून वा चोरुन आणायची आता जरुरी नव्हती. उलट जिंकणाऱ्या कोंबड्यांच्या मालकांना भरघोस बक्षिसे मिळायला लागली.

राजपुत्राच्या मुलाचे नांव केलरस ठेवले होते. तो आता बारा वर्षांचा झाला होता. त्याच्या कानावर या खेळाची माहिती आली. आपल्या आईची परवानगी घेऊन तो हा खेळ बघायला शाही मैदानावर गेला. त्यादिवशी राजाने स्वत: पाळलेले खास कोंबडे नागरिकांच्या उत्तमोत्तम कोंबड्यांशी लढत देणार होते. राजाच्या कोंबड्यांनी इतर कोंबड्यांना हरवले.

"सरकार, जर माझ्या कोंबड्याने आपल्या कोंबड्याचा पाडाव केला, तर आपण मला काय द्याल?" केलरसने विचारले. त्याने आपला कोंबडा टोपलीत झांकून ठेवलेला होता. त्या हंसतमुख, देखण्या मुलाला पाहून राजाच्या मन[illegible] चलबिचल झाली. कारण काय असावे ते त्याला कळले नाही.

"पण जर माझ्या कोंबड्याने तुझ्या कोंबड्याला हरवलं तर?" राजाने त्याला विचारले. आपल्या कोंबड्यांची राजाला पक्की खात्री होती.


















''मी एक गरीब मुलगा आहे. माझ्या कोंबड्याकडून तरी मला बक्षीस मिळेल, या आशेने मी इथे आलो आहे. मी आपल्या काय देणार? मी आपल्या पदरी राहून कांही दिवस चाकरी करीन.'' केलरसने उत्तर दिले. नंतर त्याने आपला कोंबडा टोपलीतून काढला.

''अरे बापरे! हा तर राक्षसकोंबडाच दिसतो आहे!'' दरबारी एकमेकांत कुजबुजले. झुंज सुरुं झाली. केलरसच्या कोंबड्याने राजाच्या कोंबड्यावर विजय मिळवला. राजाने केलरसला शंभर नाणी बक्षीस दिली. नंतर त्याच्या कोंबड्याने राजाच्या सगळ्याच कोंबड्यांना हरवले. दर झुंजीसाठी केलरसला भरपूर इनाम मिळाले.

''अरे पोरा, तुझा हा कोंबडा तू मला विकत देशील कां?'' राजाने विचारले.

''नाही, छे! मी कसा विकणार त्याला? तो तर मित्र आहे. माझा जन्म झाल्यानंतर एक दिवशी हा आभाळांतून येऊन खाली पडला आणि माझ्याबरोबरच मोठा झाला. या कोंबड्यामुळेच आज मला इतकी बक्षीसें मिळाली. आता माझी आई व मी, किमान साधेसुधे जीवन तरी सुखाने जगूं शकूं,'' केलरस समाधानाने म्हणाला.

''तुझा जन्म कुठे झाला?'' राजाने विचारले.

''बारा वर्षांपूर्वी एकदा मोठा महापूर आला होता. माझीआई निवाऱ्यासाठी एका गुहेत थांबली, कारण माझे वडील कांही कामासाठी दूर कुठेतरी गेलेले होते.'' केलरसने सांगितले. राजाची उत्सुकता आता जास्तच वाढायला लागली.

''बरं तर, तुझा हा कोंबडा कांही तू मला विकायला तयार नाहीस. पण मग तू या कोंबड्याबरोबर इथें या राजवाड्यांत राहाशील कां?'' राजाने विचारले.

''सरकार, ते माझ्या आईच्या इच्छेवर अवलंबून राहील.'' मुलाने उत्तर दिले.

राजा ताडकन उठून उभा राहिला. ''तू मला तुझ्या आईकडे नेतोस कां?'' राजाचा कंठ दाटून आला होता. तो मुलगा त्याच्या ओळखीचा वाटायला लागला होता.

आपल्या लवाजम्यासहित राजा केलरसच्या पाठोपाठ जाऊं लागला. त्या अरण्यांतल्या वन्यवासींना राजा येताना पाहून आश्चर्य वाटले. आणि केलरसला राजाच्या पुढ्यांत घोड्यावर बसलेला पाहून केलरसची आई भांबावून गेली. तीही चकित झाली.

पण तिने राजाला ओळखलं कां? अर्थातच! तिथेच केलरस युवराज म्हणून व त्याची आई राणी म्हणून घोषित करण्यांत आले. पुन्हां सारा लवाजमा राजवाड्याकडे परत गेला.

जेव्हां केलरस वडिलांच्या गादीवर बसला, तेव्हां त्याने आपल्या राज्याचे 'कोंबडा' हेच राजचिन्ह ठरवले.

*- एम्.डी.*



बिहारची लोककथा

# छान सूड

**मो**तिहारी खेड्यांत रघुलाल हा एक गरीब शेतकरी होता, आणि प्यारेलाल हा श्रीमंत सावकार होता. गांवातल्या लोकांना फसवून त्याने संपत्ती जमा केलेली होती. त्याची ही लबाडी लोकांना माहीत नव्हती असे नाही, पण अडीअडचणीला मदत देऊं शकणारा गांवात दुसरा कुणीही नव्हता, म्हणून फसवणूक झाली तरी ते गप्प बसत. म्हणून कर्ज घेणारा जास्त गरीब होई, आणि देणारा मात्र अधिक सधन होत होता.



प्यारेलालची पद्धत अगदी साधी होती. तो कर्जाचे लेखीपत्र ठेवतच नसे. "आपण करारावर कशासाठी सह्या करायच्या?" तुम्हाला पैसे हवे असतात, तेव्हां मी ते देतो. जेव्हां तुमच्याकडे पैसे असतात, तेव्हां तुम्ही माझी रकम परत देता. मात्र तुम्ही त्या कर्जाचं व्याज द्यायला हवं, एवढीच माझी अट आहे." तो सांगे.

वर्षाच्या अखेरीस पैसे उसने घेणाऱ्याने बरीच मोठी रकम चुकती केलेली असे, तरी पण मूळ मुद्दल बाकी असे. कारण प्यारेलालची गणिताची पद्धत व लबाडी कांही त्या अडाणी माणसाला समजत नसे.

रघुलाल आता मात्र अगदी निराश झाला होता. जेव्हां त्याच्याकडे परतफेडीसाठी पैसे शिल्लक नसत, तेव्हां प्यारेलाल त्याच्या घरांतल्या कणगीतले धान्य सरळ उचलून नेई. नाहीतरी रघुलालच्या शेताचे बारीक बारीक कानाकोपऱ्यांतले तुकडे प्यारेलाल आपल्या नांवावर घेई. कांही वेळेला तर रघुलालची भांडीकुंडीदेखील त्याने नेली होती. एकदा प्यारेलालला रघुलाल बरेच दिवस दिसला नाही, म्हणून तो रघुलालच्या घरी गेला. तो बिचारा अगतिक होऊन म्हणाला, "माझ्याजवळ हे अंगावरचे फाटके कपडे फक्त आता राहिले आहेत. बदलण्यासाठी दुसरे धड कपडेही नाहीत. तेव्हां काय करणार?"



प्यारेलालने लागलीच उत्तर दिले, "तू रामकडे जाऊन मदत कां मागत नाहीस? तो माझ्याशी फारच दयाळूपणे वागला होता. मी पुन्हां केव्हां-तरी येईन." असं म्हणून प्यारेलाल निघून गेला.

"मी रामचा शोध घेईन. जर त्याने प्यारेलालला मदत केली असेल, तर तो मला नक्कीच मदत देईल." रघुलालने मनाशी ठरवले, आणि तो रामच्या शोधार्थ निघाला. तो खूप वेळ चालत होता, पण रामच्या घराचा पत्ता कुणालाच माहीत नव्हता. त्याला एक पुजाऱ्यासारखा दिसणारा गृहस्थ भेटला. "तो दयाळू राम मला कुठे भेटेल हे तुम्ही सांगू शकाल कां? माझ्याजवळ तीन दशम्या आहेत. त्यांतली एक मी तुम्हाला देईन!"

रघुलालने हातांत दशमी घेऊन त्याला विचारले. तो इसम तुच्छतेने कांहीतरी पुटपुटत पुढे निघून गेला. त्याने दशमीकडे बघितलेदेखील नाही. नंतर कपाळावर भस्म फांसलेला एक इसम रघुलालला समोर दिसला त्यालाही त्याने एक दशमी देऊं करीत विचारले, "मला राम कुठे भेटेल? मला वाटतं तुम्ही सांगू शकाल!"

त्या माणसाने ती दशमी लगेच घेतली व म्हणाला, "मला नाही रे माहीत! मला फक्त शिव माहिती आहे." साधे आभारदेखील न मानता तो तसाच पुढे निघून गेला.

रघुलाल चालतच होता. आता तो थकला होता नि भुकेला होता. दशम्या खाऊन त्याने



विश्रांति घ्यायला हवी होती, पण तो थांबला. कुणीतरी भेटला तर त्याच्याबरोबर दशमी खाता येईल असे त्याला वाटले. थोड्या वेळानंतर त्याला एक फाटक्या कपड्यांतला भिकारी दिसला, तो ही थकलाभागलेला दिसत होता. रघुलालने त्याला सांगितले, "मी रामला शोधतो आहे कारण तो मला मदत करील असे एकाने सांगितले आहे." आणि त्याने आपले दशम्यांचे गांठोडे उघडले.

"अरे, तुला रामला भेटायचे आहे होय? मीच राम आहे. सांग, तुला कसली मदत हवीय?" त्या भिकाऱ्याने आशाळभूतपणे त्या दशम्यांकडे बघत म्हटले.

"ही घ्या एक दशमी!" रघुलाल म्हणाला आणि दोघेही शिदोरी खाऊं लागले. रघुलालने



त्याला सावकार कशी लबाडी करीत असे ते सविस्तर सांगितले. ''आता माझ्याकडे शेत नाही. पैसे नाहीत आणि कमवायला कांही मार्ग नाही.''

त्या दीनवाण्या माणसाने आपल्या लहानशा थैलीतून एक शंख काढला. ''हा एका विशिष्ट तऱ्हेने फुंकला, तर तुला जे मनांत हवे असेल ते मिळेल. हा फुंकण्याइतकी ताकद कांही माझ्या अंगात नाही, त्यामुळे मला याचा कांही उपयोग नाही. तू हा घे. पण मी तुला सांगून ठेवतो. त्या सावकाराकडून पुन्हां कधीही फसवला जाऊं नकोस.'' आणि तो भिकारी पुढे निघून गेला.

रघुलाल घरी परत आला. त्याने घराची दारेखिडक्या बंद केली आणि शंख फुंकण्याचा अनेक तऱ्हेने प्रयत्न केला. शेवटी जरा वेगळ्या तऱ्हेने पकडून त्याने तो शंख फुंकला आणि त्यांतून खळखळत नाणी बाहेर पडूं लागली. रघुलाल कांही लोभी नव्हता. त्याने शंख फुंकणे थांबवले. त्याचे जेवणखाण भागेल इतकी नाणी खाली पडलेली होती. त्याने दिवसभर विश्रांति घेतली आणि शेताच्या उरलेल्या तुकड्यावर काम करायला दुसऱ्या दिवशीच सुरवात केली.

एके दिवशी, प्यारेलाल त्या शेताच्या बाजूने जात होता. रघुलालचे हिरवेगार शेत आणि चांगली तयार झालेली कणसें पाहून तो थक्क झाला. थोडीशी मिठाई घेऊन तो रघुलालच्या घरी गेला. हंसतच म्हणाला, ''अरे, तुझं भलं झालेलं पाहून मला आनंद झालाय रे! नाही, मी तू घेतलेल्या कर्जाची तुला आठवण देत नाही. पण तुझी परिस्थिति एकदम बदलली कशी?''

रघुलाल भोळा होता. त्याने तो शंख प्यारेलालला दाखवून म्हटले, ''ही सगळी या शंखाची कृपा आहे.''

प्यारेलालला वाटलं कीं ह्याला हा शंख कुठेतरी सहजगत्या सांपडला असेल. त्या लोभी माणसाने रघुलालला फसवायचे ठरवले. तो जायला निघाला आणि त्याने तो शंख मोठ्या शिताफीने आपल्या उपरण्यांत लपवला. रघुलालजवळ आता पैसे सांठलेले होते, म्हणून तो शंख नाहीसा झाल्याचे कांही दिवस त्याच्या लक्षांत आले नाही.

सावकाराने शंख घरी नेला पण त्याला तो फुंकणे जमेना. त्याने बरेच वेळा प्रयत्न केला व तो निराश झाला. शेवटी तो रघुलालकडे गेला व



त्याला पुन्हां मिठाईचे ताट देत म्हणाला, ''मित्रा, मला एक कबुली द्यायचीय. त्या दिवशी तो सुंदर शंख पाहून मला त्याचा मोह आवरला नाही. तो नीट पाहावा म्हणून मी तो घरी घेऊन गेलो. पण मला कांही तो फुंकता आला नाही. पण तू तर म्हणालास कीं तुझी चांगली परिस्थिति ही त्या शंखाची कृपा होती. होय ना?''

रघुलाल इतका भोळसट होता कीं त्याने तो शंख फुंकला, आणि त्यांतून नाणी खळखळत पडायला लागली. प्यारेलालचा विश्वासच बसेना. ''ठीक आहे रघुलाल! तू घेतलेलं कर्जबिर्ज सारं कांही विसरुन जा. एवढंच बघ की तुला जे मिळेल त्याच्या दुप्पट मला मिळावं!''

रघुलालने याला मात्र विरोध केला. ''प्यारेलाल, तू मला खूप वर्षे फसवत आला आहेस ना? मी तुझ्यासाठी कांही करायच्याअगोदर तू माझ्याकडून घेतलेले जास्तीचे पैसे मला परत कर. माझ्या शेताचे सगळे तुकडे मला परत दे आणि माझी भांडीसुद्धां! खूप दिवस मी घरी जेवण बनवलेले नाही.''

प्यारेलाल आता कात्रींत सांपडला होता. त्याने शंख हातांत घेऊन म्हटले, ''तर मग हा माझ्याच ताब्यांत राहूं दे. आपल्या दोघांनाही याचा फायदा होणार नाही.'' आणि प्यारेलाल निघाला.

रघुलालने पवित्रा बदलला. ''बरं तर, तू माझे कर्ज माफ केले आहेस यावर मी विश्वास ठेवतो. तो शंख मला दे. मी शंख फुंकला कीं जे मला हवे असेल त्याच्या दुप्पट तुला मिळेल पण माझी भांडी परत पाठव आणि माझ्या शेतांत काम करणारे मजूर तिथून काढून टाक.''

सावकार खाली मान घालून परत गेला. रघुलालने भांडी परत घेतली. दुसऱ्या दिवशी पैशाची इच्छा करण्याऐवजी शंख फुंकताना आपण एका डोळ्याने आंधळे व्हावे अशी इच्छा त्याने मनांत धरली. रघुलाल प्यारेलालच्या घरी गेला. तो दारांतून धडपडत आंत जायचा प्रयत्न करीत होता. रघुलालने त्याला हांक मारली. तर प्यारेलाल दोन्ही डोळे गमावून बसलेला दिसला.

''रघुलाल, माफ कर रे! माझी दृष्टी परत यावी म्हणून तुझ्या शंखाकडे मागून बघ रे!'' प्यारेलाल विनवीत होता. आणि दयाळू, भोळ्या रघुलालच्या विनंतीवरुन शंखाने ही मागणी पूर्ण केली.





# जिवलग मित्र

**पूर्वी**, ब्रह्मदत्त काशीराज्याचा राजा असतांना, बोधिसत्त्वाने एका ब्राह्मण कुळांत जन्म घेतला. त्याच्या आई-वडिलांनी त्याचे 'सत्यानंद' असे नांव ठेवले. कांही काळ लोटल्यानंतर ब्राह्मणाच्या घरी आणखी एका मुलाने जन्म घेतला, त्या मुलाचे नांव 'नित्यानंद' असे ठेवण्यात आले.

हे दोघे भाऊ, कोडकौतुकांत वाढत असताना एकाएकी त्यांच्या आई-वडिलांना देवाज्ञा झाली. परिणामस्वरूप संसारावरील त्यांची आसक्ती संपली. गंगानदीच्या एका कांठावर राहून ते संन्याश्याचे जीवन व्यतीत करूं लागले.

एके दिवशी पाताळांत राहणारा मणिकांत नांवाचा एक सर्पराज, मानवरूप धारण करून भूलोकावर आला. तो गंगानदीच्या कांठा-कांठाने चालत जात असताना नित्यानंदाची पर्णकुटी त्याला आढळली. त्याने नित्यानंदाला स्वतःला परिचय करून दिला व बराच वेळ गप्पा मारल्या.

नित्यानंद व मणिकांत यांच्यात दृढ मैत्री झाली. त्यामुळे मणिकांत नियमितपणे नित्यानंदाच्या पर्णकुटीत येऊं लागला. संसारातील माया-मोहाबद्दल ते दोघे तासन्तास चर्चा करीत असत. कधीकधी मणिकांत आपल्या निजरूपांत प्रकट होत असे व नित्यानंद बोलत असताना आपली फणा पसरून, छत्राप्रमाणे त्याच्यावर सांवली धरीत असे. चर्चा संपल्यावर तो आपल्या लोकांत निघून जात असे.

असे बराच काळ घडत राहिले. एकदा नित्यानंदाला एका अकल्पित भयाने पछाडले. सर्पराज 'मणिकांत' हा आपला जिवलग मित्र होय, यांत संशय घेण्यासारखे कांही नाही. परंतु दुष्ट स्वभाव हा त्याच्या जातीचा जन्मजात गुण होय! तेव्हां यदाकदाचित कांही कारणावरून, जर मणिकांताचा आपल्यावर राग ओढवला, तर तो आपणास डसायलाही मागे पुढे बघणार नाही!

अशा विचारामुळे, नित्यानंदाच्या जिवाला भीतीचा घोर लागला. अशा स्थितीत असतां, एके दिवशी तो आपला मोठा भाऊ सत्यानंद याच्याकडे गेला. "भाऊ, इतका कसा खालावलास? याचे कारण काय?" सत्यानंदाने नित्यानंदाला विचारले.

तेव्हां कांहीही आडपडदा न ठेवता नित्यानंदाने भावासमोर आपले मन मोकळे केले.

"भाऊ, तुझ्या सांगण्यावर विचार केला असतां, तो सर्पराज मणिकांत याला तू आपला प्राणसखा समजतोस, असे दिसते आहे. तर एकीकडे, त्याच्यापासून तुझ्या जिवाला धास्ती असल्याची तुला भीती वाटते आहे. तेव्हां त्याचे तुझ्याकडे वरचेवर येणे थांबविले, तर त्याच्या भेटी वाचून तुला एकाकी तर नाही ना वाटणार? तूं सुखाने राहूं शकशील कां?" सत्यानंदाने विचारले.

क्षणभर विचार करून नित्यानंद म्हणाला - "त्याचे माझ्याकडे येणे टाळता आले, तरच मला मनःशांती लाभेल!"

ते उत्तर ऐकून सत्यानंद हंसला. "ठीक आहे, तो सर्पराज तुझ्याकडे येतो, तेव्हां त्याच्या अंगावर कशा प्रकारची आभूषणें असतात?" त्याने भावाला विचारले.

"तो तर नखशिखांत नटलेला असतो! परंतु प्रकाशाने धगधगणारा एक 'मणी' त्याच्या कण्ठात दिसतो!" नित्यानंद म्हणाला.

"भाऊ, तसं जर असेल तर एक काम कर! यावेळी तो सर्पराज तुझ्याकडे येईल, तेव्हां 'तो मणी दे' असे त्याला विचार." सत्यानंदाने नित्यानंदाला अशी युक्ती सुचविली.

दोन-तीन दिवसानंतर सर्पराज मणिकांत नित्यानंदाच्या पर्णकुटीत आला. तेव्हां "मणी दे", असे नित्यानंदाने त्याला विचारले. ते ऐकून



तिथे क्षणभरसुद्धां न थांबता मणिकांत आल्यापावली पाताळ लोकांत निघून गेला.

दुसऱ्या दिवशी मणिकांत दाराजवळ दिसतांच "काल मी तुझ्या गळ्यांतला मणी मागितला, तो तू छान दिलास!" असे नित्यानंद म्हणाला.

कुटीत प्रवेश न करतां, मणिकांत द्वारा-जवळूनच मागे वळून निघून गेला.

तिसऱ्या दिवशी मणिकांत, नित्यानंदाच्या झोपडीकडे येत असलेला दिसताच तो समोर गेला व "मणी दे, म्हणून मी आता पर्यंत दोनदा मागितला. तरीही तू दिला नाहीस!" नित्यानंदाने दटावणीच्या सुरात विचारले.

सर्पराज मणिकांताने गंभीर चेहरा केला व म्हणाला - "नित्यानंदा, हा मणी कांही सामान्य नव्हे! मी याला जे मागीन, ते देणारा हा 'कल्पतरु' आहे. तेव्हां अशी 'कामधेनू' तू मागितलीस तर ती मी तुला कशी देऊं? म्हणून आजपासून मी

तुझ्या पर्णकुटीच्या छायेच्या थाऱ्यालाही उभा राहाणार नाही!'' असे म्हणून सर्पराज मणिकांत तडक निघून गेला.

नित्यानंदाने सर्पराज परत येईल, अशा आशेने एक आठवडाभर वाट पाहिली. परंतु तो आला नाही. तेव्हां 'आपण आपल्या जिवलग मित्राला कायमचे मुकलो'. या विचाराने तो बेचैन होऊन झुरुं लागला.

धाकटा भाऊ आता कसा आहे, हे एकदा बघून यावे या विचाराने सत्यानंद एकदा त्याच्याकडे आला. नित्यानंदाची खालावलेली परिस्थिति पाहून, सत्यानंदाला खूपच काळजी वाटूं लागली. ''तुझी प्रकृती तर पूर्वीपेक्षांही अधिक खराब झालेली दिसतेय! सर्पराजची पीडा अजून टळली नाही काय?'' त्याने काकुळतीने भावाला विचारले.

''दादा, तू सांगितल्याप्रमाणेच मी सर्पराजाला तो कांतीमान मणि मागितला. परंतु तेव्हांपासून तो माझ्याकडे फिरकलाच नाही. तो जेव्हां माझ्याशी बोलत असे, तेव्हां आपली फणा पसरुन, माझ्या डोक्यावर गार सावलीचे आच्छादन घालीत असे, त्यावेळी मला फार आल्हाददायक वाटायचे. आता मणिकांताने माझ्याकडे पाठ फिरविल्यामुळे मी असा कृश होतो आहे.'' नित्यानंदाने सत्यानंदाला कारण सांगितले.

तेव्हां मोठ्या भावाच्या रुपांत असलेला बोधिसत्व शांतपणे म्हणाला - ''भाऊ, सर्पराज मणिकांत आपला जिवलग मित्र आहे, असे मानून तुला खूप समाधान वाटत असे. परंतु एवढा जिवलग मित्र म्हणविणारा तो, तू त्याच्याजवळ 'एक मणी' मागितला असताना, तुझे तोंडसुद्धां न बघता, तुझ्या घराची वाटच विसरुन गेला आहे. जिवलग मित्राची हीच का पारख? अशीच का वागायची पद्धत? तो निव्वळ स्वार्थी होता. तुझा मित्र नव्हताच मुळी! म्हणून तूसुद्धां त्याच्या इकडे न येण्याचे, एवढे कांही मनाला लावून घेऊ नकोस!'' बोधिसत्वाने भावाला हितोपदेश केला.

मोठ्या भावाने सांगितलेल्या गोष्टीचे मर्म जाणून नित्यानंदाने त्यानंतर कधीही सर्पराज मणिकांत बद्दल विचार केला नाही. त्याला काळजीचे कांही कारण न उरल्यामुळे लवकरच त्याची प्रकृती सुधारली.







# विष्णु पुराण

श्रीकृष्णाच्या थोरवीबरोबर त्याच्या शत्रूंची संख्यापण वाढूं लागली. शिशुपाल व जरासंध यांना बरेच दुष्ट राजे येऊन मिळाले. पौंड्रक नांवाचा करूश राज्याचा राजा लाकडाचे हात लावून, त्यांत शंख चक्र धारण करुन व एका हातात गदा घेऊन मीच विष्णु आहे, कृष्ण अवतार नाही, म्हणून सगळीकडे सांगत हिंडू लागला. शिशुपालाचा छोटा भाऊ शालव हा कृष्णाला आपल्याबरोबर युद्ध करण्याकरिता बोलावू लागला. पूर्व दिशेला नरकासुराने अतिशय अत्याचार व गोंधळ माजवून दिला. दक्षिणेकडे बली चक्रवर्तीचा मुलगा बाणासुर याने शंकराच्या रक्षणाकरीता शेणपुर ही आपली राजधानी करून राक्षसलोकांच्या संख्येने राज्याचा विस्तार जास्त वाढविला.

कालयवन याचा लहान भाऊ कालान्तक ह्याची पत्रिका ज्योतिषाने पाहून त्याचे भविष्य वर्तवले होते कीं कोणत्याही प्राणीमात्रांपासून ह्याला मरण नाही. त्याचा फायदा घेऊन यवन आणि म्लेंच्छ सैन्यांच्या मदतीने त्याने जिकडे तिकडे हत्याकांड करण्याचे सुरु केले. तो देवांची देवळे व मूर्ती उध्वस्त करू लागला.

अनेक देशांवर लढाया करून तो गांधार देशांत पोहोचला. तेथे असलेल्या संगमरवरी दगडांतील मोहिनीची जिवंत भासणारी मूर्ती पाहून तो मंत्रमुग्ध झाला. कृष्णाने विश्वकर्म्याकडून तशी मूर्ती बनवून त्यांत मायावीरूप धारण करून प्रवेश केला होता. ही गोष्ट कालान्तकाला माहीत नव्हती.

त्या दगडी मूर्तीला कालान्तकाने आपल्या अंतःपुरात नेले व विचार केला की ह्या मूर्तींत जीव आणला तर काय छान होईल.



एकदा रात्री सुंदर संगीताचे ध्वनी व बरोबर पायांतील पैंजणाच्या आवाजाने कालान्तकाला जाग आली. तो पहातो तर ते शिल्प एका सुंदर स्त्रीचे रूप घेऊन गाते, नाचते आहे. तो प्रेमाने जवळ गेला. तिने त्याला बाहुपाशांत घेतले. दुसऱ्या क्षणी ती मूर्ती पुन्हां दगडाची झाली. तिच्या मिठीत तो जळूं लागला व धप्पदिशी खाली पडला.

त्या मूर्तीचे हात पण तुटून गेले. त्याच बरोबर कालान्तक मरण पावला. परंतु यवन राज्यांत हाततुटकी मोहिनीची मूर्ती मात्र अजून राहिली आहे.

त्यानंतर श्रीकृष्णाने कालान्तकाच्या सैन्याला पळवून लावले. परंतु ज्वालामुखी होऊन सर्व यवन राज्य भस्मीभूत झाले. ह्याच प्रकारे पश्चिम दिशेचे म्लेंच्छ व यवनांचे प्राबल्य नष्ट झाले. पूर्वीकडे प्रागज्योतिषपुर राज्याचा राजा नरकासुराच्या अत्याचाराने लोक हवालदिल झाले होते.

वराह अवतार धारण करून विष्णुने जेव्हां पृथ्वीचा उद्धार केला, तेव्हां भूदेवीच्या पोटी जन्म घेतलेल्या नरकासुराने प्रागज्योतिषपुर ही आपली राजधानी करून तो तेथे राज्य करू लागला. त्याने असुरांना एकत्रित करून देवांच्यावर चढाई केली व देवांवर जय मिळविला. तेथून देवमाता अदिती हिची कर्णकुंडले तोडून आणली. ऋषिमुनी, साधु-संत व सज्जन लोकांना ते त्रास देऊ लागले. त्याने पृथ्वीवरच नरक बनवला व सोळा हजार कुमारिकांना आपल्या बंदीवासात ठेवले होते.

नरकासुरांच्या अत्याचारांना कंटाळून देवांनी व ऋषींनी कृष्णाकडे प्रार्थना केली. की, त्याने येऊन नरकासुराचा वध करावा. कृष्णाने अभयदान दिले. तो सत्यभामेसह नरकासुराशी लढण्यास निघाला.

नरकासुराला एक वर मिळाला होता भूदेवी-कडून त्याला जर मार लागला तर त्याचा अंत होईल. म्हणूनच सत्यभामा भूदेवीच्या अंशापासून जन्मली होती.

श्रीकृष्णाने गरुडवाहनावर सत्यभामेसह बसून प्रागज्योतिषपुरवर चाल केली आणि बऱ्याच असुरांची हत्या केली.

शेवटी एका मदमस्त हत्तीवर बसून नरकासुर कृष्णावर चालून आला. तेव्हां कृष्ण विश्रांती घेत होते. म्हणून सत्यभामेने नरकासुरांबरोबर युद्ध केले.

सत्यभामेने आपल्या धनुष्याची प्रत्यंचा कानापर्यंत ओढली व नरकासुराचे लक्ष्य करून बाण सोडला. तो जाऊन नरकासुराच्या वक्ष-



स्थळाला लागला. तो जमिनीवर धाडदिशी कोसळला, परंतु पुन्हां सर्व बळ एकवटून हातात गदा घेऊन कृष्णावर चालून आला. श्रीकृष्णाने आपल्या चक्रायुधाने नरकासुराचे डोके उडवले.

डोके उडताक्षणीच नरकासुराने विष्णुच्या रूपांत असलेल्या कृष्णाची स्तुती केली व असा वर मागितला की, त्याची स्मृती रहाण्याच्या दृष्टीने एक दिवस आनंदाने उत्सव केला जावा.

नरकासुराच्या वधाच्या दिवशी नरकचतुर्दशी व दुसऱ्या दिवशी आनंदोत्सव म्हणून दिवाळी करण्यांत येऊ लागली. त्यानंतर कृष्णाने नरकाचा मुलगा भगदत्त ह्याचा राज्याभिषेक करविला. अदितीची कुंडले घेऊन तो सत्यभामेह द्वारकेला आला.

एक दिवस कृष्ण रुक्मिणीच्या महालांत बसले होते. त्या वेळेस नारदाने येऊन एक पारिजातकाचे फूल कृष्णाला दिले. कृष्णाने ते फूल रुक्मिणीच्या हातांत दिले. ते समजताच सत्यभामा रुसली. तेव्हां कृष्णाने तिची समजून काढत म्हटले, "तू रागावू नकोस, पारिजातकाचे फूलच नाही, वृक्षच तुझ्या महालांत आणून लावतो."

कृष्ण सत्यभामेसह गरुडवाहनावर बसून देवलोकांत पोहचला. तेथे अदितीची कुण्डले देऊन बनांत विहार करीत असतांना कृष्णाला पारिजातकाचा वृक्ष दिसला. त्याने तो मुळापासून उपटून काढला.

सत्यभामा व कृष्ण तो पारिजात पळवून घेऊन जात असतांना इंद्राने त्यांना पाहिले, व तो त्याच्याशी लढायला आला. इंद्राने कृष्णाच्या अंगावर वज्रायुध फेकले. ते गरुडाच्या पंखाला



जाऊन लागले. त्याने आपला पंख झटकून टाकून दिला.

ह्या प्रकारे इंद्राचा गर्वभंग झाला. त्याने सांगितले - "कृष्ण जोपर्यंत पृथ्वीवर राहील, तोपर्यंत हा पारिजातकाचा वृक्ष सुद्धां पृथ्वीवरच राहील."

सत्यभामेच्या अंतःपुरातले उद्यान फुलाने नेहमी डंवरून येऊ लागले.

कृष्णाने पुत्रप्राप्तीच्या इच्छेने कैलासावर जाऊन शंकराची तपस्या केली व शंकराकडून अनुग्रह प्राप्त केला. त्याच वेळेस शालव व पौंड्रक राक्षसांनी द्वारकेच्या लोकांना खूप त्रास दिला. कृष्णाने परत येऊन दोघांना ठार मारले.

दन्तवक्र मेलेल्या माणसांचे अंतिम संस्कार करत होता. त्याच वेळेस कृष्ण त्याला सामोरा गेला. कृष्णाने त्याच्यावर प्रतिहल्ला केला व विजय नांवाचा जो अंश त्याच्याजवळ होता, तो आपल्यांत



सामावून टाकला. कृष्णाचा मुलगा प्रद्युम्न. प्रद्युम्नचा मुलगा अनिरुद्ध, ह्याला बाणासुराची मुलगी उषा हिने स्वप्नांत पाहिले व ती त्याच्यावर मोहित झाली.

तिची सखी चित्रलेखा हिने त्याला मायावी रूपाने उषेच्या महालांत आणले. तेव्हां उषाने अनिरुद्धला आपला पती मानले.

बाणासुराने अनिरुद्धला नागपाशाने बंदी करून कैदेत ठेवले. आपल्या नातवाला सोडण्याकरिता कृष्ण बाणासुराबरोबर लढायला आला. बाणासुराला वांचवण्या करीता आलेले शंकर भगवान कृष्णाच्या हाती पराजित झाले.

कृष्णाने बाणासुराच्या हजार हातांपैकी दोन हात शिल्लक ठेवून बाकी हात कापून काढले. त्यामुळे हार मानून बाणासुर कृष्णाला शरण आला व कृष्णाचा नातू अनिरुद्ध ह्याच्याबरोबर आपली मुलगी उषा हिचा त्याने विवाह थाटाने करून दिला. त्यामुळे दक्षिणेकडील राक्षस व उत्तरेकडील राजा लोकांचे संबंध जोडले जाऊन त्यांच्यांत मैत्रीचे संबंध वाढले.

त्यानंतर कृष्ण पांडवाचा सारथी म्हणून राहिला. बलरामाच्या इच्छेला डावलून त्याने सुभद्रेचा विवाह अर्जुनाबरोबर लावून दिला.

खाण्डववन जळण्याच्या वेळेस कृष्ण आणि अर्जुनानी तेथे रहाणाऱ्या महाशिल्पी व मय राक्षसांचे रक्षण केले होते. त्यामुळे त्यांनी पांडवाना वचन दिले होते, की त्यांना एक अद्भुत असा महाल बनवून देऊं. अग्निदेवाने कृष्णाला व अर्जुनाला प्रसन्न होऊन कृष्णाला सुदर्शन चक्र व पांचजन्य शंख, आणि अर्जुनाला गांडीव धनुष्य व देवदत्त शंख, म्हणजे अक्षय तुणीर ही आयुधे दिली.

युधिष्ठिराने जेव्हां राजसूय यज्ञ आरंभला तेव्हां जरासंधाचा वध जवळ आला होता. श्रीकृष्ण, भीम आणि अर्जुन, भगव्या वेषांत भिक्षा मागण्याकरिता एकदा जरासंधाच्या महालात गेले.

जरासंध, बकासुर, दुर्योधन, कीचक, हे भीमसेन ह्यांच्या तोडीचे शक्तिशाली होते. त्यामुळे कृष्णाने जाणले की एकाकडून बाकी चारीजणांचा वध करणे चांगले. ह्या पूर्वी भीमाने बकासुराचा वध केला होता. म्हणून त्यालाच जरासंधाचा वध करावयास सांगणे चांगले. जरासंधाचे मरण हे शस्त्राने होणार नव्हते. तर त्याला मधोमध चिरून त्याला मारणे भाग होते.

श्रीकृष्णाने जरासंधाला सांगितले की जेवण्याच्यानंतर आमच्यापैकी तू एकाशी तरी कुस्ती करावयास पाहिजे. ह्या अपेक्षेने आम्ही आलो आहोत.



जरासंध म्हणाला - "हे कृष्णा, तू मला घाबरून प्रवर्षणगीरला पळून गेलास. अर्जुन हा तर दुर्बल आहे. रहाता राहिला तो भीमसेन. त्याच्याशी मी कुस्ती खेळायला तयार आहे."

ह्यावर जरासंध व भीमसेन ह्यांच्यामध्ये भयंकर कुस्ती सुरू झाली. भीमसेनने त्याला खूप लोळवले. वेळ येताच कृष्णाच्या सांगण्यप्रमाणे जरासंधाला मधोमध पकडून दोन भाग केले व पुन्हां जोडले जाऊ नये म्हणून दोन्ही बाजूला उलटे करून टाकून दिले. अशा तऱ्हेने कृष्णाने भीमाच्या करवी जरासंधाचा वध घडवून आणला.

भीष्माच्या विनंतीवरुन युधिष्ठिराने राजसूय यज्ञाचे अग्रस्थान कृष्णाला अर्पण केले.

त्या भरसभेत मध्यभागी उभे राहून शिशुपालने श्रीकृष्णाला अग्रस्थान दिल्याबद्दल नापसंती दर्शवली. त्याने आपली तलवार उगारून कृष्णाला व पांडवाना ठार मारण्याचा निश्चय केला. त्याने कृष्णाबर खोटारडा व चोर म्हणून आरोप केला, व यज्ञाचे फळ मिळण्याच्या योग्यतेचा तो नाही म्हणून सांगितले.

तोपर्यंत शिशुपालाचे शंभर अपराध पूर्ण होत आले होते.

कृष्णाने भयंकर रागाने आपले सुदर्शन चक्र शिशुपालावर सोडले व त्याचे डोके उडविले. त्यामुळे शिशुपालामध्ये असलेला जय हा ज्योतीच्या रूपाने कृष्णांत जाऊन विलीन झाला. अशा तऱ्हेने जयविजय हा तिसरा जन्म पूर्ण झाला. ते आपल्या शापापासून मुक्त झाले व वैकुंठात विष्णुच्या द्वारपालांच्या रूपे जाऊन राहिले. मय कारागीराने पांडवांकरीता कुशलतेने



बांधलेला अप्रतिम असा महाल दुर्योधन पहाण्यास निघाला व तो पाहून आश्चर्यचकित झाला. आंतील अनेक अद्‌भुत रचना पाहून अनेक वेळां अपमानित झाला. एका वेळेस तर रत्नखचित गालीचा समजून त्याने त्यावर पाय ठेवला व पाण्याच्या हौदात धप्‌दिशी पडला. ते पाहून द्रौपदीला खूप हसू आले. द्रौपदीच्या हंसण्यामुळे दुर्योधनाचा अपमान झाला. तेव्हां शकुनीने दुर्योधनाचे सांत्वन केले व "कोणत्याही तऱ्हेने पांडवाना व द्रौपदीला माझे दास करीन व अपमानाचा बदला घेईन; तू पांडवाना द्यूत खेळण्यास सिद्ध कर" असे सांगितले.

सुदामा कृष्णाचा बालपणातील मित्र. श्रीकृष्ण आणि बलराम यांनी सांदिपनी ऋषींच्या आश्रमांत अभ्यास केला होता. तेव्हां सुदामासुद्धा त्यांच्या-बरोबर शिकायला होता.

खूप संतती व दारिद्र्य यांनी गांजून गेलेला सुदामा आपल्या पत्नीचा उपदेश ऐकून श्रीकृष्णाकडे त्याला भेटावयास गेला. जातांना बायकोने दिलेले पुरचुंडीभर पोहे त्याने कृष्णाकरिता नेले.

श्रीकृष्ण त्यावेळेस द्वारकेमध्ये आपल्या आठ पट्टराण्यांसमवेत झोपाळ्यावर बसून झोके घेत होता. लांबून येत असलेला सुदामा पाहून त्याने धावत जाऊन त्याला आपल्या बाहुपाशांत घेतले व अगत्याने आपल्या महालांत नेले.

त्याने आपल्या राण्यांची सुदामाबरोबर ओळख करून दिली. त्याचे हे अगत्य व आदर पाहून सुदामाला अत्यंत आनंद झाला. कृष्णाने त्याच्या हातांतील पुरचुंडी ओढून घेतली व उघडून पाहिली. त्यांत असलेले पोहे पाहून त्याने थोडे आपल्या तोंडात टाकले व बाकीचे आपल्या राण्यांना दिले.

कृष्णाने केलेले अत्यंत प्रेम व आदर पाहून सुदामा कशाकरिता आला होता हेच विसरला. कृष्णाचे स्मरण करीत करीत आपल्या घरी परत आला. तेव्हां त्याला आपले घर ओळखू आले नाही.

त्याच्या घराच्या जागी सुंदर असा महाल उभा होता. त्या महालाची दारे चांदी व सोन्याची होती. ती प्रकाशाने तळपत होती. त्याचे खांब रत्नामाणकांचे होते. त्याची बायको दागदागिन्यांनी नटलेली होती. सर्व मुले रेशमी कपडे घालून फुलांसारखी खटवीत दिसत होती.

ह्यानंतर सुदामाने बरीच वर्षे आपले आयुष्य सुखासमाधानाने घालवले.





# नालायक नव्हे, लायक आहे!

शंकर श्रीधरचा मुलगा होता. आपला मुलगा अत्यंत नालायक आहे अशी बापाची पूर्ण खात्री होती. म्हणून बारीकसारीक गोष्टीवरुन तो मुलाला रागवत असे, सारखी कामें सांगून त्याला पिटाळत असे. त्यामुळे स्वतंत्र विचार करण्याची संवय शंकरला झाली नाही. त्याच्या बावळटपणाला त्याचे वडीलच कारणीभूत होते.

बापाच्या तालावर नाचणारा शंकर अगदी नाठाळ व मूर्ख बनला. वय वाढत गेलं तशी त्याची अक्कलही बिघडत गेली. त्याला एकच गोष्ट चांगल्या प्रकारे अवगत होती. गांवातल्या तलावांत पोहताना तो डुबकी मारुन बराच वेळ श्वास धरुन पाण्याखाली राहू शकत असे. कारण ह्या बाबतीत त्याच्या वडिलांना लुडबूड करता आली नव्हती, म्हणून ही विद्या तो नीट शिकूं शकला होता. वडिलांनी सांगितलेली कोणतेही काम शंकर कधीही नीट करत नसे.

श्रीधरला वाटत होतं कीं लग्नानंतर हा जरा शहाणा होईल, आणि कामधंदा पाहील. शंकर लहान असतानाच त्याची आई वारली होती. त्यामुळे सारे घरकाम श्रीधरच करीत होता. त्याला वाटलं कीं सून आली कीं घरांतले कामकाज बचेल आणि श्रीधरला थोडा आराम मिळेल. पण कुणीही गांवकरी शंकरला जांवई म्हणून पत्करायला तयार नव्हता.

एके दिवशी श्रीधरला कळलं कीं जवळच्याचा एका गांवात एक स्थळ आहे. तिथे जाण्यापूर्वी त्याने शंकरला सत्रांदा बजावून सांगितलं, "हे बघ, त्यांच्या घरी पोचलास कीं दाराच्या पाठीमागे चपला काढून ठेव. आंत शिरलास कीं खुर्चीवर बैस. प्रश्न विचारला तरच त्याचं उत्तर दे."

शंकरने वडिलांची सूचना ऐकली. सारं कांही समजलंय अशा अर्थी डोके हलवले. आणि विसरुं नये म्हणून वडिलांच्या सूचना तो पुन्हां पुन्हां रस्त्यांत स्वतःशीच घोकत राहिला. त्यांत थोडी शब्दांची उलटापालट झाली.



२५ वर्षांपूर्वीची चांदोबात प्रकाशित झालेली कथा



जेव्हां ते दोघे त्या मुलीच्या घरी पोंचले, तेव्हां शंकरने चपला खुर्चीवर ठेवल्या, आणि स्वतः दाराच्यामागे जाऊन बसला. शंकरकडे बघूनच त्या मुलीच्या बापाला त्याच्या अकलेची कल्पना आली. त्याने मुलगी दाखवायला सपशेल नकार दिला आणि म्हटले, "असल्या वेड्याला कांही आम्ही मुलगी देणार नाही. या क्षणीं तुम्ही इथून निघून जा."

घरी परतल्यानंतर श्रीधरने शंकरला रागावून म्हटले, "मी जे कांही सांगितलं, त्याच्या उलट तू वागलास. या जन्मी तुझे लग्न होणे कांही शक्य दिसत नाही. एखादा माथेफिरु माणूसच तुला मुलगी देईल!"

असला माथेफिरू सासरा शोधायला शंकर त्या रात्रींच घरांतून निघाला. तीन दिवस चालल्यानंतर चौथ्या दिवशी तो एका डोंगराळ भागांत पोंचला. तिथल्या एका गुहेतून विचित्र आवाज येत होता. एक राक्षस त्या गुहेत झोंपला होता. त्याच्या घोरण्याचा तो आवाज होता.

शंकर गुहेत गेला. त्याला वाटलं कीं आपले वडील माथेफिरू म्हणाले, तो हाच असावा. तो स्वतःशी बडबडू लागला, "बरं झालं, मी योग्य ठिकाणीच येऊन पोंचलो आहे. मी येणार आहे हे ह्याला बहुधा समजलं असेल, म्हणून घाबरुन तो या गुहेंत लपला आहे." त्याने राक्षसाचे केस घट्ट पकडले आणि ते ओढून तो त्या राक्षसाला उठवायला लागला.

राक्षसाने जांभई देऊन ओरडायला सुरवात केली, "मला उठवायचं धाडस कुणी केलं?"

"अरे माथेफिरू, तुझ्या मुलीचं माझ्याशी लग्न केल्याशिवाय तू कुठे पळतो आहेस? अगोदर हुंडा दे आणि तुझ्या मुलीचं माझ्याशी लग्न करुन दे!" आणि असं म्हणून त्याने राक्षसाचा कान पिरगाळला.

राक्षस संतापाने काळानिळा झाला. तो शंकरचे तुकडे करुन त्याला खाऊन टाकणार होता, तेवढ्यांत आंतून राक्षसीणबाई बाहेर आली. तिने शंकरचे बोलणे ऐकले. तिला एक जाडजूड मुलगी होती. खूप प्रयत्न करुनदेखील तिचे लग्न कांही केल्या जमत नव्हते.

म्हणून राक्षसी बाहेर येऊन नवऱ्याला म्हणाली, "तुम्हाला जरा विचार करता येत नाही कां? जांवई घरी आलाय, त्याचा आदर सत्कार नको कां आपण करायला?"



"ठीक, ठीक! पण मुलगी कुठे आहे?" शंकरने इकडेतिकडे बघत विचारले.

"ती फिरायला गेली आहे. यायला दोनचार घटका तरी लागतील. तुम्ही दमून आला आहात थोडाफार फराळ करा आणि जरा वेळ विश्राम करा." राक्षसीने म्हटलं. तिने फळें आणली, दूध आणले आणि हा फराळ करुन शंकर आंतल्या दुसऱ्या गुहेत जमिनीवर पसरलेल्या कातड्यावर झोंपी गेला.

शंकरची प्रकृति उत्तम होती. राक्षसाला तर शंकरला खाऊन टाकायचे होते. पण त्याला अडवण्यासाठी दोन्ही गुहांच्यामधे राक्षसी पहारा करीत बसलेली होती.

मध्यरात्री तिची मुलगी आली आणि ओरडाआरड करुं लागली. शंकर जागा झाला आणि त्या मायलेकींचे बोलणे तो ऐकूं लागला.

"इतक्या वर्षानंतर हा नवरामुलगा तुला शोधत इथे आलाय" आई आनंदून गेली होती. "कुठे आहे? कुठे आहे?" म्हणत ती राक्षस कन्यका शंकर झोंपला होता तिथे आली.

शंकरने हळूंच डोळे किलकिले करुन पाहिले नि तो एकदम घाबरला. आईबापापेक्षां मुलगी जास्तच कुरुप नि भेसूर होती.

शंकरला बघून ती राक्षसकन्यका उद्गारली, "अगदी लोण्यासारखा छान आहे हा!"

"त्याचे हातपाय तोडून त्याला खाऊन टाकायचा बेत नाही ना तुझा? त्याच्याशिवाय दुसरा नवरा नाही कुणी मिळणार!" राक्षसीने लेकीला इशारा दिला.

"ठीक आहे. मी त्याला कांही नाही करणार. पण बाबांनी याला खाल्लं तर?"

"म्हणूनच तर मी इथे राखण करीत बसले



आहे. मी आता जरा वेळ फिरायला जाऊन येते. तोपर्यंत तू ह्याच्यावर लक्ष ठेव.'' असं म्हणून राक्षसी बाहेर निघून गेली.

तिची मुलगी जशीजशी शंकरला निरखून बघत होती, तसातसा त्याला खाण्याचा विचार तिच्या मनांत प्रबळ होऊं लागला तिला वाटलं, ह्याला जर इथें गुहेतच खाल्लं, तर आई तिलाच मारुन टाकील. म्हणून तिने शंकरला उठवले आणि म्हटले, ''चला, लग्नाची सगळी तयारी पूर्ण झाली आहे.''

तिचा कुटिल हेतू शंकरच्या लक्षांत आला. तो म्हणाला, ''आधी हुंड्याचे धन इथे ठेव, नंतरच लग्न होईल.''

राक्षसाची मुलगी आंत गेली आणि तिने एका चामड्याच्या थैलींत रत्ने, जवाहिर व सोने भरले. ती थैली तिने शंकरच्या हातांत दिली व दोघेही गुहेच्याबाहेर आले.

बाहेर पडल्यानंतर शंकरने तिला म्हटले, ''लग्न होण्यापूर्वी स्नान करायला लागतं. तेव्हां मला स्नान केलंच पाहिजे.''

ती त्याला एका सरोवराच्या कांठावर घेऊन गेली. त्याने हातांतल्या थैलीसकट पाण्यांत उडी मारली आणि तो पाण्याखाली पोहत जरा दूर गेला व थांबला.

राक्षसकन्येने थोडा वेळ वाट पाहिली, पण तो कांही वर येईना. तिला पाण्याची भीती वाटत असे. तिला वाटलं कीं हा बुडून मेला असेल. सकाळीं त्याचे प्रेत पाण्यावर तरंगेल, तेव्हां त्याला आरामांत खाऊन टाकता येईल. असा विचार करुन ती गुहेकडे निघून गेली.

ती दिसेनाशी झाल्यानंतर शंकर पाण्यांतून बाहेर आला. ती नक्की गेली आहे याची खात्री करुन तो थैलीसकट घरी पोंचला.

आता पैसाही भरपूर हाती आला होता. तेव्हां शंकरचे लग्न ठरले. श्रीधरला समजलं कीं तो सारखा मुलाला रागवत होता म्हणूनच मुलगा असा वेंधळा झाला. वास्तविक पाहिलं तर तो कांही नालायक नव्हता, उलट लायकच ठरला.

आपण बावळट नाही हे सिद्ध करायला शंकरला फार काळ लागला नाही.



शक्तिपुरची गादी बळकावणाऱ्या वीरसिंहाला माहिती मिळते कीं जयनगरमधे जमीन खणताना एक सोन्याची मूर्ती मिळाली आहे. सुखदेवाकडून ती मूर्ती आणण्यासाठी तो सेनापती जयसिंहाला पाठवतो. सरदार सुखदेवाला रक्तपात नको असतो. म्हणून तो मूर्ती भेट देतो. पण नावेतून नेताना ती मूर्ती वादळांत नाहीशी होते. नंतर वीरसिंहाला समजते कीं एका नव्या मंदिरात त्या मूर्तीची स्थापना होणार होती. सरदाराची मुलगी सुकन्या वीरसिंहाच्या लग्नाच्या प्रस्ताव मान्य करते.

22

# आर्य

## अज्ञात राजकुमाराचे रहस्य

चित्र :

सुखदेव सुकन्याच्या निर्णयाबद्दल साशंक आहे.

मुली, तू नीट विचार केला आहेस ना?

होय बाबा! ह्या मूर्तीचे रक्षण करण्यासाठी मी हे बलिदान करायला तयार आहे.

फार छान! हे राजकन्ये! तुला राणी सारखं ठेवण्याचा मी प्रयत्न करीन.

माझ्या मुलीची पूजा पूर्ण होऊं दे.

तिचे योग्य स्वागत करण्यासाठी मी महालांत परत

वीरसिंह घोड्यावर स्वार होऊन जयसिंहाला कांहीतरी आज्ञा देताना दिसतो.

मी एक हत्ती पाठवीन. तुला राजकुमारी-बरोबर मार्गरक्षक होऊन यायचं आहे.

वीरसिंह गेल्यानंतर सरदार आणि सुकन्या एकटेच राहातात.

मी केवळ राजकुमार आर्यच्या सल्ल्यानुसार काम करते आहे. लक्षांत ठेवा, त्यानेच मूर्ती बाहेर काढली आहे.



# सत्य अग्निसमान असते

रात्रीचे जेवण करुन सगळी मुले गोष्ट ऐकायला आली, तेव्हां सावित्रीआजी एक पुस्तक वाचीत होती. तेव्हां दहा वर्षांच्या रामने तिला विचारलं, ''काल आमचे काका एका मित्राला सांगत होते, ''कृष्णा स्वतःला फार हुशार समजतो आणि सर्वांचा मामा करायचे बेत आंखत असतो. पण सत्य हे नेहमी अग्निसमान असते. त्याला शिक्षा झाली ते बरंच झालं!'' हे बोलणं मी ऐकलं. आजी सत्य अग्निसमान असते याचा अर्थ काय ग?''

आजीने मोठ्या प्रेमाने त्याला जवळ घेतले आणि म्हटले, ''कांही लोक लपूनछपून वाईट कामें करतात. पण खरी गोष्ट पुढे केव्हांतरी उघडकीस येते. तुझ्या काकांनी हेच सांगितलं. शरद आणि कमल असंच करीत होते. त्यांची गोष्ट मी सांगते.'' आणि आजीने पुढील गोष्ट सांगितली.

एकदा गिरीपुरचा जमीनदार माधव ह्याच्या कचेरीत एक तरुण आला, त्याने माधवला सांगितलं, ''मालक, माझं नांव विश्वनाथ आहे. मी सुशिक्षित आहे. माझ्या शिक्षणाचा उपयोग होऊं शकेल अशी मला कुठेतरी नोकरी आपण मिळवून दिलीत तर फार मोठे उपकार होतील.''

जमीनदाराने म्हटले, ''माझ्या कचेरीत शरद आणि कमल हे दोघेजण आहेत. ते बरीच वर्षे इथे काम करीत आहेत. एक महिनाभर तू त्यांच्या-बरोबर काम कर. त्यानंतर जर त्यांनी तुझे काम नांवाजले, तर मग पुढे बघूं.''

विश्वनाथ हुशार व हजरजबाबी होता. त्याची कामसू वृत्ती त्या दोघांनाही आवडली. शरद व कमलला एकेक उपवर मुलगी होती. त्या दोघांनाही विश्वनाथ जांवई म्हणून आवडला होता.

संधी मिळताच शरद विश्वनाथला सांगू लागला, ''तू कमलवर विश्वास ठेवूं नकोस हं! तो खोटे हिशेब दाखवतो आणि मालकांना फसवतो. त्याची पापाची कमाई आहे.''

कमलनेही विश्वनाथला सांगितलं, ''शरद प्रत्येक बारीकसारीक गोष्टीचे रडगाणे जमीनदाराकडे गात बसतो, आणि त्यांच्याकडून पैसे उकळतो. बायको आजारी आहे असं नेहमी खोटंच सांगतो. असल्या खोट्या माणसाचे बोलणे ऐकून सोडून द्यायचं असतं. तुझही नांव त्यांत खराब होईल.''

त्या दोघांच्या एकमेकांबद्दलच्या चहाड्या ऐकून विश्वनाथला वीट आला. खरी गोष्ट काय आहे ती जाणून घेण्यासाठी त्याने आपल्या एका दूरच्या नातलगाला व पाटलाला भेटून, त्या दोघांबद्दल सांगितले.

सारी हकीकत ऐकल्यानंतर पाटील म्हणाला, ''दोघेही लबाड आहेत. श्रीरामनवमीच्या उत्सवासाठी जमीनदाराने जी रक्कम दिली होती, त्यांतील बरीच मोठी रक्कम शरदने पळवली आहे. आता कमलने सुद्धां धर्मशाळा चालवण्यासाठी जी रक्कम दिली होती, त्यांतली अर्धीअधिक रक्कम कमलने खिशांत घातली. पण जमीनदारसाहेबांचा दोघांवर फार विश्वास आहे. म्हणून आम्हाला त्यांच्यापाशी खरी गोष्ट सांगायचे धाडस होत नाही.''

विश्वनाथ जमीनदाराला एकांतात भेटला. गेले वीस दिवस त्या दोन्ही वरिष्ठ अधिकाऱ्यांनी काय काय केलं, त्याचा अहवाल दिला. त्याचप्रमाणे गांवचा पाटील आणि प्रमुख यांनाही ते दोघे आवडत नाहीत. त्यांच्या दृष्टीने ते दोघेही बदमाष व लबाड आहेत. विश्वनाथ पुढे म्हणाला कीं जमीनदाराची संमती असेल तर ते दोघे कचेरीत येऊन त्या दोन्ही लुच्च्या अधिकाऱ्यांचे पितळ उघडे करायला तयार आहेत.

विश्वनाथची माहिती ऐकून जमीनदार क्षणभर अवाक् झाला. नंतर स्वतःला सावरत म्हणाला, ''पाटील आणि गांवप्रमुखांनी साक्ष द्यायची कांही आवश्यकता नाही. त्यांचा प्रामाणिक स्वभाव मला ठाऊक आहे. सत्य अग्निसमान असते ना? किती दिवस ते लपून राहील? या क्षणापासून मी तुला शरद व कमलसकट सर्व कर्मचाऱ्यांवरचा अधिकारी म्हणून नेमतो आहे.''

आजीने गोष्ट सांगून म्हटले, ''आपली वाईट कामें लपवायचा कितीही प्रयत्न केला, तरी खरी गोष्ट कधीतरी उघडकीस येते. म्हणून चांगली कामे करण्याचीच संवय लावायची. आता कळलं ना, सत्य अग्निसमान असते याचा अर्थ?'' मुलांनी उत्साहाने माना डोलावीत म्हटले, ''आजी, अर्थ कळला!''

आजीच्या गोष्टी - ५ : ललित जोशी



# सर्वोत्तम कथा

**न्यायी राजा राजवर्मा :**

राजा म्हणाला मी कोणामधेही फरक केलेला नाही. रखवालदार हा रखवाली करण्यासाठीच नेमला होता. त्याने दरोडेखोरास पकडले. त्यांत विशेष असे कांहीच नव्हते. कारण रखवालदाराला चोर दरोडेखोर पकडण्याचा, रक्षण करण्याचा, पगार दिला जात होता. तसे शिक्षकाचे नव्हते. शिक्षकाने ओरडून लोकांना जागे करुन गुंडाला पकडवून दिले. शिवाय तो निवृत्त शिक्षक शारीरिक दृष्टया कमजोर होता. तो त्या गुंडाशी लढू शकत नव्हता. तरीही युक्तीने त्याला पकडून दिले. शिवाय तो त्याच्या नोकरीचा भागही नव्हता. किंवा वेगळा पगार मिळत नव्हता, वा बक्षिसाची अपेक्षा नव्हती.

राजाने रखवालदाराला सोन्याची अंगठी बक्षीस दिली. ही त्याने बजावलेल्या कामगिरीची शाबासकी व राजाच्या मनाचा मोठेपणा होता.

शिशु असो वा समाजातील इतर कोणीही व्यक्ति, त्यांची आपल्या समाजाशी बांधिलकी असते. समाजात वावरताना त्याची प्रत्येकाला जाणीव रहावी म्हणून राजाने शिक्षकाला हिऱ्यांचा हार देऊन, समाजांतील प्रत्येक माणसाने वय, पगार, पद, याचा विचार न करता दक्ष रहावे, व देशसेवा करावी, यासाठी बक्षीस दिले.

चोर व दरोडेखोर समाजाचे शत्रूच आहेत. त्यामुळे राजाने त्यांच्यात फरक करण्याचा प्रश्नच येत नव्हता.

प्रसाद दत्तात्रय जाधव
८७/२, शंकरराव सुतार चाळ, आझादवाडी, दीपक केबल शेजारी,
कोथरुड, पुणे - ४११ ०३८. (महाराष्ट्र)





# सासूसुनेचे भांडण

अरुंधतीने कोणत्या मुहूर्तावर सासरी पाऊल ठेवले होते कोण जाणे, पण सासूसुनेचे क्षणभर कधी पटले नाही. सासूने कांही सांगितले तर सून ते बोलणे खोडून काढायची. सुनेने कांही सुचवले तर सासू त्याला जोरदार विरोध करायची. सुनेने जर नवीन साडी नेसून, केंसात गजरा माळून मैत्रिणींकडे जायचा बेत ठरवला, कीं सासूबाईंची बडबड सुरुं व्हायची. सासू म्हणायची, "इतका वेळ नटूनथटून कुठे जायचंय तुला? आरशासमोर सारखी वेड्यासारखी उभी असतेस, ते कांही चांगलं नाही. घरादाराची वाट लागेल अशाने!"

"मी चांगले कपडे वापरले तर तुम्हाला कां राग येतो? मला वाटेल ते मी करीन. तुम्ही मला कांही एक सांगू नका." अरुंधती आपल्या सासूला, पार्वतीला ताळ्यांत उत्तर द्यायची व तडक बाहेर निघून जायची.

पार्वतीने जर गोड पदार्थ करायला सांगितला तर "ह्यांना गोड नको असतं," "असं म्हणून अरुंधती तो विचार उडवून लावीत होती. तिच्या स्वरांत मात्र कडूपणा पुरेपूर भरलेला होता.

बिचारा अमर दिवसभर शेतांत राबराबून संध्याकाळी दमूनभागून घरी आला कीं या दोघींचा वादविवाद सुरुंच होत असे. अमर जरा हळव्या स्वभावाचा होता. त्यामुळे आईला किंवा बायकोला कांही सांगणे त्याला कांही जमत नव्हते. त्याची स्थिती अगदी केविलवाणी झाली होती.

एके दिवशी संध्याकाळी तो घरी जायच्याऐवजी शेताच्या बांधावर बसूनच राहिला. संन्यास घेऊन टाकावा कीं पळून जावे? असे विचार त्याच्या मनांत घोळत होते. त्याच वेळेला त्याचे मित्र भीम आणि राम त्याला पाहून जवळ आले व त्यांनी विचारले, "अमर, काय झालं रे? चेहरा कां असा उदास? आत्ता तर तुझं लग्न झालंय; घरी पळायचं सोडून इथेच कां रे असा बसला आहेस?"

अमरने त्यांना त्याचे दुःख सांगून म्हटले, "हे

माझं दुर्दैव आहे. त्यांतून वाचण्याचा मार्गच नाही. मी तर मी तर अगदी कंटाळून गेलो आहे. करणार तरी काय? माझं जाऊं दे, तुम्ही दोघे आत्ता कुठे निघालात?''

रामने उत्तर दिलं, ''शेजारच्या गांवात नाटकाचा खेळ आहे. त्यांत आम्हीही आहोत. रामनवमीच्या निमित्ताने हा कार्यक्रम होणार आहे.''

भीमने अमरला धीर देत म्हटले, ''पत्नी आणि आई यांच्या भांडणावरुन तू इतका उदास होऊं नकोस हां! तुझी ही समस्या लौकरच सुटेल. धीर धर.''

''हो, हो, भीमचे शब्द खरे ठरतात नेहमी. तू अगदी निश्चिंत मनाने घरी जा.'' राम म्हणाला.

आठवडा उलटला. पौर्णिमेची रात्र होती. अमरला गाढ झोंप लागली होती. मागील दारच्या विहिरीजवळ अचानक जोराचा आवाज झाला.

सासू व सून दोघीही जाग्या झाल्या आणि दार उघडून त्या अंगणात गेल्या.

विहिरीच्या कठड्यावर दोन जटाधारी भुतें बसली होती. हातांतले दागिन्यांचे गांठोडे जोरजोरांत हालवत ते आपसांत बोलत होते. ते बघून सासूसुनेची बोबडीच वळली.

या दोघींना पाहून ती भुते खाली उतरुन त्यांच्याशी बोलायला लागली. ''घाबरं नका. ज्याप्रमाणे मनुष्यांच्यात चांगली माणसे असतात, त्याचप्रमाणे भुतांच्यामधेही चांगली भुते असतात. खरं सांगायचं तर आम्ही जिथें सास्वासुना भांडत नाहीत अशा घराच्या शोधांत आहोत. त्यांना हे दागिन्यांचं गांठोडं आम्हाला द्यायचं आहे. गांवात आम्ही खूप शोध घेतला,



पण सासूसुनेचं भांडण नसणारं एकही घर आम्हाला सांपडलं नाही. या घरांतही दोघींचं पटत नसावं बहुतेक!''

पार्वतीने कसाबसा जीव मुठीत धरुन त्यांना विचारले, ''पण हे दागिने तुम्हाला कुठे मिळाले?'' आणि ती हळूंहळू पुढे आली.

दुसऱ्या भुताने आपले डोके खाजवीत तिला उत्तर दिले, ''ती एक लांब कहाणी आहे. पण थोडक्यांत सांगायचं तर परवां रात्रीं आम्ही अरण्यांत फिरत होतो, तेव्हां दोन चोरांना आम्ही दिसलो. एकाच्या हातांत दागिन्यांचे हे गांठोडे होते. आम्हाला भिऊन ते ओरडत पळाले आणि गांठोडे तिथेंच टाकून गेले.''

त्यावर पार्वती कांही बोलणार तितक्यांत अरुंधतीने तिला थांबायची खूण केली आणि तिने भुतांना विचारले, ''तुमचे बोलणे विश्वास ठेवण्याजोगे आहे खरें! हे दागिने गोरगरीबांना तुम्ही वाटायला हवे होतेत. पण न भांडणाऱ्या सासूसुनांनाच ते द्यायची तुमची इच्छा कशापायी आहे?''

लांब केसांच्या मोठ्या भुताने गंभीरपणे सांगितलं, ''सूनबाई, तुम्ही फारच कठीण प्रश्न विचारलात. आम्हीही तुमच्यासारख्या भांडकुदळ सासूसुना होतो. आमच्या घरासमोर एक मंदिर होते. तिथें एक साधू ध्यानधारणा करीत होते. आमच्या घरांतही सासूसुनांचा वादविवाद नि भांडणे होत होती. त्या आवाजाने साधूमहाराजांना फार त्रास झाला. त्यांनी चिडून आम्हाला भुतें बनाल असा शाप दिला. आम्ही त्यांच्या पाया पडलो आणि क्षमा मागितली, तेव्हां



त्यांनी सांगितलं कीं ज्या घरांत सासू नि सून खरोखरीच प्रेमाने राहात असतील, त्यांचे तुम्ही कल्याण केलेत तरच तुम्ही दोघी शापमुक्त व्हाल, आणि तुम्हाला फिरुन मनुष्यरूप प्राप्त होईल.''

''तुम्ही हे गांठोडे आम्हाला द्याल ना?'' अरुंधतीने विचारले.

''अवश्य देऊं. पण त्यासाठी तुम्हीदेखील आम्हाला कांहीतरी दिलं पाहिजे.'' लहान भूत म्हणाले.

दोघींनी एकासुरांत म्हटले, ''नक्की देऊं. सांगा, काय हवंय?''

''पुढच्या पौर्णिमेच्या दिवशी हे गांठोडे घेऊन आम्ही पुन्हां येऊं. कारण या दागिन्यांच्या लोभाने नव्हे तर तुम्ही दोघी खरंच एकमेकींशी चांगल्या वागता आहात हे आम्हाला पटायला हवं ना!

आम्ही तुमच्यावर लक्ष ठेवून राहू. चला, आता पहाट होत आलीय. तुम्ही आता जा नि तुमच्या कामाला लागा.'' दोन्ही भुतांनी सांगितलं.

दोघींनी आनंदाने माना डोलावल्या आणि एकमेकींचा हात पकडून त्या घरांत गेल्या. त्या गेल्यानंतर ती दोन्ही भुतेही भिंतीपलीकडे उडी मारुन गेली आणि दिसेनाशी झाली.

दुसऱ्या दिवसापासून सासू व सून मायलेकीं-प्रमाणे वागायला लागल्या. त्यांच्या मनांत गैरसमज निर्माण होण्याचे थांबले. एकमेकींशी त्या समजूतदारपणे वागू लागल्या. त्यांच्यामधे झालेला हा बदल बघून अमरला फारच आश्चर्य वाटले, आणि आनंदही झाला.

महिनाभराने पौर्णिमा आली; टिपूर चांदणे पडले होते. सासू व सून अधीर होऊन या भुतांची वाट पाहात होत्या. दोघींना कांही झोंप येईना. दागिन्यांचे गांठोडे केव्हां मिळणार त्यासाठी त्या अगदी कासावीस झाल्या होत्या. पण सूर्योदयाची वेळ झाली तरी भुते कांही आली नाहीत.

पार्वतीने अरुंधतीला निराशेने म्हटलं, ''अग, त्या भुतांनी सांगितल्याप्रमाणे आपण प्रेमाने महिनाभर वागलो खऱ्या, पण कधीकधी मला तुझा राग येत होता, आणि मी तुझ्याशी प्रेमळ-पणाचे नाटक करीत होते. हे बहुतेक भुतांनी पाहिलं असेल, म्हणून ते आले नाहीत.''

त्यावर अरुंधतीने गंभीरपणे म्हटलं, ''सासू-बाई, माझंही तसंच झालं होतं. पण दागिने गेले तर जाऊं द्या. यापुढे आपण दोघींनी वाद न घालता प्रेमाने वागायला काय हरकत आहे? एकमेकींचा मान राखून मायलेकींसारखं, मैत्रिणीसारखं राहिलो तर? गेला महिनाभर आपल्यामधे कधीही गैरसमज, भांडण झालं नाही; असंच पुढेही राहिलो तर आपला मुलगाही खूष होईल.''

''हो हो, तुझं अगदी बरोबर आहे. लहान असलीस तरी विचार अगदी थोरांसारखा आहे हो!'' असं म्हणून पार्वतीने सुनेचे भरपूर कौतुक केले.

शेजारच्या खोलीत झोपलेल्या अमरने हे बोलणे ऐकले. दोघींची दिलजमाई झालेली पाहून त्याला फार आनंद झाला. पण त्याचे मित्रच भुताचा वेष घेऊन होते आणि त्यामुळे दोघींचा स्वभाव बदलला, हे त्याला ठाऊक नव्हते.







# भल्लूक मांत्रिक

## 19

*(जितकेतू राजाने घोषणा केली कीं मायामर्कटाचा मंत्रदंड जो आणून देईल त्याच्याशी मी दत्तक घेतलेल्या माझ्या मुलीचा विवाह करीन आणि त्याला अर्धे राज्य बक्षीस देईन. त्यानंतर मायामर्कटाला किल्ल्याच्या भिंतीवर बसलेला पाहून, वन्यवासी तरुणाने त्याच्यावर बाण सोडला. मर्कटाने तो बाण कालीवर्मा आणि अस्वल्या मांत्रिकाच्या दिशेने फेंकला. त्यानंतर...)*

बाणाची जखम होण्यापूर्वीच मायामर्कट ओरडत सुटला ''माझा मंत्रदंड कुठे आहे?'' तो आवाज सर्वांनी ऐकला. त्यावर अस्वल्या मांत्रिक चकित होऊन म्हणाला, ''अरे शिष्या कालीवर्मा, तू हा प्रश्न ऐकलास ना? मर्कटाने माझा मंत्रदंड हरवला तरी आहे, किंवा कुणीतरी तो चोरलेला आहे. याचा हा असाच अर्थ होतो ना?''

कालीवर्मा म्हणाला, ''होय गुरुजी, कुणीतरी या वानराकडून तो मंत्रदंड चोरला आहे. पण तो कोण आहे, हे आपल्याला कसं कळणार? आपल्याला शहरांत घुसतादेखील येणार नाही. किल्ल्याचे दरवाजे लोखंडी आहेत. दुर्मुखराजाच्या किल्ल्याचे दरवाजे लांकडी होते. म्हणून आपण तिथे आग लावून आंत घुसू शकलो.''

त्यावर अस्वल्या मांत्रिक म्हणाला, ''आज रात्रीं आपण किल्ल्याच्याबाहेरच डेरा टाकून तिथे रात्र काढू या. आणि किल्ल्याची भक्कम दारे कशी तोडायची, त्यावर उद्यां शांतपणे विचार करुं.''



हे ऐकून उग्रदंड राक्षस दांत विचकत बोलला, ''माझ्या दगडी गदेच्या प्रहाराने किल्ल्याची दारें मोडली नाहीत, पण भिंती तोडता येतात कां ते पाहातो.'' असं म्हणून त्याने गदेने किल्ल्याच्या भिंतीवर प्रहार केला. त्यामुळे भिंतीतले एकदोन दगड सुटून खाली गडगडले. दुसऱ्याच क्षणीं भिंतीवर उभे असलेल्या सैनिकांनी उग्रदंडावर बाणांचा वर्षाव केला.

अस्वल्या मांत्रिकाने उग्रदंडाला तिथून हलण्याची आज्ञा केली आणि कालीवर्माला म्हटले, ''कालीवर्मा, माझ्या मनांत शंका आहे कीं आणखी कुणा मांत्रिकाने मर्कटाच्या हातांतून माझा मंत्रदंड चोरला असेल.''

राजवाड्यासमोर अस्वलाच्या थपडेने भिऊन गेल्यामुळे त्याच्या हातातून मंत्रदंड जो उडून दूर फेकला गेला होता, तो आपल्या झोळींत घालणारे दोन तरुण बैरागी, नगराबाहेरच्या तलावाच्या कांठावर वडाच्या झाडाखाली मंत्रजप करणाऱ्या आपल्या गुरुकडे जात होते.

त्यांच्यापैकी जो मोठा होता त्याने धाकट्याच्या हातातून मंत्रदंड आपल्या हातांत घेत म्हटले, ''अरे भाऊ, गुरुजींच्या हातांत हा मंत्रदंड सोंपवण्यापूर्वी त्याची काय शक्ती आहे, ती आपण पडताळून पाहूं या.''

छोट्या बैराग्याने होकारार्थी मान हालवली. तेव्हां मोठ्या बैराग्याने मंत्रदंड वर उचलून ''अहूं इहीं, उहूं खजिन्याचे दार उघडा'' असा मंत्रजप करीत तो दंड जोराने जमिनीवर मारला.

त्यावेळेला जो मोठा आवाज झाला, तो ऐकून बैरागी गुरुजी डोळे न उघडताच म्हणाला, ''अरे, भैरव बैरागीच्या समोर चुकीचे मंत्र उच्चारणारा पापी कोण आहेरे? आताच मी त्याचे भस्म करुन टाकतो.''

असं म्हणून गुरुजी बैराग्याने आपला पितळेची व चांदीची फुले जडवलेला लहान दंड वर उचलला. ही गुरुवाणी ऐकून दोघेही शिष्य फारच भेदरले. तितक्यांत मंत्रदंडाच्या प्रहारामुळे जमिनीत एक भेग पडली आणि त्यांतून कारंज्या-सारखी पाण्याची एक धारा वर उसळली. ती बघून ते थक्क झाले. पण गुरुजी बैरागी मात्र चिडला होता. त्याने डोळे उघडले आणि दांतओठ आवळले. त्याबरोबर पाण्याची ती धार त्यांच्यावरच पडूं लागली.

''गुरु प्रभु'' अशी आरोळी ठोकत भैरव बैरागी एकदम उठून उभा राहिला व म्हणाला, ''अरे, विजांच्या लखलखाटाशिवाय हा पाऊस कसा?'' आणि दूरवर उभे असलेल्या आपल्या शिष्यांना पाहून त्याने विचारले, ''अरे, जमिनींतून आभाळा-कडे पाण्याची धार झेपावते आहे! किती आश्चर्याची गोष्ट आहे ही!''

हे बोलणे ऐकून दोघा शिष्यांनी धीर एकवटून विचारले, ''भैरव गुरुजी! आम्ही आमच्या मंत्रशक्तीने ही जलधारा जमिनीतून वर आणली आहे. आता आमचे शिक्षण संपले ना?'' गुरुजी चकित होऊन शिष्यांजवळ गेला. आपल्या मोठ्या शिष्याच्या हातांतला मंत्रदंड पाहून थक्क होऊन म्हणाला, ''अरे, हे काय? हा तर मंत्रदंडासारखा दिसतोय.''

''गुरुजी, हा मंत्रदंडासारखा नव्हे, मंत्रदंडच आहे. आम्ही तीन शब्द उच्चारले आणि खजिन्याचे दरवाजे उघडायला सांगितले, पण याने तर पाताळगंगाच वर आणली.'' मोठ्या शिष्याने सांगितले.

त्यानंतर भैरव बैराग्याने तो मंत्रदंड आपल्या शिष्याच्या हातांतून घेतला, जरा तो इकडेतिकडे फिरवला आणि म्हटले, ''हा मंत्रदंड कुणा मंत्रिकाच्या हातांत गुळगुळीत झालेला आहे. पण हा तुमच्या हातांत कसा काय आला? तुम्ही हा चोरलात कीं काय? तो मांत्रिक कुठे आहे?''

मोठ्या शिष्याने धाकट्याला गप्प बसण्याची खूण केली, गुरुजीच्या हातून चटकन तो मंत्रदंड घेतला, व नंतर तो म्हणाला, ''गुरुजी! सर्वांत अगोदर आपण ही पाण्याची धार थांबवायला हवी. नाहीतर कांही प्रहरांतच सारे नगर पाण्या-



खाली बुडेल.'' असं समजावून त्याने मंत्रदंड वर उचलीत म्हटले, ''आधी खजिन्याचा दरवाजा बंद कर.'' आणि पाणी येत असलेल्या जागेवर मंत्रदंडाने त्याने पुन्हां एकदा प्रहार केला.

यावेळी मात्र मंत्रदंडाच्या आघाताने जमिनीवर एक मोठा खड्डा पडला व त्याचा प्रचंड मोठा आवाज झाला. ते बघून भैरव बैरागी उडी मारुन म्हणाला, ''अरे, तुम्ही कशाही प्रकारे हा मिळवला असेल, पण तुम्ही हा मंत्रदंड मला भेट म्हणून आणला आहे ना!

वा, वा, तुमच्या गुरुभक्तीवर मी प्रसन्न आहे. मला वाटतं आता पाण्याचा प्रवाह बंद झाला आहे, आणि खजिन्याची दारेही उघडली आहेत. तुम्ही दोघे या खड्ड्यांत उतरा आणि खजिन्याचा शोध घ्या.''

मंत्रदंडाकडे साशंक नजरेने बघत छोटा शिष्य



म्हणाला, "भैरव गुरुजी! या मंत्रदंडाच्या शक्तीवर विश्वास ठेवला तर आपण कुठल्यातरी संकटात सांपडणार अशी मला भीती वाटतेय. आपण खजिन्याचे दरवाजे उघडायला सांगितले, तर याने पाण्याची धारच उसळत ठेवली! आपल्याला खजिना मिळेलच अशी कांही खात्री देता येत नाही."

त्यावर विचार करीत भैरव बैरागीने शिष्याच्या हातांतला मंत्रदंड घेतला व तो निरखत असताना मोठा शिष्य हंसून त्याला म्हणाला, "गुरुजी, याचा किती महिमा आहे ते आम्हाला माहीत नाही. एका मर्कटाला त्याची शक्ती ठाऊक आहे; त्याच्याकडचा हा दंड आमच्या हातांत आला. तो मर्कट यावेळी जितकेतु राजाच्या महामंत्री आहे. त्या राजाने घोषणा केली की हरवलेला हा दंड आणून देणाऱ्याला आपले अर्धे राज्य राजा देईल, व त्याबरोबर आपल्या मुलीचा विवाहदेखील त्या मनुष्याशी होईल."

अर्धे राज्य आणि राजकुमारीची गोष्ट ऐकल्या-बरोबर भैरव बैरागी उत्साहाने जोरांत ओरडला, "गुरु प्रभु!" आणि पुढे म्हणाला, "अरे माझ्या शिष्यांनो, तुम्ही ही इतकी महत्वाची गोष्ट इतका वेळ माझ्यापासून कां बरं लपवून ठेवलीत? तर मग अर्धे राज्य मी घेईन आणि तुम्हा दोघांपैकी एकाचा विवाह राजकुमारीशी होईल. हा निर्णय तर फारच छान आहे, पण राजेमहाराजे बोलतात तसं करतातच असं नाही. आपल्या हातून राजाने मंत्रदंड घेतला आणि आपली डोकी उडवली तर आपण काय करणार?" असं म्हणून खाली मान घालून तो वडाच्या खोडाजवळून बाजूला सरला. आपल्या गुरुच्या तोंडून हे शब्द ऐकल्यावर बैराग्याच्या शिष्यांच्या मनांतही शंका आली की राजाच्या शब्दावर पूर्ण विश्वास ठेवता येणार नाही. धाकटा शिष्य त्या जमिनीवर पडलेल्या खोल खड्ड्याकडे गेला आणि मोठ्या शिष्याच्या हाताच्या आधाराने त्या भुयारांत उतरला. खाली बघत तो एकदम चित्कारला, "भैरवगुरुजी! असं वाटतंय कीं इथे पायऱ्या आणि भुयारी वाटही आहे. या मंत्रदंडामुळे आपल्यासाठी खजिन्याचा दरवाजा उघडून ठेवलेला आहे."

भैरव बैरागी उत्साहाने आपल्या शिष्यांपाशी आला आणि म्हणाला, "अरे माझ्या शिष्यांनो, आपल्या नशिबाने जर इथें गाडलेला खजिना हातांत आला, तरी आपण संतुष्ट होऊं. त्यानंतर हा मंत्रदंड राजाच्या हातांत यायचा कीं नाही,



याचा आपण शांतपणे विचार करुं!" असं म्हणून तोही आपल्या शिष्यांच्या पाठोपाठ भुयारी वाटेने खाली उतरुन जाऊं लागला.

गुरु व शिष्य आणखी खोल अंतरावर पुढे पोंचले. तिथें साऱ्या वाटेवर पाणी असलेले त्यांना दिसले. घोट्याइतक्या पाण्यांतून ते आणखी पुढे जात राहिले, तेव्हां त्यांना भुयाराच्या आंत दूरवर एक अंधुकसा प्रकाश दिसूं लागला.

तो पाहून, खुषींत येऊन, भैरव बैरागी आपल्या शिष्यांना म्हणाला, "शिष्यांनो, तो प्रकाश म्हणजे खजिन्यांतल्या रत्नांची प्रभा आहे. त्यांची चमक आहे ती! आता समजा, त्या खजिन्याची राखण करणारा एखादा यक्ष जर तिथे असला तर आपण काय करायला हवं?"

"ते तर गुरुजी आपणच आम्हाला सांगू शकाल." मोठ्या शिष्याने म्हटले.

त्यावर छोटा शिष्य म्हणाला, "भाऊ, गुरुंनी सांगितलेले मंत्र तुला तोंडपाठ आहेत, पण व्यवहारज्ञान मात्र हवं तेवढं नाही. आपल्याला खजिना दाखवणारा मंत्रदंड किती शक्तिमान आहे, याचा विचार तू केला नाहीस ना? खजिन्याचे रक्षण करणाऱ्या यक्षाच्या अंगाला या मंत्रदंडाचा स्पर्श झाला कीं तो फटाक्यासारखा क्षणांत जळून जाईल कीं!"

"अरे वा, छानच बोललास कीं! माझा मंत्रोपदेश तुझ्या लक्षांत आला आहे तर! आता तू निमूटपणें पुढे चालत राहा." भैरव बैराग्याने मंत्रदंडाने उजेडाच्या दिशेने खूण करीत म्हटले.

त्याच वेळी भुयाराच्या वरची जमीन



हालल्यासारखी वाटली आणि हत्तीचा चित्कारही ऐकायला आला. चारसहा क्षण ते तिघेही भीतीने गांगरुन गेले होते. भैरव बैरागी सावरत म्हणाला, "अरे शिष्यांनो, आपल्या वडाच्या झाडाखाली एखादा रानटी हत्ती किंवा हत्तीवरुन सैनिक आलेले असावेत. जर ते या गुप्त भुयारांत उतरले तर आपण काय करायचे?"

"आपण आमचे गुरु आहात. तेव्हां विचार करुन आपणच आम्हाला काय करायचे ते सांगावे." मोठा शिष्य उद्गारला.

पण छोटा शिष्य मात्र हंसत म्हणाला, "रानटी हत्ती किंवा गजदळाला काय तलावांतले बेडूक बघण्याशिवाय दुसरे कांही काम नाही कां? समोर दिसणाऱ्या रत्नांच्या ढिगाखेरीज इतर गोष्टींचा विचारदेखील आत्ता करुं नका."

त्याचे बोलणे संपण्यापूर्वीच वरुन मातीचे

एक मोठे ढेकूळ तुटून त्यांच्या पुढ्यांतच धप्पकन पडले. ते पाहून तिघेही घाबरले व भुयाराच्या तोंडाकडे पळायला लागले.

त्यावेळी त्या भुयारी मार्गाच्या वरती असलेल्या तलावाच्या कांठावर मुक्काम करावा म्हणून अस्वल्या वधिक व हत्तीवर तो वन्यवासी तरुण असे सोईस्कर जागा शोधत तिथे आले होते. त्याच वेळी त्यांच्या एका हत्तीचा पाय जमिनीत रुतला. तो हत्ती आरोळी ठोकीत पुढच्या बाजूला पडला. तेव्हां त्या दोघांनी हत्तीवरुन खाली उडी मारली. तो हत्तीही धडपडत उठला आणि त्याने जमिनीवर जोराने सोंड आपटली.

अस्वल्या वधिकाने एकवार चौफेर नीट न्याहाळून बघितले, आणि त्या वन्य तरुणाला म्हटले, ''हे बघ, कालीवर्माजी आणि अस्वल्या मांत्रिकांनी सुद्धां एकदा इथें येऊन ही जागा पाहिली पाहिजे. इथें भरपूर पाणी आहे. ज्या किल्ल्यावर आपल्याला हल्ला करायचा आहे, तो जितकेतू राजाचा किल्लाही इथून जवळ आहे. मायामर्कटाकडे कितीही मंत्रतंत्र असले, तरी तो आपल्या स्वभावानुसार या वडाच्या बाजूला आलाच, तर आपण त्याला सहज पकडून अस्वल्या मांत्रिकाचा मंत्रदंड त्याच्याकडून घेऊं शकूं.''

पण तो वन्य तरुण हत्तीच्याभोवती फिरून त्याचा पाय मोडला वा दुखावला नाही ना, याचीच पाहाणी करीत होता. हत्ती नीट चालायला लागलेला पाहून तो तरुण अस्वल्या वधिकाला म्हणाला, ''पाहा, आपले वाहन तर अगदी ठीक आहे. आपण खरंच भाग्यवान आहोत.''

दुसऱ्याच क्षणीं वडाच्या फांचामधून एका पारध्याने खाली उडी घेतली व त्यांना म्हणाला, ''हे तुमचं खरंच भाग्य समजा. कारण ज्या भुयाराने त्या कपटी बैराग्यांना आपल्या पोटांत घेतलं, त्या भुयाराच्या बाजूला तुमचा हत्ती वळलाच नाही! नाहीतर तुम्हालाही त्या भुयाराने आपल्या पोटांत घेतलं असतं.''

हे ऐकून वधिक आपला परशू उचावत ओरडला, ''सिरस भैरव, अरे, पण तू कोण आहेस? मायामर्कटाचा शिष्य तर नाहीस ना?'' आणि तो पारध्याच्या दिशेला वळला. (क्रमशः)





वेताळ कथा

# बेसूर ब्रम्हा

निश्चयाचा पक्का विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला, झाडावरुन त्याने शव खाली उतरवले, आणि ते खांद्यावर घेऊन तो स्मशानाकडे जाऊं लागला. तेव्हां प्रेतांत लपलेल्या वेताळाने म्हटले, 'राजन्, तुझा हा हट्ट पाहून अतिशय आश्चर्य वाटते आहे. ज्यासाठी तू हे काम स्वतःवर घेतले आहेस, ते कधीही पूर्ण होणार नाही व तुला यश मिळणार नाही. तू राज्यकर्ता आहेस आणि प्रजेला तुझी जास्त आवश्यकता आहे. शिवशास्त्री उच्च श्रेणीचे संगीत विद्वान होते. शिष्यांना शिकवताना व त्यांची निवड करताना कोणत्याही परिस्थितींत ते नियमांचे उल्लंघन करीत नसत. पण शेवटी त्यांनीही हार पत्करली, आणि एका अयोग्य माणसाला आपला शिष्य केले.



त्यांचीच कहाणी ऐक.'' आणि वेताळाने पुढील कहाणी सांगितली.

शिवशास्त्री अत्यंत उच्च दर्जाचे संगीत विद्वान होते. त्यांना स्वरब्रम्हा अशी पदवी मिळालेली होती. त्यांचे शिष्यत्व पत्करल्याशिवाय संगीताचे शिक्षण पुरे होत नाही, अशी लोकांची भावना होती. पण शिवशास्त्री प्रत्येकाला संगीत शिकवीत नसत. जे होतकरु गायक त्यांच्याकडे येत, त्यांची परीक्षा ते गणेशचतुर्थीच्या दिवशी घेत असत. त्यांच्या-पैकी एकाचीच निवड करुन त्याला आपला शिष्य बनवीत. एका गणेशचतुर्थीला मुकुंद व गोविंद नांवाचे दोन शिष्य त्यांनी निवडले. दोघांचं ज्ञान व तयारी सारखीच होती. म्हणून शिवशास्त्री त्यांना म्हणाले, ''दोन दिवसानंतर आणखी एकदा तुमची परीक्षा घेऊन मी नंतर निर्णय घेईन.''

तेव्हांपासून गुरुची प्रशंसा मिळवण्यासाठी गोविंद रात्रंदिवस संगीतसाधना करायला लागला. पण मुकुंद गुरुपत्नीला भेटला नि म्हणाला, ''आई, संगीत शिकण्याबरोबरच पार्वती-परमेश्वरा-सारख्या आपणा उभयतांची सेवा करावी अशी मला तीव्र इच्छा आहे. परीक्षेत गुरुजींनी माझीच निवड करावी, म्हणून आपणच कांहीतरी मार्ग सुचवावा.''

गुरुपत्नीला त्याची दया आली. ती म्हणाली, ''तुमचे गुरुजी सामर्थ्य व योग्यता यांना फार महत्व देतात. तुला माहीत आहेच कीं संगीतासाठी मुख्य हवा असतो मधुर स्वर! या गांवात सहदेव नांवाचा एक वैद्य आहे. त्याच्याकडे यासाठी एक फार चांगले औषध आहे. ते घेतलं कीं आवाजाची माधुरी फारच वाढते.'' गुरुपत्नीने त्याला उपाय सुचवला.

मुकुंद सहदेवला भेटला आणि त्याने आपली इच्छा व्यक्त केली. थोडा वेळ विचार केल्यानंतर सहदेवाने म्हटलं, ''माझ्याजवळ जे औषध आहे, ते द्रावणरुपांत आहे. ज्याप्रकारे वाजवण्यासाठी वाद्य तयार करावं लागतं, त्याच प्रकारे हे औषध पिऊन आपला आवाज तयार ठेवायचा प्रयत्न करावा लागतो. औषधाची मात्रा जर जास्त झाली तर स्वर कांही वेळा बेसूर किंवा कणसूर होऊं लागतो.'' असं म्हणून सहदेवाने मुकुंदला सावध केलं होतं.

''स्वर सुरेल ठेवणे ही तर अगदी सोपी गोष्ट आहे. सांगा, या औषधाची किंमत किती आहे?'' मुकुंदने विचारलं.

त्यावर सहदेव हंसला नि म्हणाला, ''माझं



औषध आजपर्यंत अनेकांनी घेतलंय, पण त्यांना त्यांचा बेसूर स्वर कांही नीट करता आला नाही, उलट ते संगीतापासून दूरच होत गेले. मी तर तुला सांगेन, कीं तू औषध घेण्यापेक्षां संगीताची साधना करुन प्रयत्न केलास, तर ते जास्त चांगले होईल!''

मुकुंदने सहदेवचा हा सल्ला नाकारला व त्याने मागितलेली किंमत देऊन ते औषध घेऊन तो निघून गेला. त्याने थोड्या प्रमाणांत औषध प्यायले, त्यामुळे त्याचा आवाज फारच चांगला वाटायला लागला. आनंदाच्या भरांत त्याने आणखी थोडे औषध प्यायले. आता तर आवाज अप्रतिम वाटायला लागला.

परीक्षेचा दिवस उजाडला. प्रथम गोविंद गायला. त्याचे गुरुजींनी कौतुक केले. त्यानंतर मुकुंदने गायला सुरवात केली. त्याच्या आवाजांतला गोडवा पाहून शिवशास्त्री फारच खूष झाले व म्हणाले, ''शाबास! तुझे गाणे ऐकून आज मी धन्य झालो आहे!''

मुकुंद उत्साहाने पुढे गाऊं लागला. आलापी संपून जेव्हां तो जलद लयींत गाऊं लागला, तेव्हां मात्र त्याचा सूर मधूनच बेसूर व्हायला लागला. शिवशास्त्रींनी ताडकन त्याला गाणे थांबवायला सांगितले व ते म्हणाले, ''तुझा आवाज जास्त मधुर व्हावा म्हणून तू सहदेवाकडून औषध आणलंस ना? तुझा आवाज छानच झालाय, पण औषध वाजवीपेक्षां जास्त प्रमाणांत घेतलेलं दिसतं आहे. संथ आलापी चालू आहे, तेव्हां ठीक आहे, पण ताना घेताना तुझा स्वर निसटतो आहे,



बेसूर होतो, तो ऐकवत नाही. ही परीक्षा, संगीत, हे सगळं विसरुन तू घरी जावंस हे उत्तम!''

''गुरुवर्य, या चुकीबद्दल मला क्षमा करावी. संगीतविद्वान होण्याचा मार्ग आपणच मला सांगावा.'' असं म्हणून मुकुंदाने शिवशास्त्रींच्या पायावर डोके ठेवले.

त्याला वर उठवून शिवशास्त्रींनी म्हटलं, ''असं म्हणतात कीं गाता गळा, शिंपता मळा! तू सदैव उंच स्वरांत गात राहा, संगीताची सेवा करीत राहा. कदाचित त्याचं कांहीतरी फळ तुला मिळेल.''

निराश मनाने मुकुंद गांवी परत गेला. तिथे तो उंच पट्टीत गायला लागला. पण लोकांनी त्याला निरुत्साही केले. ते गांव सोडून तो दुसऱ्या गांवी गेला. तिथेही लोकांनी त्याच्या बेसूर होण्याबाबत तक्रार केली. त्यांचे कुत्सित, कडवट



बोलणे ऐकून तो वैतागला व एका जंगलात गेला. तिथे एका झाडाच्या सांवलीत बसून त्याने गायला सुरवात केली. थोड्याच वेळानंतर त्याचा स्वतःचाच स्वर त्याला ऐकवेना. त्याने गाणे बंद केले व एक दीर्घ उसासा सोडला.

दुसऱ्याच क्षणी त्याला ऐकू आले, ''गाणं कां थांबवलंस? अजून गा!'' मुकुंद तो आवाज ऐकून चक्रावला. त्याने विचारलं,

''हे कोण बोललं? जरा समोर या ना!''

बघताबघता एक भूत झाडावरुन उडी मारुन खाली त्याच्यासमोर आलं. मुकुंद भलताच घाबरला. पण त्या भुताने प्रेमळ स्वरांत म्हटलं, ''घाबरु नकोस. या झाडावर माझ्याबरोबर आणखी तीन भुते रहातात. मी त्यांच्यापेक्षां मोठा आहे. आमच्याजवळ अद्भुत सिद्धी आहेत. तू गाताना थांबू नकोस, म्हणजे आम्हाला तुझं गाणं नीट ऐकायला मिळेल.''

मुकुंदला जरा धीर आला. तो म्हणाला, ''मला आश्चर्य वाटतं की जोपर्यंत मी गायलो नव्हतो तोपर्यंत तुम्हाला गाण्यांतले कांहीही कळत नसले पाहिजे.''

''आम्हाला संगीतातलं बरंच कळतं! एके काळी आम्हीही माणसे होतो आणि नगरांतून हिंडत फिरत होतो. संगीताच्या मैफलींमधून कधीमधी बेसूर सूर तर आम्ही अनेक वेळा ऐकलेले आहेत. पण तुम्हा माणसांच्यामधे शिवशास्त्री नांवाचा एक मनुष्य आहे. तो संगीताचे नुकसान करतो आहे. तुझे गाणे ऐकणे हा आमच्यासाठी एक भाग्ययोग आहे.'' त्या भुताने म्हटले.

तेव्हांपासून मुकुंदने संगीताची साधना त्या चौघा भुतांच्यासमोर करायला सुरवात केली. त्याचा स्वर निसटला किंवा बेसूर झाला, तर आता मुकुंदालाही त्याची संवय झाली, व ते त्याला चुकीचे वाटेनासे झाले. त्याने मनाशी निश्चय केली कीं शिवशास्त्रींच्या विरोधांत आपण आता याच संगीताचा प्रसार करायचा!

त्या भुतांनीही त्याच्या विचाराला दुजोरा दिला. ती भुते मनुष्यरूप घेऊन त्याच्याबरोबर जायलादेखील तयार झाली. निघण्यापूर्वी मुकुंदाने भुतांना सांगितलं, ''जनतेची अभिरुची जर बदलायची असेल तर आपण कांही काळ तरी त्यांच्यावर आपले संगीत जबरदस्तीने लादले पाहिजे. कांहीतरी विचित्र ऐकवायला हवे. पण



त्यासाठी फार मोठी फार मोठी रक्कम खर्चावी लागेल.'' मोठ्या भुताने उत्साहाने म्हटले, ''पैशाची काळजी कांही तू करुं नकोस. तुला कांहीही हवे असले तरी माग. आम्ही ते देऊं!''

त्या भुतांनी मनुष्यरूप घेतले आणि मुकुंद-बरोबर ते नगरांत गेले. ते नगरपाल प्रमोदला भेटले. त्यांचा भपका व थाटमाट पाहून प्रमोदने त्यांचे स्वागत केले.

मुकुंद प्रमोदला म्हणाला, ''या जगांत कांहीही निरुपयोगी नाही. लोकांना वाटतं कीं संगीत सुरेलच असलं पाहिजे.

मी बेसूर ब्रम्हा आहे. बेसूर सुरांचे अद्भुत मिश्रण असलेले संगीत मी ऐकवतो. मी आपल्याला धनदौलत देईन. आपण माझ्या संगीताचा मोठ्या प्रमाणावर प्रचार करावा.''

प्रमोदने पैसे स्वीकारले आणि या बेसूरब्रम्हाचा भरपूर प्रचार केला. सुरवातीलाच खूप लोक आले. मुकुंदचे बेसूर संगीतदेखील त्यांना झगमगाटामुळे कां होईना, ऐकवले. लोकांची गर्दी व्हावी म्हणून भुतांनी रंगीबेरंगी, चित्रविचित्र सृष्टि निर्माण केली होती.

हे मनोरंजन बऱ्याच लोकांना आवडले. ज्यांना आवडले नाही, त्यांनी यांतला बदल नावीन्यपूर्ण आहे असे मत व्यक्त केले. मुकुंदने एकामागोमाग एक असे कार्यक्रम करण्याचे सत्र चालूंच ठेवले. हळूंहळूं लोकांना ह्याची संवय होऊं लागली. त्यांना हा बेसूरब्रम्हा आता आवडायला लागला आणि स्वरब्रम्हाची जुनी संगीत परंपरा त्यांना नीरस वाटायला लागली. त्या देशाच्या राजाने मुकुंदचा



मोठ्या थाटांत सन्मान केला आणि त्याला बेसूरब्रम्हा ही पदवी दिली.

कांही कांही वेळा लोकांनी मुकुंदला विचारले, ''ही बेसूर सुरांची सृष्टि लोकांना रिझवू शकते ही कल्पना आपल्याला सुचली तरी कशी?''

जर खरी गोष्ट सांगितली तर लोक आपली नक्की टर उडवतील, म्हणून मुकुंदने वेगळाच सूर लावला. ''आज मी इतका मोठा संगीतकार झालो आहे, त्याचे संपूर्ण श्रेय स्वरब्रम्हा शिवशास्त्री गुरुजी व सहदेव वैद्य यांनाच आहे. यापेक्षां जास्त कांही मला सांगता येणार नाही.''

अशा वातावरणांत, एक दिवस शिवशास्त्रींचा शिष्य गोविंद मुकुंदचा शोध घेत आला. तो म्हणाला, ''मुकुंद, इतक्या दीर्घकालानंतर तुझे भाग्य उजळले आहे. गुरुजी तुला संगीत शिक-

बायला तयार आहेत. तुला घेऊन येण्यासाठीच त्यांनी मला धाडले आहे."

मुकुंद थक होऊन बघत राहिला व म्हणाला, "खरोखरीच हे माझं सौभाग्य आहे. शेवटी देवाला माझी दया आली. चल, आपण निघू या!" आणि दोघेही लागलीच निघाले.

मनुष्यरुपांत असलेल्या भुतांनी त्याला सावध करण्याचा प्रयत्न केला. "मुकुंद, सावध राहा! तुझा गोड आवाज ते बदलतील. तुझे यश धुळीला मिळेल. तुझे नांव खराब होईल."

त्यांची सूचना ऐकून गोविंद गोंधळून गेला. पण मुकुंदाने त्याचा हात पकडून म्हटले, "जाऊं दे गोविंद, ती एक अगदी विचित्र कहाणी आहे." दोघेही तिथून निघून गेले.

कहाणी सांगून वेताळाने विचारले, "राजन्, मुकुंदने आपल्या बेसूर गाण्यावर नांव मिळवलं नि प्रसिद्ध झाला. भुतांनी सावध केलं तरीही तिकडे लक्ष न देता तो पुन्हां शिवशास्त्र्यांकडे कां गेला? शिवशास्त्रांनी मुकुंदला अगोदर शिष्य म्हणून स्वीकारलं नव्हतं. त्याचं यश पाहून त्यांना त्याचा मत्सर वाटायला लागला कां? माझ्या शंकांची उत्तरे माहीत असूनदेखील जर तू मौन पत्करलेस, तर तुझ्या डोक्याचे शंभर तुकडे होतील."

विक्रमाकनि उत्तर दिले, "मुकुंदला संगीतश्रेष्ठी व्हायचं होतं. आधी तो अयशस्वी झाला. आणि योगायोगाने भुतांच्या तावडीत सांपडला व बेसूर ब्रम्हा बनला. लोक त्याचे संगीत ऐकण्यापेक्षां इतर चित्रविचित्र सृष्टि पाहायला जाऊं लागले. अशा माणसाला जेव्हां पुन्हां चांगले संगीत शिकण्याची संधी मिळते, तेव्हां तो ती हातची संधी घालवत नाही. म्हणून तो आनंदाने शिवशास्त्रींकडे परत गेला. शिवशास्त्रींनी त्याला बोलावले .त्याच्यामागेही एक महत्वाचे कारण होते. मुकुंद त्याच्या बेसुरी संगीताने चांगले संगीत भ्रष्ट करीत होता. संगीताचे मूळ हालवत होता, लोकांना चकवत होता. हेही त्यांना वांचवायचं होतं. म्हणून शिवशास्त्रींना मुकुंदचा मत्सर वाटला हे मानणेदेखील गैर आहे."

राजाचे मौनभंग करण्यांत सफल झालेला वेताळ शवासहित अदृश्य झाला आणि पुन्हां झाडावर जाऊन बसला.








# टपालाची सांखळी



तेराव्या शतकांत, भारतीय टपालसेवेच्या अगदी सुरवातीच्या काळांत टपाल घोड्यावरुन व पायी जाऊन पोंचवले जात होते. हे घोडेस्वार प्रथम राज्यकर्त्यांचे व नंतर ब्रिटिश राजवटीचे नोकर होते. चार मैलाची दौड करुन ते टपाल पुढच्या टप्यासाठी दुसऱ्या घोडेस्वाराकडे ते देत असत. पायी चालत टपाल नेणारा तीन मैलाचा पल्ला पार करीत असे. हे चालणारे (त्यांना 'रनर' म्हणत) घुंगरे लावलेली काठी घेऊन जात असत. घुंगरांच्या आवाजामुळे चोर किंवा जनावरे यांना इशारा मिळत असे.

# आहोम ते आसाम

हिंदुस्तान व ब्रह्मदेशाच्यामधे पोंग या प्रदेशांत अहोम, हे शान जमातीतल्या एका शाखेचे जातभाई राहात होते. तेराव्या शतकांत पतकई डोंगरराजीतून हे लोक हिंदुस्तानांत शिरले, त्यांनी स्थानिक सुभेदारांचा पाडाव केला व ब्रह्मपुत्रेच्या खोऱ्यावर त्यांनी कबजा केला. या प्रदेशाला नंतर शाम असे नांव पडले. ब्रम्ही भाषेंत त्याचा उच्चार आशाम किंवा आहोम असा होऊं लागला. त्यापूर्वी या प्रदेशाचे नांव कामरुप असे होते. आहोम यांनी हिंदु रीती स्वीकारल्या आणि अनेक देवळे बांधली. शिवसागर ही त्यांची राजधानी होती.



# भयानक भाकित

ॲन्सियस हा एक धाडसी सरदार होता. तो एका जहाजाचा कप्तान होता आणि त्याने अनेक अवघड, साहसी कामे उत्तम प्रकारे पार पाडली होती. आता मात्र तो थकला होता. एका सुंदरशा डोंगर-माथ्यावर त्याने आपल्यासाठी एक गढी बांधायचे ठरवले. पैशाची कमतरता नव्हतीच! त्या किल्लेवजा गढीची व त्याभोवतीच्या उद्यानाची, फळबागांची, निगा राखायला त्याने भरपूर नोकरचाकर नेमले होते.

"अरे बाबा, देवाने तुझ्यावर वरदहस्त ठेवलेला आहे. अनुभव आणि संपत्तीचे भांडार तुझ्याकडे आहे. तेव्हां आता कांहीतरी चांगल्या कामांत वेळ घालव आणि फुरसतीच्या वेळी जीवनाच्या निरनिराळ्या पैलूंवर विचार कर." ॲन्सियसच्या एका जुन्या आदरणीय शिक्षकाने त्याला उपदेश केला. त्यावर ॲन्सियसने होकारार्थी मान डोलावली खरी, पण ते तेवढेच! त्याला अनेक मित्र होते पण ते नुसते खाण्यापिण्यांत वेळ घालवणारे, चैनी होते! ते त्याची खुशामत करीत असत आणि तो त्यांच्या संगतीत मौजमजा करीत, त्यांना खूष ठेवण्यांत दंग होता.

त्याकाळांत लहानलहान राज्यें एकमेकांशी सतत लढाया करीत असत. जो राजा विजयी होई, तो हजारों स्त्रिया व पुरुषांना हांकलत आपल्या राज्यांत घेऊन जाई आणि त्यांना गुलाम बनवीत असे. गुलामांची विक्री भर बाजारांत होई. अशा गुलामांमधे कित्येकदा सुशिक्षित व कलावंत मंडळीदेखील असत. पण त्यांच्या या गुणांच्याकडे त्यांना विकत घेणारा नवा मालक क्वचितच लक्ष देत असे. त्यांनाही इतर मजुरांप्रमाणे काबाडकष्टाची कामे करावी लागत होती. एखादा गुलाम म्हातारा असला, आजारी असला, अगदी मृत्युपंथाला लागलेला असला, तरी त्याला कोणतीही दयामाया दाखवली जात नव्हती.



ॲन्सियसकडेही असे कित्येक गुलाम काम करीत होते. त्यांच्यावर देखरेख करणारा प्रमुख कामगार अतिशय कठोर व दुष्ट होता. ॲन्सियसने एका उत्तम प्रतीच्या द्राक्षांची लागवड एका बागेंत करायचे ठरवले होते. ते गुलाम त्यासाठी दिवसरात्र कामाला जुंपले जात होते. किल्ल्याच्याभोवतीची



खडकाळ जमीन खणून तिथे ह्या नाजूक द्राक्षवेली रुजवायच्या होत्या. "चला, चला, कामाला लागा, सगळे आळशी गाढव आहात तुम्ही!" आपला चाबूक त्यांच्या पाठीवर ओढत तो प्रमुख त्यांना ओरडत होता. "आपल्या मालकांना या द्राक्षांचं भरपूर पीक मिळालंच पाहिजे. त्यापासून नंतर त्यांना उत्कृष्ट जातीची मदिरा बनवायचीय!"



त्या प्रमुख कामगाराचे शब्द ऐकून ॲन्सियस उद्गारला, "खरोखरीच मी लावलेली ही द्राक्षांची रोपे जगांतल्या सर्वोत्कृष्ट जातीची आहेत, असं शेतीतज्ञ म्हणतात. इथली हवा व जागा, या द्राक्षांसाठी सर्वतोपरी योग्य आहे. माझ्या बागेतल्या द्राक्षांपासून तयार केलेल्या मद्याचा पहिल्या प्याला मी स्वतः प्रथम पिणार आहे. त्या दिवसाची मी वाट पाहातोय!"

"ऐकताय ना रे मूर्खांनो? तुम्ही लावलेल्या या द्राक्षांची मदिरा तयार झाली, की त्याचा पहिला पेला मालक स्वतःच चाखणार आहेत, तेव्हां लवकर हात चालवा जरा!" असे ओरडून त्या प्रमुखाने हातांतल्या चाबूक त्या दुर्दैवी कामगारांच्या पाठीवर पुन्हां एकदा चालवला.

"छे! या वेलींच्या द्राक्षांची मदिरा मालकांना कधीच पिता यायची नाही!" त्यांतला एक गुलाम भान न राहून बोलला.

जरा त्याचा आवाज मोठा नव्हता, तरी त्या प्रमुखाला ते शब्द ऐकूं आले. तो कडाडला, "काय म्हणतो आहेस रे बेरडा?"

"काय, काय म्हणाला तो गुलाम?" ॲन्सियसने मागे वळून बघत विचारले. त्या प्रमुखाने त्या गुलामाचे बखोट धरुन त्याला मालकाच्या पुढ्यांत ढकलले.

"याला वेड लागलंय बहुधा! वेडा माणूसच असलं कांही-तरी बरळेल!" तो प्रमुख कामगाराने मालकाला सांगितले.

"तू काय पुटपुटलास ते पुन्हां सांग पाहू!" ॲन्सियसने दरडावले.

"मी म्हटलं कीं आपल्या मालकांना या वेलींपासून होणाऱ्या द्राक्षांची दारु चाखायला मिळायची नाही." त्या गुलामाने सांगितले.

सगळेजण एकदम गंभीर व स्तब्ध झाले. साऱ्यांना वाटलं कीं या उद्धटपणाबद्दल मालक आता या गुलामाला शिक्षा-बहुधा देहांताचीच शिक्षा-देतील. पण ॲन्सियस मात्र तिथून निमूटपणे निघून गेला. पण त्या गुलामावर सक्त करडी नजर ठेवण्यास त्याने नोकरांना बजावून सांगितले.



तो गुलाम मात्र नेहमीप्रमाणे खंबीर दिसत होता. त्याच्या चेहऱ्यावर खंत किंवा भितीचा लवलेशही नव्हता. आंत येऊन तो मालकासमोर उभा राहिला.

ॲन्सियस मोठ्याने हंसला. "तुझे मूर्ख भाकित तुला आठवते आहे कां? आता हे बघ, मी आता त्याच मद्याची चव पाहाणार आहे." मालकाने आसपास जमलेल्या आपल्या मित्रांच्या व खुष-मस्कऱ्यांच्यादेखत मोठ्या गर्वाने त्या गुलामाला सांगितले. "आता यावर काय म्हणायचे आहे रे तुला?" जोराने हंसून ॲन्सियसने विचारले. "मालक, ओठात आणि घोटांत बरेच वेळा अंतर असूं शकते." गुलामाने शांतपणे उत्तर दिले.

ॲन्सियस आणखीनच खदखदून हंसला आणि त्याने प्याला हातांत धरला. त्याच क्षणीं एक नोकर त्या महालांत धावतच शिरला आणि ओरडत सांगायला लागला, "मालक, आपल्या या नक्षत्रासारख्या द्राक्षबागेंत एक भयानक रानडुक्कर शिरलाय आणि तो बागेची धूळधाण करतोय!"

"काय? एक साधा रानडुक्कर?" मालकाने हातांतला प्याला खाली ठेवत म्हटले. त्याने झर्कन आपली तलवार उचलली आणि त्या डुकराला मारायला तो धावतच बागेकडे गेला. पण घडलं ते भलतंच! त्या डुकरानेच मालकाला ठार मारलं.

मेजावरचा मद्याचा प्याला न उष्टावता तसाच राहिला होता. आपण अजूनही कधीकधी म्हणतो, "ओठात नि घोंटात अंतर असूं शकतं." त्याचा अर्थ असा कीं शेवटच्या क्षणालादेखील आपली योजना अनपेक्षितपणे फसण्याची किंवा बारगळण्याची शक्यता असते! *(एम्.डी.)*

त्या बागेंतल्या द्राक्षांना भरघोंस पीक आले. अपेक्षेपेक्षां कितीतरी जास्तपटीने चवदार अशी द्राक्षे होती. मद्य बनवणारे तज्ञ त्यासाठी बोलावण्यांत आले. त्यांनी आपली कामगिरी बजावली, आणि मद्याचा पहिला प्याला ॲन्सियस समोर आणण्यांत आला. त्याने तो आनंदाने हातांत घेतला आणि समोरच्या मेजावर ठेवला. ज्या गुलामाने ते भयानक भाकित वरळलं होतं, त्याला आणण्यास त्याने नोकरांना धाडले. ते मद्य चाखताना त्या गुलामाला जबर शिक्षा होईल अशी सर्वांचीच अपेक्षा होती.



# ज्ञान आणि धोरण

**रा**मापूरमधे रंगनाथ नावाचा एक वैद्य राहात होता. तो आयुर्वेदांत पारंगत होता. त्याच्याकडे जे रोगी येत, त्यांच्या चालण्याच्या पद्धतीवरुन त्यांनी कांही बोलण्याअगोदरच तो त्यांना त्यावेळी त्यांना कोणते रोग असण्याची शक्यता आहे ते सांगून टाकत असे. त्यांचा रोग व तो कशामुळे झाला हेही सांगितल्यानंतर ते रोगी आश्चर्यचकित होत असत. त्यामुळे, अत्यंत निष्णात वैद्य अशी त्याची ख्याति होती. तरीदेखील त्याच्याकडे येणाऱ्या रोग्यांची संख्या मात्र फारशी वाढली नाही.

एकदा सुदूर प्रांतात राहणारे चरकाचार्य नांवाचे एक गुरु रंगनाथला भेटायला आले. त्याच वेळी एक महिला रंगनाथकडे येऊन म्हणाली, "वैद्यराज, मी वीस वर्षांची आहे. या लहान वयांत मला एक अनोखा आजार झाला आहे. माझा आजार कोणता आहे आणि मी त्यावर कोणते उपचार करायला हवेत ते कृपा करुन सांगाल कां?" ती आणखी कांही पुढे बोलण्यापूर्वीच रंगनाथ तिला म्हणाला, "काय म्हणते आहेस? तुझे वय वीस आहे? छे, छे! तुझं वय कमीतकमी एकोणतीस तरी असलंच पाहिजे." हे ऐकून ती महिला नाराज झाली व तिथून ताबडतोब निघून गेली.

गुरु चरकाचार्यांना रंगनाथ म्हणाला, "गुरुवर्य, नेहमी असं कां होतं, ते मला कळत नाही. माझ्याकडे येणारे रोगी माझे बोलणे ऐकल्यावर मधेच उठून निघून जातात."

त्यावर चरकाचार्य हंसून म्हणाले, "असं कां होतं ते मी आत्ताच बघितलं ना! तू विद्येत पारंगत आहेसच, पण तुझ्यांत व्यवहारज्ञान कमी आहे. जे येतात, त्यांना तू जरुर खरं काय ते सांगत जा. पण त्यांचे मन तू दुखवणार नाहीस याची मात्र काळजी घेत जा. त्यासाठी धोरण बाळगलं पाहिजे."

**- *त्रिविक्रम***



## अरुणाचल प्रदेशांतली एक लोककथा

# धनुर्विद्येची स्पर्धा



तरी ही सगळी वानरमंडळी सुरेख धनुष्ये व बाण हातांत घेत होती हेही दिसले असते. पण ही तर गोष्ट आहे फार फार पूर्वीची... त्या काळांत इदु मिश्मी या आदिवासी पाड्याजवळच्या अरण्यांतले सारेच वानर धनुर्धर होते. धनुष्यबाणांचा वापर करण्यांत त्यांच्याइतके तज्ञ इतर कुणी नव्हते. इदु मिश्मी पुरुषदेखील त्यांच्याशी भांडण करीत नसत. कोणत्याही कोनांतून किंवा झुलत्या फांदीवरुन अर्धवट दिसणारे लक्ष्य ते अचूक बाण सोडून टिपून काढीत.

"सरळ मार! .... नीट जवळ धर ...

"उजवीकडे बघ....", "ट्यॅंऽऽऽगऊऽऽऽ!"

"सोड!..." "थांब, थांब!"

"छान, सुरेख ...."

आसमंतात चित्कार, हर्षोद्गार यांचा आवाज घुमतो आहे. सर्वत्र आज्ञा व कठोर स्वर ऐकूं येत आहेत. तारांचा झंकार यावा तसा दोरीचा टणत्कार येऊन हवेत तीर उडत जाताना दिसतात.

प्रभात झाली कीं अरुणाचल प्रदेशांतल्या दिबांग खोऱ्यांतले हे दृश्य रोजचे असे. तुम्ही जर निरखून पाहिलेत तर इथे धनुर्विद्या शिक्षण दिले जात होते हे सहज समजले असते. करड्या नजरेची ज्येष्ठ मंडळी कनिष्ठांना धनुष्यबाण कसे चालवावेत याचे धडे देत होती. तुम्ही आणखी नीट पाहिलेत

वानरांचे प्रमुख नेते आपल्या कच्च्याबच्च्यांना हे शिक्षण देण्यांत फारच उत्सुक व शिस्तबद्ध होते. लहान वयांत शिक्षण घेतले कीं ते पक्के होते असा त्यांचा ठाम विश्वास होता. त्यांचे वाडवडीलही एके काळी श्रेष्ठ धर्नुधर होते. ते अरण्यांतून मैलचे मैल हिंडत, झाडांवरुन उड्या मारीत उत्तम प्रतीचे बांबू आणि वेताचे वासे उपटून आणीत असत. त्यांची शानदार धनुष्ये व टोंकदार बाण बनवण्यांत ते पटाईत होते. त्यांना वापर करणारे खूष होऊन जात असत.

दररोज सकाळी हा शिक्षणक्रम चालू असे.



लहानांचे हात, नजर आणि मन हे नीट स्थिर होत आहे ना, याच्यावर प्रौढांची तीक्ष्ण नजर असे. कांही वेळा तर लुटुपुटीच्या लढाईत प्रौढ वानरदेखील सामील होत आणि मग काय, आजूबाजूच्या दऱ्याखोऱ्यांत बाणांचा पाऊस पडे! त्या वर्षावातून विजेच्या वेगाने धावणारे हरीणराव किंवा अस्वलराव काळे, हेदेखील त्या क्षेत्रांत पाय ठेवायला धजावत नसत. एखादा निष्काळजी वाटसरु वाट चुकलाच तर अरण्यांतल्या रुग्णालयांत त्याला दाखल व्हावे लागे." तुमच्या शरीराचे तुकडेतुकडे व्हायता हवे आहेत कीं काय?" सर्पकुळांतल्या आया आणि इतर सरपटणारे प्राणी आपापल्या पिल्लांना दम भरायच्या.

असे कित्येक महिने, वर्षे, चाललेले होते. पण वानरेच ती! त्यांच्या युवराजाला, नटूला, एकदम सुरसुरी आली!

"केव्हांतरी आपण जरा गंमत, टवाळकी करायला हवी की नाही? नाहीतर एवढं शिक्षण घ्यायचं, पण ते बाण चालवायची वेळच आली नाही तर काय करायचं?" त्याने विचारलं.

"हो तर!" त्याचे मित्र लालू नि कालू यांनी दुजोरा देत म्हटले, "केव्हांतरी आपण त्या तापट हत्तीला आणि मिजासखोर वाघाला धडा शिकवायलाच हवा, म्हणजे ते आपल्याकडे आता करतात तसं दुर्लक्ष करणार नाहीत."

"त्यांना जरा ही चमचमीत मेजवानीच ठरेल, नाही कां?" मिटू या भित्र्या वानराने हळूच म्हटले. काळ्या छोट्या जबीने कुरकुरत सांगितले, "तो लबाड लांडगा पाहा, बिचाऱ्या कोंबडीताईवर झडप घालतोय! त्याच्या पंज्यावर एक बाण सरळ सोडला तर कुठे बिघडलं? छान गंमत येईल!" सारेजण मोठ्याने हंसले. त्यांच्या कल्पनांचे आगर खुले होत होते. लौकरच, पुष्कळ तरुण नायक कांहीतरी गंमतीदार करायलाच हवे, या निर्णयावर येऊन ठेपले.

ही हवा डिवांगच्या अरण्यांतून सगळीकडे पसरली. माकडांच्या विरुद्ध तक्रारी यायला सुरवात झाली. रोज कुणाला तरी या वात्रट माकडांच्यापायी जखमा होत होत्या किंवा कांहीतरी त्रास होत होता. इदु मिश्मीचे खेडूत देखील यांतून सुटले नाहीत.



तान्ह्या बाळांच्या डोक्यावरुन एखादा बाण सुर्कन जाई किंवा एखाद्या आजोबाची टोपीच बाणाने उडवली जात होती. केव्हांतरी मांसाचा तुकडा बाहेर चुलीवर भाजायला ठेवलेला असे. बाणामुळे तो तुकडा दूरवर उडून पडत होता आणि बिचारी आई हताश होऊन पाहात होती!

ही बातमी लौकरच साऱ्या जीवसृष्टीचा दयाळू व शक्तीमान देव 'अनो' याच्या कानावर गेली. एका दिवशी कांही अरण्यवासी त्याच्याकडे गेले. "अरे, तुम्ही सगळेजण आज जमून आलात माझ्याकडे? काळजींत दिसता आहात तुम्ही!" त्यांचे स्वागत करीत अनोदेवा म्हणाला.

"देवा, आम्ही काय सांगणार? शांतपणे जगायचे दिवस आता राहिलेले नाहीत." मोठ्या चोंचीचा एक पक्षी म्हणाला. हत्तीनेही नम्रपणे खुलासा केला, "देवा! या बेताल वानरांनी तर उच्छाद मांडलाय अगदी! काल माझ्या छोट्या बाळाने एक केळं खायला म्हणून तोंड उघडलं आणि ते जोरांत किंचाळायला लागलं! एक धारदार बाण त्याच्या घशाला लागला. माझं बाळ खूप वेळ रडत होतं! मी वरती पाहिलं तर ती दोन्ही माकडं झाडावर बसून आमची गंमत पाहात होती आणि आमच्याकडे बघून वात्रटपणे हंसत, वाकडी तोंडें करीत बसली होती."

"देवा, हे पहा जरा! आम्ही अरण्यांतल्या धावण्याच्या शर्यतींत भाग घ्यायचा म्हणून सराव करीत होतो, आणि सुरवातीलाच पहा, माझ्या पायांवर चार बाण लागलेत. मी आडवाच झालो पार, नाहीतर मी नक्की जिंकलो असतो." हुंदके देत आपले जखमी पाय दाखवीत ससेभाऊ देवाला सांगत होता.

देवाने त्याला थोपटून शांत केले व म्हटले, "होय रे बावा! मला सगळं कळलंय. मी बघतो त्या वानरांचं काय करायचं ते! तुम्ही चिंता करु नका. शांतपणे घरी जा हं!"

दुसऱ्याच दिवशी अनोदेवाने वानरांच्या प्रमुखाला बोलावणे धाडले. "तुम्हा वानरमंडळींचे ऐकतोय मी!" देवाने सहजगत्या विचारले.

"परमेश्वरा, आमचे तरुण चांगली कामगिरी करीत आहेत." नायकाने उत्तर दिले.

"यंदा अरण्याच्या स्पर्धेत तुम्ही सुवर्णपदक जिंकणार कां?" देवाने पुन्हां चौकशी केली.

"होय देवा! आमचे बरेच तरुण अगदी जोषांत आहेत. आता धाकटी मुलेदेखील उडत्या चिमणीला किंवा फुलपाखरालादेखील बाण मारायला शिकली आहेत!"



"अस्सं! मला बघितलंच पाहिजे मग. तुझा सर्वांत उत्तम धनुर्धर उद्यां नदीकिनाऱ्यावर शर्यतीसाठी पाठवतोस कां?" अनोदेवाने विचारले.

दुसऱ्या दिवशी एक देखणा वानर धनुष्यबाण घेऊन अनोदेवापुढे आला व त्याने नम्रपणे अभिवादन केले. अनोकडेही धनुष्य व कांही बाण होते.

"तर तू माझ्याबरोबर सामना करायला तयार आहेस ना?" अनोने त्या तरुण वानराला विचारले.



"हो तर!" त्याने धिटाईने सांगितले.

"ठीक तर. ते समोर बघ." अनोने पलीकडच्या तीराकडे बोट दाखवले. "कांठाजवळ पाण्यांत एक मोठा खडक दिसतोय ना?" देवने विचारले.

"हो तर!" वानराने पाण्याकडे बघत म्हटले.

"तुझ्या बाणाने त्या खडकावर नेम करायचा! ज्याचा बाण खडकाला लागेल, तो विजयी होईल. प्रथम मी सुरवात करतो." अनोने सांगितले.

"हो हो," वानर उत्साहाने म्हणाला.

सामना सुरुं झाला. दोघांनी लक्षपूर्वक नेम धरला.

"नॉऽऽऽग!" अनोचा बाण हवेतून जात असताना त्यांतून धातू सारखा टणत्कार ऐकूं आला. बाण पाण्यांत गेला आणि खडकावर आदळला. "ठाऽऽऽक!" पुढचे चारी बाण पाण्यांतून गेले आणि लक्ष्यापर्यंत अचूक पोंचले.

आता वानराची पाळी होती. "खँऽऽऽग!"

त्या वानरयोद्ध्याचा बाण सर्रकन पैलतीराकडे गेला. दोघेही एकटक बघत होते. वानराचा बाण पाण्यांवर जाऊन पुढे वाळूंत रुतला. वानर स्तंभित झाला. "अरेरे, माझा बाण पाण्यांत वरच तरंगत राहिला. मी हरलो!" वानराने पुन्हां प्रयत्न केला. पुन्हां बाण पाणी कापीत गेला पण पाण्याखाली गेला नाही. दर वेळेला असंच होत राहिलं. वानर सामना हरला आणि खाली मान घालून निघून गेला.

अनोदेव हंसला. त्याला विजयाची खात्री होती. कारण त्याचे बाण लोखंडाचे केलेले होते आणि वानराचे बाण वेताचे होते त्यामुळे ते बाण पाण्यावरच तरंगत राहिले व दुसरीकडे गेले. पाण्यांत बुडले नाहीत किंवा खडकापर्यंत पोंचले नाहीत.

त्या दिवसानंतर वानरमंडळींची धनुर्विद्या संपुष्टांत आली.

*- एस्. मुंदयूर*



## वाचकांसाठी कथास्पर्धा

## सर्वोत्कृष्ट प्रवेशिकेला रु. २५०/-चे पारितोषिक

*खालील गोष्ट वाचा :*

एका अत्यंत चिक्कू माणसाला, कृपणरावाला, महत्वाच्या कामासाठी शहरांत जायचे होते. त्याने त्याच्या किशोरवयी मुलाला बरोबर येण्यास सांगितले.

"आपण भाड्याची गाडी जाताना करुं या. पण त्यासाठी आपण घासाघीस केली पाहिजे." पिता म्हणाला.

लौकरच त्या रस्त्याने एक टॅक्सी आली. त्यांनी गाडी थांबवली आणि कृपणरावाने विचारले, "शहरांत जायला किती पैसे घेशील?"

त्या ड्रायव्हरला दहा रुपये हवे होते. कृपणरावाने त्याला जाऊं दिले.

थोड्या वेळाने आणखी एक टॅक्सी आली. कृपणरावाने त्या चालकाला भाडे विचारले, "पंधरा रुपये, साहेब!" त्याला जाऊं दिले. त्यानंतर तिसरी टॅक्सी आली. ती थांबली, तेव्हां त्या ड्रायव्हरने वीस रुपये भाडे पडेल असे सांगितले. कृपणरावाने त्या गाडीलाही जाऊं दिले.

मुलाला आश्चर्य वाटले. "तुम्ही त्याला जायला कां सांगितलेत?" त्याने पित्याला विचारले. आता खालील मुद्दे विचारांत घ्या.

- कृपणरावाने तिन्ही गाड्यांना जायला कां सांगितले?
- अखेरीस पितापुत्र शहरांत कसे पोंचले?

तुमची प्रतिक्रिया १००-१५० शब्दांत लिहा व गोष्टीला समर्पक शीर्षक द्या. खालील कुपन भरुन त्याबरोबर तुमची प्रवेशिका पाठवा. पाकिटावर "वाचा नि सुचवा" असे जरूर लिहा.

**शेवटची तारीख : ३० जून, २००५**

नांव .................................... वय ..........

जन्मतारीख .................... शाळेचे नांव ....................

घरचा पत्ता ....................................

....................................

.................................... पिनकोड ..........

**पालकांची सही** **स्पर्धकाची सही**

CHANDAMAMA INDIA LIMITED

82 Defence Officers Colony, Ekkatuthangal, Chennai - 600 097.



# सुधीर शहरांत गेला

सुधीर आणि शंभू एकाच गांवात राहात होते. सुधीर सुतार होता आणि शंभू लोहार. दोघेही आपापल्या कामांत तरबेज होते. एकदा तांब्या-पितळेच्या भांड्यांचा व्यापार करणारा एक व्यापारी त्या गांवात आला. शंभूने बनवलेली कांशाची व तांब्याची भांडी त्या व्यापाऱ्याला फार आवडली. त्याने चांगली भक्कम मजुरी देण्याचे आश्वासन देऊन शंभूला शहरांत बोलावले.

शंभू जाण्यासाठी उतावीळ झाला, पण त्याच्या बायकोने जरा विरोध केला. त्यावेळी शंभूचा मेव्हणा तिथे उपस्थित होता. त्याने शंभूला पाठिंबा देत म्हटले, "जरूर जा. चांगली मिळकत होईल. जर चारपांच महिन्यांत तुमची कमाई वाढली नाही तर परत या!"

त्याचा हा सल्ला शंभू व त्याच्या बायकोला पटला. दुसऱ्याच दिवशी शंभू त्या व्यापाऱ्याबरोबर शहरांत गेला. ही सगळी बातमी शेजारच्या आळींत राहाणाऱ्या सुधीर सुताराची बायको भानुमती हिला समजली. आजूबाजूच्या गांवात तिच्या नवऱ्याइतका दुसरा चांगला सुतार नाही, हे तिला चांगलं ठाऊक होतं. त्या दिवसापासून ती आपल्या नवऱ्याला सारखी सांगू लागली, "आपण सुद्धां शहरांत जाऊं या. खूप पैसे कमावू आणि तिथेच एक छानसं घर बांधून आरामांत राहूं!"

सुधीरच्या पत्नीचा हा आग्रह वाढतच गेला ती त्याला म्हणूं लागली, "शंभूने आपले कुटुंब इथेंच ठेवले आणि तो शहरांत जास्त कमाई करायला गेला. आपल्याला कांही मूल बाळ नाही. नातेवाईकदेखील नाहीत. लग्न झाल्यापासून मी पाहाते आहे, कीं तुमचा स्वभाव भित्रा आहे. तुमच्यांत धडाडी कशी ती नाहीच!"

नाईलाजाने सुधीरला शहराची वाट धरावी लागली. तिथे तो शंभूला भेटला आणि आपल्यासाठी कांहीतरी काम शोधावे म्हणून त्याने शंभूला विनंती केली. शंभूने खूप प्रयत्न केला पण तो कांही सुधीरसाठी काम मिळवूं शकला नाही. प्रत्येकजण सांगायचा कीं शहरांत भरपूर सुतार आहेत. त्यांनाच कामे मिळायची मारामार होती, तिथें नवीन येणाऱ्याला कोण कामे देईल?

सुधीर चार महिने काम शोधत राहिला. त्याने येताना गांवाहून जे पैसे आणले होते, ते आता संपत आले होते. शेवटी कंटाळून त्याने परत गांवी जायचा निर्णय घेतला. पण त्याला एका गोष्टीची भीती वाटत होती. एक पैसादेखील न मिळवता तो घरी परत गेला, तर त्याची बायको त्याला सारखे टोमणे मारीत राहिली असती. त्याने खूप विचार केला आणि नाकातोंडाचा भाग कपड्याने झांकून तो रात्रीं उशीरा घरी पोंचला. त्याने दार खडखडवले.

भानुमतीने दार उघडले. त्याला पाहून तिने घाबरून विचारले, "हे काय? ना तुमचे नाक दिसते आहे, ना कान! तुमचं तोंड असं कशासाठी झांकून घेतलंय तुम्ही?"

सुधीरने आत्मविश्वासाने उत्तर दिले, "मी जे पैसे शहरांत कमावले होते, ते एका पिशवीत घालून मी घेऊन येत होतो. आपल्या गांवाच्या वेशीबाहेरच चोरांनी माझ्यावर हल्ला केला. घाम गाळून मिळवलेले पैसे. मीं इतक्या सहजपणे त्यांना देईन की काय? मीही त्यांच्याशी मारामारी करूं लागलो. तेवढ्यांत त्यांच्यापैकी एकाने तलवार उपसली नि म्हटले, "तुला पैसा हवा कीं प्राण? याचा निकाल आत्ताच मनाशी ठरव. निमूटपणें ती पिशवी आम्हाला दिलीस तर तुला सोडून देऊं. जर आमचे म्हणणे मान्य केले नाहीस तर तुझे नाक कान कापून टाकूं."

"किती मोठा अन्याय हा! मग ते पैसे देऊन टाकायचेत की! याच्यापेक्षां जास्त मोठा अपमान कसला आलाय?" असं म्हणून भानुमती नवऱ्याच्या चेहऱ्यावरचा कपडा बाजूला ओढावा, म्हणून पुढे आली, तेवढ्यांत सुधीरने स्वतःच तो कपडा बाजूला करीत म्हटले, "तू जे म्हणालीस, तसंच मी केलं. मी जे कांही शहरांत मिळवलं, ते त्या चोरांनी लुबाडलं खरं; पण आपले नाककान सुरक्षित घेऊन मी घरी लपतछपत आलो!" कांपऱ्या स्वरांत सुधीरने सांगितलं.

"त्यांनी फक्त पैसेच चोरले, तुमचे सुतार-कामाचे कौशल्य कांही चोरले नाही ना? काळजी करूं नका." असं म्हणून तिने प्रेमळपणे पतीला धीर दिला.



रमण जोशी



# कपटी साधू

प्राचीन काळी कुरु राज्याची राजधानी पांचाल-नगरी इथे रेणुक नांवाचा राजा राज्य करीत असे. त्याच वेळेस हिमालयांत पांचशे साधूंचे गुरु महारक्षित नामक तपस्वी रहात होते.

एकदा यात्रा करीत असता महारक्षित आपल्या शिष्यांबरोबर पांचाल नगरीत आले. साधूंच्या आगमनाची वार्ता ऐकून राजा प्रसन्न झाला. महारक्षितांचा योग्य तो सत्कार करुन त्यांची उद्यानवनांत राहण्याची सोय करुन दिली. महारक्षित कांही दिवस तिथे राहिले.

पावसाळा संपल्यानंतर राजाचा निरोप घेऊन हिमालयाकडे निघाले परतीच्या यात्रेत सर्वचजण राजाच्या अतिथिसत्काराची प्रशंसा करीत होते. गोष्टी करीत असतांना विषय निघाला, की राजाला पुत्र आहे अथवा नाही! मग कांही ज्योतिष्य जाणणारांनी आपल्या ज्ञानाचा उपयोग केला. तेव्हां महारक्षित म्हणाले, की राजा रेणुककडे कांही दिवसांनी देवाचा अंश असलेल्या पुत्राचा जन्म होईल. सर्व शिष्यांना माहीत होते की महारक्षितांच्या तोंडून जे निघेल ते सत्य होणार. हे ऐकून महारक्षितांच्या एका शिष्यांच्या मनांत दुर्बुद्धि आली. तो बाकीच्यांना म्हणाला की मी नंतर येतो, थोडा वेळ चालल्यानंतर जेव्हां सर्वजण पुढे गेले. हा मात्र परत पांचाल देशात आला.

राजधानीत जाऊन राजाचे दर्शन करुन म्हणाला - "राजा, आम्ही हिमालयात जात होतो तेव्हां आम्हाला तुझी आठवण आली. आमच्यासमोर प्रश्न पडला की तुझी वंशलता वाढेल की नाही? आम्ही आपल्या दिव्य दृष्टिचा प्रयोग करुन पाहिले. तुझ्या घरी देवाचा अंश असलेला पुत्र जन्म घेणार आहे. हीच गोष्ट तुला सांगण्यास मी आलो होतो." असे म्हणून तो दुष्ट साधू परत जाण्यास निघाला.

योग्याने सांगितलेला शुभ समाचार ऐकून राजा प्रसन्न झाला आणि त्याला थांबवून म्हणाला - "महाराज आपण तर दिव्यचक्षूवाले आहात! आपण कृपा करुन इथेच रहा." दुष्ट साधू त्याचीच वाट पहात होता.

म्हणून त्या दुष्टाने राजाचे म्हणणे ऐकले. राजाने उद्यानवनांत योग्याच्या राहण्याची चांगली व्यवस्था करुन दिली. राजा त्याची सेवा करुं लागला. तो धूर्त योगी उद्यानाच्या एका कोपऱ्यांत भाजीपाला तयार करुन माळ्याकडून विकवून त्यावर पैसा कमवू लागला. खूप पैसा कमवून पळून जायचा त्याचा विचार होता.

त्याच वेळेस बोधिसत्वांनी राजाच्या घरी जन्म घेतला. त्यांचे नांव सुमनस असे ठेवण्यात आले.

सुमनस जेव्हां सात वर्षाचे होते, त्यावेळेस रेणुक राजाला युद्ध करावे लागले. राजाच्या अनुपस्थितित एक दिवस सुमनच उद्यान बघण्यास गेले. तिथे भगवे वस्त्र धारण करणारा योगी गोवऱ्या थापत माळ्यापेक्षाही जास्त मेहनत करीत असतांना दिसला.

सुमनसनी कपटी योग्याला ओळखले आणि त्याला चांगला धडा शिकविण्याच्या उद्देशाने म्हणाले - "अरे माळीबाबा, तू काय करतोस?"

दिव्यचक्षु असणारा म्हणून प्रसिद्ध असलेला योगी सुमनच्या आवाजाने चमकला. त्याला कळून चुकले की सुमनसला त्याचे रहस्य समजले आहे.

त्याच वेळेस सुमनसांचा अंत करण्याचा निश्चय करुन योग्याने एक उपाय केला.



राजाचे युद्धभूमिवरुन परतण्याचे वर्तमान कळतांच कपटी योग्याने आपले कमण्डलू आणि आसनाचे तुकडे-तुकडे केले. आश्रमाच्या चारी बाजूला गवत पसरले आणि अंगाला तेल लावून कण्हत-कुंथत एका कोपऱ्यांत पडून राहिला. युद्धक्षेत्रावरुन परतल्यावर राजा आपल्या गुरुंना बघण्यास आश्रमांत गेला. त्यांना आश्रमाचा परिसर घाणेरडा दिसला. आश्रमांत योगी कण्हत पडला होता. राजाने हात जोडून म्हटले - "महाराज, कृपा करुन मला सांगा की असं झालं काय?"

"राजा ही सगळी आपल्या युवराजांची कृपा आहे." असे म्हणत कपटी योग्याने सुमनवर अनेक खोटे आरोप केले.

राजा क्रोधाने वेडा झाला आणि त्याच वेळेस आपल्या सेवकांना बोलावून आज्ञा दिली -

''तुम्ही आताच जाऊन सुमनसचे शिर कापून माझ्यासमोर आणा.''

त्याच वेळेस सुमनस आपल्या आईजवळ बसले होते. सैनिकांनी जाऊन सुमनसला राजाची आज्ञा सांगितली. सुमनस आपल्या वडिलांकडे आला आणि म्हणाला - ''बाबा, तुम्ही ह्या कपटी योग्याला एक महात्मा मानून त्याची पूजा करता. पण तो काय-काय करतो हे तुम्ही प्रथम द्वारपालाकडून जाणून घ्या.''

त्यानंतर राजाने द्वारपालाला बोलावले. त्यांनी खरी हकीकत राजाला सांगितली, राजाने आश्रमाची तपासणी केली, तेव्हां कपटी योग्याने जे धन जमिनीत गाडून ठेवले होते ते सर्व मिळाले.

राजाला आपल्या चुकीमुळे खूपच पश्चाताप झाला. दुखी मनाने तो पुत्रास म्हणाला-''बेटा, तू माझ्या घाईने दिलेल्या आदेशाबद्दल मला क्षमा कर आणि आजपासून तूच राजा बनून राज्य कर.'' पण सुमनसने ऐकले नाही. तो म्हणाला - ''महाराज जशी शक्तिशाली जडीबुटी औषधाचे काम करते, तेच काम तोंडातून निघालेले शब्द पण करु शकतात. आपल्या तोंडून दुष्ट वाणी निघाली आहे. आपल्या आज्ञेप्रमाणे आईजवळ बसलेल्या मला तुमचे सैनिक वधशाळेत घेऊन चालले होते. मी आजच आपले राज्य सोडून जात आहे.''

राजाने दु:खावेगाने सुमनसला आपला निश्चय बदलण्याची परत-परत प्रार्थना केली. पण धर्माला अधिक महत्व देणाऱ्या राणीने राजाचे म्हणणे ऐकले नाही. उलट आपल्या पुत्राला आशीर्वाद देत तो म्हणाली - ''बेटा तू धर्मात्मा आहेस! पवित्र जीवन व्यतीत करीत तू इहलोकांतून मुक्ति प्राप्त कर.''

त्यानंतर सुमनस हिमालयांत पोहोचला आणि तिथे विश्वकर्माने निर्माण केलेल्या झोंपडीत राहून तपश्चर्या करुं लागला.

राजाने कपटी योग्याला मृत्युदण्ड दिला आणि बरोबरच सर्वांना आदेश दिला की - ''आजपासून ह्या राज्यात कुणाही योग्यांना आश्रय देऊ नये.''

अशा तऱ्हेने दुष्टबुद्धि, कपटी योग्यामुळे संपूर्ण राज्यात योग्यांचा अपमान झाला आणि कुरु राज्यांत लोकांकडून योग्यांना मिळणारा आदर बंद झाला.







# विष्णु पुराण

शकुनी हा दुर्योधनाची माता गांधारी हिचा लहान भाऊ व गांधार देशाचा राजा सुबल यांचा मुलगा होता. राजा सुबलला एका ज्योतिषाने सांगितले होते की, गांधारीचा विवाह होताच, तिच्या पतीला मरण येईल.

त्यामुळे राजा सुबलने तिचा विवाह एका मेंढ्याबरोबर लावून दिला. त्यानंतर पुन्हां तिचे लग्न धृतराष्ट्राबरोबर झाले. लग्न होताच तो मेंढा मेला.

जेव्हां भीमाने विधवेचा मुलगा म्हणून दुर्योधनाची टिंगल केली, तेव्हां दुर्योधनाला ही गोष्ट कळली. दुर्योधन रागाने जळफळूं लागला. त्याने सुबल व शकुनीला कैद करून आणले आणि तुरुंगात डांबून ठेवले. त्यांचा भयंकर छळ केला.

सुबलला खूप अंधविश्वास होता. त्यामुळे त्याने शकुनीला मरणाच्या आधी समजावून सांगितले की, त्याच्या हाडाचे फांसे बनवून तू दुर्योधनाबरोबर प्रतिकार कर. त्या फांशाचे एक महत्व राहील की, जो आंकडा मनात धरून फांसा टाकशील त्याचा जय होईल.

शकुनीच्या फांसाचे गुपीत दुर्योधनाला तुरुंगाच्या पहारेकऱ्याने सांगितले. तेव्हां दुर्योधनाने शकुनी मामाला तुरुंगातून सोडले आणि आपला मंत्री बनवले.

त्यानंतर हस्तिनापुरमध्ये शकुनी आणि युधिष्ठिर यांच्यामधे सोंगट्यांची पैज लागली. त्यांत युधिष्ठिर आपल्याबरोबर आपल्या लहान भावांना व द्रौपदीला जुगारात लावून घालवून बसला.

त्याचवेळेला द्वारकेमध्ये श्रीकृष्ण सत्यभामा-बरोबर जुगार खेळत होता. तो स्वत:बरोबर आपल्या सात बायकांनासुद्धां घालवून बसला.

त्यावर सत्यभामा रुक्मिणीला म्हणाली - ''आक्का, आता तू आणि माझा पती, ही माझी



संपत्ती आहे. तुम्हां दोघांना विकण्याचे किंवा दान करण्याचे सर्व अधिकार मला प्राप्त आहेत.''

कृष्णाने विचार करण्याचे सोंग करून 'अक्षय' असा उच्चार केला. कोणालाच समजले नाही की, श्रीकृष्णाने असे कां म्हटले.

त्याचवेळेला हस्तिनापुरांत कौरवांकडून हारलेले पांडव भर राज्यसभेत असतांना दुःशासनाने सूडाने द्रौपदीच्या पदराला हात घातला. तेव्हां असहाय्य होऊन द्रौपदी आपला पदर घट्ट धरून श्रीकृष्णाचा धांवा करीत हात जोडून. ''श्रीकृष्ण'' ''श्रीकृष्ण'' म्हणत होती.

तेव्हां भरसभेत भीमाने विडा उचलला की, ''ह्याचा बदला घेईन. दुःशासनाची छाती फोडून त्याचे रक्त पिईन व दुःशासनाची मांडी फोडून त्याच्या रक्ताने द्रौपदीची वेणी घालीन.''

दुःशासन द्रौपदीचे वस्त्र फेडूं लागला. तसा वस्त्रांचा ढीग जमू लागला. अतिश्रमांनी दुःशासन घेरी येऊन खाली पडला.

द्रौपदी जेव्हां मयसभामधे दुर्योधनाला पडताना पाहून हंसली होती, तेव्हां दुर्योधनाने पण केला होता, कीं ''भरसभेत हिचे वस्त्र फेडीन व हिला दासी करीन तेव्हांच माझे मन शांत होईल.'' परंतु आता तो आपली मान खाली घालून कर्ण, शकुनी व दुःशासनाबरोबर राज्यसभेतून बाहेर गेला.

दुर्योधन, शकुनि, कर्ण आणि दुःशासन हे चांडाळ-चौकडी म्हणून प्रसिद्ध होते.

राग, लोभ, मद मत्सर इत्यादि गुण, व अधर्म, यांचे मूळ कली पुरुष, यांच्या रुपाने दुर्योधनाने जन्म घेतला होता.

नर नारायणाला पाठ दाखवून पळून जाणारा, सहस्त्र कवच धारण केलेला, एकच कवच पांघरून पळून सूर्याच्या आंत जाऊन लपून बसला. तो अविवाहित असलेल्या कुन्तीच्या गर्भात सूर्याच्या वरदानाने कर्णाच्या रूपाने जन्माला आला.

कुन्ती पांडु राजाची बायको झाली. तेव्हां नर-नारायणाच्या अंश कुंतीच्या पोटी अर्जुनाच्या रुपे जन्माला आला.

नारायण म्हणजे प्रत्यक्ष कृष्ण भगवान होते. कृष्ण अर्जुनाचा नात्याने मेहुणा आणि बायकोचा भाऊ होता.

दुर्योधनाला खूप विश्वास वाटे की कर्णासारखा धनुर्धारी जेव्हां आपल्या बाजूने आहे, तेव्हां पांडवाना सहज पराजित करता येईल.

कुन्तीने कर्णाला टोपलीत घालून नदीत सोडून दिले होते. ते मूल सारथ्याची बायको राधा हिला मिळाले. तिने कर्णाला लहानाचा मोठा केले.



त्या कारणाने कर्णाला, ''सारथीपुत्र'' आणि ''राधेय'' या नांवाने संबोधू लागले. दुर्योधनाने कर्णाला अंगदेशाचा राजा केले. त्यामुळे त्याचा आत्मविश्वास खूप वाढला.

कर्णाला अनेक शाप मिळाले होते. त्याच कारणाने ब्राह्मणाच्या रुपांत आलेल्या इंद्राला कणनि जन्मापासूनच मिळालेली कवचकुंडले दान केली.

कर्णाच्या मनांत आपला प्रतिस्पर्धी अर्जुन याचा युद्धांत पराभव करण्याचा विचार होता. म्हणून तो दुर्योधनाच्या गटांत जाऊन सामील झाला.

पंचपांडव वनवासात गेले. सत्यभामेने कृष्णाला बुद्धिबळांत जिंकले. त्यामुळे तिने नारदाच्या हाती कृष्णाला सोपवले. त्यानंतर नारदाने सांगितले की कृष्णाच्याच वजनाचे सोने तोलून सत्यभामेला त्याने द्यावे. शेवटी सत्यभामेनेच आपले सर्व अलंकार काढून एका पारड्यांत ठेवले, व कृष्ण दुसऱ्या पारड्यांत. तरी पण ते सोने त्याच्या वजनाचे झाले नाही. तेव्हां ती परिस्थिती पाहून रुक्मिणीने दुसऱ्या पारड्यांत भक्तिपूर्वक एक तुळशीचे पान टाकले व कृष्णाला नारदाच्या हातून सोडवले.

त्यावर सत्यभामेने रुक्मिणीला म्हटले - ''ताई, ह्या क्षणी मी तुझी दासी आहे. तुझी श्रीकृष्णावरची भक्ति म्हणजे काय ह्याचा उलगडा आज मला झाला.''

पांडव द्रौपदीसह मत्स्य देशाचा राजा विराट याच्याकडे अज्ञातवासात होते.

भीम त्यांच्या घरी बल्लवाचार्य नांवाने स्वयंपाकी म्हणून होता. सैरंध्रीच्या नांवाने द्रौपदी



दासीचे काम करीत होती. एकदा द्रौपदीचा कीचकाने अपमान केल्यावरुन भीमाने त्याचा संहार केला होता. त्यामुळे समान शक्तीवान असे पांचापैकी तिघेजण भीमाच्या हाती मरण पावले. आता फक्त दुर्योधनच एकटा उरला होता.

बृहन्नलाचे रूप घेऊन अर्जुनाने राजकुमारी उत्तरा हिला नृत्य शिकविले होते. परंतु लढाईच्या वेळेस अर्जुनाने आपले पूर्ववत रूप प्रकट करुन असंख्य लोकांना पराजित केले.

श्रीकृष्णाच्या हातून जेव्हां कंस मारला गेला, तेव्हां कालनेमीने कंसाच्या शरीरांतून निघून जाऊन कृष्णाचा भाचा अभिमन्यू याच्या रुपाने जन्म घेतला.

कालनेमी हा कृष्णाचा कट्टर शत्रू होता. तरी पण त्याने त्याच्या भाच्याच्या रूपाने जन्म घेतला.

सुभद्रा गर्भवती होती, तेव्हां एकदा अर्जुन



चक्रव्यूह भेदाचे रहस्य तिला सांगत होते. तेवढ्यात श्रीकृष्ण तेथे येऊन म्हणाले - "अर्जुन, माझी बहीण सुभद्रा कोमल मनाची आहे. तिला सर्व युद्धाच्या गोष्टी कशाला सांगतोस?" असे म्हणत निम्या गप्पांतून त्याने सुभद्रेला उठवून आपल्या बरोबर नेले.

सुभद्रेच्या पोटांतील बाळाने, अभिमन्यूने, चक्रव्यूह फोडून आंत शिरण्याचे रहस्य तेवढेच जाणले. परंतु चक्रव्यूह फोडून बाहेर येण्याचे त्याला समजले नाही.

अभिमन्यूला गर्व होता कीं मी एकटाच कौरवांचा संहार करु शकेन. तेवढ्यांत श्रीकृष्ण तेथे पोहोचले व अभिमन्यूच्या पाठीवर थाप देत म्हणाले - "अभिमन्यू, तू त्याच योग्यतेचा आहेस. मला अभिमान आहे. तुझी वीरमाता सुभद्रा माझीच बहीण आहे."

अभिमन्यूचा विवाह उत्तरा हिच्याबरोबर झाला. पांडवाच्या अज्ञातवासाच्या वेळेस सुभद्रा व अभिमन्यू द्वारकेमधे राहिले होते. बलराम आपली मुलगी उत्तरा किंवा शशिरेखा हिचे लग्न दुर्योधनाचा मुलगा लक्ष्मणकुमार याच्याबरोबर करणार होता. अभिमन्यूने उत्तराबरोबर लग्न करणे त्याला अजिबात पसंत नव्हते.

अभिमन्यू आपल्या आईबरोबर द्वारकेतून निघून अरण्यमार्गाने बाहेर जात होता. त्याच वेळेस भीम व हिंडिबा यांचा मुलगा घटोत्कच यांची भेट झाली.

घटोत्कचाने आपल्या राक्षसी मायेने जादू करून विवाहाला आलेल्या लोकांना खूप त्रास दिला व शशिरेखाला उचलून पळून नेऊन तिचा विवाह अभिमन्यूबरोबर लावून दिला.

एकदा कृष्णाकडे मदत मागण्याकरिता एका-तर्फे अर्जुन व दुसऱ्यातर्फे दुर्योधन द्वारके मधे आले.

झोपेतून जागे झालेल्या कृष्णांनी पायाशी बसलेल्या अर्जुनाला प्रथम पाहिले. नंतर आपल्या उशाशी बसलेल्या दुर्योधनाकडे दृष्टी वळवून पाहिले.

श्रीकृष्णाने त्या दोघांसमोर असे कोडे घातले की - "मी युद्धक्षेत्रांत शस्त्र धारण करणार नाही. मी तुमच्या दोघांपैकी एकाच्या बाजूने राहीन व दुसऱ्या बाजूला माझी सारी यादव सेना राहील. पण मी प्रथम अर्जुनाला पाहिले, तेव्हां प्रथम निवड त्याने करावी."

तेव्हां अर्जुनाने श्रीकृष्णाला आपल्या बाजूने निवडले व यादवसेना दुर्योधनाच्या बाजूने राहिली.



धृतराष्ट्राचा निरोप घेऊन संजय दूत बनून पांडवांकडे आला व त्याने शांतीचा संदेश देत युद्ध न करण्याबद्दल त्यांना विनविले.

पांडवांनी श्रीकृष्णाला कौरवांकडे आपल्या बाजूने दूत म्हणून पाठविले. त्याने कौरवांना समजावून सांगत म्हटले की, "पांडवाना त्याने अर्धे राज्य नाहीतर पांच गावे किंवा इंद्रप्रस्थ द्यावे. मी आपल्या दोघांच्यामधे समेट घडवून शांती स्थापित करावी, ह्या दृष्टीने आलो आहे."

परंतु कृष्णाच्या बोलण्याकडे दुर्योधनाने लक्ष दिले नाही.

तेव्हां श्रीकृष्णाने कौरवांच्या सभेत गंभीरपणे सांगितले - "मी अर्जुनाच्या रथाचे सारथ्य करीन, त्याच्या रथावर हनुमान असलेला ध्वज फडकत राहील. त्याच वेळेला अर्जुन रथात आपले गांडीव धनुष्य हातांत घेऊन तुमचे गाजर मुळ्यासारखे तुकडे तुकडे करील."

श्रीकृष्णाच्या तोंडून बाहेर पडलेले शब्द ऐकून दुर्योधन रागाने लाल झाला व आवेशाने म्हणाला, -"अरे कृष्णा, तू पांडवाचा दूत म्हणून आला आहेस कीं त्याच्या शौर्याचे गुण गायला व आम्हाला धमकी द्यायला? आताच तुला दोरखंडाने बांधून ठेवतो आणि पहातो तुला कोण सोडवायला येतो ते!"

असे म्हणत दुर्योधनाने दुःशासनाकडून एक लोखंडी सांखळी मागविली. ते पहाताच कृष्णाच्याबरोबर आलेल्या सात्यकीने आपल्या म्यानांतून तलवार बाहेर काढली.

श्रीकृष्णाने सात्यकीला अडवीत म्हटले - "मी हातात कांहीही न घेता एकजुटीने राहाण्याचा



निरोप घेऊन दूत म्हणून आलो आहे. मला त्यांनी कैद करणे हे उचित होईल काय? तुझे सैन्य खूप प्रभावशाली आहे. मी एकटा काय करूं शकेन? माझीच चूक झाली, तरी पण तुला मला कैद करावयाचे असेल तर कर."

त्यानंतर त्या चांडाळचौकडीने श्रीकृष्णाला चारी बाजूने पकडले. परंतु कृष्णाने आपले विश्वरूप प्रकट केले. त्यासरशी सर्वजण भयभीत होऊन तेथून पळून गेले. गोड बोलून किंवा धाक दाखवून श्रीकृष्णाने कौरव व पांडवांच्यात समेट घडवून आणण्याचा प्रयत्न केला. तो असफल झाला. आता युद्ध हेच एक बाकी राहिले.

कुरुक्षेत्रांत युद्धाकरिता निरनिराळ्या देशांचे राजे आपापल्या असंख्य अक्षौहिणी सैन्यासह एकत्र जमले. अशा तऱ्हेने कौरव पांडव यांच्यात महाभारत सुरु झाले. रथांच्या घंटाच्या नादाने, घोड्यांच्या खिंकाळ्याने, सर्व दशदिशा दुमदुमून गेल्या. जिकडे तिकडे युद्धाच्या आरंभीच्या रणभेदी वाजूं लागल्या. ज्या ठिकाणी एका वेळेस परशुरामाने क्षत्रियांचे रक्त शामंत पंचक नांवाच्या कुंडात भरले होते, तोच कुरुक्षेत्र आता पुन्हां क्षत्रियांचे रक्त मागत होता. संजयला दिव्य दृष्टी प्राप्त होती. त्यामुळे त्याने सर्व युद्धांचा सारांश तयार करून धृतराष्ट्राला सांगितला. जन्मांध व पुत्रप्रेमाने व्याकुळ झालेला कौरवांचा राजा धृतराष्ट्र दुर्योधनालासुद्धां अडविण्यास असमर्थ होता.

तो शांतपणे संजयचे वक्तृत्व ऐकत होता. आपला पती आंधळा आहे म्हणून आयुष्यभर डोळ्यावर पट्टी बांधणारी महान पतिव्रता गांधारी व शंभर कौरवांची आईसुद्धां धृतराष्ट्राशेजारी बसून सारा वृत्तान्त ऐकत होती.

संजय युद्धाचे सारे वर्णन करून सांगत होता, व ते दोघे शांतपणे ऐकत होते. संजयने पांडव व कौरवांच्या सैन्यांचे वर्णन करून सांगितले. धृतराष्ट्राने विचारले - "आता मला सांग, दोघांच्या सैन्यात काय तफावत आहे?"

संजय म्हणाला, "पांडव व कौरव दोघांच्या सैन्याचे रुप समान शक्तिशाली आहे. परंतु कृष्णाला मिळवून पांडव अधिक बलवान झाले आहेत." असे म्हणत त्याने सारा कुरुक्षेत्राचा पुन्हां वृत्तांत सांगितला.





भारतांतील अपरिचित स्थळें :

# भवानी - नदीतले बेट

भूगोलाच्या तासाला आपण शिकतो कीं ज्या जमिनीला चारी बाजूंनी पाण्याने वेढलेले असते, त्या भागाला बेट, असे म्हणतात. भारतांतली अंडमान, निकोबार, लक्षद्वीप, आणि मिनिकॉयसारखी बेटे, बंगालच्या उपसागरांत किंवा अरबी समुद्रांत आहेत. त्याशिवाय भारतांत कांही बेटे समुद्रांत नसून नद्यांत आहेत. असेच एक बेट आंध्र प्रदेशांतल्या कृष्णा नदीमधे आहे. हे बेट विजयवाड्यापासून फक्त चार किमी अंतरावर आहे, आणि प्रकाशम धरणाजवळ आहे, त्यामुळे नदीत नेहमी भरपूर पाणी असते.

भवानी या रमणीय बेटापर्यंत ब्रम्ह पार्कपासून रोज नावा जात असतात. कृष्णेच्या शांत, संथ पाण्यावर नाव पुढे जाऊं लागली आणि थोडा वेग वाढला, कीं या बेटाची जाणीव आपल्याला होते. दूर अंतरावरुनदेखील इथल्या नैसर्गिक आणि निष्कलंक सौंदर्याने मन मोहित होते. मुलांसाठी हा नावेतून नदीचा प्रवास हा फारच वेगळा अनुभव आहे. जेव्हां त्या बेटावर जाऊन मुले उभी राहातात, तेव्हां आपण निर्मळ निसर्गाच्या सान्निध्यांत आहोत, व भूगोलातल्या निरनिराळ्या गोष्टींचा अभ्यास इथें करता येणे शक्य आहे, याची त्यांना जाणीव होते.

कृष्णा व गोदावरी नद्यांच्या पात्रांत अशी अनेक लहानलहान बेटे आहेत. त्यांतले भवानी हे सर्वांत मोठे आहे. त्यांत सुरेख वनराजी व मनमोहक तलावही आहेत. त्यामुळे एक दिवसभराची सहल करण्यासाठी हे एक रम्य पर्यटन स्थळ झाले आहे. पर्यावरणाचा तोल सांभाळणारे भवानी हे एक अद्वितीय बेट आहे.

व्यापारउद्योगांनी गजबजलेल्या विजयवाडा या शहरापासून हैदराबाद या राजधानीला जाताना २७५ कि.मी. अंतर पार करावे लागते. या दोन्ही शहरांतून भवानीला जाता येते.





# वेळेचे भान

एका गांवात भद्रसेन नांवाचा एक हुशार ज्योतिषी राहात होता. आसपासच्या सर्व गांवकऱ्यांनी भविष्य जाणून घ्यायला त्याला आपला हात दाखवला होता. कुणाचाही हात पाहून भद्रसेनला त्यांच्या मनांतला गोष्ट समजत असे. त्याशिवाय तो भावी काळाचे भविष्यही सांगत असे.

भद्रसेनचे नांव सगळीकडे पसरलं होतं, म्हणून कुणी व्यावसायिक ज्योतिषी त्या गावात जायला घाबरत होते. चुकून जरी एखादा ज्योतिषी त्या गांवात आलाच, तर भद्रसेन त्याची जाहीर परीक्षा घेऊन गांवकऱ्यांसमोर त्याचा अपमान करुन त्याला परत पाठवीत असे.

एकदा रामशास्त्री नांवाचा एक ज्योतिषी त्या गांवात आला. त्याला भद्रसेनबद्दल कांहीच माहिती नव्हती. भद्रसेनला जेव्हां हे समजलं, तेव्हां रामशास्त्रीला त्याने अनेक प्रश्न विचारले. ''हस्तसामुद्रिक शास्त्राच्या कोणत्या भागाचा तू अभ्यास केला आहेस? तू खरा कोणत्या गांवचा रहिवासी आहेस?''

''महाशय, मला हस्तसामुद्रिक शास्त्रांतलं थोडं कांही समजतं. त्यावरच माझं पोटपाणी अवलंबून आहे. म्हणून जिथे पोटाची सोय होईल, ते माझे गांव!'' रामशास्त्रीने नम्रपणे सांगितले.

त्याचा विनय पाहून भद्रसेनाला चेव चढला. तो म्हणाला, ''तुझं अर्धकच्चं ज्ञान पाहून पैसे द्यायला कांही इथले लोक मूर्ख, वेडे, नाहीत. माझ्याबद्दल तू ऐकलं नसशील. हस्तसामुद्रिक शास्त्राचा माझा खूप अभ्यास आहे. मी इथे आहे, म्हणून तुला इथे पाणीदेखील मिळणार नाही. म्हणून तू दुसऱ्या एखाद्या गांवी गेलास, तर त्यांत तुझेच भले होईल.''

हे बोलणे ऐकून रामशास्त्रीला फार राग आला. भद्रसेनची घमेंड उतरवून नंतरच हे गांव सोडायचे, असा त्याने निश्चय केला. तो शांतपणे म्हणाला,

२५ वर्षांपूर्वीची चांदोबात प्रकाशित झालेली कथा

''महाशय, प्रत्येकाचे ज्ञान हे आपापले वैशिष्ट्य दाखवणारे असते. मी आपल्यापेक्षां मोठा आहे अशी कांही मी शेखी मिरवत नाही. पण कांही पुरावा हातांत नसतानाच आपण मला तुच्छ ठरवलंत. आता कोण लहान वा मोठा, हा निर्णय परीक्षा घेऊनच ठरवायला हवा!''

तिथे जमलेल्या लोकांनीही म्हटले, ''रामशास्त्रीचे म्हणणे योग्य आहे. कुणातरी नवीन माणसाचा हात दोघांनी पाहावा, आणि त्याची माहिती सांगावी. म्हणजे कोण बरोबर आहे ते ठरवता येईल.''

लोकांच्यात कुजबुज चालली होतीच. तेवढ्यांत शेजारच्या गांवचा एक श्रीमंत माणूस तिथून जाताना दिसला. चौथऱ्याजवळ जमलेल्या लोकांनी त्याला बोलावून समजावले, ''महाशय, इथे एक छोटीशी परीक्षा होणार आहे. कृपा करुन या दोन्ही ज्योतिष्यांना आपण आपला हात दाखवावा.''

त्या धनवंताने चौथऱ्याजवळ जाऊन आपला हात पुढे केला. ''भद्रसेनने त्याच्या हातावरच्या रेषा पाहून म्हटले, ''महाशय, इथे तर एक परीक्षा चाललेली आहे. म्हणून मला खरं काय ते सांगणं भाग आहे. आपल्याकडे भरपूर धनसंपत्ती आहे. पण आपणही कांही कमी कंजूष नाही. आपल्या बायकोच्या लहरीनुसार आपण वागत असता!''

त्या धनवंताने रागाने म्हटले, ''कांहीतरी खोटंनाटं सांगून माझा अपमान करायला तुम्ही मला इथे बोलावलत कां?'' त्यावर त्या परक्या



गृहस्थाला रामशास्त्रीने नम्रपणे म्हटले, ''महाशय, आपण रागावूं नये. कांही लोकांना वाटतं कीं ते ज्योतिषशास्त्र पूर्ण जाणणारे पंडित आहेत. मलाही आपला हात पाहायला द्यावा जरा... हा तर एका लक्ष्मीपुत्राचा हात आहे. या हातावरच्या रेषा दातृत्व दाखवणाऱ्या आहेत. आपल्यापुढे मोठमोठी मंडळी भिजलेल्या मांजरासारखी लहान वाटतात. आपल्या पूर्वजन्मीची थोर पुण्याई असेल म्हणून आपल्याला अगदी अनुरूप पत्नी मिळालेली आहे.''

हे शब्द ऐकल्यानंतर तो सद्‌गृहस्थ खुषींत येऊन म्हणाला, ''शाबास! तुम्ही सारं कांही सांगितलंत, ते अगदी खरंच आहे! जणूं कांही तुम्ही मला अगदी जवळून पाहात आहात!''

त्यानंतर रामशास्त्रीने त्या धनवंताचा हात पुन्हां नीट निरखत म्हटले, ''यावेळी माझ्या भविष्यकथनावर प्रसन्न होऊन आपण आपल्या हातांतली आंगठी मला बक्षीस देण्याचा विचार करीत आहात!''

हे ऐकून धनवंताचा चेहरा एकदम पडला. ते ओळखून रामशास्त्रीने विचारले, ''मी कांही चुकीचं सांगितलं कीं काय? आपण असं कां पाहाता आहात?'' धनवंत सांवरत म्हणाला, ''तसं कांही नाही. पण मला अश्चर्य वाटलं कीं माझ्या मनांतला हा विचार तुम्हाला कसा काय समजला?''

असं बोलून त्याने आपल्या बोटांतली अंगठी काढून रामशास्त्रीच्या हातांत ठेवली आणि तो आपल्या मार्गाने जाऊं लागला. तिथे जमलेल्या लोकांनी रामशास्त्रीची नाना प्रकारांनी स्तुती केली आणि ह्या परीक्षेंत तो यशस्वी झाल्याचे मान्य केले, ती चर्चा ऐकून भद्रसेनची मान लाजेने खाली गेली.

तेव्हां रामशास्त्री तिथल्या लोकांना म्हणाला, ''वास्तविक भद्रसेन हस्तसामुद्रिक शास्त्रांत प्रवीण आहे, पण हेच पोटापाण्याचं साधन असलेल्या माझ्यासारख्या व्यक्तीला नुसतीच शास्त्रीय माहिती पुरत नाही. त्याला वेळेचं भान ही राखावं लागतं! त्याचबरोबर व्यावहारिक धोरण देखील असावं लागतं. त्याची सांगड जर ज्ञानाशी घातली गेली नाही, तर अहंभाव वाढतो. आणि त्यामुळे निष्कारण अपमान होऊं शकतो.







# आर्य

शांतीपुर बळकावणाऱ्या सेनापती वीरसिंहाचे कनकदुर्गादेवीची सोन्याची मूर्ती ताब्यांत घेण्याचे, सारे प्रयत्न फोल ठरतात. नवीन मंदिरात देवीची प्रतिष्ठापना थांबवायचा तो प्रयत्न करतो. मूर्तीचे रक्षण व्हावे म्हणून सुखदेव सरदाराची मुलगी सुकन्या वीरसिंहाचा विवाहाचा प्रस्ताव मान्य करते. जयर सिंहाच्या संरक्षणाखाली ती हत्तीवर बसते. एक वानर जयरसिंहावर हल्ला करतो. सुकन्या निसटते.

## अज्ञात राजकुमाराचे रहस्य

चित्र : गांधीअय्या















# सर्वोत्तम कथा



जगमोहन आजोबांनी राम व श्याम या दोघांना बोलावले, व दोघांना खाऊ दिला. नंतर त्यांनी एका गरीब मुलाची गोष्ट सांगितली. गोष्टींत देव त्या गरीब मुलावर प्रसन्न होतात व देव त्यांना सुखी करतो.

एकदम जगमोहन आजोबांनी राम व श्यामला विचारले, "राम, श्याम, जर देव तुम्हाला वर देण्यासाठी आला तर तुम्ही काय मागाल?"

बराच वेळ राम श्याम गप्प राहिले. नंतर राम म्हणाला, "मला माझे आजोबा, आमचे हिरवे हिरवे शेत, माझे घर, आंगण खूप आवडते. पण आमच्या शेतांत झाडे फारशी नाहीत. त्यामुळे पक्षी सुद्धां कमी येतात. देवाला मी सांगेन कीं माझ्या शेताच्या बांधावर भरपूर झाडे उगवू देत व पक्षी येऊं देत. म्हणजे मी रोज संध्याकाळी तिथे आजोबांना घेऊन जाईन."

श्याम म्हणाला, "आजोबा, मला फार दूरच्या देशांत जायचे आहे. मी व्यापार करणार, खूप पैसे मिळवणार. पण समुद्रावरुन जाताना जहाज लागते. ते माझ्याजवळ नाही. म्हणून मी देवाजवळ मोठे जहाज मागणार व दूरच्या देशांत जाणार आहे." अशा प्रकारे राम व श्यामने उत्तर दिले.

सागर उत्तम पाटील,
संदीप गोपाल पाटील, मु. बाघकूद बुद्रुक, पो. पिंपरी,
ता. धरणगांव, जि. जळगांव, महाराष्ट्र - ४२५ १०४.



# या बागेतले लाल गुलाब

विशाल देशांत सोमेश्वर नांवाचे एक गांव होते. तिथे पीक चांगले येत असे म्हणून तिथल्या शेतकऱ्यांना कांही कमी नव्हते. जरुरीच्या साऱ्या वस्तू ते विकत घेऊं शकत. व्यापारीदेखील योग्य नफा घेऊन माल विकत असत. स्वार्थापोटी इतरांचे नुकसान करण्याची प्रवृत्ती लोकांच्यात नव्हती. गांवकरी सज्जन व समंजस होते. ते नेहमी संतुष्ट दिसत. निरोगी वातावरणांत ते आनंदात राहात होते.

सोमेश्वरचे जनार्दन मंदिर फार प्रसिद्ध होते. त्याच्या दर्शनासाठी दूरदूरच्या गांवांतून लोक येत असत. या गांवाचे हे महात्म्य हळूंहळूं राजाच्या कानावर गेले. त्यांनी एके दिवशी गंगाभट्ट मंत्र्याला सांगितले, "मंत्रीजी, तिथले जनार्दनस्वामीचे मंदिर शेकडो वर्षांचे जुने आहे. पण माझ्या माहितीप्रमाणे दहा वर्षांपूर्वी हे गांव कांही इतके भरभराटीस आलेले नव्हते. मला वाटतं कीं गांवच्या वैभवाचे कारण फक्त हा देव आहे असे नाही; याचे दुसरे कांहींतरी कारण अवश्य असले पाहिजे. यावर तुमचे काय मत आहे?"

राजा व मंत्री ज्योतिषांचा वेष करुन सोमेश्वरला पोंचले. तिथली समृद्धी पाहून ते चकित झाले. भविष्य सांगण्याच्या निमित्ताने ते एका घरी गेले. तिथल्या घरमालकाने त्यांना म्हटले, "महाशय, तुमच्या चेहऱ्यावरचे तेज पाहून असं वाटतंय कीं तुम्ही दोघेही विद्यावंत, प्रतिभावंत आहात, पण अशा प्रकारे ज्योतिष सांगून आपली विद्या वांया जाते असं मला वाटतं. मनुष्यांना जे हवं ते कष्टाने मिळवता येतं. माणसाने केवळ दैवावर हवाला ठेवून बसणं ठीक नाही. आपल्या योग्यता व कुवतीनुसार आपण परिश्रम केले पाहिजेत, आणि ज्याला स्वतःच्या योग्यतेवर विश्वास आहे, त्याला ज्योतिषाशी कसलं आलंय काम?"

त्या गृहस्थाच्या संयमाचे राजाला आश्चर्य



वाटले व तो पुढे म्हणाला, "जनार्दनस्वामीच्या कृपेमुळे गांवातले सारे लोक सुखी आहेत, संतुष्ट आहेत. आमच्यासारख्या लोकांचा मानसन्मान, आदर तुमच्यासारखे सज्जनच करुं शकतात. नाही म्हणूं नका." त्यावर त्या गृहस्थाने हंसून म्हटले, "महोदय, परमेश्वराने आपल्याला जन्म दिला, चांगल्या सुखसोयी दिल्या. यापेक्षां जास्त अपेक्षा देवाकडून आपण ठेवणे चुकीचे आहे, असं आमच्या गांवातले कमलनाथ म्हणतात. ते सांगतात त्यानुसार आम्ही वागतो. त्यामुळेच आमच्या गांवाची इतकी प्रगती झालेली आहे. आम्हाला तर वाटतं कीं त्यांना देवाने दहा वर्षांपूर्वी आमच्याकडे पाठवलं आणि आमच्यावर कृपा केली. एकवार तुम्ही त्यांना भेटलात तर ते तुमच्या कुवतीप्रमाणे तुम्हालाही काम देतील."

त्या गांवाच्या प्रगती व वैभवाच्या मागे कमलनाथ आहे, हे राजाला व मंत्र्याला स्पष्ट कळून चुकले. ते दोघे कमलनाथला भेटले. दोघांचे बोलणे ऐकून घेतल्यावर कमलनाथ म्हणाला, "महोदय, ज्योतिषशास्त्र महान आहे हे मी मानतो. पण माणसांना भविष्य सांगण्यामुळे त्याचा फायदा होण्यापेक्षां नुकसानच जास्त होतं. या शास्त्राचा जर योग्य उपयोग करायचा असेल तर पाऊस, पूर, वादळ, भूकंप, दुष्काळ अशा आपत्तींबद्दल जर आधी समजले तर ते उपयोगी पडेल आणि त्यामुळे अगोदरच काळजी घेता येईल. त्या दृष्टीकोनातून आपण ज्योतिषाचा अभ्यास करुन पहावा. तुम्हाला हवे असेल तर या दिशेने मीही तुम्हाला थोडीफार मदत करीन."

त्यावर मात्र दोघांनी ताबडतोब आपली ओळख दिली. व तिथे येण्याचे कारण सांगितले. "हे बघा, राजाने कितीही आज्ञा व आदेश दिले तरी आपल्यासारख्यांचे प्रबोधन असल्यामुळेच जनतेचा फायदा होत असतो. आम्ही तुमच्याकडे कांही हुशार, तडफदार तरुण मुले पाठवूं. तुम्ही त्यांना प्रशिक्षण द्या. त्यांचे शिक्षण संपले कीं त्यांना इतर गांवी नोकरीवर धाडता येईल आणि आपल्या विचार व मार्गदर्शनाचा प्रसार ते नीट करतील. त्यामुळे देश समृद्ध होईल."

कमलनाथने त्यांचे म्हणणे मान्य केले. सहा महिन्यांत त्याने वीस तरुणांना प्रशिक्षण दिले. ते निरनिराळ्या गांवात गेले आणि हे नवे विचार त्यांनी गांवात रुजवले. परंतु वर्षं उलटले तरी त्या गांवातून कांही परिवर्तन दिसले नाही. त्यांच्या



नवीन विचारांत कुणीही फारसे स्वारस्य दाखवले नाही.

त्याचे राजाला आश्चर्य वाटले. उलट सोमेश्वर गांवची भरभराट जनार्दनाच्या कृपेमुळेच झाली आहे हा त्याचा विश्वास पक्का झाला. पण गंगाभद्र मंत्र्याने मात्र राजाची शंका दूर करण्याच्या हेतूने राजाला म्हटले, "महाराज, जर ही परमेश्वराचीच कृपा असली तर आपण जनतेसाठी कांहीच करुं शकणार नाही. पण जर हा कमलनाथचा प्रभाव असेल, तर आपण त्यांना दुसऱ्या गांवात पाठवून बघू या. सत्य काय ते नंतर समजेल."

राजाला मंत्र्याचा विचार पटला. त्यांनी कमलनाथने रामपूरला जावे अशी इच्छा व्यक्त केली. तिथे ओळीने चार वर्षे दुष्काळ पडला होता. गांवात लोक भुकेने कळवळत होते. जे कांही थोडेफार मिळत होते, त्यांतून ते भूक भागवत होते. कमलनाथ, आपली पत्नी मीनाक्षी, व राम व गीता ह्या मुलांना घेऊन त्या गांवात पोंचला. गांवातली वाईट परिस्थिती पाहून त्यांच्या डोळ्यांत अश्रू आले.

गांवकऱ्यांनी त्यांना राहायला एक ओसाड घर दिले. तिथे त्यांनी आपले बिऱ्हाड थाटले. ती सारीजण सूर्योदयापूर्वी उठत. मीनाक्षी घरकामांत मग्न होईल. कमलनाथ थोडा वेळ मुलांना शिकवीत असे आणि नंतर लोकांना भेटायला म्हणून गांवात जाई. प्रत्येकाशी बोलून तिथल्या अडचणी, चिंता, गांवातल्या खाचाखोचा, याची माहिती करुन घेई व जमल्यास त्यांच्या अडचणींवर मार्ग



सुचवीत असे. त्याच्या सांगण्यामधे कोणती जादू होती ते सांगता येत नसे. पण सल्ला मागायला मात्र सारेजण त्याच्याकडे जात.

कुठे विहिरी खोदल्या म्हणजे पाणी लागेल, हे कमलनाथने त्यांना सांगितले. कमी पाण्यावर कोणती नगदी पिके येऊं शकतात, हेही त्याने शिकवले. दुष्काळामुळे नगरांत जाऊन तात्पुरती कामें कशी मिळवता येतील, व कुटुंबाची त्यांत गुजराण होऊं शकते, हेही त्याने समजावून सांगितले. प्रकृति निरोगी राहावी म्हणून तो निरनिराळी औषधे व उपाय सुचवत होता. त्याचबरोबर त्याने गांवकऱ्यांना सांगितले, "आपल्या भूमीवर वाळवंट आहे, अरण्यें आहेत, बर्फाच्छादित पर्वत आहेत. या सगळ्या ठिकाणी लोक सुखरूप राहातात. कारण, नैसर्गिक



आपत्तींना माणूस कधीही घाबरत नाही आणि आपली प्रकृति त्या त्या हवेंत चांगली राहावी, म्हणून प्रयत्न करतो व आयुष्य जगतो.''

सहा महिन्यांच्या आंत कमलनाथचे ओसाड घर हिरव्या झाडाझुडपांनी बहरले, गांवाचाही हळूंहळू कायापालट होऊं लागला. त्यासाठी कमलनाथला एखादी चांगली भेटवस्तू द्यावी, असा गांवकऱ्यांनी निर्णय घेतला.

ते ऐकून कमलनाथ म्हणाला, ''आपण माझा मान राखता, माझा सल्ला अंमलात आणता आहात. ह्यापेक्षां जास्त चांगली भेट कुठली असू शकेल?''

गांवकरी त्याच्या पत्नीला, मीनाक्षीला म्हणाले, ''ताईसाहेब, आपण ह्या ओसाड घरांत आलात आणि इथे नंदनवन फुलवलेत. आपल्या पतिराजांनी आम्हाला मार्गदर्शन करुन गांवाचे भले केले. पण खरं पाहिलं तर, हे गांव सुधारण्याच्या मागे तुम्ही आहात. आम्ही आपल्याला कांहीतरी द्यावे, अशी आमची फार तीव्र इच्छा आहे. आपल्याला कांही भेट दिली तरच आम्हाला समाधान वाटेल.''

मीनाक्षीने लगेच म्हटलं, ''एक काळ होता, की या घराची पिछाडी अगदीच मोकळा माळ होती. आता हिरवी झाडे, रंगीबेरंगी फुले इथे डुलताहेत. पण या घराच्या बागेत लाल गुलाब नाही, ते मला नेहमी जाणवतं. तुम्ही जर त्याचे एखादे रोप मला आणून दिलेत, तर मला खूप आनंद वाटेल. मला दुसरीतिसरी भेट कोणतीही नको, तेवढं रोप दिलं कीं पुरे!'' गांवकरी लगेच लाल गुलाबाचे रोप शोधायला निघाले.

तोपर्यंत रामपुरमधे बरीच सुधारणा झालीय हे राजालाही कळलं. त्याने रामपुरांतल्या कांही प्रमुख गांवकऱ्यांना बोलावून घेतले. गांवकऱ्यांनी सांगितलं कीं गांवात जी कांही प्रगती झाली होती. त्याचे सारे श्रेय कमलनाथांनाच जाते.

गंगाभद्राने त्यांना सांगितलं, ''आता कमलनाथ तुमच्या गांवात राहिले नाहीत, तरी गांवाची प्रगती होतच राहाणार. आता महाराज त्यांना दुसऱ्या गांवाला, योगवरला पाठवायचा विचार करीत आहेत.''

हे ऐकून गांवकरी अवाक् झाले. त्यांनी आपसांत चर्चा केली व म्हटले, ''महाराज, कमलनाथांची पत्नी मीनाक्षीबाई यांनी आम्हाला लाल गुलाबाचे रोप आणायला सांगितले आहे आणि आम्ही ते आणून देण्याचे त्यांना वचन दिले आहे. अजून ते रोप मिळाले नसले तरी लौकरच मिळेल. तोपर्यंत आपण आम्हाला सवड द्यावी.

राजाला त्यांचे म्हणणे पटले. पण सहा महिने झाले तरी ते रोप कांही मिळाले नाही. मंत्र्याला हे समजल्यानंतर त्याने राजाला म्हटलं, ''महाराज, रामपुरवासीयांना अजून कांही गुलाबाचं रोप मिळालेलं नाही. आपण त्यासाठी प्रयत्न करायचा कां?'' राजाने संमती दिली. बऱ्याच शोधानंतर शेजारच्या राज्यांतल्या एका खेड्यांत ते रोप मिळाले.

राजा व मंत्री रामपूरला गेले. कमलनाथला एक किंमती भेटवस्तू देऊन त्यांनी त्याचा सत्कार केला व गांवकऱ्यांतर्फे ते रोप मीनाक्षीला देऊन राजाने त्यांना सांगितलं, ''आपली इच्छा पूर्ण झाली. आता तुम्ही योगवर गांवी जावे, आणि त्या गांवाचा उद्धार करावा.''

तोच मीनाक्षी चटकन म्हणाली, ''महाराज, अजून हे रोप आम्हाला इथे लावायचं आहे. त्याला पाणी घालून पहिले फूल आमच्या हातांत आले कीं त्यानंतरच आम्ही आपल्या इच्छेनुसार जरुर जाऊं.''

राजा आश्चर्याने म्हणाला, ''आपण इथून जाताना हे रोप योगवरला घेऊन जा ना!''

मीनाक्षीने उत्तर दिले, ''मी हे रोप इथल्या घराच्या बागेसाठी मागितलं होतं. ते इथेच लावायचं आहे मला!''

राजाने त्या दोघांना प्रणाम करीत म्हटले, ''आपल्या परिवाराचे वैशिष्ट्य काय आहे ते आत्ता मला समजलं. जिथें तुम्ही राहाता, ते गांव, लोक, घर, हे सारं तुम्ही आपलं मानून राहाता, आणि समर्पणाच्या भावनेने तिथे भरपूर कष्ट, मेहनत करता! म्हणून आपला सल्ला योग्य मानतात. नुसताच सल्ला महान असता तर सारे शिक्षक महात्मा बनले असते. माझी आपल्याला नम्र विनंती आहे कीं भविष्यांत आपण इच्छा असेल तिकडे जावे व रहावे, आणि आपल्या देशाच्या नागरिकांवर चांगले संस्कार करावेत, व त्यांना मार्गदर्शन करावे!''



# स्वर्ग-नरक

एक मुनी एका देवालयासमोरच्या मंडपात ध्यानमग्न होऊन बसले होते. तिथे एक सैनिक घोड्यावरुन खाली उतरला आणि मुनींच्यासमोर जाऊन उभा राहिला. थोड्या वेळानंतर मुनींनी जेव्हां डोळे उघडले, तेव्हां त्या योद्ध्याने त्यांना नम्रपणे प्रणाम केला आणि म्हटले, "फार दिवसांपासून माझ्या मनांत एक शंका आहे."

"सांग" मुनींनी प्रसन्नपणे म्हटले.

"लोक स्वर्ग-नरक याबद्दल बोलत असतात, ते खरेच आहेत कां?" सैनिकाने विचारले.

"तू कोण आहेस? काय करतोस?" मुनींनी सौम्य स्वरांत विचारले.

"मी या देशाचा सेनाधिपती आहे." त्या योद्धाने मोठ्या गर्वाने सांगितलं.

"तुझ्यासारख्या मूर्खाला कुणी सेनाधिपती केलं?" मुनींनी विचारलं.

मुनींच्या या शब्दांवर सेनाधिपती नाखूष झाला व त्याने चटकन म्यानांतून तलवार काढली.

"आत्ता आत्ता तुझ्यामधल्या नरकाचे द्वार उघडलेले आहे." मुनींनी हसत म्हटलं. मुनींचे बोलणे ऐकून सेनाधिपती मागे सरला, आणि तलवार म्यानांत ठेवून तो म्हणाला, "क्षमा करावी, मुनिवर."

"आता मात्र तुझ्यामधल्या स्वर्गाचे दार उघडलेले आहे. काम, क्रोध, लोभ, मोह इत्यादि दुर्गुण म्हणजे नरकाचे कूप आहे. पण शांति, करुणा, दया, सहनशक्ती, वगैरे सद्गुण आपल्यामधे सुख व संतोष भरतात. ज्या हृदयांत हे सद्गुण असतात, ते हृदय म्हणजे स्वर्ग असतो. स्वर्ग आणि नरक हे आणखी दुसऱ्या ठिकाणी नाहीत, ते आपल्या हृदयांतच आहेत." मुनींनी सांगितले.

"मी समजलो, मुनीवर, धन्यवाद!" असं म्हणून योद्ध्याने पुन्हां एकवार प्रणाम केला आणि तो तिथून निघून गेला. त्याच्या मनांत आता कांही शंका नव्हती हे त्याच्या चेहऱ्यावर स्पष्टपणें दिसत होतं.

*(झेन कथेचा आधार)*







# अस्वल्या मांत्रिक

## 20

(मंत्रदंड मिळवल्यानंतर बैराग्याच्या शिष्यांनी त्याचा प्रभाव किती आहे, ते पाहाण्यासाठी तो दंड जमिनीवर आपटला. त्यांतून तिथे खाली एक भुयार असल्याचे दिसले. आंत खजिना असेल या कल्पनेने बैरागी व ते शिष्य भुयारांत उतरले. त्याचवेळी तलावाजवळ पोंचलेला अस्वल्या वधिक तलवार उपसून पारध्यावर वार करणार होता. त्यानंतर...)

वधिकाची भयानक आकृती आणि त्याच्या हातांत चमकणारा परशु पाहून पारध्याला समजलं कीं पळून जाण्याचा प्रयत्न करणे तितकेच धोकादायक आहे. तो थरथर कांपायला लागला व दोन्ही हात जोडून विनवून म्हणाला, "महाशय, गेल्या सात दिवसांत मी या अरण्यांत विचित्र प्रकारची माणसे आणि एक भयंकर राक्षसही पाहिला. पण मी त्या कुणाशीही बोललो नाही. मी त्या मायामर्कटालादेखील पाहिलेलं नाही. लाल वस्त्र पांघरलेला एक जटाधारी एक शंख वाजवून ओरडत होता. "हे शिष्या, मायामर्कटा," - हे त्याचे शब्द मी निश्चित ऐकलेले आहेत."

पारध्याचे हे शब्द ऐकून वधिक आश्चर्य-चकित झाला. आपला परशु त्याने खाली ठेवत गंभीरपणे म्हटले, "अरे पारध्या, मला वाटतं कीं तू आम्हाला कांहीतरी खास गोष्टी नक्कीच सांगणार आहेस. त्यांचे रहस्य माझे मालक कालवर्माजी यांना ठाऊक असेल असं वाटतं. तू



पळून जाऊं नकोस. तुझ्या जिवाला मुळीच धोका नाही.''

तो वन्यवासी तरुणही चकित होऊन म्हणाला, ''वधिक भाऊ, या पारध्याच्या बोलण्यावर विश्वास ठेवता येईल कां? एक मांत्रिक व उग्रदंड राक्षस आपल्याबरोबर आहेत. अशा स्थितींत आणखी एक मांत्रिक आणि राक्षसांचा या अरण्यांत संचार असणे कसे शक्य आहे?''

''माझ्याही मनांत हीच शंका आहे. बहुधा आपले मांत्रिक यांच्या तोडीचा आणखी एक मांत्रिक इथे आला की काय? चांगली गोष्ट आहे. अरे पारध्या, तू ज्या लबाड बैरागी आणि भुयाराबद्दल सांगतो आहेस ना, त्यांची सविस्तर माहिती सांग.'' अस्वल्या वधिकाने म्हटलं.

त्यानंतर पारधी त्यांना त्या भुयाराकडे घेऊन गेला. बैरागी व त्याचे शिष्य त्यांत उतरले होते. मंत्रदंडाच्या सहाय्याने त्या लोकांनी जो चमत्कार केला, त्याचीही माहिती सांगितली.

ही बातमी कालीवर्मा आणि अस्वल्या मांत्रिकाला सांगावी म्हणून अस्वल्या वधिक निघणारच होता.

तेवढ्यांत कालीवर्मा घोड्यावर स्वार होऊन तिथे पोंचला आणि म्हणाला, ''अरे, हा प्रदेश आपल्यासाठी इथे मुक्काम करण्यासाठी फारच सोईचा होईल असं वाटतं!''

अस्वल्या वधिक कालीवर्माच्याजवळ जाऊन म्हणाला, ''कालीवर्माजी, मुक्कामाबद्दल नंतर विचार करूं. आता तुम्ही या पारध्याला विचारुन पाहा, त्याने दोन चमत्कारिक गोष्टी ऐकलेल्या आहेत.''

कालीवर्माने विचारल्यावर पारध्याने सांगितलं कीं त्याने शंख, मांत्रिक, राक्षस, बैरागी आणि त्याच्या दोन्ही शिष्यांना अरण्यांत बघितलं. बैरागी मंत्रदंडाच्या मदतीने जमिनींतल्या भुयारांत उतरुन आंत गेले होते.

कालीवर्मा भुयाराच्या तोंडापर्यंत गेला आणि आंत वाकून सावधपणे खाली उतरला. पायऱ्या उतरताना त्याला दूरवर थोडासा उजेड आणि त्याच्याकडे येणाऱ्या तीन आकृती दिसल्या.

कालीवर्मा लगेच भुयारातून वर येऊन पोंचला, व अस्वल्या वधिकाला म्हणाला, ''वधिका, तुझे अरण्यवासी सेवक इथे पाहारा करायला बसव. तू मांत्रिकगुरुजींकडे जाऊन ही सविस्तर माहिती सांग. इकडे मी भुयारांत शिरुन बैराग्याच्या हातांतला मंत्रदंड मिळवण्याचा प्रयत्न करतो.''



चार पावले पुढे जाऊन वधिक थांबला आणि म्हणाला, ''कालीवर्माजी, कृपा करुन हे विसरुं नका कीं यावेळी बैराग्यांच्या हातांत अस्वल्या मांत्रिकाचा शक्तीमान मंत्रदंड आहे.''

तलवार परजीत कालीवर्मा भुयाराच्या दिशेला वळून म्हणाला, ''हे बघ वधिका, माझ्या या सोनेरी मुठीच्या तलवारींत किती शक्ती आहे ते मला सांगता येणार नाही, पण ही देखील एखाद्या मंत्रदंडापेक्षा कांही कमी नाही. माझ्या पित्याच्या या तलवारीने जितकेतू राजाच्या पित्याच्या अनेक शत्रूंना मारलेले आहे. कदाचित लौकरच या तलवारीने जितकेतूचाही शिरच्छेद होण्याची शक्यता आहे.''

यानंतर अस्वल्या वधिकाचा वन्यवासी सेवक पारध्यासमोर जाऊन त्याला म्हणाला, ''अरे, तू तर पारधी, आणि मी रानांत राहणारा! पोटासाठी आपल्याला सारे अरण्य नेहमीच फिरावे लागते. म्हणून तू देखील माझ्यासारखा कुणा बलवंताच्या आश्रयाला जाऊन आपले पोटपाणी कां भरत नाहीस? चंद्रशिला नगराच्या गादीवर आता जितकेतू जास्त दिवस राहाणार नाही. त्यावेळेला जर विजेत्यांच्या पक्षांत राहिलं कीं राजदरबारांत आपल्याला कांही ना कांही चांगली नोकरी नक्की मिळेल.''

पारध्याने त्या सेवकाकडे आशेने पाहात विचारले, ''भाऊराव! तुम्ही जे कांही सांगितलंत ते चांगलं वाटतंय. पण दुष्ट आणि नाकर्त्या जितकेतू राजाला पदच्युत करणारा बलवंत कोण आहे?''



त्यावेळी भुयारांत खाली उतरणाऱ्या कालीवर्माला दाखवत तो वन्यवासी तरुण म्हणाला, ''त्यांचे नांव कालीवर्मा आहे. यापूर्वी जितकेतुने त्यांचा अपमान तर केला आहेच, पण त्यांचा शिरच्छेद करायचाही खूप प्रयत्न केला. आता त्याचा वचपा काढायची वेळ आलेली आहे.''

''भाऊ, मला मागे सोडून जाऊं नका. मीही तुमच्यासोबत राहीन!'' असं म्हणत पारध्याने त्या तरुणाला गळामिठी मारली.

भुयारांत शिरल्यानंतर कालीवर्मा गुडघ्या इतक्या पाण्यांतून चालत थोडे अंतर पुढे गेला. पुढे जाणाऱ्या बैराग्यांना सावध करीत तो बोलला, ''तुम्ही तिथेच थांबा!''

हा आवाज ऐकून बैरागी चमकले व त्यांनी वळून पाहिले. त्यांतला छोटा शिष्य थरथरत



म्हणाला, ''बैरागी गुरुजी! खजिन्याचे रक्षक आपला प्राण घ्यायला आले आहेत.''

गुरु बैरागी क्षणभर थबकला व कालीवर्माच्या दिशेने नीट निरखून बघत म्हणाला, ''अरे शिष्यांनो, आपल्याला घाबरायचं कांही कारणच नाही. आपल्याकडे येणारा हा माणूस यक्ष नसावा. मी आमच्या गुरुच्या तोंडून ऐकलं आहे की यक्ष ठेंगणे असतात आणि त्यांच आवाज किनरा असतो. हा तर अजानुबाहु दिसतो आहे. आवाजही खणखणीत घंटेसारखा आहे. हा साधा माणूस आहे. आपल्या मंत्रदंडाने याला आपण परलोकीं पाठवूं या!''

गुरुबैराग्याचे बोलणे संपण्यापूर्वीच कालीवर्मा झटकन त्यांच्याजवळ गेला आणि म्हणाला, ''अरे, तुमची सर्वांची मला चांगली माहिती आहे. तुम्ही चोरलेल्या त्या मंत्रदंडापेक्षां ही तलवार जास्त शक्तीशाली आहे. तुम्हाला तिची परीक्षा घ्यायची आहे कां?'' आणि त्याने त्यांच्यासमोर तलवार धरली.

त्या धारदार तलवारीच्या पात्याचे तेज पाहून दोन्ही शिष्य घाबरून गुरुजींना म्हणाले, ''गुरुजी, आपण मंत्र जपा आणि तलवारीचे भस्म करा!''

गुरुने दचकतच मंत्रदंड वर उचलला आणि कांहीतरी मंत्र पुटपुटला. पण त्याचा कांहीच परिणाम झाला नाही, तेव्हां कालीवर्माने पुढे सरसावून बैराग्याच्या छातीवर तलवार टेकवली आणि दरडावले, ''अरे बैराग्या, या मंत्रदंडाचा मी मालक आहे. हा फक्त माझ्या आज्ञा पाळतो. आता मला हा मंत्रदंड देतोस कीं तुझ्या छातींत मी ही तलवार खुपसू?''

गुरु बैरागी विचारांत पडला पण त्याचे दोन्ही शिष्य घाईने एकदम म्हणाले, ''गुरुजी! त्यांच्या हातांत मंत्रदंड देऊन टाका ना!''

''शिष्यांनो! तुम्ही ठीक बोललात!'' खोट्या गांभीर्याचा आव आणीत बैरागी म्हणाला आणि त्याने तो मंत्रदंड कालीवर्माच्या हातांत दिला नि म्हटले, ''वीर तरुणा! तुझ्या साहस व पराक्रमावर मी लुब्ध आहे. हा मंत्रदंड घेऊन जा आणि जितकेतु राजाच्या दत्तक मुलीशी विवाह कर. शंभर वर्षे सुखाने जगा व चंद्रशिला नगरीवर उत्तम प्रकारे राज्य करा!''

हे शब्द ऐकून हंसतच कालीवर्माने तो मंत्रदंड आपल्या हातांत घेतला. पुढे काय करावे हा विचार त्याचा मनांत तरळत होता, तोच गुरु बैरागी कांहीतरी गुप्त माहिती सांगावी असा अभिनय



करीत म्हणाला, ''हे बघ तरुणा, त्या खजिन्यांतला थोडासा हिस्सा आम्हाला देखील मिळायला हवा कीं नाही?''

हे ऐकून कालीवर्माला एक कल्पना सुचली. त्याने बैराग्याकडे एकदा नीट निरखून बघितले आणि म्हटले, ''अरेरे, या भुयारांत कांहीतरी खजिना लपवलेला असेल, म्हणून तुम्ही इकडे आलात. पण जर इथें कांही सोनेचांदी मिळाली तर ते घेऊन जाण्यासाठी मी तुम्हा लोकांना अनुमती देतो आहे. तुम्ही माझ्याबरोबर भुयारांत येऊं शकाल ना?''

हे ऐकून गुरुशिष्य फारच खूष होऊन म्हणाले, ''हे वीर तरुणा, तुमच्या शब्दांचा आम्ही अवमान करण्याचे मनांत सुद्धां आणणार नाही. तुम्ही पुढे व्हा आणि मार्ग दाखवावा.''

त्यानंतर सर्वजण दूर दिसत असलेल्या प्रकाशाकडे निघाले. एका ठिकाणी भुयारी वाट संपत होती. पण तिथे वरती जो दगड झांकण म्हणून ठेवलेला होता, त्याच्या फटींतून अंधुकसा प्रकाश खाली पडत होता.

कालीवर्माने बैराग्यांना म्हटलं, ''आता पहा, जर आपण वरचा हा दगड आवाज न करता बाजूला ढकलला, तर आपण सारेजण राजाच्या किल्ल्याच्या कोणत्या भागांत आलो आहोत हे निश्चितच आपल्याला समजेल. हं, मला जरा हात द्या!''

नंतर सर्वांनी मिळून तो दगड एका बाजूला ढकलला. दुसऱ्याच क्षणीं भुयाराच्या आंतून सूर्याचे किरण चमकायला लागले. दगडावर



असलेल्या जमिनींतली कांही फुलझाडांची लहान रोपे किंचित आवाज करीत खाली पडली.

कालीवर्मा सर्वांच्याआगोदर वर चढला, त्याने चौफेर नजर फिरवली. आपण राजाच्या उद्यानांत आलो आहोत हे त्याच्या लक्षांत आले.

त्याच्या इशाऱ्यानुसार सर्वजण भुयारांतून वर आले व म्हणूं लागले, ''आहाहा! किती सुंदर बगिचा आहे हा! हे तर जितकेतु राजाचे उद्यान असावेसे वाटते.''

कालीवर्माने त्यांना अगदी हळू आवाजांत बोलायची सूचना देत त्यांना समजावले, ''आपण अत्यंत धोक्याच्या प्रदेशांत पोंचलो आहोत. मला माझ्या जिवाची पर्वा नाही. जरा राजाच्या सैनिकांनी मला पकडले तर जिवंतपणी कांही मी त्यांचा बंदी होणार नाही. पण तुमचे काय होईल?'' बैरागी गुरु थरथरत म्हणाला, ''पण

आत्ताच आम्हाला आमचा जीव प्यारा आहे. या भुयारांत खजिना नाही हे आम्हाला समजले आहे. जर तुमची संमती असेल तर आम्ही आपले आल्या वाटेने निघून जाऊं!''

कालीवर्मा बैराग्यांनी परत जावे असं त्यांना सांगत होता, पण त्याच वेळी भुयाराच्या वाटे-जवळच्या झाडाच्या सावलीत जितकेतु राजा आणि मायामर्कट बोलत येत असताना त्यांना दिसले. ते त्यांच्या दिशेलाच येत होते. कालीवर्मा झटकन फुलझाडांच्याआड लपला आणि त्या बैराग्यांना हळूंच म्हणाला, ''तुमच्या जिवाला कांही धोका नाही. जर चुकून तुम्ही त्यांना दिसलात तर राजाला सरळ खोटं सांगा कीं हरवलेला मंत्रदंड नगरांतल्या एका व्यापाऱ्याच्या हातांत तुम्ही पाहिलात! आणि ही माहिती देण्यासाठी तुम्ही मुद्दाम तिथे आला होतात! मग पाहूं या पुढे काय होते ते!''

कालीवर्माने असं समजावून सांगितलं आणि दुरुन शंखध्वनी ऐकूं आला. क्षणांतच मायामर्कट फांदीवरुन उडी घेऊन त्यांच्याजवळच्याच एका झाडाजवळ आला व बोलला, ''तांत्रिक गुरुचा विजय असो! हा शंखध्वनि आपण किल्ल्याच्या-बाहेरुन करीत आहात कीं आंतून करता आहात?''

थोड्या वेळानंतर शंखनाद थांबला. मायामर्कट त्या झाडाच्या फांदीवरुन खाली उडी घेणार, तेवढ्यांत ते तिघे बैरागी घाबरुन चारी दिशांना टकामका पाहात होते, ते त्याच्या दृष्टीस पडले.

तो जोरजोरांत किंचाळत बोलायला लागला, ''महाराज, हे आपले उद्यान आहे कीं बैराग्यांचा मठ? आत्ता लागलीच या फुलझाडांपाशी उभ्या असलेल्या बैराग्यांना पकडा!'' आणि त्याने खाली उडी मारली.

जितकेतुने जोरांत टाळी वाजवली, सैनिकांना बोलावले, आणि बैराग्यांच्यासमोर जाऊन राजाने विचारले, ''कोण आहात तुम्ही? माझ्या बागेत कुणाच्या अनुमतीने शिरलात?''

त्यावर बैरागीगुरुने दोन्ही हात वर उचलून म्हटले, ''मंत्रदंड!.... श्यामगुप्त!.... मंत्रदंड!.... श्यामगुप्त!....''

*(क्रमशः)*





वेताळ कथा

# युवराजाचा निर्णय

शब्दाचा पक्का विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला. त्याने शव खाली उतरवले, खांद्यावर घेतले व तो स्मशानाच्या दिशेने चालूं लागला. तेव्हां प्रेतांत लपलेल्या वेताळाने त्याला म्हटले, ''राजन्, तू सर्वांना तुझ्या मनाप्रमाणे करायला लावतोस, त्यांच्यावर राज्य करतोस. जरा डोळे वटारले कीं लोक तुझ्या पायावर लोळण घेतात. पण आताची तुझी ही दयनीय स्थिती पाहून तुझी कींव येते. सेवकाप्रमाणे तू माझे ओझे वाहून नेतो आहेस. हे असं कुठपर्यंत करणार आहेस? तू एक पराक्रमी राजा आहेस हे विसरुं नकोस. राजाचे कर्तव्य काय असते ते तू चांगले



जाणतोस हे मला माहीत आहे. तुझ्यांत राजाचा अहंकार मुळीच नाही. पण असे कित्येक राजे आहेत कीं ते मोहांत अडकून वेडयासारखा व्यवहार करतात. तू तसं तर करीत नाहीस ना? तुला सावध करण्यासाठी मी तुला दिनकरवर्मा नांवाच्या एका युवराजाची कहाणी सांगतो, ती ऐक.'' आणि वेताळ पुढील गोष्ट सांगायला लागला.

कमलभद्र हा संजीवनी राज्याचा राजा होता. दिनकरवर्मा हा त्याला एकुलता एक मुलगा होता. युद्धविद्येबरोबर इतर शास्त्रांचाही त्याने भरपूर अभ्यास केलेला होता. आजपर्यंत इतका योग्य तरुण आम्ही कधी बघितला नव्हता असं लोक नेहमी म्हणत.

त्याला राज्याभिषेक करुन त्याच्यावर राज्यकारभार सोंपवावा व आपण विश्रांति घ्यावी असा विचार राजाच्या मनांत घोळत होता.

एके दिवशी उषापुरी राज्यांतला रंजितशर्मा नांवाचा दूत राजाच्या भेटीला आला. सिंहासनाच्या बाजूलाच मोठ्या ऐटीत बसलेल्या देखण्या युवराजाला पाहून तो फारच खूष झाला. त्याने राजाला म्हटलं, ''महाराज, उषापुरीचे आमचे महाराज आपल्या मुलीचा, मधुलिकाचा विवाह आपले चिरंजीवांशी करावा अशी इच्छा बाळगून आहेत. ही माहिती मी आपल्याला सांगावी म्हणून आलो आहे. हे पहा आमच्या राजकुमारीचे चित्र!'' असे म्हणून त्याने आपल्या थैलीतून चित्र व जन्मकुंडली बाहेर काढली व राजाकडे दिली.

मधुलिकाचे चित्रांतले अनुपम सौंदर्य पाहून राजा थक्क झाला. तिचे मोठे डोळे, चाफेकळी-सारखे नाक, चेहऱ्यावरचे प्रसन्न हास्य फारच मोहक होते. चित्रही फार सुरेख काढलेले होते. राजाने ते चित्र कांही वेळ नीट बघितले आणि युवराजाच्या हातांत दिले. नंतर ती जन्मकुंडली राजज्योतिषाकडे धाडली. युवराज त्या चित्राकडे एकटक बघत राहिला होता. ते पाहून राजा समाधानाने हंसला.

राजज्योतिषाने पत्रिका नीट अभ्यासली आणि नंतर एक दीर्घ श्वास घेऊन राजाला म्हटले, ''क्षमा असावी, महाराज! ही पत्रिका उत्तम आहे, पण



जर आमच्या युवराजांनी मधुलिकादेवींशी विवाह केला तर महिन्याच्या आंतच त्यांना सर्पदंश होईल व त्यांचा मृत्यू ओढवेल.''

हे ऐकून कांही क्षण युवराज गप्प राहिला. पण स्वतःला सांवरत त्याने सांगितले, ''मृत्यू अटळ असेल तर तो कोणत्याही रूपांत येऊं शकेल. जन्मकुंडलीच्यामुळे ही अशी अद्भुत सुंदरी नाकारणे हा विचार ठीक नाही.''

राजाच्या लक्षांत आलं कीं मधुलिकाने युवराजाचं मन जिंकलं आहे. रंजितशर्माही गोंधळून गेला.

''आपण आपला निर्णय आमच्या महाराजांना सावकाशीने कळवावा.'' असे सांगून तो निघून गेला.

कांही दिवस उलटले. एके दिवशी दिनकरवर्मा शिकारीला अरण्यांत गेला. दुपारपर्यंत हिंडत राहिल्यामुळे तो दमून गेला. आणि एका सरोवराच्या कांठावर सर्वांच्याबरोबर भोजनासाठी बसला. नंतर विश्रांति घेण्यासाठी जवळच्याच वडाच्या झाडाखाली तो पहुडला. त्याचा डोळा लागणार तेवढ्यांत भक्ष्य शोधण्यासाठी वडाच्या फांदीवरुन एक अजगर खाली येत होता, तो अचानक युवराजावर पडला व त्याने युवराजाच्या शरीराला विळखा घातला. ते भयंकर दृश्य बघून राजाचे सैनिक काळजींत पडले.

नेम धरून भाला फेकला किंवा तलवारीने वार केला, आणि चुकून युवराजावर घाव घातला गेला



तर अनर्थ झाला असता. कांही करण्याचा त्यांना धीरच होईना.

तितक्यांत कुठूनतरी अजगरावर बाणांचा वर्षाव झाला आणि त्याचे तुकडे झाले. अजगराचा विळखा सुटला आणि अजगर तडफडत मेला. युवराज मरणाच्या दाढेतून वांचला म्हणून सैनिकांना हर्षवायू झाला.

थोड्याचा वेळानंतर एक सुंदर रथ तिथे आला. हातांत धनुष्यबाण घेतलेली एक वीरबाला सुंदरी रथांतून खाली उतरली. तिच्यासोबत आणखी कांही तरुण मुलीही होत्या.

त्या तरुणीमुळेच आपले प्राण वांचले हे दिनकरवर्माच्या लक्षांत आले. त्याने कृतज्ञतेने तिच्याकडे पाहिले. चित्रांत जी मधुलिका त्याने



पाहिली होती, ती साक्षात त्याच्यासमोर उभी होती.

''मी उषापुरीची राजकुमारी मधुलिका - मैत्रिणींच्याबरोबर वनविहारासाठी इकडे आले होते. अचानक आपल्याला सर्पाच्या विळख्यांतून सोडवण्याची संधी मिळाली. आपण कोण ते मला कळेल कां?''

''मी संजीवनीपुरीचा युवराज, दिनकरवर्मा आहे. मला अजगराच्या विळख्यांतून तुम्ही सोडवलेत त्याबद्दल मनःपूर्वक धन्यवाद'' युवराजाने हंसून म्हटलं.

मधुलिकाने लाजून मान खाली घातली. त्यानंतर दोघेही एकमेकांकडे बघतबघत आपापल्या राज्यांच्या दिशेने गेले.

सर्पाच्या तावडीतून युवराज सुदैवाने वांचला खरा, पण राजाच्या कानांत मात्र राजज्योतिषाचे शब्द गुंजत राहिले होते. ''मधुलिकाशी जर युवराजांचे लग्न झाले तर युवराजांना सर्पदंश होईल व त्यांत त्यांचा मृत्यू होईल.''

हे शब्द आठवले कीं राजाच्या जिवाचा थरकांप होई. आठवडाभरानंतर एक दिवस युवराज व विदूषक बागेत हिंडत होते. सूर्यास्ताचे सौंदर्य पाहाण्यासाठी युवराज पुढे गेला. त्यावेळी अशोकाच्या वाळलेल्या पानांमधे एक सर्प होता. युवराजाचा पाय अनवधानाने त्या सापाच्या शेपटीवरच पडला.

सापाने फणा उभारुन युवराजाला दंश केला आणि तो तिथून सरसर जाऊं लागला. पण युवराजाने तलवार उपसून त्याचे डोकेच छाटले.

विदूषकाचा आरडाओरडा ऐकून सैनिक लगेच तिथे आले. राजवैद्याला निरोप गेला. त्यांनी ताबडतोब रामबाण औषध दिले व विषाचा परिणाम झाला नाही. युवराजाचा प्राण वांचला. त्यानंतर राजाला पुन्हां ज्योतिषाचे शब्द आठवले त्याची भीती वाढली.

पंधरा दिवसानंतर रात्री युवराजाने भोजन केले, व नंतर झोपायची वेळ झाली, तेव्हां एक दासी दुधाचा प्याला घेऊन आली व तिने तो प्याला पलंगाशेजारी असलेल्या एका घडवंचीवर ठेवला. युवराजाने प्याला उचलण्यासाठी हात पुढे केला. पण धक्का लागून दूध जमिनीवर सांडले.



शेजारीच पाळलेले मांजर झोपले होते त्याने ते दूध पटकन चाटून संपवले आणि कांही क्षणांतच ते मांजर तडफडून मेले. राजवैद्यांनी दुधाची परीक्षा केली तेव्हां त्यांत सापाचे विष मिसळले होते असे लक्षांत आले.

जास्त चौकशी केल्यानंतर ती दासी शत्रूची गुप्तहेर होती व युवराजाला मारण्याच्या हेतूनेच तिने राजवाड्यांत दासीचे काम पत्करले होते हे समजले. तिला पकडून तुरुंगात डांबले गेले.

या प्रसंगानंतर कांही दिवस उलटले व उषापुरीहून रंजित शर्मा हा दूत परत आला. त्याने राजाची भेट घेतली व युवराजाचा मधुलिकाशी विवाहाचा प्रस्ताव पुन्हां मांडला.

राजा एकदम संतापून म्हणाला, ''हा विचारच करता येणार नाही. ज्या दिवशी तुम्ही हा प्रस्ताव प्रथम आमच्यापुढे ठेवलात, त्या दिवसापासून तीन वेळा युवराज सर्पदंशापासून वांचले आहेत. यानंतर जर हा विवाह झाला आणि या बाईचे पाऊल आमच्या राजवाड्यांत पडले तर काय होऊं शकेल, त्याची कल्पनाच करवत नाही. कृपा करुन यापुढे हा विषय वाढवूं नका.''

शेजारीच बसलेल्या राजज्योतिषाने लगेच मत दिले, ''होय महाराज, आपले म्हणणे योग्य आहे, विवाहापूर्वीच जर जन्मकुंडली इतकी भारी असेल तर विवाहानंतर युवराजांचे आयुष्य लौकरच संपेल!'' त्यांचा स्वर गंभीर होता.

रंजितशर्माने एक दीर्घ श्वास घेतला आणि



युवराजाचे मत काय आहे ते जाणून घेण्यासाठी त्याच्याकडे बघितले.

युवराज विचारांत पडला. थोड्या वेळानंतर त्याने मान उंचावून म्हटले, ''मी मधुलिकाशी विवाह करणार आहे.'' त्याचाही स्वर गंभीर होता.

ही कहाणी सांगून वेताळाने विचारलं, ''राजन्, युवराज दिनकरवर्मा तीन वेळा सापाच्या अपघातातून वांचला, पण त्याचा ज्योतिष्यावर विश्वास नव्हता. त्याचे काय कारण असेल? अनुभवी राजा व सुविद्य राजज्योतिषी यांचा विरोध असूनदेखील त्याने मधुलिकाशी विवाह करण्याचा हट्ट धरला. हा मोह नाही कां? आणि उद्धटपणादेखील आहे ना? माझ्या या शंकांची उत्तरे माहीत असूनदेखील तू मौन पत्करलेस तर

तुझ्या डोक्याची शंभर शकले होतील.'' विक्रमार्कानें वेताळाच्या शंकेला लगेच शांतपणे उत्तर दिलं, ''मधुलिकाचे चित्र पाहून युवराज तिच्या सौंदर्यावर मोहित झाला होता. तिला जेव्हां त्याने प्रत्यक्ष पाहिले तेव्हां त्याचे मन तिच्यावर जडले. शत्रू आपल्या जिवावर उठलेला आहे हे त्याला ठाऊक होतं. म्हणून ज्योतिषाने सर्पदंशाचे भाकित केले तेव्हां तो घाबरला नाही किंवा त्याने आपला विचार बदलला नाही. त्याचा अर्थ त्याने राजज्योतिषाचा अपमान केला असा नाही.

उलट वस्तुस्थिती जाणून घेऊन त्यानुसार निर्णय घेणे हे योग्यच होते. भविष्यांत तो गादीवर येणार होता. म्हणून त्यावेळी वडील मंडळींना उघड विरोध करणे किंवा त्यांचा अनादर करणे हे त्याला बरोबर वाटले नाही. म्हणून त्याने प्रथम ज्योतिष्याच्या सांगण्याला विरोध केला नाही, कांही उतावळेपणा केला नाही.

ज्योतिष्याने प्रथम म्हटलं होतं कीं मधुलिकाशी विवाह झाल्यानंतर महिनाभराने युवराजाला सर्पदंश होईल. पण नंतर मात्र तिन्ही वेळा ज्या घटना घडल्या, त्यांचा संबंध ज्योतिष्याने मधुलिकाच्या जन्मकुंडलीशी जोडला. आपले बोलणे खरे ठरावे यासाठी तो एक निरर्थक, केविलवाणा प्रयत्न होता.

युवराज प्रत्येक बाबतीत तर्कनिष्ठ होऊन निर्णय घेत होता. म्हणून ज्योतिषाची शंका त्याला निरर्थक व खोटी वाटली. ज्या तरुणीने त्याचा प्राण वांचवला होता, तिच्या जन्मकुंडलीनुसार त्याचा प्राण कां जाईल, असा प्रश्न त्याला पडला. त्याला हे सगळं निराधार वाटत राहिलं.

दिनकरवर्माच्या निर्णयांत विचारपूर्वक आयोजकता होती, धैर्य होतं आणि परिपक्व विचारधारा होती. त्यांत मोह किंवा उन्माद याला कांहीही जागा नव्हती.''

राजाचे मौन भंग झाल्यामुळे वेताळ शवासहित अदृश्य झाला आणि पुन्हां झाडावर जाऊन बसला. **(राघवकी सनाच्या आधारे)**








# गुहांमधली मंदिरे

**अ**जिंठा व वेरूळ ही नांवे घेतली कीं त्यांतल्या गुहांमधे असणाऱ्या मंदिरांच्या भिंतीवरची चित्रें लगेच मनांत येतात. त्या कठीण पत्तरांतून ही मंदिरे कशी खोदली असतील, याचा कधी तुमच्या मनांत विचार आला आहे कां?

तुमच्यापैकी अनेकजण समुद्रकिनाऱ्यावर गेला असाल, आणि पाण्यांत थोडा वेळ खेळल्यानंतर, तुम्ही वाळूंत किल्ले व बंगले बनवले असतील. प्रथम तुम्ही वाळूचा एक मोठा ढीग करता आणि नंतर त्यांत दार, दालने, व इतर बारीक तपशील कोरुन काढता. अगदी तशाच पद्धतीने, हे दगड फोडून त्यांत गुहा व मंदिरेदेखील उत्तमरित्या कोरलेली असतात. तिथे 'वीटेवर वीट' असे बांधकाम नसते. भारतदेशांत ही पाषाणांत कोरण्याची कला सुमारे दोन हज़ार वर्षांपूर्वी सुरुं झाली.



प्रथम, पर्वताच्या बाजूने मोठाले दगड बाजूला करुन आंत मोकळी जागा केली जाते. हे काम छतापासून सुरुं होऊन खाली नेले जाते. मुंबईजवळची कार्ले येथील गुंफा १९०० वर्षांपूर्वी खोदलेली आहे. दोन्ही बाजूंना अगदी सरळ रेषेंत उभे असलेले इथले दगडी खांब प्रसिद्ध आहेत.

हे काम करणारे पाथरवट फारच उच्च दर्जाचे कलाकार असले पाहिजेत. वेरुळचे कैलास लेणे निर्माण करणाऱ्या कलावंताला इतके उत्तम काम आपल्या हातून घडले यावर विश्वासच बसेना, असं म्हणतात.

राजस्थानी लोककथा

# एकदा गाढव झालं की, नेहमीच....

जीवनसिंग हा एक सुखवस्तू व्यापारी होता. आपल्या दुकानांत माल विकण्यासाठी तो आसपासच्या गांवात मालाच्या खरेदीसाठी जात असे. तो आपले गाढव बरोबर घेऊन जाई. एकदा तो असाच घरी परत येत होता. गाढव पाठोपाठ येत होते. त्या दिवशी तो गांवभर बराच हिंडला होता, म्हणून तो थकून गेला होता. विश्रांतिसाठी एका मोठ्या झाडाच्या सांवलीत तो आडवा झाला नि त्याचा चटकन डोळा लागला.

कांही लहान मुलांचे पाठांतर चालले होते



त्याचा आवाज त्याला ऐकूं आला आणि तो चटकन उठून बसला. तिथला मुल्ला आपल्या घरांत मुलांना कांहीतरी शिकवत होता हे त्याला समजले. त्या मुलांच्यावर ओरडून मुल्ला म्हणाला, "मी तुम्हाला ओरडून काय उपयोग? तुम्ही सारेच गाढव आहात! तुम्ही चांगला माणूस व्हावं म्हणून मी खूप प्रयत्न करतोय. पण तुम्ही मला खोटं पाडण्याचा जणूं निश्चयच केलेला दिसतोय!"

मुलें निमूटपणे घरी परत जाताना जीवन सिंगने बघितली. त्याला आपले बाळपण आठवले. तो कधी शाळेंत गेलेला नव्हता. त्याची शाळा म्हणजे त्याच्या वडिलांचे दुकान. तिथें बोलायचे कसे, वागायचे कसे, हिशेब ठेवणे, लिहिणे, हे सारं कांही त्याने तिथे शिकून घेतले होते. आयुष्यांत प्रथमच कुणीतरी गाढवाचा माणूस बनवायचा प्रयत्न करतोय हे त्याला कळलं. त्याचे गाढव तर ओझी वाहाण्याखेरीज इतर कामांना पार निरुपयोगी होते. त्या कामासाठी कांही बुद्धीची आवश्यकता नव्हती.

जीवनसिंगाने त्याच्या गाढवाचा एक माणूस बनवावा म्हणून मुल्लाला विनंती केली. ती ऐकून मुल्लाला गंमत वाटली. व्यापाऱ्याने झाडाखाली पडल्यापडल्या जे ऐकले होते, ते सविस्तर



सांगितले. मुल्लाला हंसू आवरेना. तो म्हणाला, "ठीक आहे. तुझे गाढव इथें ठेव आणि त्याला तीन महिने लागेल त्या चारापाण्यासाठी तेवढे पैसे देऊन जा. त्यानंतर तू येऊन त्याला घेऊन जा."

जीवनसिंगाने माल खरेदीसाठी आणलेल्या पैशापैकी थोडे पैसे मुल्लाला दिले. गाढवाच्या पाठीवर लादलेले ओझे उतरवले. ते स्वतःच्या पाठीवर घेतले आणि आपली विनंती मुल्लाने मान्य केली, म्हणून त्याचे आभार मानून तो गांवी परतला. चलाख मुल्लाचा डाव असा होता कीं तीन महिने गाढव त्याच्या उपयोगी पडले असते. नंतर तो व्यापारी परत आला असता. तोपर्यंत मुल्लाला गाढवाचा कांहीच खर्च नव्हता.



तीन महिन्यानंतर जीवनसिंग आला. आपल्या-समोर एक तगडा बळकट तरुण उभा असेल ही त्याची अपेक्षा होती. मुल्लाने तोंडभर हंसून त्याचे स्वागत केले. "तुझे गाढव माझ्या कल्पनेच्या-पलीकडचे हुशार निघाले बघ! त्याने जसजसे कुराणांतले पाठांतर सुरुं केले, तसा त्याचा एक देखणा पुरुष झाला. शेजारच्या गांवातला प्रमुख नुकताच मरण पावला होता. त्याच्या जागेवर कुणाची नेमणूक करावी म्हणून ते गांवकरी शोध घेत होते. ते माझा सल्ला घ्यायला आले आणि मी त्यांना ह्या गाढवाचा झालेला तरुण दाखवला, ते वृद्ध गांवकरी खूष झाले माझ्यावर, आणि ह्या तरुणाला घेऊन गेले."

जीवनसिंग भलताच खूष झाला. पण एकाएकी त्याला आपल्या गाढवाची आठवण होऊं लागली. इतका हुशार तरुण आपल्या धंद्यात मदतीला यायलाच हवा होता, म्हणजे जीवनसिंगाला जास्त आनंद वाटला असता. त्याने शेजारच्या गांवी जाऊन त्या तरुणाला भेटायचे ठरवले. तो सरळ तिथे गेला आणि त्या प्रमुखाचे घर शोधून आंत गेला.

त्यावेळी तो प्रमुख कांही ज्येष्ठ गांवकऱ्यांच्या बरोबर बसून कांहीतरी गंभीर चर्चा करीत होता. जीवनसिंगाला वाटलं कीं मुल्लाने वर्णन केल्यासारखा हा माणूस तर देखणाही नव्हता किंवा तरुणही नव्हता. पण ज्या पद्धतीने तो सारे प्रश्न हाताळत होता, ती पाहून तो खूप हुशार मात्र नक्की होता! ती चर्चा संपल्यानंतर



जीवनसिंगाने पुढे जाऊन त्याला अभिवादन केले. ''अरे लेका, तुला मी आठवत नाही कां? मी, तुझा जुना मालक, मी तुला त्या विद्वान मुल्लाच्या स्वाधीन केलेले होते!''

या अनोळखी गृहस्थाने केलेले हे वक्तव्य ऐकून तो ग्रामप्रमुख चिडला नाही. तो नम्रपणे म्हणाला, ''हे पाहा, मी या गांवाचा प्रमुख आहे. तुम्ही काय म्हणालात ते कांही मला समजलेले नाही आणि तुम्ही माझे मालक कसे, तेही कळलेले नाही.'' ते इतर वृद्ध गांवकरी एकामेकांकडे सूचक नजरेने बघत होते आणि या नवख्या माणसाकडेही उत्सुकतेने पहात होते.

जीवनसिंगाने तीन महिन्यांपूर्वी काय घडले व त्याची मुल्लाशी झालेली भेट व चर्चा याबद्दल सविस्तर खुलासा केला. तो प्रमुख मोकळेपणा हंसला. या व्यापाऱ्याच्या सांगण्यानुसार तो आधी एक गाढव होता! त्याने हा अवमान मानला नाही. उलट ही गंमत पुढे सुरुं ठेवावी, म्हणून भाबड्या जीवनसिंगाचा हात हातांत घेत तो म्हणाला, ''अरे मित्रा, मुल्लाने तुला तुझे गाढव ह्या गांवी पाठवले असे सांगितले, ते चुकीचे होते. खरं म्हणजे, आता तो फकीर बनलेला आहे. निरनिराळ्या धार्मिक पंथांचा तो प्रमुख आहे. तू जाऊन त्याला भेटायला हवंस.''

व्यापारी आता फकीराच्या शोधांत निघाला. नदीच्या कांठावर प्रार्थना करीत बसलेला फकीर जीवनसिंगाला दिसला. त्याची प्रार्थना संपल्यानंतर जीवनसिंगाने त्याला विचारले, ''शेजारच्या खेड्यांतल्या मुल्लाने तुला त्या पवित्र पुस्तकांतल्या प्रार्थना पाठ करायला शिकवल्या होत्या ना? त्यानेच तर तुला फकीर बनवला. त्याच्यापूर्वी तू एक गाढव होतास - माझे गाढव - आणि मी तुझा मालक होतो.''

''मी गाढव होतो? काय ऐकतो आहे हे मी?'' फकिराला आश्चर्य वाटले. ''मला कुणी मुल्ला माहिती नाही. मी ह्या सगळ्या प्रार्थना मदरसामधे शिकलो होतो. तू शुद्धीवर आहेस ना?'' फकिराने आता जरा आवाज चढवूनच विचारले, ''मला वाटतं तुझा कांहीतरी भ्रम आहे हा! माझ्याकडे कांही जादू मंत्रतंत्र आहे. मी तुला बराही करुं शकेन. पण त्याच्याअगोदर तू मला तुझ्या गाढवाबद्दल सांगितले पाहिजेस.''

जीवनसिंगाला वाटले होते कीं तो गाढवाला मारायचा तसा मार त्याला बसणार; पण फकिराचा राग शांत होईपर्यंत तो स्तब्ध उभा राहिला होता. त्याने सारी कथा सविस्तर



सांगितली. कांहीसुद्धां तो विसरला नाही, हो नाहीतर फकिराच्या मंत्राचा प्रभाव कमी झाला असता. मंत्रामुळे फकिराचे पुन्हां गाढवांत रुपांतर झाले तर त्याने आपल्या जुन्या मालकाला ओळखले असते.

फकीर डोळे मिटून जमिनीवर बसला. जीवनसिंग त्याच्यासमोर श्वास रोधून बसला. थोड्या वेळाने फकिराने डोळे उघडले आणि म्हटले, ''हे बघ भल्या माणसा, जेव्हां एखादा माणूस कांहीतरी शौर्याचे काम करतो, तेव्हां आपण त्याला सिंह म्हणतो. जेव्हां कुणीतरी चलाखी करतो किंवा ज्यादा हुशारी दाखवतो, तेव्हां आपण त्याला लबाड म्हणतो. कधी कधी त्याला कोल्हाही म्हणतो. पण खरं तर आपल्याला माहीत असतं कीं शूर माणूस कांही सिंह बनलेला नाही किंवा लबाड माणूस कोल्हा झालेला नाही. आपण जेव्हां आपण आपल्या भावना अशा शब्दांत व्यक्त करतो, तेव्हां लोकांना त्या जास्त चांगल्या समजतात. त्याचप्रमाणे, जेव्हां मुल्ला जे शिकवत होता, ते मुलांना समजायला वेळ लागत होता, म्हणून तो त्यांना 'गाढव आहात' असं म्हणाला. अर्थात त्याच्या मनांत या गाढवासारख्या ठोंब्या मुलांना शिकवून चांगली हुशार माणसे बनवायची इच्छा प्रबळ होती. त्यांत मुल्लाचा दोष नाही. मी तुलाही दोष देणार नाही. तू मुल्लाच्याघरी परत जा. त्याच्या मागील दारी अंगणात तुला तुझे गाढव बहुतेक मिळेल. माझे तुला आशिर्वाद आहेत.''

''धन्यवाद, फकीरबाबा. आयुष्यांत आज मी पहिला धडा नीट शिकलो. मी आता सरळ मुल्लाच्या घरी जातो आणि माझे गाढव परत मागतो. माझे गाढव निर्बुद्ध असले तरी मला ते हवे आहे.''

फकिराने भाकित केल्याप्रमाणे, मुल्लाच्या घरांत अंगणात मागील दारी ते गाढव बांधलेले होते. मुल्ला कुठे आसपास दिसत नव्हता. जीवनसिंगाने गाढवाची दोरी सोडली आणि तो त्याला घरी घेऊन गेला.

त्या दिवशी गाढवाच्या पाठीवर ओझे नव्हते. तरीसुद्धां नेहमीसारखा जीवनसिंग गाढवावर बसला नाही.



# दोन लंब्या गोष्टी

आपली उंची वाढवण्यासाठी ठेंगणी माणसे बरेच प्रयत्न करतात. पण आंध्र प्रदेशांतल्या, करीमनगर जिल्ह्यांतल्या, रामगुंडम गांवातला २९ वर्षांचा गड्डय्या, हा आपल्या उंचीबाबत विषण्ण आहे. तो सात फूट सहा इंच उंच आहे. राजा नरसू व नरसाम्मा यांच्या सहा मुलांपैकी हा मुलगा अकरा वर्षांपर्यंत सर्वसामान्य मुलांसारखाच होता. त्याला जोराचा ताप आला. ताप आटोक्यांत आला, पण पुढच्या आठ वर्षांत त्याची उंची सतत वाढत गेली. डॉक्टरांना भिती वाटली कीं त्यावर जर उपाय केले नाहीत, तर त्याच्या उंचीचा परिणाम त्याच्या मेंदूवर होऊं शकेल. म्हणून १९९६ साली त्याच्यावर एक शस्त्रक्रिया करण्यांत आली व त्याची उंची वाढायची थांबली. कांही शाळांमधून त्याला मुद्दाम प्रवेश देण्यांत आला, कारण तो व्हॉलीबॉल व बास्केटबॉलच्या शाळेच्या संघात चांगली कामगिरी करुं शकला. पण वर्गात मात्र त्याला त्रास होत होता. त्याने नोकरीसाठी बरेच प्रयत्न केले, पण ते अयशस्वी झाले. रस्त्यावरचे दिवे दुरुस्त करणे, उंच इमारतींना रंग देणे, यासारखी कामे त्याला मिळत गेली.

जर्मनीमधल्या ३८ वर्षांच्या हेरल्ड ॲंगलिंगची गोष्ट जरा वेगळी आहे. त्याची सात फूट एक इंच उंची कधी तापदायक ठरली नाही. केरळमधल्या कालिकतला राहाणाऱ्या शेरीनशी त्याचे लग्न झाले, आणि त्यांना तीन मुले आहेत. एका वस्त्रोद्योगाच्या कारखान्यांत शेरीन फॅशन डिझायनर म्हणून नोकरीला असताना हेरल्ड तिला भेटला. तोही कापडाच्या व्यापारांत गुंतलेला होता. या लग्नाला दोन्ही घरच्या मंडळींचा कट्टर विरोध होता, तरीही १९९३ मधे या दोघांचा चेन्नईमधे विवाह झाला. सध्यां हेरल्ड इलेक्ट्रॉनिक कंपनीत प्रमुख आहे. नुकतेच हे कुटुंब केरळला गेले होते, तेव्हां सगळीकडे लोक त्याच्याकडे उत्सुकतेने बघत. आपल्या उंचीकडे लक्ष न देता तो 'टँगो' हे नृत्य कुणाबरोबरही नाचायला तयार असतो!!










# विदुरच्या सुना

चतुर्भुजपुरांत विदुर व धर्मराज असे दोन मित्र होते. दोघेही मध्यमवर्गातले शेतकरी होते. विदुरला गोपी व सोम असे दोघे मुलगे होते, पण धर्मराजला मूलबाळ नव्हते.

एक दिवस धर्मराजने विदुरला सांगितलं, ''विदुर, अरे, आपण दोघे आता पन्नाशीला आलो. तुझे दोन्ही मुलगे आता चांगले कर्तेसवरते झाले आहेत. त्यांची लग्ने केलीस की लौकर तू आजोबासुद्धां होशील कीं! म्हातारपण सुखांत जाईल बघ तुझं. मला कुणीच नाही. कुणाला दत्तक घ्यावं असा विचार केला तर तुमची मालमत्ता किती, असंच विचारतात.'' धर्मराजचा आवाज सद्गदित झाला होता.

विदुरने धर्मराजच्या खांद्यावर हात ठेवीत म्हटले, ''फक्त माणसांनाच म्हातारपणी आधार मिळतो. त्यांची मुलेबाळें त्यांची देखभाल करतात. इतर प्राण्यांना हे सुख नाही मिळत! अद्याप माझी बायको व मी आनंदात राहातो आहोत. उद्यां सुना घरांत आल्या कीं काय होईल ते सांगता येत नाही. पण पुढे कांहीही होवो, आपण दोघे यापुढे देखील असेच भाऊभाऊ म्हणून राहायचे हां!''

''अरे तुला भविष्याची चिंता करायची जरूर नाही, कारण तुझे दोघे मुलगे सज्जन आहेत, सुस्वभावी आहेत. त्यांना तशाच सालस व प्रेमळ बायका मिळतील; माझी खात्री आहे!'' धर्मराज म्हणाला.

गोपी व सोम हा संवाद शेजारच्या खोलीतून ऐकत होते. त्यांना एकमेकांशी चर्चा केली आणि ते या दोघा मित्रांच्याजवळ आले. गोपीने धर्मराजला म्हटलं ''काका, सोम आणि मी तुम्हाला परके नाही आमचे तुम्ही काका आहात ना? आम्ही तुमचेही मुलगे आहोत असं तुम्ही समजा!''

धर्मराज गहिंवरुन म्हणाला, ''अरे, तुम्हाला दोघांना मी चांगलाच ओळखतो. तुझ्या वडिलांना जर चांगल्या सुना मिळाल्या, तर माझी बायको

रमेश राठी



आणि मी, आम्ही दोघेही तुमच्या आधाराने आरामांत आयुष्य घालवूं!''

धर्मराजच्या या बोलण्याला दुजोरा देत सोम त्याला म्हणाला, ''काका, बरं झालं, सुना चांगल्याच मिळतील असं तुम्हीच म्हणालात ते! वडील माणसे म्हणतात कीं वरती वास्तु देवता राहातात. आणि त्या नेहमी त्या वास्तूतल्या बोलण्याला ''तथास्तु'' असा आशिर्वाद देत असतात. जर आम्ही दोघा भावांनी दोन सख्ख्या बहिणींशी लग्न केले तर दुधांत साखरच पडेल, नाही कां? दोघींच्यात प्रेमभावना राहील आणि त्यांच्यामुळे आम्हालाही कांही वादविवादाला सामोरे जावे लागणार नाही.''

सोमचे हे मनमोकळे बोलणे ऐकून विदुराने हंसून म्हटले, ''आपण चांगला विचार बाळगला तर त्याचे फळही चांगलेच मिळेल. नुकताच नारदकुंड गांवातून एकजण एक स्थळ सांगायला आला होता. त्या गांवच्या पाटलाच्या, विश्वेश्वरच्या दोघी मुली आहेत. त्यांना आपल्याशी संबंध जुळवायचा आहे. तुम्ही दोघे जण त्या गांवी जाऊन त्या मुलींना बघून या. तुम्हाला जर त्या मुली आवडल्या तर माझा आक्षेप राहाणार नाही. या कामाची जबाबदारी तुमच्यावर मी सोंपवतो आहे.''

त्यावर सोम व गोपी, दोघेही म्हणाले, ''तर मग उशीर कशासाठी करायचा? आपण सगळेजण जाऊं या, आणि त्या मुलींना पाहून परत येऊं.''

दुसऱ्याच दिवशी विदुरने विश्वेश्वरला निरोप धाडला कीं ते सर्वजण मुलींना बघायला दुसऱ्याच दिवशी येतील.

आणि त्याप्रमाणे त्यांनी भाड्याची गाडी केली आणि ते नारदकुंडला जायला निघाले. विश्वेश्वरच्या घरासमोर गाडी पोचली नाही तोच विदुरच्या छातीत एकदम जोराची कळ आली व दुखायला लागले. त्यांची वाट बघत थांबलेला विश्वेश्वर लगेच विदुरला घरांत घेऊन गेला आणि त्याने त्याला पलंगावर झोंपवले, आणि वैद्याला बोलावून आणण्यासाठी तांतडीने नोकराला पिटाळले.

वैद्याने येऊन विदुरला नीट तपासले आणि सांगितले, ''हा कांही हृदयविकाराचा झटका नाही असं मला वाटतं. पण म्हणतात ना, कीं सांप लहान असला तरी लाठी मोठीच असायला हवी. म्हणून आपण जास्तीत जास्त काळजी घ्यायला हवी. मी जी औषधे देतोय, ती नीट नियमित वेळेला दिली पाहिजेत. पण मात्र एक



आठवडाभर त्यांनी संपूर्ण विश्रांति घेतली पाहिजे व झोपून राहिलं पाहिजे.

त्यावर धर्मराजने विश्वेश्वरला म्हटलं, ''असं कांही घडेल असं वाटलंच नव्हतं. पण तुम्ही गांवातच आम्हाला एक घर भाड्याने बघून द्या. जरूर पडली तर एक आठवडाभर नव्हे तर चांगलं एक महिनाभर इथे राहून विदुरचा औषधोपचार करता येईल.''

विश्वेश्वर कांहीतरी उत्तरादाखल बोलण्यापूर्वीच त्याच्या दोघी मुलींनी खूण करुन त्याला दुसऱ्या खोलींत यायला सांगितले. थोरली मुलगी रागिणी विश्वेश्वरला म्हणाली, ''बाबा, ते आपल्याकडे पाहुणे म्हणून आलेले आहेत. आपण त्यांना घरीच ठेवून त्यांची सेवाशुश्रूषा करुं या. हे आपलं कर्तव्य आहे.''

धाकटी मुलगी मोहिनीने म्हणाली, ''असंच केलं तर बरे होईल. नाहीतर सासऱ्याची देखभाल केली नाही आणि त्यांना दुसरीकडे बाहेर घर देऊन आपली जबाबदारी झटकून टाकली, असा आरोप तुमच्यावर यायचा. ही सोयरीक जमली नाही तरीसुद्धां त्यांना इथून समाधानाने परत पाठवणे ही आपली जबाबदारी आहे. त्यांना जर इथे ठेवून त्यांच्यावर उपचार केले गेले तर ते सर्वप्रकारे सोईस्कर व सुखकर होईल.''

मुलींचे मत ऐकून विश्वेश्वरने वळून आपल्या पत्नीकडे पाहिले. मुलींचा विचार ऐकून विश्वेश्वरला व त्याच्या पत्नीला मनोमन आनंद वाटला. ती म्हणाली, ''मुली म्हणताहेत ते ठीकच आहे. तसंच करावं. घरी आलेल्या आप्तेष्टांना दुसऱ्या घरांत ठेवणं बरोबर वाटत नाही. त्याउप्पर तुमची मर्जी.''



शेजारच्या खोलीत पलंगावर पडून राहिलेल्या विदुरने हे संभाषण ऐकले, मनांतून मात्र त्याला समाधान वाटले कीं या अचानक उपटलेल्या आजारामळे विश्वेश्वरच्या परिवारांतल्या सगळ्या सदस्यांचा स्वभाव नीट समजला!

विश्वेश्वरने आपली पत्नी आणि मुलींच्या बोलण्यावर खूप विचार केला आणि शेवटी त्याने निर्णय ठरवला कीं विदुरला गांवातल्या एखाद्या चांगल्या घरांत ठेवणेच रास्त ठरेल. त्याने सान्या सुखसोई असलेले एक चांगले घर शोधले आणि ह्या सर्वांची तिथे राहाण्याची व्यवस्था केली.

विदुर, धर्मराज आणि त्याचे दोन्ही मुलगे दहा दिवस त्या घरांत कोणतीही गैरसोय न होता राहिले. विदुरची प्रकृति आता चांगली सुधारली होती. त्याची ही प्रगती पाहून वैद्यबुवांनादेखील आश्चर्य वाटले. आपल्या गांवी परत जाण्यापूर्वी धर्मराजने विदुरला सांगितलं, ''विश्वेश्वरचे आभार मानून आता आपण निघायचंय. पण मला एक गोष्ट मात्र नीट उमजली नाही. विश्वेश्वरची पत्नी आणि दोघी मुली यांनी आग्रहाने सांगितलं होतं तरीदेखील विश्वेश्वरने तुला वेगळ्या घरांत कां ठेवले?'' त्यावर विदुर हंसून म्हणाला, ''धर्मराज, विश्वेश्वरची पत्नी आणि मुली कनवाळू मनाच्या आहेत. दुसऱ्यांचा आदर करणाऱ्या आहेत. विश्वेश्वरही खरंच चांगला आहे. त्याचबरोबर तो व्यवहारी व धोरणी आहे. जर त्यांच्या घरी आपली राहायची सोय केली असती तर लोक म्हणाले असते कीं मुलींचे लग्न करण्यासाठी त्याने हे नाटक रचलं. म्हणून त्याने आपली दुसऱ्या घरांत व्यवस्था केली व औषधपाण्याची तजवीज केली. मला हे लोक पसंत आहेत. जर विश्वेश्वरला व मुलींची संमती असेल तर त्या मुलींना मी आपल्या सुना करुन घेण्यास तयार आहे. गोपी व सोमलाही मुली आवडल्या आहेत.''

दुसऱ्या दिवशी विश्वेश्वरच्या घरी लग्नाचा विचार नक्की झाला आणि महिनाभरांतच दोन्ही विवाह साजरे झाले.

धर्मराज आणि विदुरच्या अपेक्षेप्रमाणे नव्या सुनाही त्या दोघांच्या घरांतल्या वातावरणात समरस झाल्या, व सर्वजण आता सुखाने राहूं लागले.





देशविदेशीच्या दंतकथा (ग्रीस)

# स्वतःच्याच कुत्र्यांची शिकार



ॲक्टियन हा एक गर्विष्ठ तरुण होता - त्याला आपल्या जलदगतीने धावण्याचा व शिकार करण्याचा फारच गर्व होता. अरण्यांतून तो इतक्या चपळाईने पळत जाई कीं तो एक जादूगार असावा असे वाटे. एका जागी दिसला की लगेच लांब दुसऱ्या ठिकाणी दिसूं लागायचा! शिकारीच्याबाबतीत तर साऱ्या राज्यांत त्याचा हात कुणी धरला नसता. पण त्याचे श्रेय थोड्याफार प्रमाणांत त्याने उत्तमप्रकारे शिकवून तयार केलेल्या शिकारी कुत्र्यांनाही द्यायला हवे. ही कुत्री न थकता, सतत सावजाचा पाठलाग करीत असत, व त्या जनावराला ठार तरी मारीत किंवा मालकासाठी पकडून देत असत.

त्याकाळीं डायना ही अरण्यवासिनी वनदेवी मानली जात होती. एकदा ती अशी मुक्तपणे वनविहार करीत असताना तिला ॲक्टियन हा वाऱ्याच्या वेगाने पळत जाताना दिसला. तिला गंमत वाटली आणि तो वेग पाहून ती चकितही झाली. आपण ही असे जोरांत पळत सुटावे असा तिला मोह झाला. पण तिच्या जोडीने पळत जायला कुणी मैत्रीण नव्हती कीं अरण्यांत लपंडाव खेळायला इतर सख्याही नव्हत्या.

तिने ॲक्टियनला आपल्याबरोबर पळायला आमंत्रण दिले. त्याचा आनंद गगनांत मावेना. एका देवतेशी स्नेह जुळणें हा मोठाच सन्मान होता. त्यानंतर दररोज दोघांची धावायची शर्यत होई, आणि या दोघांच्या मागून ॲक्टियनची कुत्री पण वेगांत धावत असत.

सुरवातीला ॲक्टियन डायनाशी वागताना आदराने, सावधानतेने वागत होता. पण जसे दिवस गेले, तसा तो थोडा धिटाईने व बरोबरीच्या

नात्याने वागायला लागला. पण म्हणतात ना, कीं 'अति परिचयात् अवज्ञा!'

कधीकधी तो तिला सांगत असे, "मनांत आलं तर मी केव्हांही सहज जलद पळून पुढे जाऊं शकेन, पण तुम्हाला मागे एकटे सोडून जावेसे वाटत नाही." डायना त्याच्या बोलण्यावर नुसतीच हंसून पाहात असे. ती प्रत्युत्तर करीत नसे, कारण खरी परिस्थिती निराळी होती. ती देवता होती, त्यामुळे तीही विजेच्या वेगाने पळूं शकत होती. पण आपल्या दैवी शक्तीचा तिने विनाकारण उपयोग केला नाही. त्या माणसाला कशाला अवमानित करायचे? अरण्यांत तो तिला चांगली सोबत करीत होता. तिने त्याला सूचना दिलेली होती कीं त्याने तिच्या अंगाला किंवा तिच्या आभूषणांना स्पर्श करता कामा नये.



ॲक्टियनने याला मान डोलावली होती खरी, पण त्याने फारसे त्याला महत्व दिले नव्हते.

एकदा उन्हाळ्यांत, दुपारच्या वेळीं, अरण्यांतल्या एका रमणीय सरोवरांत डायना स्नान करीत होती. आसपासचे वातावरण मोहक होते, हजारों विविधरंगी फुले फुलली होती. त्या वनदेवतेकडे पाहून जणूं ती हसत होती. ती फुले पाहून डायना खूष झाली व आनंदात गाणे गायला लागली.

खरं तर ती ॲक्टियनची अरण्यांत जायची वेळ नव्हती. शिवाय तिच्या स्नानाच्या वेळेला त्याने तिथे जाणे योग्य नव्हतेच. पण नेमके जे करायला नको ते त्याने केले. त्याच्या शिकारी कुत्र्यांसह तो त्या अवेळी सरोवराजवळ गेला. कांठावरच्या एका दगडावर डायनाने आपले दागिने ठेवले होते. त्याने त्या दागिन्यांना हात लावला. ती पाण्यांत स्नान करताना दिसली, आणि तिला पाहून तो हंसला.

ती चकित झाली आणि अतिशय चिडली. तिने त्याच्यावर जादूचा मंत्र घालून त्या तरुणाचे एका हरणांत रुपांतर केले. आणि पुढे काय झालं असेल? अचानक, त्याच्या कुत्र्यांना हरणाचा वास आला. त्यांनी त्या हरणावर झडप घातली. ते हरीण म्हणजे ॲक्टियन होता. तो जोरांत पळत सुटला. पण त्यानेच शिकवलेली ती हिंस्त्र कुत्री जास्त चपळ ठरली.

त्यांनी त्याचे लचके तोडून त्याला ठार केले. अशा रीतीने एका देवतेची व एका मानवाची मैत्री संपुष्टात आली.

(एम्.डी.)



## वाचकांसाठी कथास्पर्धा

### सर्वोत्कृष्ट प्रवेशिकेला रु. २५०/-चे पारितोषिक

***खालील गोष्ट वाचा :***

परमशिवाच्या मुलांना एक पक्षी पाळायची फार इच्छा होती. तो बाजारांत गेला आणि एखाद्या चांगल्या पक्ष्याचा शोध घेऊं लागला. बराच वेळ तपास केल्यानंतर त्याला एक गोंडस पोपट पिंजऱ्यात ठेवलेला दिसला. दुकानदाराने त्या पोपटाची किंमत शंभर रुपये सांगितली.

"पण शंभर रुपये म्हणजे फार जास्त होतात!" परमशिव कुरकुरला.

"साहेब, तुम्हाला कांही शंका वाटत असेल तर ह्या पोपटालाच विचारा ना!" दुकानदार म्हणाला.

परमशिव पिंजऱ्याजवळ गेला. "तुझी किंमत शंभर रुपये आहे कां?"

"शंका कशाला?" पोपटाचे उत्तर होते. परमशिवने शंभर रुपये दिले व तो पोपट त्याने घरी नेला.

मुलांना फारच आनंद झाला. पण परमशिवला मात्र आपली फसवणूक झाली असेच वाटत होते.

- परमशिवला असे वाटण्याचे काय कारण होते?
- त्याने तो पोपट परत दिला कां?
- मुलांना दुसरा पक्षी मिळाला कां?

तुमची प्रतिक्रिया १००-१५० शब्दांत लिहा व गोष्टीला समर्पक शीर्षक द्या. खालील कुपन भरुन त्याबरोबर तुमची प्रवेशिका पाठवा. पाकिटावर "वाचा नि सुचवा" असे जरुर लिहा.

**शेवटची तारीख : ३१ जुलै २००५**

**नांव** .................................................... **वय** ..........

**जन्मतारीख** .................... **शाळेचे नांव** ....................

**घरचा पत्ता** ....................................................

....................................................

.................................... **पिनकोड** ..........

**पालकांची सही** **स्पर्धकाची सही**

CHANDAMAMA INDIA LIMITED

82 Defence Officers Colony, Ekkatuthangal, Chennai - 600 097.



# मंत्राचा महिमा

ज्यावेळी ब्रह्मदत्त काशीवर राज्य करत होते, त्यावेळेस बोधिसत्वांनी एका गांवात चांभाराच्या रूपांत जन्म घेतला. आपला व्यवसाय करत असतानाच ते एका ऋषीच्या आश्रयाला जाऊन राहिले व त्यांच्याकडून त्यांनी एक अपूर्व असा मंत्र शिकून घेतला.

त्या मंत्राच्या प्रभावानी बोधिसत्व कोणत्याही वेळी कोणत्याही आंब्याच्या झाडावर आंबे लागल्याचे दाखवू शकत होते, ते रोज सकाळी एक बांकडी काठी खांद्यावर घेउन जंगलातील एखाद्या आंब्याच्या झाडापाशी जात व झाडापासून सात फुटांवर उभे राहून एक मंत्र म्हणत. त्यानंतर त्या फांद्यांवर मंत्रून ठेवलेले पाणी शिंपडत. दुसऱ्या क्षणीच त्या फांद्यांतून नवीन कोंब फुटून त्यावर हळूहळू फुले येऊन आंबे लागत.

एक दिवस बोधिसत्व असेच जंगलात जाऊन आंब्याच्या झाडावर फळे उगवण्याचे काम करीत असताना, काम मिळविण्याचा शोध करीत असलेला सुनंद नांवाचा एक तरुण ब्राह्मण त्यांना दिसला. तो तरुण जंगलाजवळच असलेल्या अग्रहार गांवचा रहिवासी होता. त्याला लिहायला वाचायला चांगले येत नव्हते. परंतु तो नेहमीच असे स्वप्न बघत असे की, कोणत्यातरी देवीची कृपा होऊन आपण पंडित व्हावे व सोने, चांदी, संपत्ती मिळून आपण आयुष्यभर वैभवात रहावे. बोधिसत्व जेव्हां जंगलातून घरी परत आले, तेव्हां त्या तरुणांनी त्यांच्या हातांतील वांकडी काठी व आंब्यांनी भरलेली टोपली आत घरामध्ये नेऊन पोहोचवली व नंतर आपली ओळख करून देत त्यांच्या घरातील सर्व कामे मोठ्या आशेने करण्याचे धाडस दाखवले.

थोडे दिवस लोटले. एके दिवशी बोधिसत्व आपल्या बायकोला म्हणाले - ''तुला माहित आहे कां? हा मुलगा कां येऊन राहिला आहे?'' त्याच्या मनांत बाराही महिने आंब्याची निर्मिती करण्याचा मंत्र शिकण्याची इच्छा आहे. हा खूप लोभी आहे. मी त्याला हा मंत्र शिकविला तर तो मंत्र ह्याच्या थोडेच दिवस कामास येईल.''





सुनंदच्या कामावर बोधिसत्वांची बायको खूप खूष होती. तिला सुनंदची दया आली. तिने एक दिवस आपल्या पतीला सांगितले - ''हा मुलगा आपल्या घरचे सर्व कामकाज करतो. तेव्हां मंत्र त्याला कां उपयोगी पडणार नाही? आणि जर मंत्र उपयोगी पडणार नसला, तर तो त्याचा दोष होईल. तेव्हां तुम्ही त्याला जरूर मंत्रविद्या शिकवा.''

बोधिसत्वांनी थोडा वेळ विचार केला व त्यांनी आपल्या पत्नीच्या विचारांशी सहमत दाखवून त्याला मंत्रविद्या शिकविण्याचे ठरवले.

दुसऱ्या दिवशी बोधिसत्वानी त्या मुलाला बोलावून घेतले व म्हणाले - ''मुला, हा एक अपूर्व असा मंत्र आहे. जर तू ह्या मंत्राचा उपयोग योग्य कारणासाठी केलास, तर तुला पुष्कळ धन मिळून तू सुखी होशील. परंतु एक गोष्ट लक्षांत ठेव. कोणीही तुला या मंत्राचे रहस्य विचारले, तर ते तू कोणालाही सांगता उपयोगी नाही. आणि जर कां तू ते रहस्य सांगितलेस, तर त्या मंत्राचा महिमा नाहीसा होईल.'' असे समजावून सांगून बोधिसत्वांनी त्या मुलांस मंत्रोपदेश दिला.

मंत्रविद्या शिकून सुनंद आपल्या घरी परत आला व आंब्याची सृष्टी करून धन कमावून तो दिवस घालवू लागला.

अशा तऱ्हेने आंब्याचे दिवस नसतानाही जे आंबे विकले जात होते, त्यांतील एक आंबा काशीच्या राजाच्या हाती गेला. त्याला अत्यंत आश्चर्य वाटले. त्यांनी हा आंबे निर्माण करणारा कोण आहे? त्याचा ठावठिकाणा शोधून त्याला बोलावणे धाडले. राजांनी सुनंदला विचारले - ''तू आंब्याचे दिवस नसतांनाही आंबे कसे निर्माण करू शकतोस? ही दैवी शक्तिही नाही आणि मानवी शक्तिपण नाही. खरे काय ते कारण सांग.''

सुनंद अत्यंत आनंदून म्हणाला - ''राजा, ते आंबे ऋतु नसतांनाही मी उत्पन्न करू शकतो. त्याचा एक महामंत्र आहे. त्या मंत्राच्या मुळे मी आंब्याचा ऋतू नसतांनाही आंबे निर्माण करू शकतो.''

हे उत्तर ऐकून राजाला अत्यंत आश्चर्य वाटले व राजा म्हणाला, ''असं होय! तर अशी गोष्ट आहे! माझ्या मनांत त्या मंत्राची शक्ति स्वतः पहाण्याची इच्छा आहे, तर तू माझ्या बागेतल्या आंब्याच्या झाडावर आंबे निर्माण करून दाखवू शकतोस कां?''

सुनंदने खुशीने होकार दिला. दुसऱ्या दिवशी राजा आपल्या सर्व परिवारासह बागेत येऊन पोहोचला. तेव्हां सुनंद एका आंब्याच्या

झाडापासून जरा लांब उभा होता. त्याने मंत्रपाठ करून कमंडलूतले पाणी आंब्याच्या झाडाच्या फांद्यांवर शिंपडले. तत्क्षणीच शेकडो आंबे झाडावरून खाली पडू लागले.

ही अद्‌भुत गोष्ट राजा व त्याचा परिवार आश्चर्यचकित होऊन पाहू लागले. राजाने सुनंदची प्रशंसा करून सत्कार केला.

त्यानंतर राजाने सुनंदला विचारले - "ही महति जाणणारा महाज्ञानी कोण आहे?"

सुनंदला काय उत्तर द्यावे कळेना. त्याच क्षणी त्याला बोधिसत्वानी सांगितलेली गोष्ट आठवली, की त्याचे रहस्य सांगितले तर त्या मंत्राचा महिमा नाहीसा होईल. त्याने विचार केला की जी गोष्ट पाठ करून ठेवली आहे ती कशी काय नाहीशी होईल? तेव्हां राजाला ही मंत्रविद्या कोणाजवळून व कशी आत्मसात केली, त्याचा सारा वृत्तांत सुनंदने सांगितला.

त्यावर राजाने सुनंदचा उपहास केला व म्हणाला - "अरेरे, अशी चांगली विद्या तू एका चांभाराकडून शिकला आहेस. चांगला ब्राह्मण वंशात जन्माला येऊन तू इहलोकांच्या सुखाच्या लालसेने स्वधर्म पण विसरून गेलास? ही फार मोठी चूक केली आहेस."

असे राजाच्या तोंडी ऐकताच सुनंद लज्जित होऊन, मान खाली घालून, निमूटपणे घरी निघून गेला. थोडे दिवस उलटून गेले. एके दिवशी काशीच्या राजाच्या मनांत आंबे खाण्याची इच्छा प्रकट झाली. तेव्हां त्यांनी सुनंदला बोलावून घेऊन आपली इच्छा सांगितली, त्यावर सर्व लोक राजाच्या बागेत येऊन पोहोचले.

सुनंदने पूर्वीप्रमाणेच आंब्याच्या झाडापासून जरा लांब उभे राहून मंत्र म्हणण्याचा प्रयत्न केला. परंतु पाठ केलेला मंत्र त्याला कितीही आठवायचा प्रयत्न केला तरी आठवेना. तेव्हां सुनंदला समजून आले की आपल्या गुरुचे म्हणणे अवमानिले, त्याचा हा परिणाम मंत्रविद्या निघून जाण्याशी आहे. म्हणून मंत्राचा महिमा निघून गेला.

राजाने आश्चर्याने झाडाकडे पाहिले. तेव्हां सुनंदनी राजाला सांगितले - "राजा, मी माझ्या गुरुची आज्ञा मोडली व त्यामुळे मी मंत्रविद्या विसरलो." असे म्हणून चिंतापूर्ण चेहऱ्यांनी सुनंद आपल्या घरी परत गेला.







# विष्णुपुराण

युद्धभूमीवर दोन्ही सैन्यांच्या मधोमध श्रीकृष्णाने अर्जुनाचा रथ नेऊन उभा केला.

अर्जुनाने कौरवांच्या सैन्यावरून नजर फिरविली. वडील बांधव, गुरुवर्य, आचार्य आणि भावांप्रमाणे असलेले प्रिय मित्र, सर्वजण त्यांच्याबरोबर लढण्याकरिता तयार झाले होते. त्यांना पहाताच त्याचे मन विदीर्ण झाले - "काय हे! राज्य मिळविण्याकरिता आपल्या प्रिय बांधवाचाच वध करावयाचा? नाही, नाही! ह्यांची हत्या करुन मिळविलेले राज्य मला नको. मी असे करण्याकरिता अजिबात लढणार नाही."

निरुत्साही होऊन तो रथाच्या पाठीमागे टेकला. त्याच्या हातांतून धनुष्यबाण शिंग खाली पडले. त्याचे मन दुःखी होऊन शोकसागरात बुडून गेले.

श्रीकृष्णाने अर्जुनाची मनःस्थिती पाहून त्याला समजावीत म्हटले - "हे अर्जुना! युद्धभूमीवर विवेक घालवून अस्त्र-शस्त्राचा त्याग करणे, म्हणजे क्षत्रिय धर्माचा अपमान केल्यासारखे आहे. राज्याकरिता वेळेचा मान ठेवून, कर्तव्याचे पालन करणे, म्हणजेच सर्वांत मोठा धर्म आहे.

खरे पहाता परमेश्वर हा कर्ता आहे. फक्त मनुष्य त्याचे निमित्तमात्र आहे. अधर्म व अन्याय ह्यांचा नायनाट करून सत्य व न्याय ह्यांची स्थापना करणे, हे नर-नारायण ह्यांच्या हातातील खेळणे आहे."

जेव्हां जेव्हां जगांतील दुष्ट लोकांची संख्या वाढते, तेव्हां सत्य व धर्माचा नाश होतो. तेव्हां दुष्टांचा संहार करून सत्य व धर्माची स्थापना करण्याकरिता प्रत्येक युगांत विष्णू अवतार धारण करतो. तेव्हां त्याच अवतारांत मी आहे, असे समजून माझे स्मरण कर, व मला शरण येऊन मी सांगते त्या अनुसाराने वाग. तू तुझे कर्तव्य



"कर. त्याचे फळ माझे समज." ह्या उपदेशाने अर्जुनाचे मन पालटले. तो श्रीकृष्णच नारायण आहे असे समजूं लागला. म्हणून श्रीकृष्णाने त्याची शंका निवारण करण्याकरिता आपले विराटदर्शन अर्जुनाला घडविले.

कृष्णाच्या विराट रूपांत त्याला जगांतील सृष्टीची स्थिती व प्रलय एकापाठोपाठ नजरेस पडले. कर्ता, कर्म व क्रिया, ह्या तिन्ही स्थित्यंतरात त्याला परमेश्वराच्या अगाधलीला दिसल्या. सर्व सृष्टी नाहीशी करणारा महाकाल पण त्याला दिसला.

ते सर्व पाहून अर्जुनाचे मन शांत झाले. त्याचे शंकासमाधान झाले. "श्रीकृष्णच माझ्याकडून करून घेत आहेत. मी केवळ एक यंत्र आहे." त्या विचाराने अर्जुनाच्या शरीरांत एक प्रकारचे चैतन्य पसरले. तो उत्साहाने उठला. त्याने आपले गांडीव धनुष्य व तुणीर घेऊन शंख वाजविला.

दोन्ही बाजूंनीं सैन्य एकमेकांवर सिंहासारखे तुटून पडले. अठरा दिवस घनघोर युद्ध झाले. युद्धांत पाण्डवांचा जय झाला.

शान्तीदूताच्या रूपाने श्रीकृष्णाने जी भविष्यवाणी केली ती खरी झाली. भीमाने आपली प्रतिज्ञा पूर्ण केली. त्याने द्रौपदीचा मोकळ्या केसांचा आंबाडा घातला.

अभिमन्यूच्या रूपाने कालनेमीने वीरगति प्राप्त केली. कर्णाच्या अंगातून सहस्र कवचाचा अंश निघून शिवांत विलीन झाला. अर्जुन व कृष्ण हे दोघे नर-नारायणाच्या अवतारानें पूर्ण झाले. विष्णूनी भूदेवीला दिलेल्या वचनाप्रमाणे पृथ्वीवरचा पापाचा भार कमी झाला.

धृतराष्ट्राचे हृदय दुर्योधनाच्या मृत्यूच्या शोकाने विव्हळ झाले. त्यामुळे त्याने आपल्या मुलाच्या वधाचा बदला घेण्याकरीता भीमाला भेटण्याची इच्छा व्यक्त केली. श्रीकृष्णाने ते अंतर्मनाने जाणले व एक लोखंडाचा भीमाचा पुतळा बनवून त्याच्यासमोर नेऊन उभा केला. धृतराष्ट्राने त्याला मिठीत घेऊन मारण्याकरीता दाबले, तेव्हां त्या लोखंडाचे तुकडे तुकडे झाले.

गांधारीने पुत्रशोकाने त्याला शाप दिला - "हे कृष्णा, कौरवांच्या पाठोपाठ तुझ्या यादव-वंशाचा पण समूळ नायनाट होईल."

श्रीकृष्णाने हसत म्हटले - "गांधारी! तू महासती आहेस. तुझे वचन खोटे ठरणार नाही. नियती काय घडवेल तेच तुझ्या तोंडून बाहेर पडले."



द्रौपदीच्या झोपलेल्या पांची मुलांचा वध द्रोणाचार्यांचा मुलगा अश्वत्थामा याने केला होता. त्यामुळे द्रौपदीच्या सांगण्यावरून अर्जुन व श्रीकृष्णाने अश्वत्थामाला द्रौपदीसमोर आणून उभे केले.

द्रौपदीने अश्वत्थामाला सोडून देत म्हटले - "तुला झिजून झिजून मरण येणेच उत्तम." श्रीकृष्णाच्या सांगण्यावरुन अर्जुनाने अश्वत्थामाच्या डोक्यातील कांही भाग काढून टाकला. त्यामुळे तो वेड्यासारख्या मानसिक रोगाने भ्रमिष्ट झाला.



अश्वत्थामाने पांडवाचा समूळ नायनाट करण्याच्या इच्छेने उत्तरेच्या पोटांतील गर्भावर अस्त्राचा प्रयोग केला होता. त्यामुळे तिच्या पोटातून मेलेला मुलगाच बाहेर आला. श्रीकृष्णाने आपल्या पायाने दाबून त्या बालकाची प्राणाची परिक्षा घेतली, आणि त्याला नवे जीवदान दिले. त्यामुळे त्याचे नाव परिक्षित ठेवले गेले. त्यानेच पुढे पांडवाचा वंश सांभाळला.

बाणांच्या गादीवर पडलेले पितामह भीष्म इच्छा मृत्यूमुळे उत्तरायणाकरिता वाट पहात होते. मृत्यूच्या तोंडात असतानासुद्धां युधिष्ठिराला त्यांनी राजधर्माचा उपदेश केला. उत्तरायण येताच त्यांनी देहत्याग केला व ते नक्षत्रांमध्ये जाऊन विलीन झाले.

युधिष्ठिराचा राज्याभिषेक झाला. त्याच बरोबर अश्वमेध यज्ञाची तयारी सुरुं झाली.

जेव्हां श्रीकृष्ण व यादववीर कुरुक्षेत्रात आले होते, तेव्हां द्वारकेमध्ये त्यांचे प्राबल्य नसल्यामुळे अंदाधुंदी माजली होती. द्वारकावासी घमेंडी व अविचारी बनले होते. युद्धाच्या सुरवातीलाच बलराम तीर्थाटनाकरिता द्वारकेमधून बाहेर गेला होता.

एकदा द्वारकेमध्ये विश्वामित्र ऋषी आले. तेव्हां द्वारकावासी घमेंडी व मूर्ख लोकांनी सांबाला एका गर्भार बाईचा वेष घालून त्यांच्यासमोर नेले व गंमतीने विचारले, "स्वामी, सांगा ह्या गर्भारशी बाईला मुलगा होईल कां मुलगी?"

विश्वामित्रानी थट्टेच्या स्वरात क्रोधाने शाप देत म्हटले - "मूर्ख व दुष्ट यादववंशीयांनो, हिच्या गर्भातून एक मुसळ निर्माण होईल. ते सर्व यादव वंशाचा नाश करेल."

ते सर्व उलट चेष्टा करत होते. परंतु सांबाने स्त्रीवेष काढून टाकला. तेव्हां खरोखरी एक मुसळ बाहेर पडले. ते पाहून सर्व यादववंशी लोक घाबरून गेले.



कांही दिवसांनी युद्ध संपल्यावर श्रीकृष्ण हस्तिनापुरहून द्वारकेला परत आले. तेव्हां यादव लोकांनी ती घटना श्रीकृष्णाला सांगितली. श्रीकृष्णाने त्या मुसळाचे अत्यंत बारीक बारीक तुकडे करून समुद्रांत फेकून द्यावयास सांगितले.

त्यातील एक बारीक तुकडा समुद्रांतील एका माशाने गिळला. ती मासोळी एका व्याधाच्या हाती लागली. व व्याधाने त्या मासळीच्या पोटांतील तो लोखंडाचा तुकडा आपल्या बाणाला बसविला. अखेर त्या बाणानेच श्रीकृष्णाचा अंत झाला.

इतर सर्व तुकडे पाण्याच्या प्रवाहाबरोबर वाहात जाऊन कांठाला एकत्र येऊन पडले. तेथे गवताच्या रूपाने उगवले.

कांही वर्षांनी द्वारकेतील सर्व यादव पुरुष लोक गमतीजमती करीता समुद्र किनाऱ्यावर गेले असतांना सर्वांनी मनसोक्त दारू प्याली. व प्रत्येकाला गुंगी चढली. प्रत्येकजण आपापल्या बढाया मारू लागला. शेवटी प्रत्येकाने जवळचे गवत उपटून एकमेकांस मारण्यास सुरवात केली व त्याने सर्वजण मरण पावले.

ऋषीचा शाप खरा झाला. त्या मुसळानेच यदुवंशाचा सर्वनाश झाला.

जेव्हां बलरामाला ही घटना समजली. तेव्हां तो विवर्ण होऊन जंगलामध्ये जाऊन समाधिस्त झाला. त्याने योगाच्या बलाने आपले शरीर त्याग केले व शेषनागाच्या रूपाने तो वैकुंठात जाऊन पोहोचला.

श्रीकृष्णाने द्वारका वसवण्याकरीता समुद्राकडे जमीन मागितली होती. ती समुद्राला सात दिवसाच्या आत परत करावयाची होती. त्यामुळे कृष्णाने अर्जुनाकडे निरोप धाडला - "तू ताबडतोब द्वारकेला येऊन येथील मुले, म्हातारे व बायका यांना घेऊन इंद्रप्रस्थला घेऊन जा.

श्रीकृष्णाने तत्पश्चात आपला प्रिय सखा उद्धव याला परमतत्वाचा उपदेश दिला व आपले खरे रूप दाखविले.

शेवटी श्रीकृष्ण समुद्रकिनारी जाऊन आपल्या बांसरीवर दिव्य असे वेणुगान वाजवू लागला. त्याच्या बांसरीवर हिन्दोल, यमुना-कल्याणी व देवगान्धार राग निघाले. सर्व आसमंत तरतरून उठला. समुद्राचे पाणी शांत झाले. त्यानंतर विश्रांतीकरिता श्रीकृष्णाने जवळच्याच एका झाडाच्या सावलीत उभे राहून आपले पाय पसरले. एका व्याधाने दूरूनच पायाला हरणाचा पाय समजून बाण सोडला. तो बरोबर पायाच्या तळव्याला लागला. तो बाण तोच होता. माशाच्या पोटातून मुसळाचा तुकडा काढून व्याधाने बाणाला लावला होता. श्रीकृष्णाचा शेवटही त्याच मुसळाच्या तुकड्याने झाला व पूर्ण यादव वंशाचा संहार झाला.

एकदा हिंडत हिंडत दुर्वास ऋषि द्वारकेला आले होते. तेव्हां त्यांनी श्रीकृष्णाकडे खाण्यासाठी खीर मागितली. नंतर रागाने त्याला स्वतःच्या अंगभर खीर लावायला सांगितली. तेव्हां श्रीकृष्णाने चुकून आपला पायांचा तळवा सोडून सर्व ठिकाणी खीर लावून घेतली. तेव्हां दुर्वासानी श्रीकृष्णाला सांगितले. तुला फक्त तळव्यापासूनच प्राणांची भीती व अपाय होऊ शकतो. शरिराचा बाकी भाग माझ्या वरदानाने लोखंडाचा झाला आहे.

तळव्याला बाण लागताच त्यातून रक्ताच्या धारा वाहू लागल्या. थोड्या वेळाने शिकारी आपली शिकार घेण्याकरिता जवळ आला. तेव्हां श्रीकृष्ण वेदनेने कण्हत असलला पाहून त्याला रडू येऊ लागले.

श्रीकृष्णाने व्याधाला समजावत म्हटले - "तू माझ्याकरिता दुःख करू नकोस. रामावतारात मी झाडाचा बुंधा घेऊन वालीला मारले होते. तेव्हां तू त्यावेळेस वालीचा मुलगा अंगद होतास. त्यामुळे ह्या जन्मांत माझ्यावर तू सूडाचा बदला घेतला आहेस. कर्माची फळे भोगावीच लागतात. त्यामुळे तू काळजी करण्याचे कारण नाही." असे म्हणत त्याने रामावतारातील स्वतःचे स्वरूप त्याला प्रत्यक्ष दाखविले. रामाचे दर्शन होताच त्याला आपले पूर्वायुष्य आठवले. तो रामतल्लीन होऊन गेला.

तेवढ्यांत श्रीकृष्णाचा सारथी त्याच्या



शोधार्थ तेथे येऊन पोहोचला व श्रीकृष्णाला त्या स्थितीत पाहून हुंदके देऊन रडू लागला. श्रीकृष्णाने त्याला दिलासा देत म्हटले - "तू ताबडतोब द्वारकेमधे जाऊन यादव लोकांना द्वारकेमधून निघून जावयास सांग. अर्जुनाला जाऊन माझा निरोप सांग, कीं त्याने यादव वंशातील सर्व स्त्रियांना हस्तिनापुरात घेऊन जावे व उद्धव व अक्रूराला माझा आशीर्वाद कळवावा."

श्रीकृष्णाने परत एकदा आपल्या मुरलीमधून स्वर काढले. तो एक अद्भुत व अपूर्व असा राग होता. नंतर शरीराच्या अगाध लीला समाप्त करून विष्णूच्या दिव्य रूपांत तो वैकुण्ठाला गेला.

श्रीकृष्णाने देहाचा त्याग केल्याबरोबर समुद्राचे पाणी उसळू लागले. सगळी द्वारका पाण्यांत बुडाली. ह्यानंतर नवीन युगाचा प्रारम्भ झाला - "कलियुग." श्रीकृष्ण स्वर्गात गेल्यानंतर उद्धवाने त्याच्या आदेशाने प्रत्येक लोकांच्यात श्रीकृष्णाच्या भक्तिचा प्रसार केला.

श्रीकृष्ण मनुष्य रूपांत विष्णूचा अवतार होता. व आपल्या अनेक अगाध लीलांच्या द्वारे लोकांच्यात ईश्वरभक्तिचा संचार करण्यास आला होता. तो विष्णूच्या अंशाचा भाग होता. त्यामुळे तो त्रिकालदर्शी सर्वज्ञ होता. त्याच्या अवताराचा मुख्य हेतू म्हणजे, दुष्टांचा संहार करणे. सदाचरण करणाऱ्याचे रक्षण करणे, व त्याच बरोबर एक नवीन आदर्श लोकांपुढे ठेवणे. त्यांनी स्वतःच्या विचारांनी एक चांगला आदर्श सर्वांसमोर ठेवला.

कलियुगाचा आरंभ झाला, तेव्हां त्यांना कळून आले की कलियुगांत माणसांच्या हातून इतकी क्रूर पापे घडतील की माणसाची तपस्या क्षीण होत जाईल. त्यामुळे त्यांनी माणसाच्या मुक्तिकरीता सरळ मार्गाचा अवलंब केला. तो म्हणजे भक्तिमार्ग.

कृष्णावतारातील एक महान भेट म्हणजे गीता. महासागरात बुडणाऱ्या कलियुगातील माणसांना एकमेव सहारा असल्यासारखे होईल. ह्या महान ग्रंथात स्वतः देवांच्या तोंडून निघालेले अमृतवचन सर्व वेदांतील सारतत्व आहे.

गीतेच्या महानतेच्याबद्दल कोण्या पंडित विद्वानांनी सांगितलेले बरोबरच आहे. वेद वेदान्त ह्या गाई आहेत. श्रीकृष्ण त्याचा दूधवाला गवळी आहे, व अर्जुन मूल आहे. तो गीतारूपी अमृत पान करतो आहे.







# हरवलेली आंगठी

एका शबर राजाच्याकडे इळु व मळु, हे दोन विश्वासू सेवक होते. पण राजाला इळु जास्ती आवडत होता आणि मळुचा तो रागराग करीत होता.

एके दिवशी राजाने या दोघांना बोलावून सांगितले, "तुम्ही दोघेही सुटी घेऊन आपापल्या घरी जा. तीन दिवसानंतर इथे एक मेळा भरणार आहे, त्या दिवशी मात्र तुम्ही दोघेही अवश्य या. हे घ्या, तुमच्यासाठी बक्षीस आहे." आणि राजाने इळुला एक मोठा दगड दिला आणि मळुला एक मोठा सुरणाचा गड्डा दिला. दोघांनी राजाला प्रणाम केला व ते घराच्या वाटेला लागले.

राजाने इळुला एक मोठा दगड दिला म्हणून इळु मनोमन राजावर नाराज होता. तो मळुला म्हणाला, "हा भिकार दगड मी घरी कशासाठी घेऊन जाऊं? मी इथेच झाडींत कुठेतरी हा फेकून देतो."

"नाही, नाही, असं करुं नकोस. हा सुरण उचलायला मलाही जडच होतोय. आपण आपापल्या या वस्तू बदलूं या." मळु म्हणाला.

दोघांनी आपापली बक्षिसे एकमेकांना दिली. इळुने तो कंद शिजवून खाल्ला. मळुने तो दगड रात्री चांदण्यात निरखून पाहिला. तर त्याला त्या दगडांतल्या चिरेंत कांहीतरी चमकत असावे असे वाटले. त्याने तो दगड फोडला. त्यांत मोठ्या कौशल्याने सोन्याचे दागिने बसवलेले होते ते बाहेर आले.

राजाने केलेला पक्षपात मळुला लगेच समजला. ते दागिने इळुसाठी होते, तरीसुद्धां मळुने ते स्वतःकडे ठेवले.

तीन दिवसानंतर मेळा सुरुं झाला. त्यादिवशी राजवाड्यांत मनोरंजनाचे कार्यक्रम होते. त्यानंतर मेजवानी होती. भोजनाला बरेच लोक आले होते. राजाने सर्वांची नीट विचारपूस केली. त्यावेळी मळुच्या अंगावर चार सोन्याचे ठळक दागिने पाहून राजाने विचारले, "हे अलंकार तुला कुठे मिळाले?"

मळुने राजाला खरी गोष्ट सांगितली. त्या दगडाचे मोल समजले नाही म्हणून इळुने तो दगड मळुला उगीच दिला, त्याबद्दल इळुने राजाची

**२५ वर्षापूर्वीची चांदोबात प्रकाशित झालेली कथा**



क्षमा मागितली. राजाने इल्लुला क्षमा केली, पण त्याने मल्लुचा वध करायचा निश्चय केला.

मेजवानी संपल्यानंतर जेव्हां सर्वजण निरोप घेऊं लागले, तेव्हां मल्लुने राजाला सांगितले, "मी हे अलंकार घातले आहेत, त्याबद्दल आपण मला क्षमा करावी. आम्हाला जी बक्षिसे मिळाली, ती आम्ही बदलून घेतली. इल्लु व त्याच्या बायकोने सुरणाचा कंद खाऊन संपवला."

"मी तुला क्षमा केली आहे. त्याचं प्रतीक म्हणून मी तुला ही आंगठी बक्षिसादाखल देतो आहे. ती तू अगदी सुरक्षित ठेव आणि पुढल्या आठवड्यांत मला दाखव, पण लक्षांत ठेव कीं जर तू ही हरवलीस, तर मात्र तुला मृत्युदंडाची शिक्षा दिली जाईल." राजाने सांगितलं.

मल्लुच्या लक्षांत आले की राजा त्याच्याशी कपट करतोय, व त्याचा कांटा काढण्याच्या प्रयत्नांत आहे. म्हणून ती आंगठी त्याने मोठ्या शिताफीने नीट लपवायचे ठरवले. पण त्याच्या झोंपडीत आंगठी लपवण्यासाठी एकही चांगली जागा नव्हती.

शेवटी, जेव्हां रात्रीं त्याची पत्नी व मुलगा झोंपी गेले, तेव्हां त्याने घराच्या मातीच्या भिंतीत लहानसे भोक पाडले, त्यांत आंगठी नीट ठेवली आणि ओल्या मातीने ते भोंक बुजवून टाकले. त्याच्यावर त्याने इतके छान गुळगुळीत लिंपण केले कीं कुणालाच ती जागा सहजगत्या लक्षांत आली नसती.

सकाळपर्यंत तो ओलावा सुकला आणि ती जागा भिंतीसारख्या रंगाचीच दिसूं लागली. मल्लुला तेव्हां वाटलं कीं आता त्याच्या जिवाला कांही धोका नाही.

या घटनेनंतर दोन दिवसांनी राजाने मल्लुच्या पत्नीला बोलावून सांगितले, "तुझ्या नवऱ्याने ती अंगठी कुठेतरी लपवून ठेवलेली आहे. ती मला आणून दे. मी तुला बरेच सोनेनाणे देईन. पण ही गोष्ट तू तुझ्या नवऱ्याला मुळीच सांगायची नाहीस. जेव्हां तो बरेच सोने, दागिने पाहील, तेव्हां तो आश्चर्यचकित होईल."

मल्लुच्या बायकोला हे माहीत नव्हते कीं राजा तिच्या नवऱ्याचा प्राण घेण्याच्या विचाराने ती आंगठी मागतो आहे. तिने घराचा कानाकोपरा शोधला, पण तिला आंगठी मिळाली नाही.

संध्याकाळी नवरा घरी परत आल्यानंतर तिने विचारले, "तुमच्याजवळ ती आंगठी होती ना, ती कुठे आहे?"

मल्लुला वाटलं कीं तिने ती अंगठी बघितलीय. म्हणून तो म्हणाला, "ती मी भिंतीत लपवून ठेवलीय."

दुसऱ्या दिवशी मल्लु कामाला निघून गेल्यावर तिने सगळ्या भिंती नीट निरखून पाहिल्या. शंका आली तिथे खणले आणि शेवटी तिला ती आंगठी सांपडली. तिने पटकन ते भोंक लिंपून बुजवले, आणि आंगठी घेऊन घाईघाईने राजवाड्यांत गेली.

राजाने आंगठी घेतली आणि त्याच्या बदली तिला पिशवीभर सोने दिले. ती फारच खूष झाली. घरी परत गेल्यावर ती थैली तिने घराच्या मागील बाजूला जमिनींत पुरली.

आठवडा संपला. राजाचा एक सेवक मल्लुकडे येऊन म्हणाला, "राजाने तुला आंगठी घेऊन लौकर यायला सांगितले आहे."

मल्लुने झोंपडीत आंगठी शोधली. जेव्हां ती आंगठी हरवली आहे हे त्याच्या लक्षांत आलं, तेव्हां तो ओरडायला लागला, "आता माझे आयुष्य संपत आले!"

त्याने बायकोला बोलावून विचारले, "आंगठी कुठे तरी तू बघितली होतीस कां?" पण नवरा मारील या भीतीने तिने सरळ सांगितलं कीं तिने आंगठी बघितलीच नव्हती.

मल्लु निराश झाला. जड पावलांनी तो राजाकडे जाऊन म्हणाला, "महाराज, मी आंगठी दाखवूं शकत नाही."

"तर मग तुझा मृत्यू अटळ आहे." राजाने सुनावले.

"महाराज, ही शिक्षा उद्यापर्यंत पुढे ढकलावी. तोपर्यंत मी माझी सारी कामे आटोपून ठेवतो." मल्लुने राजाला विनंती केली.

'बरं तर, मी त्या मांगांना सकाळी तुझ्या घरी पाठवीन." राजाने सांगितलं.



मल्लने हताश होऊन घराची वाट धरली. तो फारच कष्टी झाला होता. त्याने विचार केला, "नाहीतरी उद्यां मी मरणारच आहे, तेव्हां आजच एक मोठा मासा पकडतो, छानपैकी शिजवून आनंदाने जेवण करता येईल!" आणि त्याने आपल्या कमरेच्या पट्ट्यांतून बांधलेला एक गळ काढला नि तो पाण्यांत फेकला.

थोड्याच वेळांत त्या गळाला एक मोठा पांढरा मासा अडकला. मल्ल तो मासा घेऊन घरी गेला, तर काय, त्याची बायको घरांत नव्हती.

म्हणून त्याने मोठा सुरा घेऊन तो मासा चिरला. त्याचे डोळे चमकले आणि तो किंचाळला, "आंगठी आहे, ही राजाची आंगठी आहे."

ती आंगठी घेऊन मल्ल राजाला भेटायला धावतच सुटला. रस्त्यांत जो भेटेल, त्याला तो सांगत होता, "मला वाटलं, माझा शेवट जवळ आला, पण मी वांचलो!" जेव्हां तो राजाकडे पोंचला, तेव्हां त्याच्यापाठोपाठ अनेक माणसेही जमली होती.

मल्ल आपल्या मित्रांसह राजासमोर गेला व म्हणाला, "महाराज, ही घ्या आंगठी! आता माझ्या मृत्युदंडाची शिक्षा रद्द करा."

सर्वांच्या समक्ष राजाला मल्लची शिक्षा रद्द करावी लागली. ती अंगठी मल्लच्या हातांत कशी आली हे कांही राजाला समजलं नाही. कोणती दैवी शक्ती त्याला मदत करत असावी? त्यानंतर मात्र राजाने कधी मल्लवर अपकार करण्याचा प्रयत्न केला नाही.

वास्तविक त्याचं असं झालं कीं मल्लच्या पत्नीने जेव्हां ती आंगठी राजाला दिली, तेव्हां राजाने ती आपल्या आसनाजवळच्या तिवईवर ठेवली होती. त्या रात्रीं एका उंदराने तिवईवर उडी मारली आणि ती आंगठी उडून जमिनीवर ठेवलेल्या पाण्याच्या घड्यांत पडली.

दुसऱ्या दिवशी रोजच्याप्रमाणे राजाच्या सेवकाने त्या मातीच्या घड्यांतले उरलेले पाणी नदीच्या कांठावर जाऊन नदीत ओतले, आणि ताजे पाणी घड्यांत भरुन आणले. राजाला कांही हे माहीत नव्हतं. त्यामुळे ती आंगठी मल्लच्या हातांत पुन्हां कशी आली याची खरी गोष्ट त्याला कधीही समजली नाही.





भारतांतली अप्रसिद्ध स्थळें :

# चेट्टिनाड परंपरा

दक्षिण भारतांतला चेट्टियार समूह सामान्यतः "नाट्टुकोट्टै" (गांवरान दुर्ग) या विशेषणाने ओळखले जातात. त्यांची आलिशान घरे इतकी प्रशस्त आहेत कीं स्थानिक लोक आश्चर्यचकित होतात. कारण ही घरे किल्ल्यासारखीच असतात. कल्पना करा कीं एखाद्या घराला हजार खिडक्या असल्या तर? हे असे घर तुम्हाला कारईकुडीमधे पाहाता येते. ही पूर्वी चेट्टिनाडची राजधानी होती. आता हे गांव तमिळनाडमधे आहे. हे विशाल भवन १९१२ मधे बांधले गेले. इथें इटलीच्या लाद्या विटा आणि ब्रम्हदेशांतून आणलेले सागवानी लाकूड; यांचा भरपूर वापर केलेला आहे. या बांधकामासाठी स्थानिक कलेलाच उत्तेजन दिले गेले आणि स्थानिक वस्तूंच्या उत्पादनाला प्रोत्साहन मिळाले. उदाहरणार्थ, कांही कांही इमारतींत वापरलेल्या फरशा तर जवळच्याच अतनगुडी गांवात रेती, सिमेंट, पाणी व रंग मिसळून हाताने तयार करण्यांत आलेल्या आहेत. त्या फरशीवर आपण जेव्हां अनवाणी चालतो. तेव्हां आजदेखील आपल्या पायाला गारवा जाणवतो. तिथल्या भिंतीही तितक्याच थंडावा देणाऱ्या आहेत. भिंतीवरचे प्लास्टर, अंड्याच्या टरफलांचा चुरा, अंड्यातले पांढरे, चुना, गूळ व इतर कांही मसाल्यांचे मिश्रण करुन सुरेख गुळगुळीत केले गेले. या विशाल भवनांमधल्या आंतल्या चौकांत हवा खेळती राहिल्यामुळे सगळ्या दालनांत मोकळी हवा जाणवते. लांकडी दरवाज्यांवर बहारदार कोरीवकाम केलेले आहे.

उन्नती साधणारी चेट्टियार जमात सावकारी व व्यापारांत संपन्न बनली, आणि आपल्या अत्यंत सचोटीच्या व्यावहारिक कौशल्यामुळे त्यांनी आपल्या समुदायाचे चांगले नांव मिळवले व ते राखले.

त्यांनी निर्माण केलेल्या या 'नाट्टुकोट्टै' घरांमुळे त्यांचे तेच नांव प्रसिद्ध झाले.

जर्मनीत नुकत्याच भरलेल्या आंतरराष्ट्रीय प्रदर्शनांत चेट्टियार समूह व चेट्टिनाड परंपरेच्या इतर अनेक वैशिष्ट्यांवर खास भर देण्यांत आला व तमिळनाड पर्यटनांत त्यांस पुरस्कृत करण्यांत आले आहे.



बाचकांसाठी कथास्पर्धा (जानेवारी-२००५)

# सर्वोत्तम कथा

नावाडी : ''मला सांगा साहेब, कोणत्या पक्ष्याला शंभर पंख असून तो रात्री उडतो आणि दिवसा झोपतो?''

पंडित : वा! फारच सोपे. शतवट-वाघूळ!

नावाडी : आँ? मी कसं ऐकलं नाही अजूनपर्यंत या पक्ष्याचं नांव?

पंडित : आता ऐकलंस की! निशाचर आहे तो पक्षी. रात्रीं उडतो आणि दिवसा झोपतो. आता मी तुला प्रश्न विचारतो. सांग, शतवटवाघूळ आणि वटवाघूळ यांच्यांत फरक काय?

नावाडी : हरलो साहेब. हा घ्या एक रुपया.

पंडित : शतवटवाघळाला कान किती असतात?

नावाडी : साहेब, हा पक्षी तुम्ही पहिलात. मी नाही, मग काय सांगणार?

पंडित : काढ प्रथम एक रुपया आणि वर पहा. आकाशात शत वटवाघळे घिरट्या घालीत आहेत. मोज त्यांचे कान!

नावाडी : साहेब! ती वटवाघळे आहेत. शतवटवाघळे नव्हेत. आपण चुकीचे उत्तर देऊन, या अशिक्षित नावाड्याला थाप मारून, दोन रुपये बळकावलेत. काढा ते दोन रुपये प्रथम! आता तीर जवळ आलेला आहे. परत जायचे असल्यास दुप्पट भाडे द्यावे लागेल.

पंडित : शत वटवाघुळांनो! हरवलंत हो मला!

कु. भाग्यश्री दत्तात्रय मोडक,
घर नं. २९५, मारुती गल्ली,
अनगोळ, बेळगांव - ५९० ००७. कर्नाटक राज्य.





# उत्तम वैद्य

वल्लभपुरांत राहाणारा रमेश पांडे हा प्रसिद्ध वैद्य होता. त्याच्याइतका चांगला वैद्य मिळणार नाही असं सारेजण म्हणत. त्याला मूल नव्हते. त्याचा पक्का विश्वास होता कीं वैद्यकशास्त्र हे नुसतं शिकवून कुणी शिकणार नाही, त्याच्यासाठी प्रबळ इच्छाशक्ती व ओढ असायला हवी.

एक दिवस कमल पांडे हा रमेशचा एक नातेवाईक आपल्या दोन्ही मुलांना घेऊन प्रकृति तपासायला रमेशकडे आला. शहरांत त्याचे दागिन्यांचे दुकान होते. कांही दिवसांपासून त्याला त्रास होत होता. त्याचे दोन्ही मुलगे, धनंजय व राघव, यांना वैद्यकी व्यवसायाचे आकर्षण वाटूं लागले.

रमेश पांडेच्या उपचारांमुळे पंधरवड्यातच कमल पांडेचा आजार आटोक्यांत आला. शहरांत परत जाताना त्याने रमेशला सांगितलं, ''भाऊ साहेब, आपण साक्षात धन्वंतरी आहात. पण आपलं हे कौशल्य आपल्याबरोबर संपून जाऊं नये असं मला वाटतं.'' त्यावर रमेश पांडे म्हणाला, ''मी तरी काय करूं शकणार? ज्या कुणाच्या मनांत वैद्यकी शिकायची फार इच्छा असलीच तर मी त्यांना शिकवूं शकेन.''

''माझ्या दोन्ही मुलांना या शास्त्राबद्दल आवड आहे. आपण या दोघांना आपले शिष्य म्हणून स्वीकार करा.'' कमल पांडेने विनंती केली.

त्यावर रमेशने सांगितलं कीं तो अगोदर त्या दोघांची परीक्षा घेऊन मगच त्यांचा निर्णय करेल. हे उत्तर ऐकून कमल समाधानाने शहरांत परत गेला.

त्या दोघांमधे धनंजय जास्त हुशार होता. त्याला कोणताही विषय झटकन समजे. राघव शांत स्वभावाचा होता. एकदोनदा विषय ऐकल्यानंतरच तो कांहीतरी निर्णयाप्रत येऊन पोंचत होता. रमेश पांडेने दहा दिवस त्यांना निरनिराळ्या झाडांच्या पानांची व जडीबुटीच्या औषधांची माहिती व महत्व सांगितले. त्याबरोबर तो रोग्याची परीक्षा कशी करतोय ते नीट लक्षपूर्वक पाहायलाही दोघांना सांगितले.

एके दिवशी, जवळच्या गांवातला भूस्वामी

पद्मजा शुक्ला



खूप आजारी आहे, असा निरोप रमेश पांडेला मिळाला. भूस्वामीला खालेले कांही पचत नव्हते. कुठल्यातरी रोगामुळे तो फारच अशक्त झाला होता. ज्याने निरोप आणला, त्याला रमेशने भूस्वामीबद्दल आणखीही माहिती विचारली. रमेशने ताडलं कीं भूस्वामीला अजीर्ण झालेलं असावं. त्या भूस्वामीवर उपचार करण्याचे काम धनंजयवर सोंपवले. त्या गांवी जाण्यापूर्वी रमेशने धनंजयला कोणती औषधे कशी द्यायला हवीत, हेही समजावून सांगितलं.

धनंजयने दोन दिवस गुरुने सांगितलेली औषधे देऊन भूस्वामीवर इलाज केला. त्याने त्या औषधी वनस्पती वाटून त्यांच्या गोळ्या बनवल्या व त्या तो भूस्वामीला देत राहिला. सुरवातीला थोडी सुधारणा होते आहे असं वाटलं खरं, पण नंतर मात्र भूस्वामीचा आजार बळावला. काय करावे ते धनंजयला कांही समजेना. तो निराश होऊन रमेशच्या घरी परत आला.

राघवने भूस्वामीवर उपचार करायची परवानगी गुरुकडे मागितली. रमेशने त्याला संमती दिली.

राघव भूस्वामीच्या घरी गेला. त्याने भूस्वामी रोज काय काय खातो ते पदार्थ मागवले, व त्यांची तपासणी केली. त्या भोजनांत तेल व तुपाचा भडिमार होता. अनेक पौष्टिक पदार्थांची रेलचेल होती. भूस्वामी जरूरीपेक्षां खूप जास्त खात होता. चुकतंय कुठे, ते राघवच्या लक्षांत आलं.

तो भूस्वामीला म्हणाला, "भाऊसाहेब, तुम्हाला पथ्य हे करायलाच हवं. जर तुम्ही दहा दिवस ताकभात आणि चिंचेचं सार व भात एवढंच खाल्लंत, तर गुरुजींच्या औषधाचा प्रभाव तुमच्या प्रकृतिवर चांगला पडेल."

भूस्वामीने होकार दिला. आठवड्याच्या आंत त्याचा आजार कमी होऊं लागला. भूस्वामीने राघवला योग्य इनाम देऊन त्याला निरोप दिला.

जेव्हां राघव रमेशच्या घरी परतला तेव्हां रमेश घरी नव्हता. धनंजयने राघवकडून त्याने केलेल्या औषधोपचाराची माहिती घेतली. संध्याकाळी जेव्हां रमेश घरी आला तेव्हां धनंजय त्याला म्हणाला, "गुरुजी, राघवने कोणती औषधे दिली आणि ती कशी लागू पडली हे आता मला समजलं. त्याने जिऱ्यामिऱ्यांचा काढाच, थोडा गूळ घालून दिला आहे. मी देखील तुम्ही सांगितलेले उपाय केलेले होते, पण त्याचा कांहीही परिणाम झाला नाही. असं कां झालं असावं?"

रमेश पांडेने हंसून म्हटलं, "धनंजय, वैद्याने फक्त रोग्याचीच नव्हे, तर रोगाचीदेखील परीक्षा करायची असते. रोगाचं मूळ कारण काय असेल ते शोधून काढायचं असतं. भूस्वामी जरूरीपेक्षां जास्त खात होता. त्याच्या उपचारासाठी औषधांपेक्षां



पथ्य हे जास्त महत्वाचं होतं. या कारणानेच राघवचा इलाज यशस्वी झाला."

दुसऱ्या दिवशी दोघे भाऊ रानांतल्या वनौषधी गोळा करण्यासाठी इकडेतिकडे हिंडत होते, वाटेत त्यांना एक म्हातारा झाडाखाली बेशुद्ध पडलेला आढळला. तो अगदीच दुर्बळ दिसत होता, आणि त्याच्या अंगावरचे कपडे फाटके होते. धनंजय म्हणाला, "कुणीतरी भिकारी दिसतोय. भुकेने बेशुद्ध झाला असेल बहुतेक. चल, आपण आपले काम करूं या."

"हो हो तर, ज्या कामासाठी आलो आहोत, ते काम तर करायला हवेच, पण अशा परिस्थितींत याला इथे सोडून जाणे हे ही योग्य नाही." असं म्हणत राघवने त्या इसमाच्या चेहऱ्यावर पाणी शिंपडले.

थोड्या वेळांत तो इसम उठून बसला, तेव्हां राघव धनंजयला म्हणाला, "धनंजय, याला घरी नेऊन आधी पोटभर जेवायला घालूं या. तो भुकेने बेशुद्ध झाला कीं दुसऱ्या एखाद्या कारणाने, हे ही आपल्याला पाहायला हवे. गुरुजींनाच याची परीक्षा करूं दे." आणि त्यांनी त्या माणसाला रमेशच्या घरी आणले. रमेशने ही हकीकत ऐकली आणि धनंजयला म्हटले, "वैद्याच्या मनांत असहाय्य व्यक्तींबद्दल आणि रोग्यांच्याबाबतीत सहानुभुति असायला हवी. त्याची आर्थिक परिस्थिती लक्षांत घेऊन त्याच्याकडून पैसे घ्यायला हवेत. आपण रोग्याचा मित्र बनून त्याच्याशी व्यवहार केला तर आपला व्यवसाय आपण जास्त चांगल्या प्रकारे करूं शकूं."

गुरुजींचे बोलणे ऐकून धनंजयचा चेहरा पडला. तो वरमून म्हणाला, "मी चुकलो, मला क्षमा करा गुरुजी! वैद्यकी शिकली तर भरपूर पैसे मिळतील. एवढ्याच हेतूने मी इथे आलो होतो. पण आता तर वाटतं कीं व्यापारांत मिळणाऱ्या फायद्याच्या प्रमाणांत यांतून कांही फारशी कमाई होणार नाही. माझ्या स्वभावाला हा व्यवसाय कांही मानवणारा नाही. मला तुम्ही घरी जायची परवानगी द्या." असं म्हणून धनंजय नंतर आपल्या घरी परत गेला.

राघवने गुरु रमेश पांडेच्या घरी राहून वैद्यकशास्त्र मन लावून शिकले आणि लौकरच तो एक निष्णात वैद्य मानला जाऊं लागला. गुरुपेक्षांही त्याला जास्त प्रसिद्धी मिळायला लागली.





# लोभ

कुमुद्वती राज्याच्या सीमेवर वाहाणाऱ्या कुमुदिनी नदीच्या कांठावर सुप्रसिद्ध मुनी सोमशेखर यांचा आश्रम होता. गुरुकुलांत अभ्यासाबरोबर विद्यार्थ्यांना चित्रकलेचे धडेही मुनी देत असत. ते स्वतः एक श्रेष्ठ चित्रकार होते. कलाप्रेमी रसिकजन दूरदूरच्या नगरांतून येत व मुनींकडून ते सांगतील ती किंमत मोजून आपले चित्र काढून घेत असत. सोमशेखर मुनींकडून आपले चित्र काढून घेणे ही धनिक मंडळींमधे प्रतिष्ठेची बाब मानली जात होती.

जी चित्रें मुनी काढत, त्यांची किंमत वसूल करण्याबाबतीत ते फारच काटेकोर होते. लोकांना त्याचे आश्चर्य वाटे. कांही लोक तर सरळ म्हणत कीं इतके पैसे मागणे हे एका मुनीला शोभत नाही.

पण या टीकेची मुनीवर्यांनी कधी दखल घेतली नाही. आणि आपली चित्रें काढण्याची जबर किंमतही कधी कमी केली नाही.

एकदा एक सुंदर सजवलेल्या घोडागाडीतून राजनर्तकी शुभांगी मुनींना भेटायला आली. तिने आपली प्रतिमा मुनींकडून काढून घ्यावी अशी इच्छा व्यक्त केली.

''चांगली गोष्ट आहे. मी तुमचे चांगले चित्र जरूर काढीन. पण त्यासाठी तुम्हाला मोठी रक्कम चुकती करायला लागेल.'' मुनींनी म्हटलं.

''हरकत नाही. मागाल ती किंमत मी देईन. सांगा, किती हवेत आपल्याला?'' राजनर्तकीने प्रश्न केला.

''आपल्या पदाला योग्य असे किती देऊं शकशील, हे तूच सांग.'' मुनींनी तिला विचारलं.

''शंभर मोहोरा पुरतील?'' तिने उलट विचारलं. तिला वाटलं, हे ऐकून मुनी फारच प्रसन्न होतील!

''दोनशे मोहोरा'' मुनींनी झटकन निर्भयपणे सांगितलं.

ती चकितच झाली. पण स्वतःला सांवरत म्हणाली, ''ही रक्कम मोठी आहे. ही मागणं हे मुनींना शोभादायक नाही.''

''यांत सौदा करण्याचा प्रश्नच येत नाही. जे मी मूल्य मागतो आहे, ते प्रथम दिलं पाहिजे. त्यानंतरच मी कामाला सुरवात करीन. हे मान्य नसेल तर राहूं दे!'' मुनीने स्पष्टच सांगितलं.

आता तिचाही अभिमान जागा झाला. ज्या कामासाठी ती आली होती, ते पूर्ण केल्याशिवाय ती परत जाणार नव्हती. तिने दोनशे मोहोरा त्यांच्यासमोर ठेवल्या आणि म्हटले, ''घ्या, मी झाडाजवळ जाऊन उभी राहाते, आपण माझे चित्र काढा!'' असं म्हणून ती समोरच्या झाडाच्या-खाली नृत्याच्या मुद्रेत उभी राहिली.

मुनींनी तिला नखशिखान्त नीट निरखून पाहिले आणि ते चित्र काढण्यांत दंग झाले. कांही वेळानंतर त्यांनी काढलेले तिचे चित्र तिला दिले.

ते पाहून राजनर्तकी आनंदून गेली व त्यांना उतावीळपणे म्हणाली, ''खरंच, फारच सुंदर चित्र आहे. पण ते काढण्याची जी किंमत तुम्ही घेतलीत ती मात्र जास्त वाटते. असे पैसे जमा करुन मरतेवेळी काय तुम्ही ते बरोबर नेणार आहात कां?''

आणि असं म्हणून ती झर्रकन घोडागाडीत बसून निघून गेली.

मुनींचे चित्रे काढण्याने काम चालूंच होते, आणि त्यांतून ते भरपूर पैसे मिळवत होते. पण एक दिवस त्यांनी अचानक चित्रांचे काम बंद



जैन कथेवर आधारित

केले व मुलांच्या विद्यार्जनावर लक्ष केंद्रित केले. जेव्हां राजनर्तकीला ही वार्ता कळली, तेव्हां या परिवर्तनाचे कारण काय ते जाणून घेण्यासाठी ती आश्रमांत आली.

गेल्या वेळेला जेव्हां ती आश्रमांत आली होती, तेव्हां तिथला रस्ता ओबडधोबड होता, दगडगोटे होते, रस्ता वेडावांकडा होता; पण आता मात्र रस्ता अगदी नीटस, आंखीवरेखीव व स्वच्छ होता. त्या दिवशी वैशाखी पौर्णिमा होती.

आश्रमाच्या प्रांगणात एक मोठा मंडप पाहून तिला आश्चर्य वाटले. मंडपाच्या मधोमध सोमशेखरचा प्रमुख शिष्य बसलेला होता आणि शिष्य व भक्तगण यांना उद्देशून तो भाषण करीत होता.

''भानुप्रकाशानंद स्वामींची प्रबळ इच्छा होती की एक ध्यानमंदिराची निर्मिती करावी. पण त्यांची इच्छा पूर्ण होण्यापूर्वीच त्यांचं निधन झालं. पण आमचे गुरुवर्य सोमशेखरस्वामींनी गुरुजींची इच्छा पूर्ण करण्यासाठी ध्यान-मंदिर निर्माण करणे हेच आपले लक्ष्य बनवले आणि त्यासाठी त्यांनी अपार परिश्रम केले. लोकांनी त्यांना लोभी, स्वार्थी म्हटले. पण त्यांनी त्याची फिकीर केली नाही. चित्रें काढून त्यांनी धन गोळा केले आणि आपल्या गुरुची इच्छा पूर्ण केली. पुढच्या पिढीवर उपकार करण्यासाठी तपस्या करण्यासाठी ते अरण्यांत निघून गेले. त्यांची कितीही प्रशंसा केली तरी ती कमीच आहे. त्यासाठी त्यांनी हा रस्ता बनवला, हे ध्यानमंदिर बनवलं. आपण त्यांचे ऋणी आहोत.''

हे ऐकून राजनर्तकीचे डोळे पाणावले. तिला पश्चात्ताप झाला. तिला मुनी लोभी वाटले होते पण खरं तर ते महान आत्मा व परोपकारी होते. तिला आपली चूक समजली. तिने मनोमन मुनींची क्षमा मागितली. नंतर आपल्या अंगावरचे दागिने तिने काढले व मंदिराला भेट दिले. आता तिचे मन शांत झाले होते, आणि तिच्या मनांत पवित्र विचार होते. जड अंतःकरणाने ती तिथून परत गेली.







# भल्लूक मांत्रिक

## 21

*(कालीवमनि भुयारी मार्गाने जाऊन बैराग्यांकडून मंत्रदंड घेतला, आणि नंतर ते सारेजण जितकेतु राजाच्या उद्यानांत पोंचले. त्यावेळेला तिथे जितकेतु आणि मायामर्कट येऊन पोंचले. राजाने त्यांना तिथे येण्याचे कारण विचारले. पण गुरु बैरागी ''मंत्रदंड'' आणि ''श्यामगुप्त'' एवढंच म्हणत राहिला. त्यानंतर...)*

गुरु बैराग्याचे बोलणे राजाला समजले नाही. त्याने रागाने विचारले, ''अरे संन्यासी, काय म्हणतो आहेस तू? मंत्रदंड कुठे आहे? हा श्यामगुप्त कोण आहे?''

गुरु बैरागी थोडा शांत होऊन म्हणाला, ''महाराज! मी एक बैरागी आहे. मला संन्यासी म्हणून माझा अपमान करुं नये. बैरागी निराळा असतो आणि संन्यासी निराळा! हा फरक आपल्याला माहीत नाही कां?''

हे उत्तर ऐकून राजा संतापाने पेटून उठला. तेव्हां मायामर्कटाने दांत विचकून रागाने विचारले, ''अरे कपटी बैराग्या, खरं काय ते सांग, इतर बडबड नको. ज्याने माझा मंत्रदंड चोरलाय, त्याला तू पाहिलंस कां?''

बैरागी गुरुने मायामर्कटाकडे आश्चर्याने पाहिले आणि नंतर आपल्या शिष्यांकडे वळून तो म्हणाला, ''माझ्या शिष्यांनो, चंद्रशिला नगरीचा नवा मंत्री हाच कां आहे?''



“होय गुरुजी. हाच तो मर्कटामात्य!” एका शिष्याने उत्तर दिले, त्यावर मायामर्कट गरजला, “जे कांही पाहिलंस ते लौकर सांग, नाहीतर याच तलवारीने तुझा शिरच्छेद करीन.”

मोठ्या शिष्याने चिंताग्रस्त चेहऱ्याने म्हटलं, “गुरुजी, खरं काय ते सांगा. म्हणजे आम्हाला इनाम मिळेल. नगराच्या उत्तरेला वेशीबर जी धर्मशाळा आहे. तिच्यासमोरच्या वाड्याचा मालक श्यामगुप्त ह्याच्याकडे आपण तो मंत्रदंड पाहिला आहे ना?”

गुरु बैरागी उत्तर देण्यापूर्वीच मायामर्कट दांत काढून हंसायला लागला आणि म्हणाला, “अरे मूर्खा! आता तुझा गुरु काय सांगणार? तूच सांगितलंस की सारं कांही! हे राजा, लगेच श्यामगुप्ताच्या घरी शिपाई पाठवून तो मंत्रदंड मागवून घ्यावा.”

राजाने जोराने टाळी वाजवली. एक शिपाई धावतच तिथे आला. त्याला ते बैरागी दाखवून राजाने सांगितलं, “हे पहा, तुम्ही आणखी कांही शिपाई घेऊन ह्यांच्याबरोबर जा. आपल्या नगरांतल्या श्यामगुप्ताला मंत्रदंडासहित इथे तावडतोब घेऊन या.”

शिपाई बैराग्यांसह जायला निघताहेत तोच एकदम किल्ल्याच्या भिंतीपलीकडून शंखनाद ऐकू आला. मायामर्कट उडी मारुन म्हणाला, “हे राजा! हा शंखनाद करणारे तर माझे गुरु महानुभाव मिथ्यामिश्र आहेत. आता आपल्या साऱ्या अडचणी दूर होतील. ते आपल्या सगळ्या शत्रूंना पार नामोहरम करुन टाकतील. आता थोड्याच वेळांत आपण चक्रवर्ती राजा होणार आहात.” आणि तो किल्ल्याच्या भिंतीकडे जाऊं लागला.

राजाने मायामर्कटाच्या खांद्यावर हात ठेवून त्याला थांबवीत आपला संशय व्यक्त केला, “ऐक महामंत्री! माझे सैनिक, सूर्यभूपती, उग्रदंड आणि अस्वल्या मांत्रिकापासून किती वेळ किल्ला वांचवू शकतील? तूही इथून गेलास तर मला ऐन वेळेवर सल्ला कोण देईल? आपण जीवगुप्ताला इथून अपमान करुन पाठवून दिलं ही आपली मोठीच चूक झालीय.”

“राजन्, आपले प्राण धोक्यांत नाहीत.” असं म्हणून मायामर्कट तिथून पळाला.

झुडुपांच्याआडून हे दृश्य कालीवर्मा पहात होता. त्याला ही एक नामी संधी वाटली. तेवढ्यांत धाप लागलेला सूर्यभूपती तिथे येऊन म्हणाला, “महाराज! मी आता इथून माझ्या



स्वतःच्या किल्ल्याकडे जातो. एक राक्षस शंखनाद करणाऱ्या आपल्या शिष्यांना घेऊन किल्ल्याची भिंत फोडून आंत शिरण्याचा प्रयत्न करतोय असं मला कळलं. माझ्या किल्ल्यांत माझी पत्नी, मुलगी आणि थोडेसेच सैनिक आहेत.”

जितकेतू आश्चर्याने म्हणाला, “ही सगळी कांहीतरी गडबड दिसतेय मला! एक राक्षस आणि अस्वल्या मांत्रिक माझ्या किल्ल्यावर हल्ला करायला आलेले आहेतच. त्यांत आणखी एक राक्षस आणि मांत्रिक! ही काय पीडा आहे?”

जितकेतू राजा गोंधळला होता आणि चारी दिशांना टकामका बघत होता.

त्यावेळी कालीवर्मा झाडांआडून बाहेर येऊन त्याला म्हणाला, “महाराज! यावेळी मी आपला शत्रू नाही. तलवार उपसूं नका. याक्षणीं आपण किती असहाय्य आहात ते आपल्यापेक्षां मला जास्त माहिती आहे. आपला मंत्री मायामर्कट किल्ल्याची भिंत ओलांडून बाहेर गेला आहे ते आपण पाहिलं आहेच!”

जितकेतू क्षणभर चकित झाला आणि म्हणाला, “तू कालीवर्मा आहेस ना? यापूर्वी मी तुझा शिरच्छेद करण्याची शिक्षा दिली होती ना?”

हा प्रश्न ऐकून कालीवर्मा किंचित हंसत म्हणाला, “महाराज, ती जुनी गोष्ट झाली. त्यावेळेला आपल्या मनांत मी एक राजा आहे असा अहंभाव भरलेला होता. पण आत्ता आपण अनेक संकटांमुळे चिंताक्रांत आहात.”

त्यावर जितकेतुने सूर्यभूपतीकडे बघून विचारले, “कालीवर्मा, सूर्यभूपती आणखी एका



राक्षस व मांत्रिकाबद्दल बोलतोय. दोघे मांत्रिक आणि दोघे राक्षस कसे?”

“महाराज! या साऱ्या गडबडीच खरं कारण आहे - या दोघा मांत्रिकांच्यामधे असलेले वैर आणि सूड घ्यायची भावना! हे दोघेजण ब्रम्हपुत्रा नदीच्या उगमाजवळ असलेल्या एका जुन्या मंदिरांतल्या भल्लुकेश्वरीचे भक्त आहेत. त्यांच्यापैकी एकाचे नांव भल्लूकपाद आहे. त्याचाच शिष्य भल्लूक मांत्रिक उर्फ अस्वल्या मांत्रिक, इथे आलेला आहे. दुसरा मिथ्यामिश्र नांवाचा एक तांत्रिक आहे. त्याचा शिष्य मायामर्कट आहे. आता राहिले ते राक्षस! ते दोघे सख्खे भाऊ आहेस. त्यांतला उग्रदंड राक्षस आपल्या बाजूचा आहे. तांत्रिक मिथ्यामिश्राने उग्रदंडाच्या भावाला, कालदंडाला, कैदेत ठेवलेलं आहे.” कालीवर्माने खुलासा केला.



कालीवर्माचे बोलणे पूर्ण होण्यापूर्वी सूर्यभूपती म्हणाला, "महाराज, तोच तांत्रिक आपल्या कैदेत असलेल्या राक्षसाला बरोबर घेऊन माझ्या किल्ल्यावर हल्ला करायला गेला असावा. मला आज्ञा द्यावी. मी आपल्या दर्शनाला नंतर येईन." आणि तो वेगाने तिथून चालता झाला.

जितकेतु राजा काळजीयुक्त स्वरांत कालीवर्माला म्हणाला, "वर्मा, आता तू काय करणार आहेस? अरे, तुझ्या हातांत एक मंत्रदंड आहे, आणि दुसऱ्या हाताने तू तलवारही म्यानांतून उपसू शकतोस? मी कदाचित राज्य कारभार चांगला केला नसेल, पण मी भेकड नाही हं! तू कोणते शस्त्र माझ्यावर वापरणार आहेस?"

कालीवर्माने मंत्रदंड व तलवार जमिनीवर फेकून देत म्हटले, "महाराज, मी यापैकी एकही शस्त्र आपल्यावर चालवणार नाही. आपल्या शासनात जे अत्याचार घडले, त्याची जबाबदारी आपल्या मंत्र्यांनी वाटून घ्यायला हवी. तरीही आत्ता आपल्या राज्याला मांत्रिकांपासून व राक्षसांपासून वाचवण्याची जबाबदारी माझ्यावर आहे."

हे बोलणे ऐकून जितकेतू खूष झाला, आणि खाली टाकलेली तलवार उचलून ती तो कालीवर्माला देणार, तेवढ्यांत दुर्मुखराजा व अस्वल्या मांत्रिक जवळच्या भुयारी मार्गातून वर आले.

दुर्मुख तलवार उपसून गर्जतच म्हणाला, "कालीवर्मा, मला वाटलं होतं कीं आपले नुकसान झाले होते. पण तुम्ही या राजाला अद्यापि जिवंत कशासाठी ठेवलंत? मी आत्ताच यांना माझ्या तलवारीची धार दाखवतो." आणि तो जितकेतुजवळ जाऊं लागला.

कालीवर्माने विजेच्या गतीने पुढे होऊन आपल्या तलवारीने दुर्मुखची तलवार रोखली आणि त्याला समजावून सांगितले, "राजा दुर्मुख, उतावळेपणा नको. याच राजा जितकेतूच्या वंशाची सेवा करताना माझे पिताश्री युद्धांत स्वर्गवासी झाले होते. ते विसरुन यांचा यावेळी वध करणे हे माझ्या लेखी पाप आहे."

दुर्मुख रागावून कांहीतरी बोलणार, तितक्यांत अस्वल्या मांत्रिकाने झटकन खाली पडलेला मंत्रदंड उचलून म्हटले, "कालीवर्मा, छान! माझे गुरु भल्लूकपाद, त्यांचा हाडवैरी तांत्रिक मिथ्यामिश्र, कालदंड राक्षस आणि त्याचा शिष्य जंबुकेश्वर, यांना शोधत या प्रदेशांत आले आहेत.



माझ्या गुरुजींचा कांही घातपात होईल अशी मला शंका आहे. आपण तात्काळ भल्लूकपाद पर्वतराजीकडे जायला हवं!"

"जर आपण तिकडे गेलो तर इथे त्या तांत्रिकाचा जुलूम कसा रोखता येईल? तो सूर्यभूपतीच्या किल्ल्यावर हल्ला करायला गेला आहे ते मला समजलंय. त्या किल्ल्यांत सैनिकही फारसे नाहीत." कालीवर्मा म्हणाला.

अस्वल्या मांत्रिकाने त्यावर टिपणी केली, "या सगळ्या गोष्टी सूर्यभूपतीच्या तोंडून, तो किल्ल्याकडे जाण्यापूर्वीच मी ऐकल्या होत्या. माझा साधा सरळ प्रश्न आहे, कीं या राजा नि मांडलिकाच्या भानगडीत आपण कशासाठी पडायचं?"

कालीवर्मा मांत्रिकाकडे रागाने बघत बोलला, "मी या राज्यांत जन्मलोय आणि या मातींतच वाढलो आहे. म्हणून अगोदर या राज्याचे आणि राजाचे हित पाहायला हवे. पर्वतांत राहाणाऱ्या एकट्या मांत्रिकाच्या मदतीसाठी धावणे हे कांही योग्य नाही!"

हे उत्तर ऐकून अस्वल्या मांत्रिक थक्क झाला, आणि म्हणाला, "अरे शिष्या कालीवर्मा, कांही क्षणांतच तू कसा बदललास? जितकेतू राजाचे बोलणे ऐकून कदाचित् तू फसशील. हा मंत्रदंड आणून देणाऱ्याला तो आपले अर्धे राज्य आणि आपली दत्तककन्या देण्याची त्याने फक्त घोषणा केलेली आहे."

"माझ्या बोलण्यांत अर्धे राज्य व राजकुमारीशी विवाह यांचा उल्लेख कुठेही नव्हता. मंत्रदंड तर



मी आपल्याला दिला, महाराजांना कुठे दिला होता?" असं म्हणून कालीवर्माने राजाकडे बघितलं. तेव्हां तिथे उग्रदंड राक्षस आणि अस्वल्या वधिकदेखील येऊन पोंचले.

उग्रदंडाला पाहून क्षणभर जितकेतु राजा भ्यायला, पण धीर एकवटून त्याने विचारले, "मला कांही मूलबाळ नाही. या राज्याचा वारस कोण होईल हाच विचार मी करतो. यावेळी अनायासे मला चांगली संधी मिळाली आहे. सूर्यभूपतीची मुलगी माझी दत्तक कन्या आहे. मी तिचा विवाह कालीवर्माशी करीन. म्हणजे माझ्या पश्चात तो चंद्रशिलाचा राजा होईल."

त्यावर अस्वल्या मांत्रिक चिडून ओरडला, "भल्लूकपाद गुरु की जय!" आणि नंतर जरा शांत होऊन म्हणाला, "खरी परिस्थिती जाणून घेण्याऐवजी तुम्ही हवेंत इमले बांधता आहात. तो दुष्ट

तांत्रिक मिथ्यामिश्र एव्हाना सूर्यभूपतीच्या कन्येला बंदी बनवून पर्वतरांगांतल्या आपल्या वस्तींत जायला निघालादेखील असेल. बरेच दिवसांपासून भलुकेश्वरीदेवीसाठी एका पुजारिणीच्या शोधांत तो होता.''

''मी जिवंत आहे तोपर्यंत हे काम तो तांत्रिक पूर्ण करुं शकणार नाही.'' असं म्हणून कालीवर्माने सर्रकन आपली तलवार म्यानांतून उपसली.

''कालीवर्मा, मीदेखील हीच प्रतिज्ञा करतो आहे.'' उग्रदंड राक्षसाने आपली गदा उचलून म्हटले.

अस्वल्या मांत्रिक हंसून म्हणाला, ''उग्रदंडा! तुमची प्रतिज्ञा सफल होवो अशी माझीही इच्छा आहे. या कामांत तुम्ही त्या तांत्रिकाच्या तावडीतून माझ्या मोठ्या भावाला, कालदंडाला सोडवा. कांहीतरी वनौषधी पाजून मिथ्यामिश्राने त्याचा बुद्धिभ्रंश केला आहे आणि विश्वासू हरकाम्या-प्रमाणे त्याच्या उपयोग तो करतो आहे. ठीक तर, मी आता निघालो!''

असं म्हणून तो भुयाराकडे जायला वळला, तेव्हां एका झाडाच्या पाठीमागून अस्वल्या वधिक 'सिरस भैरव!''

असं किंचाळत, हातांतला परशु नाचवीत, मांत्रिकासमोर उडी मारुन म्हणाला, ''अस्वल्या मांत्रिकजी! आपल्या मंत्राच्या प्रभावाने मी अर्धा अस्वल झालो आहे.

आता माझं काय होणार? तुम्ही, तुमचे गुरु आणि मी, तिघेही अस्वलासारखे आहोत त्यामुळेच तर सगळी गडबड होते आहे. मला पूर्वीसारखा माणूस बनवता कीं या परशुने तुमचे मस्तक छाटून टाकू?''

अस्वल्या मांत्रिक टरकला नि त्याला म्हणाला, ''तू अस्वल्या वधिक नाहीस, या नगरीचा प्रमुख वधिक आहेस. आत्ता तू सिरसवनांत जाऊन ज्या गुन्हेगारांना शिक्षा झालेली आहे त्यांचे शिरच्छेद कर, जा!''

असं म्हणून त्याने अस्वल्या वधिकाच्या डोक्याला तीन वेळा आपला मंत्रदंड टेकवला, आणि विजेच्या चपळाईने तो भुयारांत उतरला.

***(पुढच्या अंकात समाप्त)***





बेताळ कथा

# देवनाथच्या दिव्य शक्ती

निश्चयाचा पक्का विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला, त्याने झाडावरुन शव खाली उतरवले आणि आपल्या खांद्यावर घेतले. नेहमीप्रमाणे त्याने स्मशानाची वाट धरली. तेव्हां प्रेतांत लपलेल्या बेताळाने राजाला विचारले, ''राजन्, या घनघोर अंधारात तू निर्भयपणे पुढे चालतच राहिला आहेस. तुझे हे अपार कष्ट व मेहनत पाहिले कीं कुणाच्याही मनांत तुझ्याविषयी दयेचा पाझर फुटेल. तू एवढे परिश्रम घेतो आहेस तेव्हां त्याच्या पाठीमागे तुझा कांहीतरी गुप्त हेतू असेलच. तुझे ध्येय गाठण्यासाठी तू जी ही साधना



करतो आहेस, ती निश्चितच कौतुकास्पद आहे. पण हे ध्येय साधण्यासाठी तू जो मार्ग निवडला आहेस तो मात्र श्रेष्ठ असणे अत्यंत आवश्यक आहे. तरच तुझी ध्येयसिद्धी योग्य मार्गानं जाते आहे असं म्हटलं जाईल. हे धर्मसूत्र आणि त्याची सक्षमता ओळखून योगी देवनाथने उतावळेपणाने जो निर्णय घेतला, तो पूर्णपणे विसंगत होता. त्यामुळेच त्याचा परिणामही अशुभ व वाईट झाला. तुला सावध करण्यासाठी मी तुला त्या योग्याची गोष्टच सांगतो. ती ऐकताना तुझा थकवादेखील दूर होईल.'' आणि वेताळाने देवनाथ योग्याची पुढील गोष्ट सांगितली.

सिंगवर नावाचे एक गांव समुद्रकिनाऱ्यावर वसलेले होते. त्या गांवाच्यालगत एक अरण्य होते. त्यांत योगी देवनाथने आश्रम स्थापन केला आणि जरूर पडेल तेव्हां तो लोकांना मदत करीत असे. त्या योग्याजवळ अनेक दिव्य शक्ती आहेत अशी बहुतेक लोकांची श्रद्धा होती.

सिंगवर गांवात आणि त्याच्या जवळपासच्या प्रदेशांत वेळेवर पाऊस पडत होता व उत्तम पीक येत होते. आपल्या कष्टांचे भरपूर फळ मिळते आहे हे पाहून गांवकरी समाधानी व तृप्त होत असत.

कांही दिवसानंतर बलराज नांवाच्या एका स्वार्थी माणसांची तिथे ग्रामाधिकारी म्हणून नेमणूक झाली. जास्त पैसा मिळवण्यासाठी त्याने गांवात दारुची दुकाने व जुगाराचे अड्डे सुरुं केले. त्यामुळे गावांतली तरुण मुले या वाईट संवयींची शिकार बनली.

या संकटाला निमंत्रण दिल्याबद्दल गांवकऱ्यांनी बलरामला दोष दिला. पण त्याने त्यांना उत्तर दिले, ''काळ बदलत चालला आहे. काळाबरोबर आपणही बदललं पाहिजे. अनेक गांवकऱ्यांनी मागणी केली म्हणून मी ही व्यवस्था केली.''

बलराजच्या या कृतीबद्दल जे लोक खूष झाले त्यांच्यामधे गिरीराज नांवाचा एक शेतकरी होता. त्याच्या घरी त्याची बायको मालती व सहदेव व रमानाथ हे दोघे तरुण मुलगे राहात होते. थोरला सहदेव सुशील व सरळ स्वभावाचा होता. गांवातले सगळे सज्जन तरुण त्याच्याशी मैत्री ठेवून होते. पण रमानाथ मात्र पोरकट व बेजबाबदार होता. टवाळखोर व उनाड मुलांचा तो नेता होता.

रमानाथच्या आईवडिलांना नेहमी त्याची काळजी वाटत असे, पण सहदेव त्यांना शांत करीत नेहमी सांगत असे. ''तो अजून लहान, अल्लड आहे. त्याच्यावर मी लक्ष ठेवीन. तुम्ही काळजी करुं नका.''

आपल्या मित्रांच्या मदतीने सहदेव कथाकीर्तन, व लहानसहान प्रहसनांचे कार्यक्रम करीत होता. या करमणुकीतून दारुचे प्रकृतिवर किती वाईट परिणाम होतात, जुगाराचे दुष्परिणाम व नुकसान कसे होते, ते लोकांच्या मनावर बिंबवण्याचा प्रयत्न करीत होता.

सहदेवाचे हे कार्य रमानाथला मुळीच पसंत नव्हते. त्याबाबत बोलताना त्याच्या मित्रांनी त्याला सांगितले, ''तुझा भाऊ लोकांचा आवडता आहे. तुला त्याचे काम पसंत नाही पण हे आम्ही लोकांना सांगितलं तर ते चिडतील. सहदेवाच्या विरुद्ध आपल्याला ग्रामाधिकारी बलराजच मदत करुं शकतील.''

बलराजलाही सहदेवाची लोकप्रियता खुपत होती. रमानाथ मित्रांना घेऊन जेव्हां त्याच्या घरी आला, तेव्हां तो म्हणाला, ''हिरा हिऱ्यानेच कापला जातो. कांट्यानेच कांटा काढायला हवा. आपण रमानाथच्या चांगुलपणाचा उपयोग करुन त्याच्याकरवी असे काम करुन घेऊं, कीं सगळे ग्रामस्थ त्याचा तिरस्कार करतील.'' असं सांगून बलराजने एक सविस्तर योजना आंखली.

त्याच्या सांगण्यानुसार रमानाथचा एक मित्र साधूच्या वेषांत सहदेवाकडे जाऊन भेटला आणि त्याला म्हणाला, ''मी ऐकलंय कीं रमानाथ घरांत सगळ्यांचा लाडका आहे. तो खोडकर व उडाणटप्पू आहे हेही ऐकलंय. त्याला सुधारायचं



असेल तर एक साहसी योजना आहे. तू ते धाडस करशील कां?''

सहदेवाने चटकन होकार दिला.

''बरं तर, आजच मध्यरात्र झाली कीं तू एकटाच रामाच्या मंदिरात जा. गाभाऱ्यांत श्रीरामचंद्राची मुकुटधारी मूर्ती आहे. तो मुकुट घरी घेऊन जा आणि तुझा भाऊ झोपलेला असेल तर त्याच्या डोक्यावर थोडा वेळ ठेव. नंतर लगेच तो मुकुट घेऊन मंदिरात परत जा, आणि प्रभूच्या मूर्तीच्या मस्तकावर होता तसा ठेवून दे. पण हे काम अत्यंत गुप्तपणे व सावधानतेने करायला हवं. असं केलंस तर तुझा धाकटा भाऊ श्रीरामचंद्रसारखा थोर व गुणवंत होईल.''

त्या कपटी साधूच्या बोलण्यावर सहदेवाने विश्वास ठेवला. त्याच रात्री तो राममंदिरात गेला.



बलराजच्या योजनेप्रमाणे मंदिराची दारे बंद नव्हती. त्यामुळे सहदेवाला वाटलं कीं प्रभू रामचंद्रदेखील या कामांत त्याला मदत करीत आहेत. त्याने मूर्तीला प्रणाम केला आणि तिच्या मस्तकावरचा मुकुट काढला. पण तेवढ्यांत रमानाथचे मित्र आणि ग्रामाधिकारी बलराज तिथे बोलत बोलत पोंचले. हातांत देवाचा मुकुट घेतलेल्या सहदेवाला त्यांना पकडले. बलराजने सहदेवावर प्रश्नांचा भडिमार केला.

तेव्हां रमानाथने उत्तरादाखल फक्त म्हटले, "हे माझं केवळ दुर्भाग्य आहे!"

दुसऱ्याच दिवशी रामाच्या मंदिरात सर्व ग्रामस्थांना बोलावण्यांत आले. बलराजने सर्वांच्यासमक्ष सहदेवावर चोरीचा आरोप केला आणि त्याला पन्नास फटके मारावेत अशी शिक्षा सुनावली. सहदेवाच्या आईला जेव्हां ही बातमी समजली, तेव्हां ती थरथर कांपतच मुलाजवळ येऊन म्हणाली, "बाळ, तू सज्जन आहेस. तू कधीही वाईट काम करत नाहीस. तू देवाचा मुकुट घेतलास खरा, पण मग त्याच्यामागे कांहीतरी सबळ कारण असलेच पाहिजे. मला हे पहावत नाही. तू असं कां केलंस ते सर्वांना सांग." आपले दुःख आवरत तिने सहदेवाला विचारलं.

आईच्या विनवणीचा सहदेवावर कांही परिणाम झाला नाही. शांत स्वरांत त्याने उत्तर दिले, "आई, माझ्यावर विश्वास ठेव. जर मी मुकुट कां घेतला याचे खरे कारण सांगितले, तर त्यामुळे साऱ्या गांवाचे अकल्याण होईल."

त्याचे उत्तर ऐकून बलराज मोठ्याने हंसला व म्हणाला, "आपल्या गोड बोलण्याने आमचा विश्वास संपादन करण्याचा प्रयत्न हा करतो आहे. चांगुलपणाचा बुरखा याने पांघरला आहे. याची शिक्षा तावडतोब अंमलात आणली पाहिजे." असं म्हणून त्याने एका पहिलवानाच्या हातांत चाबूक दिला.

मालती सहदेवाच्यासमोर उभी राहिली आणि म्हणाली, "ज्या गावाचं अमंगल होऊं नये असं माझ्या मुलाला वाटतं, त्याच गांवाकडून त्याला शिक्षा होते आहे! ह्या गांवाचं अकल्याण नक्की होईल; हा माझा शाप आहे." रागाने जमिनीवर पाय आपटून ती म्हणाली.

योगायोगाने दुसऱ्याच क्षणीं तिथे धरणीकंप झाला. गांवातली सारी घरे कोसळली. जवळच असलेल्या समुद्राचे पाणी गांवात शिरले आणि



गांवाची जमीन पाण्याखाली गेली. "आपली सगळी जमीन खारी झाली. कित्येक वर्षे तिथे कांहीच पीक येऊं शकले नसते. सहदेवाच्या बाबतींत आपली फार मोठी चूक झाली. आपण सारेजण समुद्रांत बुडून मरुन जाऊं या, हाच एकमात्र मार्ग आहे." एका गांवकऱ्याने पश्चात्तापाच्या स्वरांत म्हटलं.

तेव्हां मालतीने त्याला म्हटलं, "या आपत्तीत कितीतरी लोक मेले आहेत. पण आमच्या घरांतले मात्र सगळे वांचले! आता दिव्यारामच्या योगी देवनाथ यांच्या दर्शनाला जाऊं. तेच कांहीतरी मार्गदर्शन करूं शकतील."

सर्वांनी त्याला संमती दर्शवली. योगी देवनाथांकडे गांवकरी गेले व त्यांनी आपली व्यथा सांगितली तेव्हां देवनाथांनी सांगितलं, "तुमचे गांव पुन्हां पूर्वीसारखे चांगले होण्यासाठी माझ्याकडे कांही दिव्य शक्ती आहेत. पण त्या शक्ती वापरण्यासाठी कांही नियम आवश्यक असतात. ज्या व्यक्तीने आजपर्यंत कोणतेही वाईट कृत्य केलेले नाही, अशा व्यक्तीलाच या दिव्य शक्ती वापरता येतील. असा एकमेव उत्तम माणूस तुमच्या गांवात आहे - तो म्हणजे सहदेव! तोच तुमच्या गांवाला पूर्वीसारखा समृद्ध बनवूं शकेल."

हे ऐकून सहदेवाचा भाऊ रमानाथ पुढे येऊन म्हणाला, "योगीराज, माझ्या मोठ्या भावाने आमच्या गांवातल्या राममंदिरातल्या मूर्तीचा मुकुट चोरला होता. त्या कृत्यामागे त्याचा स्वार्थी हेतू होता. हे माहीत असूनही आपण त्याला योग्य व्यक्ती ठरवता आहात? आपला हा निर्णय सुसंगत व न्यायी आहे कां?"



देवनाथने रमानाथकडे रोखून बघत म्हटले, ''मला सारं कांही माहीत आहे. सहदेव ह्या दिव्य शक्ती वापरण्यासाठी योग्य व्यक्ती आहे.'' असं म्हणून देवनाथने सहदेवला जवळ बोलावले व आपल्या दिव्य शक्ती त्याला प्रदान केल्या.

वेताळाने ही गोष्ट सांगून पुढे विचारले, ''राजन्, दिव्य शक्ती देण्याच्या बाबतींत देवनाथ-कडून चूक झाली कां? आपल्या सख्ख्या भावाला सन्मार्गावर परत आणावा म्हणून त्याने देवाचा मुकुट घरी नेण्याचा प्रयत्न केला. हा स्वार्थ, वाईट साहस किंवा अपहरण नाही कां? ही काय उत्तम मनुष्याची लक्षणें आहेत कां? एक चांगले कार्य साधण्यासाठी वाईट मार्ग स्वीकारणे योग्य आहे कां? त्याला दिव्य शक्ती देण्यांत देवनाथने पक्षपात केला कीं नाही? माझ्या या शंकांची उत्तरे माहीत असूनदेखील जर तू गप्प राहिलास तर तुझ्या मस्तकाची अनेक शकले होतील.''

विक्रमार्कनि म्हटलं, ''सहदेवाचा भाऊ रमानाथ याचा बलराजने आपल्या स्वार्थासाठी उपयोग केला. रमानाथला परत चांगल्या मार्गावर आणायचे असेल तर तो व त्याचे मित्र यांचा दुष्टपणा नष्ट करायला हवा! आपल्या भावाला सुधारण्यासाठी, एका चांगल्या कामासाठी त्याने मुकुटाची चोरी केली नव्हती. त्याने आपल्या भावाच्या डोक्यावर मुकुट ठेवण्यासाठी त्या साधूच्या आज्ञेनुसार मंदिरातून तो मुकुट घेतला होता. तो बलराजच्या जाळ्यांत सांपडला. ही गोष्ट इतरांना समजली तर गांवाचे अकल्याण होईल ही त्याची श्रद्धा होती. स्वतः दोषी नसताना-देखील तो शिक्षा भोगायला तयार झाला. यांत त्याचा निस्वार्थीपणा व त्यागी भावना दिसून येते. चांगले-वाईट याचा निर्णय त्या काम करणाऱ्याचा हेतू काय आहे, त्यावर ठरतो. सहदेवाच्या दुर्भाग्याचा इथें प्रश्नच नाही. योगी देवनाथ यांना सारी खरी वस्तुस्थिती माहीत होती, म्हणून त्यांनी आपल्या शक्ती त्याला दिल्या. त्यांत कोणताही पक्षपात नाही. किंवा कोणतीही त्रुटी नाही.''

राजाचे मौन भंग करण्यांत सफल झालेला वेताळ शवासहित अदृश्य झाला आणि झाडावर जाऊन बसला.

*(आधार : ''वसुंधरा'' यांची रचना)*








# मुघल लघुचित्रें

लघुचित्रे काढण्याची कला मोंगल राज्यकर्त्यांनी भारतांत आणली.

शेरशहा सुरीच्या हातून पराभव पत्करल्या-नंतर हुमायून बादशहा पर्शियांत (हल्लींचा इराण) अज्ञातवासांत गेला. वर्षभरांतच तो हिंदुस्तानांत परत आला, तेव्हां त्याच्याबरोबर अबदुल समद आणि मुल्ला दोस्त महंमद हे दोघे पर्शियन चित्रकार आले होते. ह्यांनी शाहजादा अकबराला चित्रकला शिकवलीच, पण त्याशिवाय अनेक हिंदू व मुसलमान कलावंतांना या लघुचित्रांचे तंत्र ह्या दोघा चित्रकारांनी उत्तमप्रकारे शिकवले. त्यांच्या कलागुणांचा वापर अकबराने हमजा-नामा याचे पर्शियन भाषांतर करताना केला. त्यांतली चित्रे या दोघांनी काढलेली आहेत. त्या हस्तलिखितांत सुमारे हजार पृष्ठांवर चित्रे आहेत.

ते काम पूर्ण करायला पंधरा वर्षे लागली व त्याचे बारा खंड तयार झाले. त्यानंतर बाबरनामा व अकबरनामा हे ग्रंथदेखील लघुचित्रांनी सुशोभित केले गेले.

मोगल साम्राज्याच्या-ऱ्हासाबरोबर या कलेची लोकप्रियता कमी होत गेली. तरीदेखील, या शैलीचे तंत्र राजस्थानी व पहाडी चित्रशैलींमधून विकसित होत गेले.



# शिक्षेतून सुटका नव्हती

जेव्हां हेमचंद्र हेलापुरीचा राज्यकर्ता होता, तेव्हां देवाच्या मूर्तीपुढे नतमस्तक असलेला भक्त किंवा पूजेंत मग्न असलेल्या अर्चकाला कैद करायचे नाही असा दंडक राज्यांत प्राचीन शिलालेखावरुन रुढ होता. पूजा, प्रार्थना संपवून भाविक मंदिराबाहेर आला कीं सैनिक त्याला नंतर पकडून नेत असत.

या कायद्याची पळवाट शोधून गुन्हेगार शिक्षेतून वांचण्यासाठी निरनिराळे उपाय शोधून काढीत असत. सैनिक येत आहेत असं समजलं कीं अपराधी मंदिरात शिरत, आणि मूर्तीसमोर हात जोडून, डोळे मिटून बसून राहात. त्यांची प्रार्थना संपतच नसे. मग कधीकधी सैनिक कंटाळून निघून जात.

सैनिक निघून गेले कीं अपराधी बाहेर येत व चटकन निसटून जात. मग त्यांचा शोध घेणे हे जास्तच अवघड काम होऊन बसे. हेमचंद्र राजाकडे चंद्रहास हा सल्लागार नुकताच नोकरीवर रुजूं झाला होता.

त्याने या कायद्यांतली त्रुटी राजाच्या निदर्शनास आणली व म्हटले, "महाराज, देवाचे मंदिर हे परम पवित्र स्थळ असते. मानवाचे जीवन चढउतारांनी भरलेले असते, त्यामुळे त्याच्या मनांत पापाविषयी भिती व परमेश्वराविषयी श्रद्धा आवश्यक व उपयुक्त आहे. पण मूर्तीसमोर बसणाऱ्या अपराध्याला पकडू नये असा जो शिलालेख आहे, त्याचा फार दुरुपयोग केला जातो आहे. त्याच्याआड गुन्हेगार लपतो व सैनिकांना चुकवून पळून जाऊं शकतो. दिवसेंदिवस अपराध्यांची संख्या वाढत चाललीय. आपण या रुढीबद्दल खोल विचार करावा. न्यायाधिशांशी विचार विनिमय करावा, आणि योग्य तो निर्णय घ्यावा."

चंद्रहासचे बोलणे राजाने लक्षपूर्वक ऐकले, व त्यावर राजा म्हणाला, "हा शिलालेख आमच्या पूर्वजांनी अंमलात आणलेला असून ही रुढी अशी एकदम बदलणे योग्य होणार नाही."

चंद्रहास लगेच गप्प बसला खरा, पण त्याविषयी तो जास्त खोल विचार करुं लागला.

एके दिवशी सैनिक एका चोराचा पाठलाग करीत आले. सुगंधीपुरांतल्या एका स्त्रीच्या दागिन्यांची चोरी करुन तो चोर इकडे पळून आला होता.

पळतापळता मागोमाग सैनिकांना येताना पाहून तो एका झोंपडीकडे वळला. तिथे त्याला हळद व कुंकू माखलेला एक मोठासा दगड दिसला. झालं, त्या दगडापुढे उभा राहून चोराने हात जोडले व त्याची प्रार्थना सुरुं झाली.

त्याचा पाठलाग करणारे सैनिक थांबले व आपापसांत बोलूं लागले, "आता हा देवीच्या मूर्तीसमोर उभा आहे. आता कांही त्याला पकडता येणार नाही. आपण इथेच थांबून त्याची वाट पाहायला हवी."

चोराने डोळे मिटले होते आणि मूर्तीसमोर त्याने आसनमांडी घातली. तो प्रार्थनेत मग्न आहे असे वाटत होते. पण त्याचे हे ढोंग आहे हे सैनिकांना माहिती होते. थोड्या वेळानंतर सैनिकांनी त्याला वेढा घातला. आता आपण कांही सुटत नाही, हे चोराला कळून चुकले. त्याने आवाज चढवून विचारले, "दिसत नाही कां तुम्हाला? माझी पूजा चाललीय. देवासमोर मला अटक करताय?"

तो पुढे कांही बोलणार तेवढ्यांत तो गप्प झाला. कारण सैनिकांनी तो हळदीकुंकवाने माखलेला तो दगड तिथून उचलून बाहेर नेला. चोराला पकडण्यांत आले.

दुसऱ्या दिवशी न्यायाधिशाकडून राजाला ही हकीकत समजली. चंद्रहासच्या सल्ल्यानुसार त्यांतली उणीव राजाच्या लक्षांत आली. त्याने ताबडतोब त्या शिलालेखांतली "पूजेंत गर्क असणाऱ्यांना कैद करुं नये" ही आज्ञा रद्द केली.

तेव्हांपासून अपराध्यांची संख्याही कमी झाली, व गुन्हेगारांना शिक्षेतून सहज सुटका होणे बंद झाले.

सुषमा चतुर्वेदी



# खास बातम्या

## टूथपिकवर कोरीवकाम



दगड व धातूवर कोरीवकाम अनेकदा केलेले आढळते. बंगलोरच्या सी. मल्लिकार्जुन रेड्डी ह्यांनी प्रथम वर्गात वापरलेल्या खडूंवर कोरण्याचा प्रयत्न केला. त्यांनी एका खडूवर कोरीवकाम करुन तो नमुना गिनेस बुकांत नोंद व्हावी म्हणून पाठवला. पण तो नाकारण्यांत आला. तेव्हां मित्रांच्या सल्ल्यावरुन त्यांनी टूथपिकवर कोरीवकाम करायला सुरवात केली.

अलीकडेच, चोवीस वर्षाच्या रेड्डीने गिनेस बुकच्या प्रतिनिधीसमोर बोटभर लांबीच्या चिमुकल्या टूथपिकवर अठ्ठावीस जोडांची सांखळी कोरली. अमेरिकेतल्या बॉब शामी याने यापूर्वी १९९६ मधे १७ जोडांची सांखळी कोरल्याचा विक्रम नोंदवला होता. मल्लिकार्जुन हा बंगलोरचा बी एस्सी असून कोलार जिल्ह्यांतल्या टोपनहळ्ळी गांवचा निवासी आहे.

## कटु सत्य

हिंवाळ्यात शून्याखाली ५५ ते ६० अंश तपमान असलेल्या सियाचिन या भारताच्या सीमेवर सुमारे दोन हजार सैनिक पहारा करीत आहेत. या भयंकर थंडीपासून स्वतःचे रक्षण करण्यासाठी प्रत्येकाला दोन लाख रुपयांपेक्षा जास्त किंमतीचा गणवेष दिला जातो. त्यांतल्या कांही वस्तूंच्या किंमती अशा आहेत - ऑस्ट्रियाहून कॉर्फेक बूट (रु. ७२००/-), स्वित्झर्लंडहून पायमोजे (रु. ११००), इटलीहून हातमोजे (रु.२,१००), स्वित्झर्लंडहून लोकरी कोट (१८,०००), पाटलोणी (रु. ८,८००), फिनलंडहून सदरे (रु.३,४००/-) आणि कॅनडाहून टोप्या (रु.१०००)!





देशविदेशींच्या दंतकथा (इराण)

# घोडा खिंकाळला आणि राज्य जिंकले



पर्शिया (हल्लींचा इराण) हा देश तीन हजार वर्षांपूर्वीदेखील चांगला सुसंस्कृत होता. या समृद्ध देशाच्या गादीवर एका काळांत स्मेर्डिस हा पाताळयंत्री राजा राज्य करीत होता. त्याने ते राज्य हडप केले होते. लोक त्याच्या कारकीर्दीत सुखी नव्हते. श्रीमंतापासून गोरगरीबांपर्यंत सारेजण राजाच्या विरोधांत होते.

स्मेर्डिसने जरी प्रजेच्या कल्याणासाठी कांही विशेष केलं नाही, तरी स्वतःची सुरक्षा मात्र त्याने नीट ठेवलेली होती. त्याचे विश्वासू संरक्षक शिपाई सभोवती सतत असत. प्रत्येक खात्यांत त्याने गुप्तहेर पेरलेले होते. कुणी कांही राजाविरुद्ध बोललं कीं ते राजाला लगेच कळवलं जात होतं. त्या माणसाविरुद्ध लगेच कारवाई होऊन त्याचे तोंड कायमचेच बंद केले जात होते.

राजाविरुद्ध बोलायला मंत्री वा सरदार फार घाबरत असत. पण सहा तरुण सरदार मात्र गुप्तपणे एकत्र झाले आणि त्यांनी राजाविरुद्ध कट केला. त्यांचा डाव यशस्वी होईल अशी जेव्हां त्यांना खात्री वाटायला लागली, तेव्हां त्यांनी भावी कामकाजाची रूपरेखा आंखायला सुरवात केली. नवा राजा कोण होईल? त्या साहीजणांना आपण राजा व्हावे ही मनोमन इच्छा होती आणि प्रत्येकजण त्या गादीवर बसायला लायक होता. पण त्यांची मैत्री इतकी घट्ट होती कीं या बहुमानासाठी ते आपापसांत भांडत बसणारे नव्हते.

त्यांच्यापैकी एकजण म्हणाला, ''हे पहा, सिंहासनाची कांही सहाजणांत वांटणी करता येत नाही. एकच राजा होऊं शकतो. पण इतर पांचीजणांनी राजाचे सल्लागार व सन्मित्र असण्यांत कांही फरक पडणार नाही. पण सिंहासनावर कोण बसेल त्याची निवड एकदाच व्हावी. आपण ती कांहीतरी वेगळ्या पद्धतीने करायची.''

''कोणती वेगळी पद्धत?'' इतर मित्रांनी विचारले.

 Restore      

"तुम्हीच सुचवाना कांहीतरी नवी कल्पना?" पहिला म्हणाला.

साहीजणांनी बराच वेळ निमूटपणे विचार केला. मग एकाने आपली कल्पना सांगितली. "आता जर निवड एकदाच करायची ठरलंय, तर आपण असं करुं या. उद्यां सकाळच्या शांत वेळेला, आपण सहाजण तलावाजवळच्या प्रशस्त चराईच्या कुरणांत जाऊं या. ज्याचा घोडा प्रथम खिंकाळेल, तो विजयी होईल. तुम्हाला काय वाटतं?"

"वा, वा, फार छान, असंच करुं या." सर्वांनी अनुमोदन दिले.

पहाटे सहाजण ठरलेल्या जागी जमले आणि त्यांनी आपापल्या घोड्यावर टांग मारली. साहीजण आरामांत त्या कुरणांतून जाऊं लागले. ते तलावाजवळ पोंचले नाहीत तोच एका सरदाराचा, डरायसचा घोडा प्रथम खिंकाळला. साऱ्या मित्रांनी त्याचे अभिनंदन केले. भावी राजा कोण होणर ते फक्त त्या सहा मित्रांनाच ठाऊक होते. त्यानंतर लौकरच स्मेर्डिस पदच्युत झाला. डरायस बिनविरोध गादीवर बसला.

त्याचा घोडा प्रथम खिंकाळला होता, त्याचे रहस्य मात्र कुणाला कळले नाही. डरायसलादेखील ते बरेच दिवस ठाऊक नव्हते. पण काळाच्या ओघांत सत्य बाहेर आले. त्याचं काय झालं, हे सहा मित्र चर्चा करीत होते, ते संभाषण डरायसच्या सेवकाने ऐकलं. त्यादिवशी संध्याकाळीं, तो डरायसच्या घोड्याला तलावाच्या कांठावर घेऊन गेला. त्याने घोड्याला पोटभर खाऊं घातले. दुसऱ्या दिवशी जेव्हां घोडा त्याच जागी पोंचला, तेव्हां आदल्या दिवसाच्या पोटभर खाण्याची घोड्याला आठवण झाली, आणि तो खुषीने खिंकाळला.

त्यावरुन म्हण पडली, "घोडा राज्य जिंकतो.' पण त्यापेक्षां "सेवकाने मालकाला राज्य जिंकून दिलं." ही म्हण जास्त योग्य ठरली असती.



डरायसने त्या सेवकाला भरपूर इनाम दिलं की नाही ते माहीत नाही. पण पर्शियांत इ.स. पू. ५२७ मधे गादीवर आलेल्या डरायसने चांगली कामगिरी केल्याची इतिहासांत नोंद आहे. त्याने पर्सिपोलिस ही राजधानीची नगरी बसवली. त्याने शिलालेखांत कोरले आहे. "ईश्वराला या दुनियेत दंगल नको होती. लोकांसाठी इथे शांति, समृद्धी व सुराज्य असावे ही त्याची इच्छा होती."



THE ADVENTURES OF G-man

अँड्रोमेडिया

काळी सावली भाग 1

महाराष्ट्राची एक लोककथा

# राजकन्या व दगडी खांब

**फार** फार पूर्वी, रत्नागिरीचा राजा चांगल्याप्रकारे राज्य करीत होता. राज्यांत शांतता, सुबत्ता होती. त्याला तीन मुलगे होते आणि तिघेही राजपुत्र आता ऐटबाज तरुण दिसूं लागले होते. त्यांच्या-पैकी एकजण भावी राजा होऊन आपल्यानंतर गादीवर येईल हे राजाच्या लक्षांत आले. त्याने



तिघांना जवळ बोलावून म्हटले, "याच्यापुढे, तुम्ही आपल्या राज्यांत हिंडून लोक कसे राहातात ते नीट पाहिलं पाहिजे. उद्यां तुम्ही तिघे तीन दिशांना जा आणि संध्याकाळपर्यंत परत या. दिवसभरांत जे घडेल ते येऊन मला सांगा."

दुसऱ्या दिवशी तिघा राजपुत्रांनी शिदोरी घेतली आणि ते राजवाड्यांतून चालत बाहेर पडले. सर्वांत थोरला राजकिर्ती डावीकडे गेला. राजमूर्तीने उजव्या दिशेला जायचं ठरवलं. सर्वांत धाकट्या राजस्नेहीने समोरची वाट धरली. अंधार पडण्यापूर्वी तिघांनी राजवाड्यांत परत यायचे कबूल केले.

राजकिर्ती बराच वेळ चालत राहिला. त्याला एक अरण्य लागले. तिथें तळ्याच्या कांठावर तीन उमदे घोडे चरत होते. जवळच एका उंच वृक्षाच्या सावलीत एक योगी त्या घोड्यांकडे पाहात बसलेला होता.

राजकीर्तिने त्या योग्याजवळ जाऊन त्याला प्रणाम केला. योग्याने त्याला विचारले, "मुला, तू कोण आहेस? या अरण्यांत कां आला आहेस?"



राजकीर्तीने आपण कोण व इकडे कशासाठी आलो ते योग्याला सांगितले, "साधूमहाराज, तुमच्या परवानगीने मी यांतल्या एका घोड्यावर बसून हिंडायला जाऊं कां? म्हणजे मला अनेक भागांत हिंडून तिथल्या लोकांना भेटता येईल!"

"कोणताही घोडा घे, पण सूर्यास्तापूर्वी इथे परत येऊन तुला काय अनुभव आला ते मला सांगितलं पाहिजेस." योगी म्हणाला.

राजकीर्तीने एक घोड्यावर स्वार होऊन घोडा पिटाळला. भरधाव दौडत तो एका भाज्यांच्या मळ्यापाशी येऊन पोंचला. तिथे कुणीही माळी नव्हता आणि त्या बागेला चारी बाजूंनी बंदिस्त कुंपण होते. तो बघतच राहिला आणि बघता-बघता कुंपणाच्या वाशांचे कोयते बनले आणि ते भाज्यांची रोपे भराभरा कापूं लागले. राजकीर्तिला वाटलं कीं त्या रहस्यमय बागेत आपण प्रवेश करावा, पण त्याने ते धाडस केलं नाही.

तो अरण्यांकडे परत गेला, व पायउतार होऊन योग्याजवळ गेला, "होय मुला, तू गडबडलेला दिसतो आहेस. काय झालंय?"

राजकीर्तिने त्या रहस्यमय मळ्याबद्दल सांगितले. "त्यांतून तू काय अर्थ काढलास?" योग्याने विचारले. त्याच्या डोळ्यांत वेगळीच चमक दिसत होती.

"साधूमहाराज, मला माहीत नाही. ते सगळंच विचित्र होतं आणि त्याचा मला कांही अर्थच लागत नाही." राजपुत्राने प्रांजलपणे सांगितलं.



"जर तुला या साध्या गोष्टी समजल्या नाहीत तर तू राज्य कसं काम चालवणार? तुझ्या या मूर्खपणाबद्दल, मी आता तुझा एक दगड बनवतो."

राजा व दुसरे दोघे परत आलेले राजकुमार काळजीत पडले. रात्र झाली तरी राजकीर्ति परत आलेला नव्हता. दोन्ही मुलांचे अनुभव काय होते ते विचारण्याचे राजाच्या लक्षांतच राहिले नाही. दिवसभर हिंडल्यामुळे तेही दमले होते. दुसऱ्या दिवशी सकाळी यावर उपाय शोधायचा असे त्यांनी ठरवले.

राजमूर्तीने सकाळी डाव्या रस्त्याने जाऊन भावाचा शोध घ्यायचा असे ठरले. राजस्नेहीने उजवीकडचा रस्ता धरला. कारण आदल्या



दिवशी त्याने जी वाट पकडली, त्या बाजूला डोंगर होते व फारशी वस्ती नव्हती.

राजमूर्ती भावासारखाच त्या अरण्यांतल्या योग्याजवळ आला. ते तीन देखणे घोडे तिथे चरत होते.

राजमूर्तीने योग्याला वंदन केले आणि एका घोड्यावर बसून जायची परवानगी मागितली. "मुनीवर्य, आजपर्यंत मी इतके देखणे घोडे कुठेही बघितलेले नाहीत."

"अवश्य घेऊन जा राजकुमार, पण सूर्यास्ता-पूर्वी इथे परत ये आणि तुझ्या अनुभवांबद्दल मला सांग." हंसतच योगी म्हणाला.

राजमूर्ती उत्साहाने एका घोड्यावर स्वार झाला. पण त्या आनंदात त्याला तिथला दगडी खांब दिसला नाही. त्या खांबाचा वरचा भाग अगदी राजकीर्तिच्या चेहऱ्यासारखा दिसत होता.

राजमूर्ती डावीउजवीकडे बघत चालला होता. कुठेतरी राजकीर्ति दिसेल असं त्याला वाटत होतं. पण त्याला कांही भाऊ भेटला नाही.

मात्र वाटेंत त्याला एक म्हातारा दिसला. त्याच्या पाठीवर लांकडाची खूपच मोठी मोळी होती. राजमूर्तीने घोड्याचा लगाम खेचला व म्हटले, "आजोबा, मी तुम्हाला मदत करुं कां?"

त्या म्हाताऱ्याने वर बघितले नाही कीं कांही उत्तर दिले नाही. तो आणखी लांकडे गोळा करीत राहिला.

राजमूर्तीला हे जरा विचित्र वाटले. तो परत फिरला, आणि योग्याकडे जाऊन त्याने पुन्हां प्रणाम केला. योग्याने विचारले, "सांग मला, काय पाहिलेस तूं?"

राजमूर्तीने म्हाताऱ्याबद्दल सांगितले, "त्याने तुझी मदत कां घेतली नाही?" योग्याने विचारले.

"मला नाही हो माहीत. तो एक शब्दही बोलायला तयार नव्हता." राजमूर्ती म्हणाला.

"अरे राजकुमार, तुला या साध्या गोष्टी जर कळल्या नाहीत, तर संधी मिळाली तर तू राज्यकारभार कसा काय करणार? तू मूर्ख आहेस आणि गादीवर यायला अयोग्य आहेस. मी तुला एका दगडाचेच रूप देतो!"

जेव्हां राजमूर्ती परतला नाही, तेव्हां राजस्नेही फारच अस्वस्थ झाला आणि राजाही काळजीत



पडला. राजस्नेहीने त्याला दिलासा दिला आणि दुसऱ्या दिवशी दोन्ही भावांच्या शोधार्थ जाण्याचे ठरवले.

सकाळ झाल्यावर राजस्नेहीने डावी वाट धरली आणि अरण्यापर्यंत तो चालत पोंचला. ते घोडे आणि त्यांना निरखणारा योगी पाहून तोही मोहित झाला. अकस्मात, त्याचे लक्ष त्या दोन दगडी खांबांकडे गेले. त्याला त्याच्या भावांचे चेहरे त्या खांबांवर असावेत असे वाटले. तो चक्रावला.

राजस्नेहीने योग्याला नम्रपणे विचारले, "मुनीवर, माझे भाऊ या वाटेने आले होते कां?"

"हो, आले होते राजकुमार! त्यांना घोड्या-वरुन रपेट करायची इच्छा झाली. पण जेव्हां ते परत आले, तेव्हां माझ्या प्रश्नांची उत्तरे त्यांना नीट देता आली नाहीत म्हणून मी त्यांचे हे दगडी खांब केले!"

"त्यांना पुन्हां जिवंत करता येईल कां?" राजस्नेहीने काकुळतीने विचारले.

"एक घोडा घे आणि तुला जर कांही विचित्र दिसले तर मला परत येऊन सांग. जर तू माझ्या प्रश्नाचे समाधानकारक उत्तर दिलेस तर तुम्ही तिघे भाऊ या तिन्ही घोड्यांवर स्वार होऊन परत घरी जाल."

राजपुत्राने विचार केला आणि आपले नशीब आजमावयाचे ठरवले. दोघा भावांचा जीव त्याला वांचवायचा होता. तो एका घोड्यावर बसला आणि योग्याने सांगितल्याप्रमाणे पुढे गेला.

त्याला कांहीही विचित्र किंवा विसंगत आढळले नाही.

त्याला खूप तहान लागली होती आणि घोडाही जरा थकला होता. त्याला जवळच एक तळे दिसले. तिथे गेल्यावर तो खाली उतरला. घोडाही कुरणांत चरुं लागला. राजस्नेही तळ्याच्या कांठावर गेला.

तो ओंजळीने पाणी प्यायला घेणार, तोच ते पाणी मागे जाऊं लागले. तो पुढे गेला आणि पाण्यांत शिरला. पण तो वांकण्यापूर्वीच पाणी भराभर मागे गेले आणि राजपुत्र एका कोरड्या जमिनीवर उभा असल्याचे त्याच्या ध्यानांत आले.

हे तर फारच विचित्र होते! योग्याला जाऊन





हे सांगायलाच हवे होते. त्याचा अनुभव ऐकून योग्याने विचारले, ''मग तुझा काय त्यावर निष्कर्ष निघाला?''

राजपुत्राला कांही उत्तर देता येईना. ''तूही तुझ्या भावांसारखाच अडाणी दिसतोस. तुझीही तीच गती होणार आहे, दुसरं काय?'' दुसऱ्याच क्षणी, राजपुत्राचा दगडी खांब झाला.

राजस्नेही परत आला नाही त्यामुळे राजवाड्यांत एकच हलकल्लोळ माजला. आपल्यामुळे तिघेही राजकुमार बेपत्ता झाले आहेत हे पाहून राजा फारच दुःखीकष्टी झाला.

त्यांचे काय झाले ते कुणालाच कळत नव्हते. त्यांचा शोध घ्यायला सैनिक पाठवावेत असा मंत्र्याने सल्ला दिला. पण राजाने मुलांचा शोध घ्यायला स्वतःच जायचे ठरवले. राजानेही तीच वाट धरली व तो योग्यापाशी जाऊन पोंचला. त्याला ते तीन घोडे व त्यांना पाहात बसलेला योगी दिसला.

राजाला वाटलं कीं योग्याकडून कांहीतरी माहिती मिळेल. त्याने विचारले, ''पूज्य गुरुवर्य, राज्याचा फेरफटका करण्यासाठी माझे तिघे राजकुमार या बाजूला हिंडत आलेले होते....

योग्याने त्याचे बोलणे संपण्यापूर्वीच विचारले, ''होय, ते आले होते. मी त्यांना साधे प्रश्न विचारले पण त्यांना त्याची उत्तरे देता आली नाहीत. मला ते अडाणी आणि राज्य चालवायला नालायक वाटले. म्हणून मी त्यांचे तीन दगडी खांबात रुपांतर केले! ते तुम्हाला समोर दिसताहेत बघा!''

त्या खांबांचा बराच भाग तिन्ही मुलांच्या चेहेरेपट्टीसारखा होता. ते पाहून राजा चकितच झाला. ''स्वामी, आपण कोणते प्रश्न त्यांना विचारले होतेत? त्यांच्याऐवजी मी त्या प्रश्नांची उत्तरे देऊं कां?''

योग्याने राजकीर्तिचा अनुभव सांगितला. ''राजपुत्राला एक भाजीचा मोठा मळा दिसला. राखणदार कुणीही नव्हता. एकाएकी कुंपणाच्या वाशांचे कोयते बनले आणि ते सपासप भाज्या तोडूं लागले. याचा काय अर्थ होतो?''

''भाज्यांचे व झाडांचे रक्षण करण्यासाठी



कुंपण असते. जे कुंपण भाज्या तोडायला लागले, ते मालकाच्या संपत्तीचे नुकसान करणाऱ्या एखाद्या वाईट नोकरासारखे असते.'' राजाने आपले मत सांगितले.

योगी हंसला आणि त्याने राजमूर्तीचा अनुभव कथन केला. ''तो म्हातारा, पाठीवरचे ओझे किती मोठे आहे त्याची फिकीर न करता लांकडे गोळा करीत होता आणि भार वाढवीत होता. त्याचा तुम्ही काय अर्थ लावाल, राजन्?''

राजाने उत्तर दिले, ''त्या माणसाकडे जे होते त्यांत त्याला समाधान नव्हते. त्याला हांव होती पण त्याचे परिणाम काय होतील त्याची चिंता नव्हती.''

योगी प्रसन्नपणे हंसला. ''तुमच्या धाकट्या मुलाला घोटभर पाणी प्यायला हवे होते पण ते तळे त्याला चकवा देत होते. त्याचा काय अर्थ होतो राजन्?''

''खर्चिक, उधळ्या माणूस अनावश्यक गोष्टींवर आपले पैसे खर्च करतो आणि शेवटी त्याच्या हातांत कांहीच उरत नाही.'' राजा म्हणाला. त्याला हंसण्याचा आवाज ऐकूं आला. त्याने वळून पाहिले तर तिघे राजपुत्र त्याच्याजवळ उभे होते आणि ते दगडी खांब नाहीसे झाले होते.

''पूज्य स्वामीमहाराज!'' असं म्हणून राजाने योग्याला साष्टांग नमस्कार घातला.

''माझ्या तिन्ही मुलांना आपण जीवदान दिलेत म्हणून मी आपला जन्मभर ऋणी राहीन. आज मी त्यांना वाड्यावर परत घेऊन जातो. जर आपण त्यांना चांगला राजा कसा असावा याचे शिक्षण दिलेत तर मोठेच उपकार होतील. आपण आमच्याबरोबर यावे ही विनंती आहे.'' राजाने सांगितले.

योगीमहाराजांनी ही विनंती मान्य केली आणि तिघा राजपुत्रांना ते तीन घोडे नेण्याची आज्ञा दिली.

कांही दिवसानंतर राजाने योग्याला सन्मानपूर्वक राजवाड्यांत नेले व राजगुरु म्हणून त्यांची प्रतिष्ठापना केली.





# दासीपुत्र

ब्रह्मदत्त काशीच्या राज्यावर राज्य करीत असताना बोधिसत्वांनी एका श्रीमंत घरी अवतार घेतला. लग्नाचे वय झाल्यावर त्यांचे लग्न झाले. कांही काळ लोटल्यावर त्यांना एक मुलगा झाला. त्याच दिवशी त्या घरांतल्या दासीलासुद्धां एक मुलगा झाला. त्याचे नाव कटाहक असे ठेवण्यात आले.

श्रीमंताचा मुलगा व दासीपुत्र कटाहक दोघांची वाढ हळूंहळूं होत गेली. श्रीमंताचा मुलगा विद्याभ्यासासाठी जाई, तेव्हां कटाहक त्याची पाटी व पुस्तके वगैरे घेऊन जाई. ओघाओघाने श्रीमंताचा मुलगा जे शिकत गेला, तसाच कटाहक सुद्धा अनायासे शिकत गेला.

हळूहळू कटाहकला सुशिक्षित व हुशार म्हणून प्रसिद्धी मिळू लागली. त्याला एखाद्या नोकरासारखे राहणे बरे वाटेनासे झाले. आपण आपल्या विद्वत्तेला अनुरूप असे समाजांत स्थान प्राप्त केले पाहिजे. म्हणून त्याने एक उपाय करण्याचे आपल्या मनाशी ठरविले.

काशीपासून काही कोस अंतरावर प्रत्यंत नांवाच्या देशात बोधिसत्वाचा एक लक्षाधीश मित्र रहात होता. त्याच्या नावे कटाहकने एक पत्र लिहून खाली बोधिसत्वांची सही केली. पत्रातील मजूकर असा होता,

"मी आपल्या मुलाला आपल्याकडे पाठवीत आहे. आपण परस्परांशी नाते जमवून ध्यावे असे मला वाटते. म्हणून आपण माझ्या मुलाशी मुलीचे लग्न करुन देऊन माझ्या मुलाला स्वतःकडेच ठेवून ध्यावे. मी फुरसत काढून आपणास भेटायला येईन."

असे पत्र लिहून कटाहकने मालकाची सही केली व खाली त्याची मोहोरसुद्धां लावली. नंतर मालकाच्या तिजोरीतून त्याला हवे होते तेवढे पैसे काढून घेतले, आणि प्रत्यंत देशी तो निघून गेला. तेथे त्या लक्षाधीश मित्राला भेटून ते त्याने पत्र दिले.

लक्षाधीश मित्राने पत्र वाचले व त्याला आनंद झाला. त्याने एका चांगल्या मुहूर्तावर आनंदाने कटाहकबरोबर आपल्या मुलीचे लग्न करुन दिले.

तेव्हापासून कटाहकच्या सेवेला अनेक नोकर-चाकर हजर राहू लागले. त्याला जेवायला दररोज पंचपक्वान्ने येऊ लागली. तो ऐषआरामात बुडून गेला. तरी तो दररोज चिडून म्हणू लागला, "काय पण हा प्रत्यंत देश आहे, येथील लोकांना सभ्यता म्हणजे काय असते, हे सुद्धां कळतच नाहीसे दिसतं आहे. हे काय जेवण झालं? आणि ही काय वस्त्रें झाली? असला रांगडेपणा व रानटीपणा कधी पूर्वी पाहिला नव्हता."

कटाहक बरेच दिवस न दिसल्यावर बोधिसत्वांना त्याची काळजी वाटू लागली तो कुठे गेला ते कुणालाच माहीत नव्हते. म्हणून त्याच्या शोधार्थ बोधिसत्वांनी चारी दिशांना नोकर पाठविले. त्यांपैकी एकाने प्रत्यंत देशात जाऊन ह्या गोष्टीचा शोध लावला की कटाहकने आपले नांव बदलून एका लक्षाधिशाच्या मुलीशी लग्न करुन घेतले आहे, आणि तो स्वतःला काशीच्या कोठल्या तरी श्रीमंताचा मुलगा असल्याचे सांगत होता.

ते ऐकून बोधिसत्वांना फार वाईट वाटले. ते स्वतः कटाहकला घेऊन येण्यासाठी प्रत्यंत देशाकडे निघाले. बोधिसत्व स्वतः येणार हे कळल्यावर कटाहकची घाबरगुंडीच उडाली. प्रथम त्याने पळून जाण्याचे ठरविले. असे केल्याने आपलेच नुकसान होईल व कोणत्याही प्रकारचा फायदा होणार नाही. असा विचार करुन त्याने आपल्या मालकाला खरी गोष्ट सांगून टाकण्याचे ठरविले.

आपल्या मालकाकडून लक्षाधीशाला सर्व कळण्यापूर्वीच त्यांना स्वतःच सर्व सांगून मोकळे व्हावे व त्यांची माफी मागावी असेही त्याने ठरविले.

परंतु आपल्या मालकाबरोबर नोकरासारखे वागताना पाहून सर्व आपल्याविषयी नाही त्या शंका करुं लागतील, असा विचार करुन तो स्वतःच आपल्या नोकरांना म्हणाला, "मी इतर लोकांच्या मुलांसारखा नाही. मी आपल्या वडिलांना देवा-सारखे मानतो. माझे वडील जेवायला बसले म्हणजे मी त्यांना पंख्याने वारा घालतो. त्यांना पाणी वगैरे काही लागल्यास स्वतः आणून देतो." या शब्दांत त्याने स्वतः वा नोकरामार्फत काम कसे केले जाते, हे सांगितले.



त्यानंतर कटाहक आपल्या सासऱ्याला जाऊन म्हणाला, "माझे वडील येत आहेत. मी त्यांना आणायला थोडा पुढे जातो आणि घेऊन येतो."

लक्षाधीश सासऱ्याने होकार दिला.

कटाहक बोधिसत्वांना नगराबाहेरच भेटला, त्यांचे पाय धरुन आपल्या कृतकर्माबद्दल त्याने पश्चात्ताप व्यक्त केला आणि क्षमा मागून या संकटातून वाचविण्याची विनंती केली. बोधि-सत्वांनी त्याला अभयदान दिले. त्यानंतर कटाहक बोधिसत्वांबरोबर आपल्या सासऱ्याच्या घरी निघून गेला.

लक्षाधीश मित्र बोधिसत्वांना भेटला. त्याला मित्र घरी आल्याबद्दल परमानंद झाला. म्हणाला, "तुमच्या इच्छेप्रमाणे माझ्या मुलीचे लग्न आपल्या चिरंजीवांशी करुन दिले."

बोधिसत्वांनी मनाचे समाधान झाल्यासारखा अभिनय केला आणि कटाहक जवळ स्वतःच्या मुलाशी बोलतात तसेच बोलले. त्यानंतर त्यांनी लक्षाधीशाच्या मुलीला बोलावून विचारले, "मुली, माझा मुलगा तुझ्याशी योग्य प्रकारे वागतो की नाही?"

ती म्हणाली, "त्यांच्यात तशी कोणत्याही तऱ्हेची उणीव नाही. परंतु त्यांना उत्तमोत्तम पदार्थही रुचकर वाटत नाहीत. पंचपक्वान्ने वाढली तरी त्यांत कांही तरी दोष काढतातच. यांना कोणकोणत्या प्रकारचे आणि कशा प्रकारचे पदार्थ आवडतील हेच मला कळत नाही."

"होय, तो असाच आपल्या घरीसुद्धां खाण्यापिण्याच्या पदार्थात एक न एक दोष काढून घरांतील लोकांना त्रास देत असे. म्हणून खायला बसताना तो त्यांत कांही दोष दाखवू लागला की तू मी सांगतो तो श्लोक म्हणत जा. मी तो श्लोक तुला लिहून देतो. तू तो पाठ करुन ठेव. तू तो म्हण, म्हणजे तो दोष काढण्याचे सोडून देईल, तू जे वाढशील ते आनंदाने खाईल." असे सांगून बोधिसत्वांनी तो श्लोक लिहून दिला.

त्यानंतर बोधिसत्व काशीला परतले. ते निघून गेल्यावर कटाहक जास्तच शेफारला. तो जास्तच तक्रारी करू लागला. तो प्रत्येक खाद्यपदार्थात कांहीना कांही दोष काढू लागला.

एके दिवशी त्याच्या तोंडून तक्रार ऐकताच त्याच्या बायकोने हा श्लोक म्हटला-

"बहूंपि सो विकत्थेय्य अंडम् जनपदं गतो,
अन्वागंत्वान दूसेय्य भुंज भोगे कटाहक!

(कटाहक अनेक प्रकारे शिव्याशाप खाऊन, परस्थानी दुसऱ्याची निंदा करीत, सर्व प्रकारे सुखोपभोग ग्रहण करीत आहे.)

कटाहकाच्या बायकोला या श्लोकाचा अर्थ माहीत नव्हता. परंतु कटाहकला मात्र वाटले की त्याच्या मालकाने आपले नांव आपल्या बायकोला सांगून सर्व रहस्यस्फोट केला आहे.

त्यानंतर पुन्हां कधी जेवतांना कोणत्याही पक्वान्नाला त्याने नांवे ठेवली नाहीत, उलट आनंदाने सर्व खाऊं लागला आणि सुखसमाधानाने राहू लागला.







# विष्णुपुराण

मुनींनें सूत महर्षींना विचारले, "मुनीवर्य! आम्ही असे ऐकले आहे की, विष्णूने आपले आणखी एक रूप कृष्णरुपाने स्वर्गातून पाठविले होते. त्या कृष्णाचा पूर्ण वृत्तान्त आम्ही ऐकू इच्छितो."

त्यावर सूत महर्षींनी कथा सांगण्यास आरंभ केला. सत्यलोकाच्या वर स्वर्ग आहे. अनेक नक्षत्रे व तारे यांच्यासह तो नेहमी दैदिप्यमान-असतो. एकदा कृष्ण दिव्य नदी वीरजा हिच्या किनाऱ्यावर तुलसीवनात आपल्या मुरलीवर दिव्य असे वेणुगान वाजवीत होते. त्या मुरलीतून निघणाऱ्या ध्वनीने राधारूपी आकार धारण केला.

राधा व कृष्ण या कधीही वेगळे न होणाऱ्या जोडीने ते विहार तिथे करीत होते. सुदामा सदासर्वदा त्यांची सेवा करीत होते.

राधा देवीच्या शरिरातून असंख्य अशा गोपिका निर्माण झाल्या. वीरजा नदी सुद्धा बृन्दादेवीचे रूप धारण करून कृष्णावर भक्तिप्रेम करू लागली.

एकदा राधा व कृष्ण एकांतात असतांना वीरजा कृष्णाला शोधत तिथे आली. तेव्हां राधाने तिला शाप देत म्हटले, "पृथ्वीवर तू जन्म घेशील." तेव्हां सुदामाने राधाला असे करणे व त्या शापाने काय वाईट घडेल व होईल ते सांगितले.

त्यावर सुदामावर राग काढीत राधाने त्याला शाप देत म्हटले, "तू राक्षस अवतार धारण करून पृथ्वीवर जन्म घेशील." राधाच्या शापाने वीरजा एक राजकुमारी तुलसी अथवा वृन्दा या नांवाने जन्मली व सुदामा शंखचूडाच्या अवताराने. एकदा इंद्र कैलासावर गेले असताना तेथे दारावर रुद्रभटाने अडवले. द्वारपालाच्या रूपांत असलेल्या शंकराला न ओळखून इंद्राने आपल्या वज्रायुधाचा



प्रयोग त्याच्यावर करण्याचे मनांत आणले. तेव्हां शंकराने आपले रूप साकार करून तिसरा डोळा उघडला.

इंद्राने त्याच्या पायावर लोटांगण घालून त्याला आपले रक्षण करण्याकरिता विनविले. शंकराने आपल्या क्रोधाला आवर घालून आपला राग समुद्रांत टाकून दिला. तेव्हांच देवाचा शाप मिळालेला सुदामा अग्निक्षेत्रांतून समुद्रांत पडून एक पांढरा शंख डोक्यावर धारण करुन लहान बालकाच्या रूपे जन्मला. कृष्ण व सुदाम दोघे एकच रूप होती. त्याच्यावर आपला अनुग्रह करीत कृष्णाने सुदामाला अजेय कृष्णकवच दान केले.

त्याच वेळेस दंभ नांवाचा राक्षस समुद्र-किनारी पुत्रप्राप्तीकरिता घोर तपस्या करीत होता. त्याच राक्षस राजाने समुद्राच्या पाण्यात तरंगत असलेल्या त्या मुलाला उचलले. तोच पुढे जलंधर आणि शंखचूडाच्या नांवाने प्रसिद्ध पावला.

ब्रह्मदेवाकडून वर मिळाल्यानंतर शंखचूड त्याच्या आज्ञेप्रमाणे बदरिकाश्रमात आला. तेथे त्याने तपश्चर्या करीत असलेल्या तुलसीला पाहिले. तिला पाहून तिच्या सौंदर्यावर तो भाळला व तिच्याजवळ जाऊन त्याने तिला विचारले, "हे सुंदरी! तू कोण? कोणाची मुलगी? आणि तू या रानावनांत एकटी कशी?"

तुलसी देखील शंखचूडाच्या रूप लावण्यावर मोहित होऊन त्याच्याकडे कौतुकाने पाहू लागली. थोड्या वेळाने ती म्हणाली, "मी धर्मध्वज नांवाच्या राजाची कन्या. माझे नांव तुलसी. एका थोर शूर पुरुषाशी विवाह व्हावा म्हणून मी तपश्चर्या करीत आहे. पण आपण कोण?"

"मी दंभ नामक दानव राजाचा मुलगा आहे. माझे नांव शंखचूड. मी ब्रह्मदेवाचे स्मरण करून तपश्चर्या केली आणि त्रिलोक जिंकण्याचा वर मिळविला. ब्रह्मदेवाने मला तुझ्याशी विवाह करून घेण्यास आज्ञा केली आहे. आपण दोघे लग्न करुन घेऊन पुढील आयुष्य सुखाने घालवू."

त्यानंतर दोघांनी गांधर्व विवाह करून घेतला. आणि दऱ्याखोऱ्यांत रानावनांत ते विहार करू लागले. शंखचूड तुलसीला घेऊन आपल्या घरी गेला. नंतर दंभ राक्षसाने शुक्राचार्यांच्या सल्ल्याने स्वतःला राज्याभिषेक केला.

एकदा सर्व दानववीर व थोर मंडळी शुक्राचार्यांना पुढे घालून शंखचूडाकडे आली व म्हणाली, "हे दानवराज! तुला ब्रह्मदेवाने अनेक वर दिले आहेत. तुझ्या पूर्वजांवर इंद्राने व देवांनी अनेक अत्याचार केले आहेत. त्याचे ऋण



फेडण्याची जबाबदारी तुझी आहे. तू स्वर्गावर स्वारी कर व इंद्राचे आसन हस्तगत करून घे."

नंतर शंखचूडाने स्वर्गावर स्वारी केली. इंद्राला हेरांकरवी शंखचूड स्वारी करण्यास येत असल्याचे वृत्त कळले. म्हणून इंद्राने कुमारस्वामी व इतर देवांच्या सल्ल्याने युद्धाची तयारी केली.

देवदानव यांच्यात खूप मोठी लढाई झाली. आपला पराभव होणार हे ओळखून इंद्र शंख-चूडाकडे जाऊन म्हणाला, "तू कश्यपमुनींच्या रूपाने जन्मला आहेत. मी तुझ्या शौर्य पराक्रमावर संतुष्ट झालो आहे. तूच त्रिलोकावर राज्य कर. आम्ही तुला मदत करू.

तेव्हां शंखचूड म्हणाला, "इंद्रा! आजपासून माझ्या आज्ञेप्रमाणे स्वर्गाचा राज्यकारभार तूच पहात जा." नंतर तो शोणितपुर येथे परत आला व त्रिलोकावर आपली सत्ता गाजवू लागला.

दानव लोक शंखचूडाच्या आज्ञेने यज्ञकार्यात विघ्ने आणून हाहाःकार करू लागले. तेव्हां ऋषीमुनी विष्णूकडे गेले व विनंती केली - "भगवन! शंखचूड राक्षसाच्या अत्याचारामुळे पृथ्वीवर हाहाःकार उडाला आहे. त्याचे पारिपत्य करण्यास तूच एक समर्थ आहेस."

विष्णू म्हणाला, "शंखचूडाचा जन्म माझ्या अंशरूपाने झालेला आहे. तुलसीचा जन्म लक्ष्मीच्या अंश रूपाने झालेला आहे. म्हणून शंखचूडाचा वध करणे मला शक्य नाही. तुम्ही शंकराला शरण जावे."

विष्णूच्या सल्ल्याने ऋषी शंकराच्या दर्शनासाठी कैलास लोकी गेले आणि हात जोडून त्यांनी शंकराला विनंती केली - "देवाधिदेवा,



महादेवा! शंखचूडाच्या अत्याचारापासून तूच आमचे रक्षण कर." शंकराने त्यांना पारिपत्य करण्याचे वचन देऊन त्यांना निरोप दिला.

ते कळल्यावर कळीचा नारद शंखचूडाकडे गेला व म्हणाला, "शंखचूडा! शंकराने तुझा वध करण्याचे वचन ऋषीमुनींना दिले आहे. रुद्रगण तुझ्यावर स्वारीला येतील. त्यापूर्वी तू कैलासावर स्वारी करून शंकराचा पराभव कां करीत नाहीस?"

शंखचूडाने नारदाच्या सल्ल्याने कैलासावर स्वारी केली. कित्येक दिवस युद्ध चालू होते. परंतु शंखचूडाचे सैन्य कमीच होत नव्हते. असे कां?

तेव्हां विष्णू म्हणाला, "शंखचूड राक्षसाची पतिव्रता पत्नी पातिव्रत्याच्या बळावर त्याचे रक्षण करीत आहे. मी तिचे पातिव्रत्य भंग करून तुझा मार्ग मोकळा करतो. तू त्याचा वध कर."

त्यानंतर विष्णू शंखचूडाचे रूप धारण करून



त्याच्या घरी गेला. आणि तुलसीला म्हणाला, "मी शंकराशी युद्ध करीत आहे. आजपर्यंत कोणालाच जयलाभ झाला नाही. तुला सोडून कित्येक दिवस लोटले म्हणून तुझ्याकडे आलो आहे. "तुलसीने विष्णूला ओळखले नाही. आणि पती समजून कित्येक दिवस त्याच्या सहवासात राहिली. अशा तऱ्हेने तिचे पातिव्रत्य भंग झाले.

तिकडे शंखचूडच्या सैन्याचा संहार व शेवटी शंकराने शंखचूडाचा वध केला.

त्याच दिवशी रात्री विष्णूला आपल्या बरोबर एकाच शय्येवर झोपलेला असतांना तुलसीने ओळखले. शंखचूडाचा वध झाला होता व विष्णूचे मायावी रूप उघडे पडले होते. त्याने उघड उघड तिची फसवणूक केली होती, म्हणून तिने विष्णूला "दगड हो" असा शाप दिला.

"तू गंडकी नदी होऊन व मी शाळीग्राम होऊन शाश्वत राहू. तुझ्या नावाने एक पतिव्रता नारी म्हणून तुळशीच्या झाडाची पूजा होत राहील." असा आशिर्वाद देऊन विष्णूने तुलसीला घेऊन वैकुंठलोकी प्रस्थान केले.

एकदा सर्व ऋषींच्या मधे वादविवाद होऊं लागला की त्रिमूर्तिमध्यें श्रेष्ठ कोण? ह्याचा न्याय निवाडा करण्याकरिता सर्व ऋषींमुनींनी भृगु-महर्षींना पाठवले. भृगुंनी सर्वांत प्रथम सत्यलोकात पदार्पण केले. तिथे ब्रम्हा सरस्वतीदेवीबरोबर वीणावादन ऐकण्यात मग्न झाले होते. नंतर ते कैलासावर गेले. तिथे शिव पार्वती बरोबर नृत्य करण्यात दंग होते. त्यामुळे भृगुंना राग आला.

त्यांचा दोन्ही ठिकाणी अपमान झाला, त्यामुळे त्यांना राग आला. त्यांच्या पायाच्या तळव्यात एक डोळा असल्यामुळे ते नेहमी अहंकाराने रहात. ते त्याच रागात वैकुंठात गेले. त्यावेळेस श्रीविष्णु लक्ष्मीदेवी बरोबर शेषशय्यावर बसलेले होते. ते पाहून भृगुंना अत्यंत राग आला व त्याच रागाच्या आवेशाने त्यांनी त्यांच्या छातीवर लाथ मारली.

तेव्हां विष्णूंनी पटकन् उभे रहात म्हटले, "मुनिवर्य, आपल्या कोमल पायांना माझ्या कठीण अशा छातीचा आघात बसून आपला पाय तर दुखावला नाही ना?" आणि त्यांनी त्यांचा पाय हातात घेऊन दाबण्याचे ढोंग केले, व दाबता दाबता. पायांत असलेला डोळा हाताने दाबून टाकला व तत्क्षणी त्यांचा अहंकार निघून गेला. तशा प्रकारे भृगुंनी विष्णुची स्तुती करीत पृथ्वीलोकांत येऊन विष्णुचे गुणगान व महत्व मुनींना सांगितले.



लक्ष्मीदेवी विष्णुच्या हृदयांत बसली असताना भृगुनी विष्णुच्या छातीवर लाथ मारल्याने तिचा अपमान झाला. तिला वाटले की मुनींच्या पायाच्या स्पर्शाने विष्णु अपवित्र झाला. अशा विचाराने तिनें वैकुंठ सोडले व पृथ्वीलोकांत येऊन ती तिथे तपश्चर्या करू लागली.

तेव्हां विष्णू मानव रूप धारण करून, लक्ष्मीच्या शोधार्थ पृथ्वीवर येऊन राहू लागला. श्रीनिवास हे नांव धारण करून तो वकुला देवीच्या आश्रमात आला. वकुला देवी कृष्णअवतारात यशोदा होती.

कृष्णावताराच्या वेळी यशोदा मातेने कृष्णाला म्हटले, "कृष्णा, तुला माहीत नाही की, आई आपल्या मुलाचा विवाह कशा तऱ्हेने व्हावा, ह्याची इच्छा करते. ती माझी इच्छा पुरी झाली नाही." कृष्ण म्हणाला, "आई, तुला ह्या इच्छेचे फळ पुढच्या जन्मी नक्की मिळेल."

म्हणून ह्या जन्मांत वकुला देवींनी श्रीनिवासला आपला मुलगा मानले. एकदा ते बागेत फिरत असतांना आकाश राजाची मुलगी पद्मावती आपल्या सखींच्याबरोबर हिंडत असताना त्यांनी पाहिली.

तेवढ्यांत एक मदमस्त हत्ती जोरजोरात पळत त्या बाजूला आला. पद्मावती व तिच्या सख्या घाबरून इकडे तिकडे पळू लागल्या. पद्मावतीसुद्धा घाबरून श्रीनिवास उभे होते तेथे येऊन बेशुद्ध पडली.

श्रीनिवासांनी हत्तीला अडवले व दोघांच्या मधे येऊन ते उभे राहीले. तो मदमस्त हत्ती क्षणार्धात शांत झाला व त्यांना प्रणाम करू



लागला. त्यानंतर त्यांनी पद्मावतीला हात देऊन उठविले.

पद्मावतीला श्रीनिवासावर लोभ उत्पन्न झाला. पूर्वजन्मी विष्णू आपला पती व्हावा म्हणून पद्मावती तपश्चर्या करीत होती. आकाशराजाला तिने तसे सांगितले.

पद्मावती व श्रीनिवास ह्यांचा विवाह थाटामाटाने झाला. विवाह खर्चाला कुबेराने धन, सोने, रत्नेमाणके दिली. लग्नानंतर श्रीनिवास पद्मावतीला घेऊन गेले.

तपश्चर्या करीत असलेल्या लक्ष्मीदेवीला नारदाने श्रीनिवासाने पद्मावतीशी विवाह केल्याचा समाचार सांगितला. ह्या रागाने लक्ष्मी तिथून निघून आली.

तिला येत असलेले पहाताच श्रीनिवास पद्मावतीला तेथेच सोडून शेषाद्रिवर सात डोंगराच्या पलीकडे निघून गेले.

लक्ष्मीला जवळ आलेली पहाताच श्रीनिवासांनी तीक्ष्ण दृष्टीने मंदहास्य करीत काळ्या रंगाच्या दगडांत स्वतःला विलीन केले.

तेथे त्या मूर्तीच्या गळ्यांत तुलसीच्या पानांची माळ अतिशय सुंदर दिसत होती. त्या मूर्तीच्या मधे विष्णु शिव व शक्ति, यांचे अंश पहायला मिळाले.

ह्यानंतर भक्तजनांना आपल्या वांछित रूपाचे दर्शन देण्याकरिता श्रीनिवासाला वेंकटरमण किंवा वेंकटेश्वर नांवाने संबोधू लागले. सात डोंगरांचा अधिपती देवताच्या रूपाने विष्णू तेथे स्थापित झाला.

शेषाद्रिजवळ असलेल्या मंगम्माच्या रूपाने पद्मावती विराजमान झाली. लक्ष्मीने जिथे तप केले होते, तिथे ती महालक्ष्मीच्या रूपाने स्थापित झाली. ती जागा म्हणजेच कोल्हापूर झाले.

आपल्यावर विश्वास ठेवणाच्या भक्तजनांना त्याच्या संकटकाळी रक्षण करत, त्यांनी हांक मारताच धावून जाणारा वेंकटेश्वर स्वामीच्या रूपांत असलेला विष्णु, शेषाद्रिच्या शिखरांवर कलीयुग देवताच्या रूपाने वैभवाने राहू लागला. विष्णूची ही लीला ऐकून सारे ऋषिमुनी आनंदाने माना डोलावू लागले.







# भुताचा ससेमिरा सुटला

वाणी आणि वर्मा या सज्जन जोडप्याला मूलबाळ नव्हते. त्यांच्या चांगुलपणाबद्दल सारा गांव त्यांची वाखाणणी करीत असे.

एका रात्री मुसळधार पाऊस पडत होता. वर्मा व वाणी जेवायला बसणार तेवढ्यांत बाहेरुन कुणीतरी दारावर जोरजोरांत थाप मारली. दार उघडून वर्माने पाहिलं, तर पावसांत भिजलेले एक तरुण दांपत्य दारांत उभे होते.

"आम्ही शहरांत जात होतो पण पावसांत अडकलो. आज रात्रीपुरती आम्हाला तुमच्या घरी राहाण्यापुरती जागा मिळेल कां?" त्यांनी विचारले.

"आंत या ना" वाणीने प्रेमळपणे त्यांना आंत बोलावलं, त्यांना जेवायला देऊन त्यांची झोपण्याची व्यवस्था केली.

या पाहुण्यांचे जेवण झाल्यावर थोडेच अन्न शिल्लक राहिले होते. वाणीने पतिराजांना जेवून घ्यायला सांगितले. कारण पुन्हां स्वयंपाक करायची तर लाकडे भिजून गेली होती.

वर्माने हट्ट धरला, "हे बघ, उरलेलं आपण दोघेही मिळून थोडेथोडे खाऊं या!" दोघांनी गप्पा मारत जेवण केले आणि काम संपल्यानंतर ती दोघेही झोपी गेली.

सकाळी उठल्यावर कुणाच्यातरी रडण्याचा आवाज आला, तो ऐकून ते चकित झाले. घराचे दार उघडे होते. ओटीवर रात्री आलेली स्त्री स्फुंदून स्फुंदून रडत होती. वाणी व वर्मा दोघेही तिच्याजवळ गेले आणि तिच्या रडण्याचे कारण त्यांनी तिला विचारले.

"मी काय सांगू? माझा संसार उधळला. काल रात्री मी या घरांत आले नसते तर बरं झालं असतं. तुमचं दोघाचं एकमेकांवरचं प्रेम पाहून माझे पती मला म्हणाले, "या गृहिणिसारखं तू कधी माझ्याशी प्रेमाने वागलीस तरी कां? जी पत्नी पतीशी प्रेमाने बोलत नाही, ती कसली पत्नी?" आणि मी समजूत घालण्यासाठी कांहीतरी बोलले पण तरी ते निघून गेले. फार हट्टी आहेत ते. पुन्हां येणार नाही असं म्हणाले!" ती हुंदके देत सांगत होती. तिचं नांव चंद्रमती होतं.

२५ वर्षापूर्वीची चांदोबात प्रकाशित झालेली कथा



वर्मानं बराच वेळ शोधाशोध केली, पण चंद्रमतीचा पती कांही सांपडला नाही.

"मला माहीत आहे, ते कांही परत येणार नाहीत. माझं तर आता या जगांत कुणीच नाही. आत मला एखाद्या विहिरीवर जीव द्यायला हवा." आणि ती ढसाढसा रडूं लागली.

तिचे रडणे पाहून या जोडप्याचा जीव कळवळला. त्यांनी तिची समजूत घातली, "तू अगदी शांत हो. तुझा पती परत येईपर्यंत तू आमच्याकडे निर्धास्तपणें रहा." त्या दिवसा-पासून चंद्रमती त्या कुटुंबातलीच एक घटक म्हणून राहायला लागली. ती वागायला अत्यंत कोमल स्वभावाची होती. रोज रात्रीचा स्वयंपाक ती स्वतः करायला लागली, घरकाम करायला लागली.

एक महिना उलटला. वर्माचा बालमित्र मुरारी हा चारपांच दिवस वर्माच्या घरी राहाण्याच्या विचाराने आला. दोनचार महिन्यांतून त्याची वर्माकडे एखादी फेरी अवश्य असायची. गेल्या वेळेला तो आला होता तेव्हां चंद्रमती नव्हती. वर्माकडून त्याला चंद्रमतीची कथा समजली. त्यादिवशी रात्रीं चंद्रमतीनेच सर्वांना जेवण वाढले. ओटीवर एक पलंग टाकून मुरारी रात्री तिथें झोपला.

पण मुरारीला नीट झोंप लागली नाही. मध्यरात्रीच्या सुमारास कुणाचीतरी पावले वाजताहेत असं त्याला वाटलं. त्याने डोळे उघडले तर चंद्रमती हातांत दिवा घेऊन स्वयंपाकघराचे दार हलकेच उघडत होती. चुलीच्या मागे एक खिडकी होती. तिथे कुणीतरी टकटक केल्यासारखा आवाज आला.

चंद्रमतीचे हळूंच दार उघडणे व तो आवाज ऐकून मुरारीला संशय आला. त्याने हलक्या पावलाने जाऊन स्वयंपाकघरांत डोकावून बघितले. एका थाळींत आमटी, भात, भाजी, भाकरी व दही ठेवून खिडकींतून आंत आलेल्या हातामधे ती थाळी चंद्रमती देत होती.

खिडकीच्या पलीकडे असलेली व्यक्ती म्हणत होती, "अजून किती दिवस हे अर्ध्या रात्री मी जेवण जेवायचं? कांहीतरी युक्ती कर नि तिजोरी-तले धन हडप करुन लौकर निसट इथून!" अंधारात त्या माणसाचा चेहरा कांही मुरारीला दिसला नाही.

"आत्ताच तर त्यांचा माझ्यावर विश्वास बसायला लागला आहे. लौकरच किल्ल्यांचा जुडगा माझ्या हातांत येईल. जरा धीर धरा." चंद्रमती म्हणाली. "अग चोरटे! भोळेपणाचे



नाटक करुन माझ्या मित्राच्या दिलदारपणाचा फायदा घेते आहेस आणि तुझ्या नवऱ्याच्या बरोबरीने हे असं नाटक करते आहेस काय? हो, आता बघच, मी तुझं हे नाटक बंद करुन टाकीन." मुरारी मनांत म्हणत होता. तो जाऊन झोंपला खरा, पण त्याने मनाशी निश्चय केला की वाणी व वर्माचे मन न दुखवता त्यांच्या घरांतून या भुतांचा पिच्छा सोडवायचा.

दुसऱ्या दिवशी सकाळी मुरारी तारसप्तकांत वर्माशी बोलत होता, "बाप रे, रात्रभर डोळ्याला डोळा नाही लागला माझा! मला वाटतं या घरांत एक भूत घुसलंय. मी पूर्वेच्या बाजूला पलंग ओढून ठेवला होता, तो पश्चिमेला ओढला गेला. खिडकींत पाण्याचा तांब्या ठेवला होता, तो पलंगाच्या खाली पोंचला. मी तसा धीट आहे, आणखी कुणी असता तर मेला असता."

वाणी आणि वर्मा हे ऐकून बावरुन गेली आणि म्हणाली, "मग काय आपण मांत्रिकाला बोलवायचं कां?" "आपण घाबरायचं नाही. मी सगळ्या प्रकारच्या भुतांना पळवून लावूं शकतो." मुरारीने त्यांना धीर दिला दुसऱ्या दिवशी त्याने बाजारांतून पैंजण आणले आणि रात्री त्याचा छुमछुम आवाज होऊं लागला. रात्री त्याने उशा पलंगावर रचल्या, त्याच्यावर एक साडी पांघरुन तो हळूंच मागल्या दाराने बाहेर गेला. त्याने स्वयंपाकघराच्या खिडकीवर टकटक केले.

चंद्रमती बऱ्याच वेळानंतर धीर एकवटून तिथे आली, थाळींत रोजच्याप्रमाणे सगळे पदार्थ तिने वाढले आणि ती थाळी मुरारीच्या हातांत दिली. मुरारी चटकन घरांत आला. ती थाळी त्याने



चंद्रमतीच्या खाटेवर ठेवली आणि खाट जरा सरकवून ठेवली. निमूटपणे तो ओटीवर गेला आणि आपल्या अंथरुणावर पांघरुण घेऊन झोंपला.

चंद्रमती थाळी परत येईल म्हणून थोडावेळ वाट बघत थांबली होती. खिडकीच्या बाहेर जवळच तिचा नवरा असेल असं तिला वाटलं. पण त्याचा कांही आवाज येईना, म्हणून तिने खिडकीदारे बंद केली आणि ती तिच्या खोलींत गेली. पण आंत शिरताच ती एकदम किंचाळली.

त्या आवाजाने वर्मा आणि वाणी दचकून जागे झाले आणि ताबडतोब चंद्रमतीच्या खोलीत आले. मुरारीदेखील त्याचवेळेला जागा झाल्या-सारखा तिथे आला.

चंद्रमती भेदरलेल्या स्वरांत म्हणाली, "भुताची गोष्ट खरी आहे. मीही पैंजणांचा आवाज ऐकला. या बाजूला असलेली माझी खाट इकडच्या बाजूला

आली. मी तर मटकन खालीच बसले. बघा, स्वयंपाकघरातले पदार्थ थाळीत घालून माझ्या खाटेवर आले आहेत.'' मुरारीने त्यांना धीर देत म्हटले, ''तुम्ही सारे घाबरू नका. मी त्या भुताचा चांगला समाचार घेतो.''

त्यानंतर दोन रात्री तो पैंजणांचा आवाज करीत राहिला. म्हणून जरी खिडकीवर टकटक केल्याचा आवाज येत राहिला तरी चंद्रमती भिऊन तिच्या खोलीबाहेर आली नाही, आणि तिने नवऱ्याला जेवणही दिले नाही.

तिसऱ्या दिवशी रात्रीच्या अंधारात मुरारी अंगणात लपून बसला होता. मागील दारच्या रस्त्याने चंद्रमतीच्या नवऱ्याला जाताना त्याने पाहिले. तो ही त्याच वाटेने मागून चालत गेला आणिल स्वत:शीचा बोलू लागला, ''माझ्या बहिणीशी हा असा अन्याय करायचा? मीही बघून घेईन.''

चंद्रमतीचा नवरा तिथे उभा होता. त्याने विचारले, ''अहो, काय झालं? काय बोलताय?''

''काय व्हायचंय? या घराचा मालक माझ्या बहिणीचा नवरा आहे. माझ्या बहिणीला कांही मूलबाळ नाही. कुणी एक बाई त्या घरांत राहिलीय. तिच्या नवऱ्याने तिला टाकलीय म्हणे! आता माझा मेव्हणा तिच्याशी लग्न करणार आहे आणि तीही तयार आहे म्हणे!'' असं म्हणून मुरारी रागाने पुढे निघून गेला आणि दुसऱ्या वाटेने परत घरी येऊन ओटीवर पलंगावर निजला. मुरारीच्या बोलण्यावर चंद्रमतीच्या नवऱ्याचाही विश्वास बसला. कारण गेले तीन दिवस चंद्रमतीने त्याला खिडकीमधून जेवण दिलेले नव्हते.

दुसऱ्याच दिवशी सकाळीच चंद्रमतीचा नवरा त्या घरी आला आणि वर्माला म्हणाला, ''मी मूर्खासारखा माझ्या बायकोला इथे सोडून गेलो होतो, पण आत तिला माझ्याबरोबर येऊं दे.''

भुताच्या भीतीने चंद्रमतीही गारठली होती. ती आनंदाने नवऱ्याबरोबर परत गेली. म्हणून वाणी व वर्मा उदास झाले होते. त्यांना घर अगदी सुनेसुने वाटत होते. तेव्हां मुरारी त्यांना म्हणाला, ''भुताचा ससेमिरा सुटला म्हणून तुम्ही दोघांनी तर खूष व्हायला हवं! उलट तुम्ही तर फारच दु:खी झाला आहात.'' मुरारीने नंतर त्यांना खरी गोष्ट सांगितली आणि मग तीही त्यांचा निरोप घेऊन आपल्या घरी परत गेला.





शांतीपुरचे बंडखोर शेजारच्या अमृतपुरमध्ये गेले होते, ते परत येण्यासाठी योग्य संधी शोधत होते. त्यांचा नेता वसंत, स्वामी जयानंद आणि त्यांचे आश्रमवासी रहस्यमय राजकुमार आर्यच्या संपर्कात आहेत. पडक्या वाड्यांत लपवलेल्या शाही खजिन्याची आठवण जयानंद त्यांना करुन देतात, त्यांत जी संपत्ती आहे ती तिच्या खऱ्या मालकाच्यासाठी आहे व तिचा उपयोग जनकल्याणासाठीच केला गेला पाहिजे.

# आर्य

## अज्ञात राजकुमाराचे रहस्य

चित्र : गांधीअय्या

प्राचीन शाही खजिन्याजवळ वसंत व आर्य भेटतात. कांही कार्यकर्ते तिथे येऊन त्यांना सामील होतात.

वीरसिंह व जबरसिंह दिवसा इथे येणार आहेत असं ते बोलताना मी ऐकले होते.

या, आंत काय आहे ते आंत जाऊन पाहू या.

असल्याला इथे एका बैलगाडीची जरुरी आहे.

मी आत्ताच जाऊन घेऊन येतो.

इथे आणखी एक पेटी दिसते आहे.

ठीक आहे. ती ही आपल्याला लागेल.

दोघेजण खजिन्यावर पहारा करतात, आणि वसंत व आर्य बाहेर उभे राहून बैलगाडीची वाट पाहातात.

कुणाचीतरी पावले वाजतात. भितीच्या आडोशाला वसंत व आर्य चटकन लपतात

जबरने धाडलेले शिपाई काळजीत दिसतात.

इथे कशावर पहारा करायचा? ही तर पडझड झालेली जागा

अरे, थोड्या

# सर्वोत्तम कथा



जगतराम गरीब होता. त्याला चार मुलगे होते. त्यांच्यापैकी कोणता मुलगा आपला श्रीमंत मित्र धनीराम याला दत्तक द्यावा या संभ्रमात तो राहिला. चारी मुलांपैकी एका मुलाला सुखांत राहाण्यासाठी श्रीमंत घरांत पाठवायचे, व इतर तिघा मुलांनी गरिबीत राहायचे, याला तो तयार नव्हता. कोणते आईवडील आपल्या हाडामांसाच्या जीवाला दुसऱ्याकडे देतील? असा विचार करुन तो गप्प राहिला. जगतराम गप्प राहिला यांतच धनीरामला समजलं की जगतराम चारी मुलांपैकी कोणत्या मुलाला माझ्याकडे द्यावे अशा संभ्रमात आहे.

आपण केवळ एकच मुलगा मागितला तरी तो कोणत्या मुलाला निवडून पाठवूं शकेल? आणि इतर तीन मुलांवर तो अन्याय करेल कां?

धनीरामचा या सूचनेमागे एकच हेतू होता. तो म्हणजे आपल्या धनदौलतीला व घराण्याला वारस मिळावा. आपल्या घराण्याला कुलदीपक मिळेल व घराण्याचे तो नांव काढील ही त्याची सुप्त इच्छा होती.

धनीरामने ही गोष्ट चारी मुलांना परस्पर सांगितली असती तर त्यांच्यामध्ये शत्रुत्व किंवा वैर निर्माण झाले असते. प्रत्येकाच्या मनांत आपण दत्तक जावे म्हणजे सुखसमृद्धी प्राप्त होईल अशी आशा निर्माण झाली असती. म्हणून धनीरामने हा विषय पुढे वाढवला नाही.

कोमल अर्जुन पालवे,
अे/२०६, सागर दर्शन सोसायटी,
मानपाडा रोड, डोंबिवली (पूर्व), महाराष्ट्र - ४२१ २०१.



# लल्लूची हुशारी

लक्ष्मीपुरांतल्या भूस्वामीच्याकडे लल्लू नांवाचा एक माणूस शेतीकाम, व शहरांत जाऊन घरासाठी लागणारे सर्व सामान बाजारांतून आणण्याचे काम करीत होता.

गांवकरी म्हणत की लल्लू हा हुशार आहे, आणि हजरजबाबीदेखील! हे ऐकल्यावर तो म्हणायचा, "मी खरंच तसा आहे कीं नाही ते मला ठाऊक नाही. कारण ही हुशारी कांही मला प्रगति करायला मदत करीत नाही. भूस्वामी जो कांही पगार देतात त्यांत आमचं पोटपाणी जेमतेम भागतं आहे! काम तर सतत करावं लागतंच की!"

भूस्वामींकडे चार बैलांच्या जोड्या होत्या. त्यातले एका जोडीचे बैल आता म्हातारे झाले होते. गाडीला जुंपणे, नांगरणे ही कामे त्या बैलांना झेपेनात. भूस्वामीने विचार केला कीं आणखी एक बैलजोडी विकत घ्यावी. त्या कामासाठी तो आपला अठरा वर्षांचा तरुण मुलगा अर्जुन व लल्लू यांना घेऊन दर मंगळवारी भरणाऱ्या गुरांच्या बाजाराला गेला.

बाजाराचे मैदान, गायी, बैल व गोजिरवाणी वासरे, यांनी खचून भरलेले होते. लल्लू व अर्जुनच्या पसंतीने भूस्वामीने दोन छोटे छोटे बैल खरेदी केले व त्यांना हांकत ते सारेजण घरी परतले.

पाऊस येण्यापूर्वी त्या बैलांना कामाची संवय व्हावी, म्हणून अर्जुन त्यांना गाडीला जुंपून शेतावर नेऊं लागला.

लल्लूने अर्जुनला सांगितले, "धाकटे मालक, हे दोन्ही बैल अजून तरणेबांड व दांडगे आहेत. तुम्हीही तरुण आहात आणि ह्यांच्यासारखे आहात. तेव्हां जरा जपून राहा!"

दोन आठवडे उलटले. एके दिवशी सकाळीच अर्जुन त्या नव्या बैलांना गाडीला जुंपून शेतावरुन घरी परत येत होता. रस्त्यांतल्या एका वळणावर

बैल एकदम बिथरले आणि समोरुन लल्लू चालत येत होता, त्याच्या अंगावर गाडी ओढत गेले. लल्लूला कांही फारसे लागलेबिगले नव्हते, पण तो जमिनीवर पडला होता, तो तसाच हातपाय झाडत राहिला.

गांवकऱ्यांनी त्याची ही अवस्था पाहिली आणि अर्जुनला रागावत त्यांनी लल्लूला त्याच्या घरी पोंचवले. घरी गेल्यानंतर लल्लू कण्हायला लागला. त्याच्या नजरेत ओळख दिसत नव्हती, जणूं कांही सगळे चेहरे त्याला अनोळखी दिसत होते. त्याची ही अवस्था पाहून गांवकऱ्यांनी ठरवले कीं आणखी कांही दिवस तरी लल्लूला काम करता आले नसते. त्यांनी भूस्वामीला सांगितले, ''लल्लू तुमच्यावरच अवलंबून आहे. दुर्दैवाने आता त्याची स्थिति अगदी दयनीय आहे. त्याला मदत करायची तुमचीच जबाबदारी आहे.''

भूस्वामीला वाटलं कीं आता जर लल्लूची देखभाल केली नाही तर गांवात आपली बदनामी होईल. म्हणून तो लगोलग लल्लूच्या घरी गेला. त्याची नीट विचारपूस केली आणि त्याच्या बायकोला दोन हजार रुपये देऊन भूस्वामीने सांगितलं, ''माझ्या मुलाच्या हलगर्जीपणामुळे हे झालं आहे. लल्लू जेव्हां चांगला बरा होईल तेव्हां त्याला जास्ती कष्टाची कामे मी करुं देणार नाही. त्याने शेतांतल्या मजुरांवर नुसते लक्ष ठेवले तरी पुरे!''

भूस्वामीच्या दयाळूपणामुळे लल्लूची पत्नी भारावून गेली. तिचे डोळे पाणावले. भूस्वामी गेल्यानंतर ती लल्लूला म्हणाली, ''पाहिलंत, थोरले मालक किती दयाळू आहेत! तेव्हां आता तुमचे हे लागल्याचं नाटक पुरे झालं! तुम्ही आता कामावर जायला लागा.''

त्यावर लल्लूने हंसतच तिला म्हटले, ''मी जर लगेच हिंडायला-फिरायला लागलो तर गांववाले मला खोटा ठरवतील. निदान कमीतकमी महिनाभर तरी मला घरी बसून विश्रांति घेऊं दे ग! आजपर्यंत मालक माझ्याकडून भरपूर काम करुन घेत होते. आणि बेताचा पगार देत होते. अशा कंजूष मालकाकडून व्याजासकट वसुली केली हेच मोठं काम मी केलंय. चल, तूही तुझ्या कामाला लाग!''







# बाभूळ तलावांतली हडळ

कमला सासरी आल्यानंतर आठवडा पूर्ण व्हायच्या अगोदरच तिच्या लक्षांत आले की तिचा नवरा रमेश एक नंबरचा आळशी आहे. शेतीवाडीचे सगळे काम तिचे साठ वर्षांचा माधव सासरा माधव, हा पाहात होता.

रमेश उशीरापर्यंत लोळत पडायचा. जेवण झाले कीं गांवांत इकडेतिकडे टवाळकी करायला जायचा. अंधार पडला कीं घरी येऊन जेवायचे नि झोंपी जायचे!

रमेशचा हा दिनक्रम कमलाला सहन होईना, म्हणून ती त्याला म्हणाली, ''मामंजींचं आता वय झालंय. तुम्ही आता जरा शेतीवाडीचे काम पाहायला लागा आणि त्यांना विश्रांति द्या.''

तिचा हा सल्ला ऐकून रमेश हंसतच सुटला व तिला म्हणाला, ''तू आल्यानंतर त्यांना आता कांही स्वयंपाक करावा लागत नाही. त्यांचा आरामच चाललाय कीं!''

रमेशला सांगून त्याचा कांही फायदा होत नाही हे बघितल्यावर ती सासऱ्यांना म्हणाली, ''तुम्ही शेतावर निघाला आहात तर तुमच्या मुलालाही घेऊन जा. तुम्ही एकटेच किती दिवस कष्ट करीत राहाणार?''

माधवने हंसतच म्हटले, ''त्याची आई त्याच्या लहानपणीच वारली, तेव्हांपासून मी त्याला अगदी लाडांत वाढवलंय. त्याने शेतांत राबणे हे मलाच पसंत नाही. झोंपू दे त्याला!'' आणि तो शेतावर निघून गेला.

त्याच दिवशी संध्याकाली माधवला सांप चावला आणि त्याचा मृत्यू झाला. त्यानंतर एक आठवडा उलटला तरी रमेशच्या दिनक्रमांत काडीचा बदल झाला नाही.

एक दिवस जेवण वाढताना कमला रमेशला म्हणाली, ''आता जर तुम्ही शेतीच्या कामांत लक्ष घातलं नाहीत तर कामें कशी होतील? बियाणे पेरायची कामे सुरुं झालीत.''

''हे बघ. यापुढे शेतीच्या कामासंबंधी तू मला

राजेश मिश्रा



कांही एक सांगायचं नाहीस.'' रमेशने चिडून सांगितलं.

''मग घर कसं चालेल? तुमचा विचार बदलायला हवा.'' कमला म्हणाली.

''मी बदलणार नाही. ती सगळी कामे तूच सांभाळ की!'' असं गुर्मीत उत्तर देऊन भरपेट जेवून तो गांवात फिरायला निघून गेला.

कमला थक्कच झाली. तिने खूप विचार केला, पण नवऱ्याची ही बेपर्वा वृत्ती कशी बदलता येईल हे कांही तिला सुचेना. विचारांत ती इतकी गुंगली होती कीं रात्रीचा स्वयंपाक करायला ती विसरून गेली. अंधार पडल्यानंतर रमेशने घरांत पाय ठेवला आणि म्हणाला, ''पोटांत कावळे ओरडताहेत. लवकर पान मांड.''

कमलानेही रागाने उत्तर दिलं, ''तुम्ही शेतीवाडीचे काय बघायला स्पष्ट नकार दिलात. मीही जेवण बनवलं नाही. शेतांत काम करायला लागलात कीं त्यावेळी जेवण मिळेल.''

रमेश रागावून तिच्याकडे बघतच राहिला आणि थोडा वेळ वाट पाहून घरांतून बाहेर पडला. अंधारात तो कुठल्या दिशेला जातो आहे याचे त्याला भान नव्हते.

अखेरीस जंगलाच्यालगत असलेल्या बाभूळ तलावाजवळ तो आला. तलावाच्या कांठावर बाभळींची खूप झाडे होती, म्हणून त्या तलावाला बाभूळतलाव म्हणायला लागले. कांठावर कांही खूप पारंब्या असलेली मोठी वडाची झाडेही होती.

''मीही एका चांगल्या शेताचा मालक आहे. आणि अशा रात्रीं उपाशीपोटी मला गांवाबाहेर भटकत राहावं लागतं आहे. असलं कसलं आहे हे माझं आयुष्य?'' स्वतःशीच बडबडत तो चालला होता. अंधारात त्याला समोरचा वृक्ष दिसला नाही. तो सरळ त्याच्या बुंध्यावर आपटला आणि तलावांत घसरून पडला.

पण दुसऱ्याच क्षणी वडाची एक पारंबी त्याच्या हातांत आली. ती पकडून तो कांठावर येऊं शकला.

तिथे एका हडळीने त्याला विचारलं, ''कशासाठी मरणार होतास रे? मी जर ती पारंबी तुझ्याकडे फेंकली नसती तर एव्हाना तू मेलाच असतास.''

हडळीला बघून रमेश घाबरला होता. पण तिचे बोलणे ऐकून त्याला जरा धीर आला. तिला आता काय उत्तर द्यावे याचा तो विचार करूं लागला. ती पुढे म्हणाली, ''मी इथे बसल्याबसल्या देवाची प्रार्थना करीत होते कीं कांही चांगलं काम करून पुण्य कमावीन आणि परलोकांत जाईन. तुझ्यामुळे माझ्या प्रार्थनेत व्यत्यय आला की!''



हडळीचे बोलणे ऐकून रमेशला वाटलं की ही कुणी धर्मपरायण हडळ असावी. त्याने मुद्दामच दुःखभरल्या आवाजांत म्हटलं, ''मला वांचवून तुम्ही मोठं पुण्य केलं आहेत. माझ्याजवळ एक पैसादेखील नाही. मी माझ्या पत्नीचा सांभाळ कसा काय करणार?'' आणि जणूं त्याच्यासाठीच तो तलावांत आत्महत्या करायला निघाल्याचे त्याने नाटक केले. ''अरे, थांब, असं नको करूस!'' असं म्हणून हडळ उडत झाडावर गेली आणि तिने एक गांठोडे आणून रमेशला दिले.

''हे धन घेऊन मी आता सुखाने जगेन. आम्ही सारेजण तुझ्यासाठी अवश्य प्रार्थना करूं.'' असं म्हणून रमेश मोठ्या खुषींत घराकडे परतला.

घरी पोचल्याबरोबर त्याने ते गांठोडे कमलासमोर फेकले आणि सांगितले, ''मनांत आलं तर क्षणांत मी असे धन कमावू शकतो. आणि हा कांही चोरीचा माल नाही, समजलं?''

कमला अतिशय आनंदून गेली. पण दुसऱ्या दिवशी रमेशने त्यांतली थोडी रक्कम घेतली आणि जुगारांत ते पैसे घालवले.

जेव्हां तो घरी परतला तेव्हां कमलाने मोठ्या कडवटपणाने म्हटले, ''असे खर्च करीत बसलात तर घर कसं चालेल? शेती करण्यांत तुमचं मन लागत नसेल तर एखादा लहानसहान व्यापार तरी सुरुं करा.'' कमलाने सुचवलं.

''कुणी मला सूचना करायला लागलं की मला खूप राग येतो. यापुढे तू मला शिकवत जाऊं नकोस.'' रमेशने कमलाला ताठरपणे सांगितले.

महिनाभरांतच हडळीने दिलेले सारे धन संपून गेले. रमेश पुन्हां एका रात्री बाभुळतलावाकडे गेला.



तलावांत बुडण्याचे नाटक पुन्हां त्याने केले आणि हडळीकडून पुन्हां धनाचे गांठोडे घेतले. त्याच्या हातातले गांठोडे पाहून कमला स्तंभित झाली.

रमेशच्या चैनीच्या सवयी दिवसेंदिवस वाढतच गेल्या. या खेपेला त्याने वीस दिवसांतच सगळे पैसे उडवले. नवऱ्याला रागावून कांहीच उपयोग होणार नाही हे कमलाला माहीत होतं. ती शांतपणे म्हणाली, ''घरांत फुटकी कवडीदेखील नाही. तेव्हां काय करायचं?''

त्या रात्रीं तो बाभूळतलावाकडे जायला निघाला. कमला पाळतीवर होतीच. यावेळी त्याच्या पाठोपाठ जाऊन तो हे धन कुठून आणतो त्याचा छडा लावायचाच असा तिने निश्चय केला. एका झाडाच्या मागे ती लपून बसली आणि रमेशने त्या हडळीकडे कसं धन मागितलं ते तिने बघितलं.

रमेश जसा बांधावरुन खाली उतरला, तसे

कमलानेही तलावांत उडी मारायचे नाटक केले. हडळीने तिला लगेच थांबवून विचारले, "थांब, तुझ्यावर असं कोणतं संकट आलंय कीं त्याच्यामुळे तुला मरावसं वाटतंय?"

"माझ्यावर आलेलं संकट तुझ्यामुळे आलंय!" कमलाने सांगितलं.

"माझ्यामुळे तुझ्यावर संकट आलंय? म्हणजे मी काय केलंय?" हडळीने आश्चर्याने विचारले.

"तुझ्यामुळे माझा नवरा एकदम आळशी झाला आहे. त्याला असलेली व्यसने कमी होती. म्हणून नव्या व्यसनांच्या तावडीत तो सांपडला आहे, अयोग्य माणसाला मदत करणे याच्यापेक्षां मोठे पाप कोणतेही नाही. तुला इतकंदेखील माहिती नाही?" कमलाने कठोरपणे विचारले.

"मी तर समजत होते की या बिचाऱ्याला मदत करुन मी पुण्यच मिळवते आहे. पण माझ्याकडून पाप घडत होतं हे मला आता समजलं. आता याचं प्रायश्चित्त मी कसं करुं?" हडळीने दीनवाण्या स्वरांत विचारलं!

कमलाने हडळीला समजावून सांगितलं की तिचा पती तलावांत उडी मारुन मरायचं नाटक करत होता. आता पुन्हां तो येईल तेव्हां काय करायला हवं हेही कमलाने हडळीला सांगितलं.

या वेळेला तर रमेशने मिळालेलं धन पंधरा दिवसांतच संपवून टाकलं; आणि एका रात्री पुन्हां तो बाभूळतलावाकडे गेला व तलावांत उडी टाकून मरण्याचा प्रयत्न करायचं नाटक त्याने पूर्वीसारखंच केलं.

हडळ किचकितच हंसत सुटली आणि त्याला म्हणाली, "तू अत्यंत आळशी आहेस. पत्नीच्या कष्टावर जगणारा महापापी आहेस. पाण्यांत बुडून मरायचं नाटक तू आजवर केलंस, आता याच्यापुढे तुझं रक्षण मी नाही, हे झाड करील. तूही भूत बनून या झाडावर लौकरच राहायला येशील." असं म्हणून ती अंधारात विलीन झाली.

हडळीचे बोलणे ऐकून रमेश भीतीने थरथर कांपायला लागला. दुसऱ्या दिवशी सकाळी उठून आपला नवरा शेतावर कामाला जायला निघाला होता. ते पाहून कमला अगदी खूष झाली आणि तिने मनोमन त्या हडळीबद्दल धन्यवाद दिले.







# भल्लूक मांत्रिक

## 22

*(सूर्यभूपती मांडलिक आपल्या किल्ल्याचे रक्षण करायला गेला. मायामर्कटही किल्ल्याची भिंत ओलांडून बाहेर निघून गेला. अस्वल्या मांत्रिक आपला गुरु संकटात आहे कां ते बघायला भुयारांत शिरणार होता, पण अस्वल्या बधिकाने त्याला थांबवले. मांत्रिकाने त्याच्या डोक्यावर मंत्रदंडाचा स्पर्श केला व तो नगराचा बधिक आहे असे सांगितले व नंतर तो भुयारांत गेला. त्यानंतर....)*

**अस्वल्या** मांत्रिक गेल्यानंतर जितकेतू राजा कालीवर्माकडे बघून बोलला, "सांग, आता ह्यावेळी आमचे कर्तव्य कोणते आहे? सर्वांच्या समक्ष मी सूर्यभूपतिची मुलगी दत्तक घेणार आहे, अशी घोषणा केलेली आहे. आता मायामर्कटाचे गुरु मिथ्यामिश्र यांच्यापासून तिचे रक्षण करायला हवे ना? आपण सैनिकांना बरोबर घेऊन अरण्याच्या दिशेने जाऊं या कां?"

"महाराज, जर आपण सारेजण सैनिकांना बरोबर घेऊन अरण्यांत गेलो तर आपल्या आवाजामुळे त्या तांत्रिकाला आपले आगमन अगोदरच समजेल." कालीवर्माने आपली शंका व्यक्त केली.

त्याला सावध करीत कालीवर्मा तिथून निघाला त्यावेळी कालीवर्मा, बधिक आणि राक्षस उग्रदंडही पायी चालत अरण्यांत शिरले आणि त्या जागी त्यांना एक खूप मोठा बलदंड अस्वल दृष्टीस पडला. कांही कंदमुळे आणि फळे रानवेलींच्या साहाय्याने बांधून, ती खांद्यावर टाकून तो चालला होता.



त्याला पाहून कालीवर्मा म्हणाला, "उग्रदंड, हे किती चमत्कारिक दृश्य आहे?"

"त्यांत आश्चर्य कसलं? तो अस्वल म्हणजे त्या दुष्ट तांत्रिक मिथ्यामिश्रचे पाळलेले जनावर असणार! आपण जर गुपचूप त्याच्या मागोमाग गेलो, तर आपल्याला त्या तांत्रिकाचा पत्ता लागेल." उग्रदंड राक्षसाने उत्तर दिले.

त्यानंतर ते तिघेही थोडे अंतर ठेवून त्या अस्वल्यापाठोपाठ चालत गेले, तेव्हां त्यांना एका झाडाखाली अस्वल्या मांत्रिक आणि एक पांढऱ्या दाढीचा दुर्बळ वृद्ध दिसला. त्याच्या गळ्यांत रुद्राक्षाची माळ होती. त्यांच्याशी मांडलिक बोलत होता.

कालीवर्माला दुरुनच पाहून अस्वल्या मांत्रिक म्हणाला, "अरे माझ्या शिष्या कालीवर्मा, हे माझे गुरु भल्लूकपाद आहेत. सूर्यभूपतीची मुलगी कांचनलता हिला किल्ल्यांतून मिथ्यामिश्र तांत्रिकाने पळवून नेली आहे. आता तू काय करणार आहेस?"

त्या अस्वल्यावर परशूने प्रहार करुन त्याला मारण्याचा विचार करणाऱ्या नगरवधिकाने आपला परशु पुन्हां खांद्यावर घेतला नि म्हटले, "अरेच्च्या, म्हणजे हे अस्वल भल्लूकपादाचे पाळलेले जनावर आहे काय? तो वांचलाय?"

हे ऐकून भल्लूक मांत्रिक त्याच्याजवळ येऊन म्हणाला, "होय तर; आता मला समजलं की माझ्या गुरुजींनी पाळलेले हे जनावर तुम्हाला इथे घेऊन आले आहे. तो तांत्रिक माझ्या गुरुजींना भल्लूकेश्वरीच्या मंदिरासमोर बांधून, त्यांना उपाशी ठेवून, त्यांना मारणार आहे. पण स्वामीभक्त अस्वलाने त्यांच्यादोऱ्या सोडल्या आणि त्यांना मुक्त केले."

हे शब्द ऐकून वृद्ध भल्लूकपादाकडे रागाने बघत उग्रदंडाने विचारलं, "सांग, माझा भाऊ कालदंड कुठे आहे?"

भल्लूकपादाने निर्भयपणे एकवार आपल्या रुद्राक्षमालेकडे पाहिले, आणि हंसून म्हटले, "हा प्रश्न मला विचारण्यापेक्षा तांत्रिक मिथ्यामिश्रालाच विचारायला हवांस! त्यानेच जडीबुटीचा वापर करुन तुझ्या भावाला मुका बनवला आहे आणि त्याचाच उपयोग पाळीव जनावरासारखा तो करतोय! या अरण्यांत जर तू त्याला पकडलंस तर तुझा भाऊ कालदंड आणि कांचनलतादेखील तुझ्या हाती लागतील. तुमच्यांत हे धाडस करणारा कुणी आहे कां?"

हे ऐकून कालीवर्माने तलवारीच्या मुठीवर हात धरुन म्हटले, "मी करीन हे धाडस! कांचनलताला



तर वांचवीनच, पण त्याच्याबरोबर त्या तांत्रिकाचा आणि तुझादेखील बळी देईन. जारणमारण करणारा कुणीही दुष्ट मांत्रिक या प्रदेशांत जिवंत राहाणार नाही."

अस्वल्या मांत्रिकाने दांत काढून आपला मंत्रदंड वर उचलण्यासाठी हात लावला मात्र, तोच सूर्यभूपती त्याला अडवीत म्हणाला, "कालीवर्मा, हे भल्लूक पाद आणि यांचे शिष्य भल्लूक उर्फ अस्वल्या मांत्रिक, हे कांही आपले शत्रू नाहीत! शंख वाजवून मायामर्कटाला गुरु तांत्रिकमिश्र जवळ येणार असल्याची सूचना देणारे जे त्यांचे सेवक होते, त्यांना बंदी बनवण्यांत या लोकांनी मला खूपच मदत केली होती. हे बघ, हा शंख आणि हा सेवक! याला मी खूप छळले, पण तरीही त्याने आपल्या मालकाचा ठावाठिकाणा मला सांगितला नाही. म्हणून मी त्या दुष्टाला माझ्या तलवारीचा बळी केले."

कालीवर्माने तो शंख दूर फेकून म्हटले, "राजा सूर्यभूपती! आपण सर्वप्रथम आपल्या कन्येचे अपहरण करणाऱ्या मिथ्यामिश्राचा बळी चढवायला हवा होतात. ठीक, आता आपण सर्वांनी चारी बाजूंनी गराडा घालून त्या तांत्रिकाचा शोध घेऊं या!" आणि कालीवर्मा तिथून पुढे निघाला.

त्यानंतर भल्लूकपाद अस्वलावर स्वार झाला, तेव्हां त्याच्या एका बाजूला त्याचा शिष्य अस्वल्या मांत्रिक आणि दुसऱ्या बाजूला उग्रदंड राक्षस, बधिक आणि मांडलिक पायी चालत अरण्याच्या दिशेला जाऊं लागले.

वाटेंत कालीवर्मा पावलांचे ठसे शोधत होता. एका जागी सामान्य मनुष्यांच्या पाऊल खुणां-



बरोबरच त्याच्या दुप्पट तिप्पट मोठ्या आकाराच्या खुणा दिसत होत्या. त्याला ताबडतोब तांत्रिकाबरोबर राहाणाऱ्या उग्रदंडाचा भाऊ कालदंड राक्षसाची आठवण आली.

कालीवर्मा अशा विचारांतच झाडीच्या बाजूने पुढे गेला. जवळच तांत्रिक राहात असावा असा त्याचा तर्क होता. थोडे दूर अंतर पार केल्यावर त्याला एक खूप मोठे सरोवर आणि त्याला मिळणारा एक लहानसा झरा दिसला. त्या झऱ्याच्या कांठावर एक त्रिशूळ जमिनीत पुरलेले होते, सरोवरांतल्या पाण्यांत एक बलदंड माणूस उभा राहून डोळे मिटून मंत्र जपत होता.

ती तांत्रिक मिथ्यामिश्र होता. कालीवर्माच्या हे लगेच लक्षांत आले. त्याने रागाने ओरडून विचारले, "अरे, तुम्हीच ना तांत्रिक मिथ्यामिश्र? तांत्रिकाला मंत्र कशाला हवेत? तू सूर्यभूपतीच्या मुलीचे अपहरण केले आहेस. ती कुठे आहे?"



मंत्रपठण करणाऱ्या मिथ्यामिश्राने चटकन डोळे उघडले, आणि कालीवर्माकडे निरखून पाहिले, व विचारले, "तुला माझं नांव कसं कळलं? नक्कीच तू हुशार आहेस. माझा शिष्य भ्रांतिमती याने मला सांगितलं कीं माझ्या शंख फुंकणाऱ्या सेवकाला अरण्यांत कुणीतरी ठार मारलं. तूच तो मारेकरी नाहीस ना?"

"ते मी नंतर सांगीन. तुम्ही आधी सांगा, तुम्ही कांचनलताला कुठे लपवून ठेवलेलं आहे?" असं म्हणत कालीवर्माने तलवारीला हात घातला, तेवढ्यांत झाडाच्या फांदीवर बसलेला मायामर्कट किचकिचत ओरडला, "तांत्रिक गुरुजी! हाच कालीवर्मा आहे. हा जन्मजात पराक्रमी आहे. आता यावेळी याचा प्राण घेणेच आपल्या हिताचे आहे." हे बोलून तो फांदीवरुन उडी मारुन कालीवर्माच्याजवळ येणार तितक्यांत कालीवर्माने आपली तलवार उपसायला वेळ मिळाला नाही, म्हणून समोरच असलेला त्रिशूळ ओढला व मायामर्कटावर रोखला. त्याच वेळेला मायामर्कट फांदीवरुन वेगाने खाली येत होता, तो त्रिशूळावरच नेमका आदळला.

त्याच्या शरीरांत त्रिशूळ घुसल्यामुळे, आत्यंतिक वेदनेने हातपाय आपटीत तो ओरडत उठला व पुन्हां पडला.

"तांत्रिक गुरुकी जय! आपली सेवा करण्याचे भाग्य मला पुन्हां परलोकांतच मिळेल." असे म्हणून तो कोसळला.

त्यानंतर कालीवर्माने आपली तलवार सर्रकन म्यानांतून बाहेर काढली आणि स्तब्ध उभा असलेल्या तांत्रिकाला तो म्हणाला, "अरे तांत्रिका, ज्या भल्लूकेश्वरीची तू पूजा करतोस, तिच्याच नांवाने माझ्या तलवारीने मी तुझा बळी चढवीन. पण त्यापूर्वी तू कांचनलतेला कुठे लपवून ठेवलेलं आहेस ते मला सांग!"

त्यावर तांत्रिकाने मंद हास्य केले, आणि आपले हात पुढे करुन तो मुठीची उघडझाप करायला लागला. त्याचे हे करणे पाहून कालीवर्माला नवल वाटले.

तो सरोवरांत पाय टाकणार तेवढ्यांत पाठी-मागून कुणा स्त्रीचा आवाज आला, "हे तरुणा, सावध राहा! हा तांत्रिक एका मुक्याला खुणा करतो आहे."

तो आवाज ऐकल्याबरोबर कालीवर्माने झर्रकन मागे वळून पाहिले. तेव्हां उग्रदंड राक्षसासारखा आणखी एक राक्षस, एका तरुणीला आपल्या खांद्यावर घेऊन येताना दिसला.

त्या राक्षसाने त्या तरुणीला खाली ठेवले, आणि रानटी हत्तीसारखी आरोळी ठोकली; आणि आपली दगडी गदा उचलून तो कालीवर्माच्या दिशेने पुढे सरसावला.

कालीवर्मा पटकन त्याच्या वाटेतून बाजूला सरला, आणि तो राक्षस सरोवराच्या कांठावरच्या चिखलांत पाय रुतल्यामुळे, तोंडावरच खाली पडला. त्याच्या हातांतली गदा धाडदिशी बाजूला पडली.

यावेळी राक्षस आणखी जोराने गरजला. जमिनीवर गुडघे टेकून तो उठायचा प्रयत्न करीत होता, तितक्यांत कालीवर्माने उडी मारुन ती गदा हातांत घेतली. आणि राक्षसावर तिचा प्रहार केला. राक्षस किंचाळतच सरोवराच्या कांठावर पडला.

या वेळांत तांत्रिक मिथ्यामिश्र पळून जाण्याच्या विचाराने चारी बाजूला बघत होता, तो कालीवर्माच्या तीक्ष्ण नजरेस पडला. राक्षसाने आणलेल्या त्या तरुणीला कालीवर्माने विचारले, "तुम्हीच सूर्यभूपतीची कन्या कांचनलता आहात ना?"

तिने होकारार्थी मान डोलावीत म्हटले, "मला वाटतं, तांत्रिकाचे दोघेही सेवक मेले आहेत तरी त्याला जिवंत सोडूं नये. माझ्या हातांत कांही हत्यार नाही. मला तुमची तलवार द्या नि तुम्ही गदा घ्या. आपण दोघेही या दुष्ट तांत्रिकाची शिकार करुं या."

कालीवर्माला तिचे शब्द ऐकून आनंद झाला. त्याने तलवार तिला दिली, हातांत गदा घेतली, आणि पाण्यांत उतरुन तो त्या तांत्रिकाच्या दिशेने जायला निघाला. तोच जितकेतू राजा दोन सेवकांसह तिथे येऊन पोंचला व मोठ्याने ओरडला, "कालीवर्मा, हा मगरीसुसरींचा तलाव आहे. तू ताबडतोब किनाऱ्यावर ये. त्या तांत्रिकाला मारायला माझे सैनिक, नगराचा वधिक, आणि उग्रदंड राक्षस मागून येत आहेतच."



आणि चारी बाजूला न्याहाळत असलेल्या कांचनलतेच्या जवळ जाऊन तो म्हणाला, "मुली, तू माझी दत्तककन्या आहेस. म्हणून तुला पसंत असलेल्या तरुणाशी तुझा विवाह करुन देण्याचा मला अधिकार आहे. आहे ना?"

कांचनलता लाजली व तिने मान खाली घातली. त्यावेळी सूर्यभूपतीच्याबरोबर हत्तीवर स्वार होऊन भल्लूकपाद, भल्लूक मांत्रिक, नगराचा वधिक आणि उग्रदंड राक्षस हेही तिथे आले.

सूर्यभूपती तिच्याजवळ जाऊन म्हणाला, "पोरी, तुला पुन्हां मी जिवंत पाहूं शकेन असं कधी वाटलं नव्हतं. कालीवर्मा, तू महान वीर आहेस यांत काडीमात्र शंका नाही."

त्यानंतर जितकेतु राजा हंसतमुख कालीवर्माचा हात पकडून त्याला कांचनलताजवळ घेऊन गेला व म्हणाला, ''तुम्हा सर्वांच्या साक्षीने, मी माझी दत्तक मुलगी कांचनलता, हिचा विवाह हा क्षत्रिय तरुण कालीवर्मा ह्याच्याशी करतो आहे. माझ्यानंतर हा तरुण चंद्रशिला नगरीचा राजा बनेल.''

त्यावर सर्वांनी आनंदाने टाळ्या वाजवल्या, पण तेवढ्यांत सरोवरांतून एक भयंकर किंकाळी ऐकू आली. सर्वजणांनी तिकडे नजरा वळवल्या. तर त्यांना काय दिसले? एका प्रचंड मोठ्या मगरीने मिथ्यामिश्राला पकडले होते आणि तिच्या जबड्यांतून सुटका करुन घेण्यासाठी तांत्रिक धडपडत होता. ते पाहून अस्वल्या मांत्रिकाने आपला मंत्रदंड उत्साहाने वर उचलला नि त्याने गर्जत म्हटले, ''भल्लूकपाद गुरु! आता आपणच भल्लूकेश्वरीचे प्रमुख पुजारी आहात. कारण आपला शत्रू मगरीचे भक्ष्य बनला आहे.''

त्यानंतर मगरीने मिथ्यामिश्राला तोंडात पकडून खोल पाण्यांत बुडी मारली. उग्रदंड राक्षस सरोवराच्या कांठावर पोंचला तेव्हां तिथे खाली पडलेल्या कालदंड राक्षसाला त्याने उठवले व म्हटले, ''भाऊ! आजपर्यंत तुला त्रास देणारा तांत्रिक आता मगरमिठीत सांपडून मेला आहे. आता तू उठ!''

कालदंड राक्षस हे ऐकून उठून उभा राहिला. आपल्या दोन्ही हातांनी स्वत:चा गळा त्याने चांचपून बघितला. सरोवराच्या दिशेकडे बघत तो ओरडत म्हणाला, ''अरे उग्रदंडा, खरंच तो तांत्रिक मेलाय ना? त्याने मला विषारी औषधे पाजून मला मुका बनवले होते. मला बोलता येत नव्हते. माझ्यासारख्या बलवान राक्षसाला बेशुद्ध करणारा महान वीर कोण आहे?'' असं म्हणत लांबलांब टांगा टाकीत तो पुढे आला आणि कालीवर्मा आणि त्याच्याशेजारी उभी असलेली कांचनलता, या दोघांना त्याने हाताने उचलून आपल्या खांद्यावर बसवले.

हे पाहून अस्वल्या मांत्रिकासकट सर्वांना अतिशय आनंद झाला आणि त्यांनी एकमुखाने जयघोष केला.

*(समाप्त)*





वेताळ कथा

# गांवातली जागा

**निश्चयाचा** पक्का विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ आला, त्याने प्रेत खाली उतरवले आणि आपल्या खांद्यावर घेतले. स्मशानाच्या दिशेने तो जाऊं लागला तेव्हां प्रेतांत लपलेल्या वेताळाने त्याला म्हटले, ''राजन्, कांहीतरी लक्ष्य डोळ्यांसमोर ठेवून तू एवढे जिवापाड परिश्रम करतो आहेस. ते पाहून तुला सुसेन राजाची गोष्ट सांगावी अशी मला तीव्र इच्छा होते आहे. त्याचं व्यक्तिमत्व, सामर्थ्य अगदी निराळं होतं. पण आपले लक्ष्य साध्य करण्यासाठी त्याने आगळावेगळा मार्ग धरला होता. तुझे व्यक्तिमत्व त्याच्यासारखे नाही. तरीदेखील त्याचा मार्ग जर तू स्वीकारलास, तर तुझे काम पूर्ण होईल. थकवा



जाण्यासाठी तू ही गोष्ट ऐकच." आणि वेताळ पुढील गोष्ट सांगू लागला.

सुसेन हा पुष्पक देशाचा राजा होता. स्वतःच्या राज्यपदाचा अभिमान त्याला अवश्य होता. पण प्रजेचे हित व कल्याण कोणत्याही चांगल्या मार्गाने कसे साधता येईल याबद्दल तो सतर्क असे. त्यांच्या कोणत्याही मार्गाकडे त्याने कधीही दुर्लक्ष केले नाही. मग ती लहान असो वा मोठी! तो प्रजेच्या समस्या अगदी वेगळ्या पद्धतीने सोडवत असे.

आपल्या समस्या सर्वसामान्य लोकांना तो सांगत असे. जे लोक योग्य उपाय सुचवत असत, त्यांना तो मूल्यवान भेटी देई व त्या सूचना अंमलात आणी.

एकदा राजमाता रुक्मिणी आजारी पडली. आता सुनेने सासूची सेवा करायला हवी ही परंपरा, पण नंदिनी राणीला कांही सासूची सेवा करण्याची इच्छा अजिबात नव्हती. तिने आजारी पडल्याचे नाटक केले आणि तिने अंथरुण धरले. राजवैद्य पुंडरीकाने दोघींची परीक्षा केली. नंदिनीने आजाराचे नाटक केले आहे हे त्याला कळले. तिला फक्त शक्तीवर्धक औषधे त्याने दिली. पण राजमातेला औषधे दिल्यानंतर त्याचा परिणाम किती होतो आहे ते पाहण्यासाठी राजवैद्य बराच वेळ बसून राहात होता. त्याच्या औषधाने रुक्मिणी मात्र लौकरच बरी झाली. राजवैद्याच्या सल्ल्यानुसार राजमातेला थंड हवेच्या ठिकाणी हिमनगरीला राजाने हवापालट करण्यासाठी पाठवले.

सासूची सेवा करण्यासाठी नंदिनीला हिमनगरीला जावे लागेल अशी तिला भीती वाटली, म्हणून तिने आजाराचे नाटक तसेच चालू ठेवले. प्रकृति बरी नसल्यामुळे नंदिनी सासूबरोबर कांही हिमनगरीला गेली नाही. बरेच दिवस उलटले तरी राणीची प्रकृति कांही सुधारेना म्हणून राजाने वैद्याला त्याचे कारण विचारले.

"सरकार, मला शंका येते कीं राणीसाहेबांना मानसिक रोगाची लागण असावी. आपण त्यांचे मन प्रसन्न होईल असे कांहीतरी काम करावे. म्हणजे त्यांची प्रकृति लौकर सुधारेल." राजाने राणीला हे सांगून तिला प्रेमाने विचारलं,

"सांग, मी काय केलं म्हणजे तू संतुष्ट होशील?"



हे ऐकून नंदिनी राजवैद्य पुंडरिकावर संतापली व कडवटपणे म्हणाली,

"या असल्या वैद्याऐवजी दुसरा वैद्य नेमा. म्हणजेच मला बरे वाटेल."

राजवैद्य पुंडरीक हा अत्यंत निष्णात वैद्य आहे असा राजाला पूर्ण विश्वास होता. राजाला प्रश्न पडला कीं राणीला आता कसे समजावून सांगावे कीं पुंडरीक उत्तम वैद्य आहेत आणि त्यांच्याजागी दुसरा वैद्य नेमणे योग्य ठरणार नाही. त्याचवेळी हिमनगरीहून राजमातेने संदेश पाठवला की "राजवैद्य पुंडरीक धन्वंतरी आहेत. त्यांना मूल्यवान उपहार देऊन त्यांचा सन्मान करावा."

आता पुंडरीकाला राजवैद्याच्या जागेवरुन काढले तर राजमाता नाराज होईल, व तिचे ऐकले तर पत्नी नाराज होईल, असा पेंच राजासमोर खडा झाला. काय निर्णय घ्यावा ते ठरेना, म्हणून एका रात्रीं राजा वेषांतर करुन शहरांत हिंडायला गेला. तेव्हां दिनपाल या लहानशा व्यापाऱ्याशी त्याची ओळख झाली. सुसेनने त्याला आपली समस्या सांगितली.

थोडा वेळ विचार करुन दिनपालने म्हटलं, "अशा वेळी जो खोटं बोलतोय, त्याच्यावर उपकार केले पाहिजेत व तसा त्याच्या मनांत विश्वास निर्माण झाला पाहिजे!"

दुसऱ्याच दिवशी राजा राणीला म्हणाला, "आमच्या राजवैद्याच्या मागावर गुप्त हेर धाडलेले आहेत. त्यांनी सांगितले कीं राजवैद्यांना तुझ्या-बद्दल खूप माया व आदर आहे. त्यांच्या मते तुझा



रोग बाहेर दिसणारा नाही. तुला सासूची सेवा करायला लागू नये म्हणून त्यांनी राजमातेला हवापालट करण्यास पाठवून दिले, ते तुझ्या भल्यासाठीच!"

आता तोच पुंडरीक नंदिनीला एकदम भला माणूस वाटायला लागला आपल्या गैरसमजाबद्दल तिला वाईट वाटले. तिने राजाला सांगितले की वैद्याला किंमती भेट अवश्य द्यावी व त्यांचा सन्मान करावा.

राजाला समाधान वाटले. पुन्हां एकदा तो शेतकऱ्याच्या वेषांत दिनपालला भेटून म्हणाला, "तुमचा सल्ला अगदी परिणामकारक ठरला. राजाला तुमच्यासारखे सल्लागार हवेत. माझी दरबारांत ओळख आहे. मी हा विषय महाराजांकडे काढूं कां?"



दिनपालने नकारार्थी मान हालवीत म्हटले,

''मला राजधानीत राहायला आवडत नाही. माझी प्रकृति तिथे बिघडेल. माझ्या वैद्यांनी मला लक्ष्मीपुरला जायचा सल्ला दिला आहे. मी तिथे राहीन किंवा घरच खरेदी करीन. खरं तर तिथे एक चांगले घर रिकामे आहे. पण ते घर ग्रामाधिकाऱ्याच्या ताब्यांत आहे. तो ते भाड्यानेही देत नाही किंवा विकायलाही तयार नाही. जर तुमच्या शब्दाला राजाकडे कांही किंमत असेल तर मला ते घर मिळवून द्यायची व्यवस्था कराल कां?''

राजाने संतोषाने म्हटले,

''हो करीन ना. उद्यांच तुम्ही लक्ष्मीपुरला जा. तिथे तुम्हाला ते घर मिळेल.''

लक्ष्मीपुरचा ग्रामाधिकारी अत्यंत स्वार्थी व भ्रष्टाचारी होता. त्या दोन्ही घरांमधे मोकळी जागा बरीच होती. त्याच्या घरांतला सगळा केरकचरा तिथे टाकला जात होता.

दुसऱ्याच दिवशी वेषांतर केलेला राजा दिनपालला घेऊन लक्ष्मीपुरला गेला. ते ग्रामाधिकाऱ्या भेटले आणि राजाच्या सहीचे पत्र त्याला दिले.

त्यानुसार ग्रामाधिकारी ते घर दिनपालला नाईलाजाने विकायला तयार झाला. कांही दिवसानंतर दिनपाल त्या घरांत आपला परिवार घेऊन राहायला आला.

एक दिवस त्याने ग्रामाधिकाऱ्याला सांगितले, ''तुमच्या घरांतल्या लोकांना सांगा कीं यापुढे या जागेंत केरकचरा टाकू नका.''

''पहिल्यापासूनच इथे उकीरडा आहे. हा थोडाच फुलांचा बगिचा आहे?'' ग्रामाधिकाऱ्याने उर्मटपणे सांगितले.

दिनपालने तिथे साफसूफ करुन फुलझाडे लावली. तर त्या अधिकाऱ्याने तिथे गुरे चरायला आणली. म्हणून दिनपालने त्या जागेला चारी बाजूंनी कुंपण घातले व एक माळी नेमला. गांवातले जे लोक फुले मागतील त्यांना फुकट फुले द्यावीत असेही त्याने त्या माळ्याला सांगून ठेवले. गांवात दिनपालबद्दल प्रेम व आदर वाटायला लागला.

राजाला ही सारी माहिती वेळोवेळी समजत होती. ग्रामाधिकाऱ्याची दुष्कृत्येही कळत होती. त्यावर काय उपाय करावा या विचारांत राजा होता. तेवढ्यांत राजाच्या खास मर्जीतल्या



सोनाराच्या घरांत एक विचित्र समस्या उभी राहिली.

सोनाराच्या आईची दासी गंगा, हिच्या घरांत सोनाराच्या पत्नीसाठी केलेला मोत्यांचा हार मिळाला; आणि त्याच्या पत्नीची दासी यमुना, हिच्या घरांत सोनाराच्या आईची पोंवळ्यांची माळ सांपडली.

दोघी मालकिणी आपापल्या दासी अगदी प्रामाणिक व विश्वासू आहेत अशी ग्वाही देत होत्या. आणि दुसरीला शिक्षा व्हावी म्हणून आग्रह धरीत होत्या.

सुसेन राजाकडे सोनार हा प्रश्न घेऊन आल्यावर राजा त्याला सरळपणे म्हणाला,

''तुझ्या समस्येचे उत्तर लक्ष्मीपुरांतला दिनपालच देऊं शकेल. मी त्याच्या नांवाने एक पत्र देतो; त्याखेरीज त्या गांवात ओसाड जमीन आहे, तिचा उपयोग गांवाच्या कल्याणासाठी कसा करता येईल, त्याबद्दलही नवी योजना हवी आहे. जो कुणी चांगला उपाय सुचवेल व तुझ्या समस्येलाही मार्ग सुचवेल, तो नवीन ग्रामाधिकारी होईल.''

राजाचे मोहरबंद पत्र घेऊन सोनार दिनपालकडे गेला.

त्याचवेळी ग्रामाधिकारी गांवकऱ्यांसमोर दिनपालने ओसाड जागेत फुलझाडे लावून कसा गुन्हा केला आहे, ते सांगत होता.

राजाचे पत्र त्याला दिल्यावर त्याने ते वाचले. तो बावरला त्याला कांही त्यावर बोलता येईना



किंवा उपाय सांगता येईना. तेव्हां दिनपाल पुढे येऊन म्हणाला,

''याला अगदी सरळ साधा उपाय आहे. तुमच्या आईच्या दासीला काय शिक्षा द्यावी ते पत्नी ठरवेल, आणि तुमच्या पत्नीच्या दासीला काय शिक्षा द्यायची, ते तुमची आई ठरवेल. म्हणजे प्रश्नाचा उलगडा आपोआप होईल.''

सोनार खूष झाला. त्याने राजाला सांगून दिनपालला नवा ग्रामाधिकारी नेमले. गांवच्या ओसाड जमिनीत वृक्षारोपण केले तर त्या जमिनीतून राजाला आता दरमहा उत्पन्न मिळायला लागेल. राजाच उत्पन्नांत भर पडली व एक चांगले उदाहरण इतरांसमोर सांगता आले असते, हा फायदा आणखी निराळाच होता!''

ही गोष्ट सांगून वेताळ म्हणाला, ''राजन्, राजाने

ज्या समस्या समोर आल्या, त्यांचे निराकरण करण्यासाठी अगदी विलक्षण मार्ग स्वीकारला होता, आणि ते त्याच्या दृष्टीने योग्य नव्हते. आपण स्वतः समस्या सोडवण्याऐवजी लोकांकडून सल्ला घेणे हे त्याची असमर्थता दाखवीत नाही कां? जरी उपाय योग्य असला तरी ते राजाला शोभणारे आहे कां? भ्रष्टाचारी ग्रामाधिकाऱ्याला सरळ काढून टाकायचे आणि त्याच्या जागी विचारी दिनपालची नेमणूक करणे राजाला सहज शक्य होते. गांवातली पडीक जमीन म्हणजे कांही मोठी समस्या नाही. स्वार्थी ग्रामाधिकाऱ्याला वठणीवर आणणे कांही अवघड नसते. त्यासाठी त्या सोनाराला त्या गांवी कशाला पाठवायचं? माझ्या या शंकांची उत्तरे तुला माहीत असूनही जर तू मौन पत्करलेस तर तुझ्या मस्तकाची शंभर शकले होतील.''

विक्रमार्कने वेतालाला शांतपणे उत्तर दिले, ''राजा जेव्हां वेषांतर करुन दिनपालला भेटायला गेला, तेव्हां त्याने आपली खरी ओळख न सांगता समस्येचे उत्तर मिळवले. राजपरिवारांतल्या समस्या राजवाड्याबाहेर जाऊं देता कामा नयेत, या मर्यादेचे त्याने पालन केले.

नवीन ग्रामाधिकाऱ्याची नेमणूक करण्याच्या विषयाबाबत एखाद्या चांगल्या, लायक माणसाची नियुक्ती व्हावी, म्हणून त्याने स्वतः जाण्याऐवजी सोनाराला त्याचा प्रश्न सोडवण्यासाठी लक्ष्मीपुरला दिनपालकडे धाडले.

सुसेनच्या राज्यकारभाराची पद्धत जर नीट पाहिली तर तो आपल्या मित्रांना महत्त्वाची पदे देत सुटला नव्हता, आणि जे पदाधिकारी होते त्यांच्याशीही त्याने जास्त जवळीक दाखवली नव्हती.

कारण राज्यशासन हे गांवच्या ओसाड जमिनीसारखेच असते. त्याचा उपयोग लोकांच्या कल्याणासाठीच करायला हवा. सुसेन राजा शंभर टक्के स्वार्थी व मतलबी नाही. उलट तो एक दक्ष व चतुर राज्यकर्ता आहे.''

राजाचे मौनभंग झाल्यामुळे वेताळ शवासहित पुन्हां अदृश्य झाला आणि झाडावर जाऊन बसला.

*(आधार : 'सुचित्रा'ची रचना)*








# पाऊस आणि बांबू

**मा**णूस (मि), टेकडी (झो) आणि प्रांत (राम)! थोडक्यांत, दुर्गम, डोंगराळ प्रदेश. मिझोराम येथील लोक मंगोलियन वंशाचे आहेत. ते ३०० वर्षांपूर्वी ब्रम्हदेशातून (आत्ताचा म्यानमार) आले. बऱ्याच वर्षापर्यंत या डोंगराळ भागांत पोहोचणंच कठीण होतं. सर्वप्रथम ख्रिश्चन धर्माचे प्रचारक तेथे पोचले व त्यांनी तिथे ख्रिस्ती धर्माचा प्रचार केला.



म्हणूनच मिझोराम येथील जवळजवळ ९५% लोक ख्रिश्चन आहेत. त्यांची लेखन-वाचनाची व बोलीभाषाही इंग्लिश आहे. तसेच त्यांची प्रांतीय बोलीभाषाही इंग्लिश लिपीतच लिहिली जाते.

तिथे वर्षातील नऊ महिने पाऊस पडतो. अशा पावसामुळे तिथे बांबूंची चांगली जोमदार वाढ होते. तेथील लोक बांबूच्या पोकळीमधे तांदूळ सांठवून ठेवतात. मिझोराममधील लोक हे मुळांत कृषिप्रधान आहेत. त्यामुळेच त्यांचे सण-समारंभही शेतीतील गोष्टींशी संबंधित आहेत. मिझो भाषेत सणाला कुत म्हणतात. त्यांचे तीन महत्त्वाचे सण म्हणजे चाप्चर कुत, मिम कुत आणि पॉल कुत.

तेथील बांबूचा नाच हा सर्वच सणांमधील महत्त्वाचा भाग आहे. बांबूचा नाच करताना प्रत्येकाने अतिशय सावध, चपळ असावे लागते, नाहीतर पायाला जोरांत मार बसतो, किंवा अडखळून जोरांत पडायला होतं.

देशविदेशी दंतकथा (कोरिया)

# राजा धडा शिकला

त्याचं असं झालं की राजाला दोन मुलगे होते. दुसरा राजपुत्र त्याच्या निपुत्रिक मामाच्या मांडीवर दत्तक गेला होता. पण दहा वर्षानंतर राजाचा थोरला मुलगा संन्यास घेऊन पर्वतराजींतल्या अरण्यांत राहायला गेला. इकडे त्या मामालाही मुलगा झाला. म्हणून दत्तक गेलेला मुलगा पुन्हां आपल्या पहिल्या घरी आला.

बहुधा त्या राजपुत्राला आपला अशा तऱ्हेने वापर केलेला आवडला नसावा - प्रथम घरांतून दुसऱ्या घरांत देणे, आणि नंतर तिथे नकोसे झाल्यावर पुन्हां परत स्वगृही येणे. तो एक मनस्वी, तापट तरुण झाला. तो कधी हंसत नसे किंवा कुणाशीही बोलत नसे. सगळ्यांत कहर म्हणजे तो कुठलाही अभ्यास करीत नसे. सर्वांशी तो अतिशय उर्मटपणे वागत होता.



राजपुत्राच्याबाबतीत राजा जास्तच उतावीळ व अधिरा होऊं लागला होता. आणि साहजिकच इतरांच्याबाबतीत देखील आततायी होऊं लागला.

राजाने अनेक विद्वान शिक्षक त्याला शिकवण्यासाठी म्हणून नेमले. पण एकही धडा न शिकवता प्रत्येकजण परत गेला. शिक्षकांनी जर राजपुत्राला बोलावून जवळ येऊन बसायला सांगितले, तर तो त्यांच्याकडे जळजळीत नजरेने पाहून तिथून आपल्या शय्यागृहांत उद्धटपणे निघून जाई. शिक्षकांनी त्याला शिस्त लावायचे अनेक प्रयत्न केले, पण कांहीही उपयोग झाला नाही. साहजिकच शिक्षक निमूटपणे नोकरी सोडून निघून जात होते. राजाला भेटून सांगण्याचे धाडस त्यांना होईना.

"सरकार, राजपुत्रावर कुणीतरी चेटूक केलं असलं पाहिजे." मंत्री म्हणाला. "मग? त्यांतून सुटका कशी करायची?" राजाने उलट विचारले.

"आपल्याला नाही करता येणार; पण एक विद्वान साधू त्यांतून आपली सोडवणूक करूं शकेल. नदीच्या कांठावर, डोंगराच्या पायथ्याशी, आपल्या गांवापासून जवळच त्यांची झोपडी आहे. पण त्यांना सहसा लोकांना भेटायला आवडत नाही.



पण आपण जर त्यांच्याकडे गेलात तर बहुतेक ते आपल्याला भेटतील, आणि या समस्येतून राजपुत्राला बाहेर कसे काढता येईल त्याचे मार्गदर्शन करतील." मंत्र्याने खुलासा केला.

आपल्या सूज्ञ मंत्र्याचा सल्ला ऐकायचा असे राजाने ठरवले. तो एकटाच घोड्यावर बसून त्या साधूकडे गेला. त्याला वंदन करुन, राजा नम्रपणे गुडघे टेकून खाली बसला व साधूला त्याने आपला परिचय करुन दिला. "माझ्यासारख्या गरीबासाठी एक राजा बरेच कांही करूं शकतो. राजासाठी मी काय करूं शकणार?" साधूने विचारले.

"साधू महाराज, या क्षणीं राजा असलो तरी मी सर्वांत गरीब व दुर्दैवी माणूस आहे." राजाने दीनवाण्या सुरांत आपली समस्या साधूला सविस्तर सांगितली. थोड्या वेळानंतर साधू गंभीरपणे म्हणाला, "हे पहा, मी तुझ्या मुलाला शिक्षण देण्यासाठी मदत करूं शकेन. पण त्यापूर्वी तू मला वाघाच्या मिशा आणून दिल्या पाहिजेस. आणि त्याही वाघ पूर्णपणे जागा असताना, तुझ्या हाताने त्या कापायला हव्यात!" राजा निराशेने उठून उभा राहिला, "वाघाच्या मिशा? साधूमहाराज, ही तर अगदी अशक्य कोटीतली गोष्ट आहे."

"माणसाचा स्वभाव बदलण्याइतकी अशक्य निश्चितच नाही! तू जा, प्रयत्न कर. आशा सोडू नकोस पुत्रा!" साधूने त्याला धीर देत म्हटले.

साधू तिथून उठला आणि रोजच्याप्रमाणे फिरायला निघून गेला. राजाही राजवाड्यांत परतला, तो गंभीरपणे विचार करीतच!

राजाच्या उद्यानांत एक प्राणीसंग्रहालय होते, व त्यांत एका पिंजऱ्यात एक वाघ होता. त्याने तिथल्या रक्षकाला बोलावून विचारले कीं वाघाला स्पर्श करता येतो कां?



"महाराज, आपला हा वाघ रागीट आहे. मी त्याचे जेवण पिंजऱ्यात ढकलून ठेवतो, पण मी वाघाच्याजवळ कधीही जात नाही." तो सेवक म्हणाला.

पण साधूच्या स्पष्ट व ठाम बोलण्याचा राजाच्या मनावर प्रभाव पडला होता. राजाने एक धाडसी बेत ठरवला. संध्याकाळी त्याने वाघासाठी जेवण नेले, ती थाळी पिंजऱ्याच्या आंत ढकलली आणि राजा तिथेच थांबला. वाघ गुरगुरला, त्याने ते जेवण फस्त केले व राजाकडे नुसतेच बघितले. राजाने हाच क्रम पुढील पंधरा दिवस चालूं ठेवला. नंतर ती थाळी पिंजऱ्यात ढकलण्याऐवजी, राजा ती हातांत धरुन ठेवूं लागला व वाघ पुढे येण्याची वाट पाहूं लागला. वाघाने जरा साशंक नजरेने राजाला न्याहाळले, पण थोडा वेळ वाट पाहून तो पिंजऱ्याच्या दाराजवळ आला. राजाने थाळी घट्ट

धरली होती, आणि वाघाने त्या थाळींतले अन्न संपवले. थाळी राजाच्या हातांतच होती.

हीच पद्धत राजाने कांही दिवस वापरली. एके दिवशी थाळींतले अन्न खाल्ल्यानंतर वाघाने राजाचा हात चाटला. त्या प्राण्याने आपले प्रेम व्यक्त केले असे राजाला जाणवले. त्यानंतर रोज वाघ राजाचा हात चाटत होता. कांही दिवसानंतर राजाने वाघाच्या डोक्यावरुन हात फिरवला. वाघालाही राजाचा प्रेमळपणा जाणवला असावा. हे असे सुमारे महिनाभर चालले. वाघाला गोंजारताना राजा प्रेमळ स्वरांत कांहीतरी बोलत असे, आणि वाघाला ते आवडत होते असे दिसले. एका दिवशी, तो वाघाशी प्रेमाने बोलत असताना राजाने लहानशी कात्री हातांत धरलेली होती. त्याने हळूंच मिशीतल्या केसाचा तुकडा कापला. वाघाने तिकडे लक्षच दिले नाही.

राजा आनंदाने फुलला. तो दौडतच साधूकडे गेला आणि त्याने तो केस त्याला अभिमानाने दिला. साधूने समाधानाने मान डोलावली आणि तो तुकडा जवळच्या चुलीत फेकून दिला.



''राजन्, आता तुझ्या मुलाला माणसाळवायचे कसे, हे तुझ्या लक्षांत आले असेलच. होय ना? कोणताही मुलगा वाघापेक्षां जास्त उग्र व धोकादायक असूंच शकणार नाही. तुझा मुलगा कोणत्याही शिक्षकाच्या हातांत सोंपवायच्यापूर्वी तू स्वतः त्याला शिस्त लाव; म्हणजे त्याच्याशी बोल, त्याला गोष्टी सांग, त्याच्याशी मैत्री कर; वाघाशी केलीस ना तशीच! आणि त्यानंतर त्याने शिक्षणांत लक्ष घालावे, म्हणून त्याचे मन वळव. बरोबर आहे ना? आता जा आणि हे काम आत्मविश्वासाने आणि निश्चयपूर्वक करुन बघ- अगदी वाघाची मिशी जशी आणलीस ना, त्याच तडफेने कर. तुला नक्की यश मिळेल बघ!'' साधूने आशिर्वाद दिला आणि तो नेहमीप्रमाणे फिरायला निघून गेला.

राजा राजवाड्यांत परत गेला आणि त्याने हा नवा उपदेश अंमलात आणायला सुरवात केली. आपला पिता हा एक प्रेमळ, हितचिंतक आहे व आपल्या मनांतल्या इच्छा आकांक्षा तो जाणतो, हे राजपुत्राला उमगले. राजालाही आपला मुलगा बेपर्वा नसून एक बुद्धिमान, तडफदार तरुण आहे, व त्याला आता शिक्षण घेण्याची इच्छा आहे हे कळले.

''प्रथम मी धडा शिकलो आणि त्यानंतरच मी माझ्या मुलाला धडा देऊं शकलो!'' राजाने आनंदाने मंत्र्याला सांगितले. मंत्र्यालाही खूप समाधान वाटले. (एम्.डी.)



# सगळीच लबाडी

हेलापुरीत राहाणारा माधव हा सामान्य परिस्थितीतला होता. पण त्याच्या पत्नीला, नीरजाला मात्र नटून थटून राहाण्याची व थाटमाट करण्याची दांडगी हौस होती.

नीरजाच्या नात्यांत एक लग्न ठरलं आणि त्या दोघांना त्या लग्नाचं निमंत्रण आलं.

त्याप्रसंगी गळ्यांत घालण्यासाठी नीरजाजवळ चांगलासा सोन्याचा हार नव्हता.

तिची शेजारीण श्यामला हिच्या गळ्यांत चमचमणारा हार पाहून तिला तो हार घालून मिरवायची इच्छा झाली. श्यामलाने तिला लग्नांत घालायला हार दिला. पण घरी परत आल्याबरोबर तो हार परत देण्याच्या अटीवरच तिने दिला. मोठ्या आनंदाने नीरजाने तो हार गळ्यांत घातला आणि ती त्या नातेवाईकांकडे लग्नाला गेली. आठवडा होऊन गेला तरी नीरजाने तो हार श्यामलाला परत दिला नाही. श्यामलानेही तो मागितला नाही.

दहा दिवसानंतर रागारागाने नीरजा श्यामलाकडे गेली आणि तिने तो हार तिच्या हातांत देऊन म्हटले, ''जगांत इतके लबाड लोक असतात याची मला कधी कल्पनाच नव्हती. सोन्याचा हार सांगून तू मला खोटा पितळेचा हार दिलास!'' तिचा आवाजही कर्कश होता.

तरीही शांतपणे श्यामला म्हणाली, ''मी कधी तुला म्हटलं कीं हा सोन्याचा हार आहे म्हणून? तुला घालायला हवा होता, तो मी दिला. पण तुला कसं कळलं की हार सोन्याचा नसून नकली आहे तो?'' त्यावर नीरजा संतापाने म्हणाली, ''जरा पैशाची नड होती, म्हणून मी तो सावकाराकडे गहाण टाकायला नेला होता. त्याने दगडावर घासून पाहिले आणि हा हार खोटा, नकली आहे असे सांगितले!''

हे उत्तर ऐकून श्यामला थक्क झाली.

*-मृदुला सावंत*



## उंच आणि बलवान



सध्या बंगलोर येथे स्थायिक असलेला, परंतु मूळचा पंजाब येथील मनोजकुमार चोप्रा (वय वर्षे ३५) हा जगातील सर्वात बलवान माणूस होऊ पहातोय. त्याची उंची ६ फूट ५ इंच आहे. २००२ साली त्याने भारतातील सर्वात बलवान व्यक्ती होण्याचा मान मिळवला होता. तसेच २००४ साली तो संपूर्ण आशियातील सर्वात बलवान व्यक्ती ठरला होता. आता त्याला जागतिक विक्रम नोंदवायचा आहे. त्याच्या पराक्रमांमधे जाडजूड टेलिफोन डिरेक्टरी सहज फाडणे, धातूची नंबरप्लेट सहज वाकविणे, पत्रा सहज वाकविणे, आणि गरम पाण्याची बाटली फुग्यासारखी फुगवून फोडण्याचा समावेश आहे. त्याच्या अशा प्रेरणादायी प्रयोगानंतर मात्र तो मुलांना त्यांची जाडजूड पुस्तके - वह्या, न फाडण्याविषयी सांगतो. मग प्रेक्षकांच्या टाळ्या आणि उत्साह जसा वाढत जाईल, तसे तो त्यांना फुगे वाटून ते फुगविण्यास सांगतो. तेव्हां मात्र सगळे चकित होतात. कारण फुगविल्यानंतर त्या फुग्यांना प्राणी, पक्षी, आणि कार्टून्सचा आकार येतो.

## जास्त लोकसंख्या



'यूनो'च्या फेब्रुवारीत प्रसिद्ध झालेल्या आकडेवारीनुसार जगातील सर्वात जास्त लोकसंख्या असणाऱ्या पहिल्या दहा शहरांमध्ये भारतातील तीन शहरांचा समावेश होतो. ती शहरे म्हणजे मुंबई (१.८३ कोटी), दिल्ली (१.५३ कोटी) आणि कलकत्ता (१.४३ कोटी). टोकियो हे जगातील सर्वात जास्त म्हणजे ३.५३ कोटी लोकसंख्या असणारे शहर आहे. त्याच्या खालोखाल मेक्सिको (१.९२ कोटी) आणि न्यूयॉर्क (१.८५ कोटी) ही शहरे येतात. त्यानंतर मुंबईचा नंबर लागतो. या अहवालासुमार जगातील अर्धे म्हणजे ३२५ कोटी लोक हे शहरांत रहातात व २००७ सालापर्यंत ही संख्या ५०० कोटीपर्यंत जाण्याची शक्यता आहे.













मला रंगवा आणि आनंद मिळवा.









# अति लोभाचे फळ



मदुराईत घडलेली ही गोष्ट पांड्यन राजवटीमधे मदुराई हे एक भरभराटीस आलेले शहर होते. तिथे चामी नांवाचा एक झाडूवाला रहात असे. रोज सकाळी लवकर उठून त्याला त्याचं काम करावे लागे.

तेथील राजा दररोज नेमाने देवदर्शनास जाई. त्यामुळे रस्ते अगदी स्वच्छ ठेवावे लागत. राजा दोन घोड्यांच्या सोनेरी बग्गीतून येत असे. तो येण्यापूर्वी त्याचे दोन अंगरक्षक रस्त्यांची पहाणी करून जात. त्यामुळे चामीला अगदी डोळ्यांत तेल घालून रस्त्यांची सफाई करावी लागे.

एके दिवशी राजाचे अंगरक्षक रस्त्यांची पहाणी करून जात असतां चामी त्यांच्याकडे निरखून पहात होता. त्या अंगरक्षकांनी लाल भरजरी पोशाख करून त्यावर जांभळे रेशमी फेटे बांधले होते. चामीच्या मनांत आलं, ''राजाचा अंगरक्षक होण्यांत किती मजा असेल नाही?''

चामी लवकर काम आटोपून घरी आला तेव्हां त्याची बायको मीनाक्षी, वेणी घालत होती. अंगणातल्या विहिरीवर पटकन हातपाय धुवून चामी पलंगावर येऊन बसला. नंतर मीनाक्षीने त्याला पेलाभर दूध आणून दिले तेव्हां तो तिला म्हणाला, ''मीना, मी असे सुंदर घोडे कधीच पाहिले नाहीत. प्रत्यक्षांत त्या घोड्यांवर बसण्यात तर किती मजा असेल!''

मीनाक्षीने विचारले, ''तुम्ही राजाच्या अंगरक्षकांच्या घोड्यांविषयीच बोलता आहात ना? पण तुम्ही त्या घोड्यांवर बसायला खूप घाबराल.''

चामीही तिच्या मागोमाग स्वयंपाकघरात गेला आणि जणू पैज लावल्यासारखा म्हणाला, ''मी मुळीच घाबरणार नाही आणि एक दिवस मी हे सिद्ध करून दाखवीन.''

त्यावर मीनाक्षी चिडून म्हणाली, ''इथे

आपल्याला पुढच्या जेवणासाठी पुरेसं अन्न मिळायची पंचाईत, आणि या अशा धोंड्यां-विषयीच्या गप्पा मारणं किती मूर्खपणाचं आहे! येत्या पावसाळ्यापूर्वी आपल्याला आपल्या घराच्या छताची डागडुजी करणे आवश्यक आहे. त्यासाठी तुम्ही डोंगरावर जाऊन घराच्या डागडुजीकरिता पुरेशा पैशाची प्रार्थना कां करीत नाही? असो, आता मला जमीनदारांच्या घरी जाऊं दे. आज त्यांच्या नातवाचा वाढदिवस आहे. त्यामुळे तिथे खूप काम असेल, आणि कदाचित मला थोडे जास्त पैसे, आणि आपल्या दोघांकरिता कांही खायलाही मिळेल."

दुसरा कांहीच मार्ग नसल्याने चामी म्हणाला, "मीनाक्षी, तू म्हणते आहेस तर मी डोंगरावर जाऊन प्रार्थना करतोच. मी परत येईपर्यंत आपल्या दोघांच्या जेवणाची कांही व्यवस्था होते कां ते पहा."



"तिचा माझ्यावर विश्वास नाहीये. पण आता देव असो वा नसो, मी डोंगरावर जाणारच" असे पुटपुटत चामी चालू लागला. त्याने मागे वळून पाहिले तेव्हां त्याला मीनाक्षी त्याच्या विरुद्ध रस्त्याने भराभरा चालत कामावर निघालेली दिसली. त्याला घराच्या भिंतीला टेकवून ठेवलेला त्याचा झाडूही दिसला. त्याला आठवण झाली की उद्या सकाळी राजा देवदर्शनाला निघण्यापूर्वी रस्ते साफ करण्याकरिता त्याला परत आलं पाहिजे.

भराभर चालत चामी काळ्या डोंगरापाशी पोचला. डोंगराच्या पायथ्याशी आल्यावर त्याने दगडांची चढण चढायला सुरुवात केली. थोड्या उंचीवर गेल्यावर चामीला एक गुहा दिसली, त्याबरोबर त्याला थोडी विश्रांति घ्यायची इच्छा झाली. आपले गुंडाळलेले पागोटे उशाशी घेऊन चामी तिथेच कलंडला, आणि त्याला अगदी गाढ झोप लागली.

"चामी! ऊठ!" असा आवाज आल्यावर चामीला वाटले आपल्याला कांहीतरी स्वप्न पडते आहे. पण नाही, चामीला कोणीतरी हलवून जागे करत असल्याची जाणीव झाली. चामी डोळे चोळत उठून बसला, त्याने इकडे-तिकडे पाहिले, पण तिथे तर कोणीच नव्हते.

पण पुन्हां तोच आवाज आला, "चामी, तू इथे डोंगरावरच्या देवाला भेटायला आला आहेस ना? मीच तो मलैवण्णन आहे. तुझ्या पाठीमागे तुला एक शंख सांपडेल. प्रत्येक वेळी तो शंख फुंकताना, तू मनांत जी इच्छा धरशील ती पूर्ण होईल. अशा प्रकारे अन्नधान्य, पैसा-पाणी, कापड, घरदार, तुला जे कांही हवे असेल ते सगळे मिळेल."



चामी उभा राहिला आणि त्याने मागे वळून पाहिले. तिथे जमिनीवर खरोखरीच एक चमकणारा पांढराशुभ्र शंख त्याला दिसला. त्याने पटकन तो शंख उचलून आपल्या पागोट्याच्या एका टोकाला बांधला आणि तो परत घरी निघाला. हळूं हळूं अंधार पडूं लागला होता त्यामुळे चामी भराभरा चालू लागला. तो तसाच सावधपणे चालत राहिला. थोड्याच वेळांत त्याला मिणमिणता उजेड दिसला, ते रस्त्याच्याकडेला असलेले एक अतिथीगृह होते. चामीने रात्री तिथेच मुक्काम करायचा ठरवले आणि एक खोली घेतली. अतिथीगृहाच्या मालकाने चामीला खोली दाखविली आणि तो त्याच्यासाठी जेवण आणायला गेला. तेवढ्यांत त्याला शंख फुंकल्याचा आवाज ऐकू आला. कोण होतं ते? कुठून आला बरं हा आवाज?



या विचारातच अतिथीगृहाचा मालक चामीसाठी जेवण घेऊन आला आणि त्याला वाढता वाढता सहजपणे त्याने विचारले, "आत्ता तुम्ही शंख फुंकला का?" चामी म्हणाला, "हो, मीच फुंकला." आणि त्याने त्याला तो पागोट्यात बांधलेला शंखही दाखवला. जेवता-जेवता चामीने त्या मालकाला तो डोंगरावर कशासाठी गेला होता, तिथे डोंगराच्या देवाने प्रसन्न होऊन त्याला शंख कसा दिला, वगैरे सर्व हकीकत सांगितली. तसंच तो म्हणाला की इथल्या खोलीचे भाडे, जेवणखर्च देण्यासाठी त्याला पैसे हवे होते म्हणून त्याने शंख फुंकला.

अतिथीगृहाचा मालक हा एक अतिशय लोभी मनुष्य होता. तो चामी झोपण्याचीच वाट पहात होता आणि त्याला झोप लागल्यावर तो चोरपावलांनी त्याच्या खोलीत शिरला. त्याने चामीच्या पागोट्यांत बांधलेला शंख काढून घेऊन तसाच दुसरा शंख त्याच्या पागोट्यांत बांधून ठेवला. सकाळी चामी त्याला खोलीभाडे आणि जेवणाचे पैसे देऊं लागला. पण नम्रपणे ते पैसे नाकारुन मालक त्याला म्हणाला, "आपल्यासारख्या सद्गृहस्थाची भेट झाली हे माझे परम भाग्यच! आता तुम्ही माझे पाहुणे आहात. पुन्हां कधीही इकडे आलात की माझ्याकडे अवश्य या आणि माझा पाहुणचार घ्या."

चामीने त्याचे आभार मानले आणि तो लगबगीने घरी आला. वाटेत तो विचार करत होता, "आता मी झाडूवाल्याचे काम कशाला करायचे? आता माझ्या इच्छेप्रमाणे सर्व कांही मला मिळूं शकेल."

मीनाक्षीने हसून चामीचं स्वागत केलं आणि



त्याला प्यायला पेलाभर दूध आणून दिलं. तिनं विचारलं, "बरं, मला सांगा, तुम्हाला डोंगरावरचा देव भेटला का?"

चामी म्हणाला, "तुला तुझा नवरा म्हणजे कोण वाटला?" मग त्यानं तिला सारी हकीकत सांगितली आणि पागोट्यांत बांधून आणलेला तो शंखही दाखविला.

आता मीनाक्षीची उत्सुकता शिगेला पोचली. "मला पाहू दे! मला पाहू दे!" असं म्हणत तिनं तो शंख त्याच्याकडून काढून घेतला आणि श्रद्धापूर्वक म्हणाली, "हे जादूच्या शंखा! तू मला एक सोन्याचं नाणं देशील का?" मग तिने शंख फुंकला पण कांहीच घडलं नाही.

मग मीनाक्षी चामीला म्हणाली, "हा माझ्यासाठी उपयोगी दिसत नाही. तुम्ही प्रयत्न करून बघा." तिच्याकडून चामीने तो शंख घेतला आणि कांहीही इच्छा मनांत न धरता तसाच तो फुंकला. पण कांही आवाजच आला नाही. त्याने आणखी काही वेळा वेगळ्या प्रकारांनीही शंख फुंकून पाहिला, पण कांहीच उपयोग झाला नाही.

एकदम चामीच्या लक्षांत आलं कीं काल रात्री मात्र ह्या शंखाचा उपयोग झाला होता. तो मीनाक्षीला म्हणाला, "काल रात्री मनांत इच्छा धरुन मी शंख फुंकला तेव्हां मला त्याने चांदीची दहा नाणी दिली होती. अतिथीगृहाच्या मालकाने माझ्याकडून कांहीच पैसे घेतले नाहीत त्यामुळे ती नाणी तशीच माझ्याकडे आहेत." असे म्हणून त्याने मीनाक्षीला ती दहा नाणी दाखविली.

त्यावर ती चामीला म्हणाली, "नीट बघ, हा तोच शंख आहे का जो तू रात्री फुंकला होतास? मला तरी वाटतंय त्या अतिथीगृहाच्या मालकाने तुला फसवलं आहे. त्यानं तुझा तो जादूचा शंख काढून घेऊन त्याऐवजी हा साधा शंख ठेवला असला पाहिजे."

मग चामीने तो शंख नीट निरखून पाहिला आणि म्हणाला, "तुला शंका येतेय तसंच आता मलाही वाटूं लागलंय की हा तो जादूचा शंख नाहीये. तो शंख अगदी पांढराशुभ्र होता. हा तर मळकट दिसतो आहे."

मीनाक्षी म्हणाली, "मी तुला सांगते आता काय करायचं ते. आता तू तुझ्या कामावर जा आणि संध्याकाळी मात्र पुन्हां त्या अतिथीगृहात जा कालच्यासारखीच रहाण्यासाठी एक खोली घे आणि गप्पांच्या ओघात त्या मालकाला सांग की एका योगी पुरुषाने मला एक शंख दिला आहे आणि तो चांदीऐवजी सोन्याची नाणी देतो. आणि मग पाहा काय होतं ते!"



चामी गडबडीने आपल्या कामावर निघून गेला. काम संपवून चामी घरी आला आणि त्याने थोडी विश्रांती घेतली. नंतर लगेचच तो त्या अतिथीगृहांत जाण्यासाठी निघाला.

अतिथीगृहाच्या मालकाला आज चामी परत तिथे आलेला पाहून आश्चर्य वाटले. जेवणाच्या वेळी चामी व तो मालक गप्पा मारीत होते. तेव्हां चामीने सहजपणे त्या मालकाला योगी पुरुषाकडून मिळालेल्या शंखाविषयी सांगितले. जेवणानंतर चामी त्याला म्हणाला, "मी खूप दमलो आहे. तेव्हां आता लगेचच खोलीवर जाऊन झोपतो."

चामी खोलीत आला आणि सावधपणे नुसतेच डोळे मिटून झोपेचे नाटक करू लागला. थोड्या वेळाने मालक चोरपावलांनी चामीच्या खोलीत आला. कालच्याप्रमाणेच त्याने शंखांची अदलाबदल केली आणि निघून गेला.

तो गेल्यावर चामीने जादूचा शंख आपल्याकडे परत आल्याची खात्री करून घेतली आणि मग झोपला. पहाटे लवकरच चामी उठला. त्याने मालकालाही उठवले व पैसे देऊ केले. पण आजही मालकाने त्याच्याकडून खोलीभाडे व जेवणखर्च घेण्यास नकार दिला.

जादूच्या शंखासहित चामी घरी परत आला. पुढील कांही दिवसांतच त्याच्या आणि मीनाक्षीच्या सर्व इच्छा पूर्ण झाल्या. घराची चांगली डागडुजी झाली, चामीला राजाच्या अंगरक्षकाची रुबाबदार नोकरी मिळाली.

इकडे अतिथीगृहाचा मालक मात्र पश्चात्ताप करं लागला. अति लोभापायी तेलही गेले आणि तूपही गेले, अशी त्याची अवस्था झाली होती. मालकाच्या मनांत झाले 'आता पुन्हां मात्र चामी आणखी एखाद्या जादूच्या शंखाविषयीची नवीन गोष्ट सांगत येईल असे वाटत नाही.' पण चामी पुन्हां एकदा त्या अतिथीगृहांत गेला. यावेळी मात्र तो लाल भरजरी पोशाखांत काळ्या सुंदर घोड्यावर बसला होता. मालकाला आश्चर्यच वाटलं. राजाचा अंगरक्षक आणि त्याच्या अतिथीगृहात पाहुणा म्हणून?

चामी मिस्कीलपणे मालकाला म्हणाला, "तू



आत्तापर्यंत किती सोन्याची नाणी जमविलीस ते विचारायला फक्त मी आलो आहे!" मालकाने आता चामीला ओळखले आणि आश्चर्याने तो म्हणाला, "राव, तुम्ही? मला माफ करा राव! मी चुकलो."

चामी त्याच्या घोड्यावर स्वार झाला, त्याने मालकाकडे पाहून हात हालवला आणि तो पुढे निघून गेला.

## वाचकांसाठी कथास्पर्धा

## सर्वोत्कृष्ट प्रवेशिकेला रु. २५०/-चे पारितोषिक

*खाली दिलेली गोष्ट नीट वाचा:*



गोपाळचे एक नातेवाईक मानसोपचार केंद्रात उपचार घेत होते. एक दिवस तो त्या नातेवाईकांना भेटायला गेला. तेव्हां त्याला स्वागतकक्षांत बसून थोडा वेळ वाट पहाण्यास सांगण्यात आले. थोड्या वेळाने एक माणूस गोपाळ बसला होता त्याच बाकावर येऊन बसला. कांही वेळाने गोपाळ त्या माणसाला म्हणाला, "तुम्हीही इथे कोणा रुग्णाला भेटायला आला आहात कां?" त्यावर तो माणूस म्हणाला, "मी गेल्या चार महिन्यांपासून इथेच आहे. मला मनोरुग्ण समजून माझ्या नातेवाईकांनी इथे मला आणून सोडलं आहे."

तेव्हां गोपाळ त्याला धीर देत म्हणाला, "पण तुम्ही तर अगदी ठीक दिसताहात."

त्यावर अगतिकपणे तो माणूस म्हणाला, "मला भीती वाटते की इथल्या उपचारांनी माझी स्थिती आणखीनच बिघडत चालली आहे." पुढे तो म्हणाला, "ते असो, तुम्हाला काय आवडते? खडावा की चामड्याच्या चपला?"

गोपाळ म्हणाला, "अर्थातच चामड्याच्या चपला."

त्यावर त्या माणसाने विचारले, "वा! पण त्या तुम्हाला कशा आवडतील? तळलेल्या की उकडलेल्या?"

तुम्हाला वरील गोष्ट विनोदी वाटली का? तुम्ही याचा शेवट कसा कराल? तुम्हाला शक्य असल्यास १००-१५० शब्द वापरुन ती आणखी विनोदी करा. गोष्टीला योग्य ते नांव द्या व आमच्याकडे पाठवा. त्यासोबत खालील कुपनही भरून पाठवा तसेच पाकीटवर "वाचा आणि सुचवा" असे नमूद करा.

**शेवटची तारीख : ३० सप्टेंबर २००५**

नांव ........................................ वय ..................

जन्मतारीख .................... शाळेचे नांव ....................

घरचा पत्ता ..................................................

..................................................

.................................... पिनकोड ....................

पालकांची सही — स्पर्धकाची सही

CHANDAMAMA INDIA LIMITED
82 Defence Officers Colony, Ekkatuthangal, Chennai - 600 097.





# नीतिमान्

काशीराजा ब्रम्हदत्त याचा पुत्र म्हणून बोधिसत्वांनी जन्म घेतला. ब्रम्हदत्ताने त्यांचे नांव शीलवान् ठेवले.

शीलवानने राजाला उचित अशा विद्यांचे शिक्षण घेतले. धर्मशास्त्रांचा सखोल अभ्यास केला आणि मोठेपणी तो काशीराज्याचा राजा बनला. तो प्रजेला आपली मुले मानीत असे. प्रजेवर त्याचे फार प्रेम होते, प्रजाजनांचा तो आदर करीत असे. गुन्हेगारांना तो दयेने वागवीत असे व त्यांची जीवनशैली सुधारावी म्हणून खूप प्रयत्न करीत असे.

दारिद्र्य व अज्ञान, या कारणांमुळे जे चोरी करीत होते, त्यांना तो कडक शिक्षा देत नव्हता. उलट त्यांना जवळ बोलावून घेत होता. जरूर पडल्यास त्यांना पैशाची मदत करुन, त्यांना उपदेशाचे चार शब्द सांगून, घरी परत धाडत असे. यामुळे त्याच्या राज्यांत गुन्हेगारांची संख्या कमी होत गेली व प्रजेत एकमेकांविषयी आदराची भावना व श्रद्धा वाढत गेली.

कोसल देश हा काशीराज्याच्या जवळचाच देश होता. त्या देशाच्या मंत्र्याला काशीराजाचा चांगुलपणा हा त्याचा दोष वाटायला लागला. त्याला वाटलं कीं काशीराज्य सहजपणे जिंकता येईल.

त्याने आपल्या राजाला सांगितलं, "काशीचा राजा शीलवान हा अतिशय दुर्बल आहे. चोर, खुनी, यांना तो शिक्षा करीत नाही. असल्या भेदरट राजाला आपण नक्कीच धूळ चारु शकू."

कोसल राजाचा मंत्र्याच्या बोलण्यावर विश्वास बसला नाही. खरी परिस्थिती जाणून घेण्यासाठी त्याने आपल्या कांही सैनिकांना बोलावून सांगितले, "तुम्ही काशी राज्यांत प्रवेश करा आणि त्यांची गांवे लुटा."

जेव्हां कोसलचे सैनिक काशीराज्याच्या




गांवात शिरले व त्यांनी हल्ला केला, तेव्हां तिथल्या जनतेने त्यांचा प्रतिकार केला, त्यांना पकडले आणि शीलवान राजाकडे नेले.

"तुम्ही परदेशी दिसता. आमच्या गांवावर तुम्ही हल्ला कां केलात?" शीलवानने त्यांना विचारले. "महाराज, पोटासाठी आम्हाला ते करावे लागले." कोसल सैनिकांनी सांगितले.

"तुम्ही जर इतके उपाशी असाल तर माझ्याकडे मागायला यायचंत!" असं म्हणून राजाने त्यांना कांही धन दिले व परत धाडले.

शीलवानचे हे कृत्य पाहून कोसलराजाला आश्चर्य वाटले आणि पुन्हां एकदा शीलवानची परीक्षा घेण्यासाठी त्याने जास्ती सैनिक पाठवले. जेव्हां ते सरहद्द ओलांडून काशीराज्यांत शिरले, तेव्हां तिथल्या जनतेने त्यांना थांबवले आणि पकडून राजासमोर नेले. पण राजाने त्यांना शिक्षा केली नाही. थोडे धन देऊन परत पाठवले. आता मात्र, कोसलराजाला वाटले कीं काशीराजा खराच बावळट व दुर्बळ आहे व त्याच्यावर विजय मिळवणे सहज शक्य आहे. तो मोठी सेना घेऊन काशीराज्यावर चालून गेला.

ही बातमी काशीच्या मंत्र्यांना व सेनाधिकाऱ्यांना जेव्हां त्यांच्या हेरांमार्फत समजली, तेव्हां ते शीलवान राजापाशी जाऊन काळजीच्या स्वरांत राजाला म्हणाले,

"महाराज, कोसलराजाला आपल्या बळाची कल्पना नाही. त्यांच्याशी सामना करण्याची आज्ञा द्यावी. आम्ही त्यांचा पाडाव करूं."

शीलवान युद्धाला राजी नव्हता. त्याने विचार करुन शांतपणे म्हटले,

"विनाकारण रक्तपात नको. त्यांना काशीराज्यच हवं असेल, तर येऊं दे. किल्ल्यांची दारे उघडून त्यांना आंत येऊं द्या."

काशीराजाने एका दूतामार्फत संदेश पाठवला. "शत्रू बनून यायची आवश्यकता नाही. तुम्ही मित्र बनून या!"

कोसलराजा मोठ्या उत्साहाने काशीराज्यांत घुसला.

राजशिष्टाचारांचं भंग करीत तो सैनिकांसह राजसभेत शिरला. आणि आंत येऊन त्याने काशीराजा व मंत्र्यांना दोरखंडाने बांधण्याची आज्ञा दिली.

"अतिथीने असे वागणे योग्य ठरत नाही" काशीराजा म्हणाला. त्यावर कोसलराजाला हंसू आवरेना. बघता बघता त्याच्या सैनिकांनी शीलवान व त्याच्या मंत्र्यांना बांधले आणि त्यांची राजचिन्हे ओढून काढली.

शीलवान व त्याचे मंत्री काशीराज्य सोडून निघून गेले. ते अरण्यांतून जात होते. रात्र झाली तशी ते विश्रांतिसाठी झाडाखाली झोपले. त्या रात्री त्यांनी भोजनही केलेले नव्हते.

मध्यरात्री कांहीतरी गडबड झाल्याचा आवाज आला आणि त्यांची झोंप मोडली. त्यांनी उठून पाहिले तर कांही लुटारु मशाल हातांत घेऊन उभे होते.

लुटारूंनी शीलवानला नम्रपणे म्हटलं, "महाराज, आम्ही चोर आहोत. आपण दया दाखवलीत म्हणून आम्ही आजपर्यंत चोरी न करता शांतपणे जगत होतो. पण आता आमचे हाल सुरु होतील. म्हणून आम्ही रात्रीच राजवाड्यांत घुसलो आणि ही संपत्ती तिथून लुटून आणली. ही घ्या, आपले हे पोशाख, राजचिन्हे आणि तलवारी! आम्ही आपल्यासाठी भोजनही आणले आहे. प्रथम आपण ही राजवस्त्रें नेसावीत, भोजन करावे आणि या संपत्तीचे आता काय करायचे त्याविषयी आज्ञा करावी."

शीलवान व मंत्र्यांनी ती वस्त्रे नेसली व भोजनही केले. नंतर शीलवान त्यांना म्हणाला, "तुमच्या अडचणी कसल्या आहेत, हे नवीन राजाला समजले पाहिजे. ते तुमच्यासाठी कांहीतरी चांगला निर्णय घेतील याची मला खात्री आहे. पण



त्याच्यासाठी तुम्ही ही संपत्ती लुटलीत, हे मात्र चांगले झाले नाही. हे धन घेऊन राजाला नेऊन द्या, आणि ते तुमच्याबद्दल काय निर्णय घेणार आहेत ते विचारा.''

''तो राजा नाही, दरोडेखोर आहे. त्याने आपले राज्य लुबाडले. आमचा त्याच्यावर विश्वास नाही. महाराज, कोणत्याही परिस्थितींत आम्ही त्याच्याकडे जाणार नाही. आमचे महाराज आपणच आहात आणि नेहमीच असाल.'' चोरांनी सांगितले.

पहाटेच निघून काशीराजा मंत्र्यांच्याबरोबर राजसभेत पोंचला. शीलवानला तिथे पाहून कोसलराजाला कांही सुचेना. तो अवाक् झाला.

जे घडलं ते सविस्तर सांगून शीलवान म्हणाला, ''महाराज, माझ्यापेक्षां आपण जास्त चांगल्याप्रकारे राज्य चालवाल, म्हणून आपण मला माझ्या राज्यांतून काढलंत आणि माझ्या सिंहासनावर बसलात. हे बिचारे पूर्वी चोरी करीत होते. त्यांना सत्य काय ठाऊक नव्हते, म्हणून त्यांनी रात्री आपला खजिना लुटला. आपल्या राज्यांत त्यांचे हाल होतील अशी त्यांना भीती वाटते. आपण त्यांच्या समस्येचे योग्य ते निराकरण कराल असे मी त्यांना आश्वासन दिलेले आहे. त्यांच्या सोबत आपली संपत्ती आपल्याकडे सुपूर्द करण्यासाठी मी इथे आलो आहे. या राज्यांत यापेक्षां मी जास्त काय करुं शकणार?''

शीलवानचे शब्द ऐकून राजाचे एकदम हृदयपरिवर्तन झाले. तो चटकन सिंहासनावरून खाली उतरला आणि शीलवानच्या पायांवर त्याने डोके ठेवले. तो शरमून म्हणाला, ''महात्मा, आपण महान आहात. चोरांनादेखील आपण प्रिय आहात. आपण असाधारण व्यक्ती आहात, याचा यापेक्षां दुसरा कोणता सबळ पुरावा हवा? माझ्याहातून पाप घडलं. मला क्षमा करावी. माझ्या दुष्ट मंत्र्याने मला चुकीची माहिती दिली. आपण आपले राज्य घ्यावे. आपल्या राज्यांत प्रजा सुखी आहे आणि त्यांना न्याय मिळतो. मला फक्त आपली मैत्री हवी आहे, आपले राज्य नको!''

शीलवान पुन्हां त्या गादीवर बसला आणि कोसलराजाला त्याने सन्मानाने परत पाठवले.





# विष्णुपुराण

महामुनी सुत याने दशावतारांपैकी नववा अवतार बुद्धावताराविषयी कथा सांगण्यास सुरवात केली. कलीयुगाचा खूप विस्तार झाला होता. मानव क्रूर पशूंप्रमाणे बदलूं लागण्याची चिन्हे दिसत होती. त्यामुळे त्यांना आपला विवेक न घालवता परत मनुष्यप्राण्यांत आणण्याची आताच गरज भासूं लागली.

ह्यापूर्वी जगांत दुष्ट राक्षसांचा संहार करण्या-करिता विष्णूने अवतार धारण केला होता. आता त्याचे कार्य संपन्न करण्याचा काळ पूर्ण होत आला होता.

सर्व मानव राक्षस बनून एकमेकांना लुटत व त्रास देत. यज्ञकार्यात अडथळा आणून यज्ञ-कार्याच्या नावे प्राणीहिंसा करून त्यांचे बळी देत. व दारू मांसाहार ह्यांतच मग्न होऊन आपला विवेक अज्ञान घालवत होते. खरे सत्य कोणालाच समजेनासे झाले. माणसाचा मूर्खपणा वाढूं लागला. त्याचबरोबर यातना दुःख, दारिद्र्य, ह्यांची सर्वत्र वाढ झाली.

मानवरूप धारण करून देवरूपात असलेल्या विष्णूने बुद्धाच्या नांवाने युगाला अनुसरून अनुरूप अशा बौद्ध धर्माची स्थापना करून बुद्ध नावाने पृथ्वीवर जन्म धारण केला.

नेपाळ देशातील कपिलवस्तु नगरांत राजा शुद्धोदन राज्य करीत होता. त्याची पत्नी माया-देवी हिने एक स्वप्न पाहिले - पौर्णिमेच्या चंद्राच्या बिंबाप्रमाणे प्रकाशमान असा एक पांढरा शुभ्र हत्ती आकाशांतून उतरून तिच्या शरिरांत प्रवेश करीत आहे. ह्या स्वप्नाचा काय अर्थ म्हणून ज्योतिषांना विचारण्यात आला. तेव्हां



ज्योतिषाने सांगितले ''महाराज लवकरच एक महापुरुष राणीच्या उदरी जन्म घेणार आहे.''

थोड्या दिवसांनी मायादेवी पालखीत बसून आपल्या माहेरी जात असतांनाच वाटेत एका उद्यानात तिने एका बालकाला जन्म दिला. तो दिवस वैशाख पौर्णिमेचा होता.

सर्व राज्यात आनंदीआनंद झाला. परंतु तो आनंद जास्त टिकला नाही. त्यावर सावट आले. मुलाच्या जन्मानंतर मायादेवी जास्त दिवस जगली नाही. व अशा प्रकारे शुद्धोदनला दुःखांत टाकून तिने प्राण सोडला.

मातृप्रेमापासून वंचित झालेल्या त्या बालकाला शुद्धोदनने आपल्या डोळ्यासमोर ठेवून त्याचे नामकरण केले. त्याचे नांव गौतम सिद्धार्थ ठेवले गेले. सिद्धार्थ दिवसेंदिवस शुक्लपक्षाच्या चंद्रबिंबाप्रमाणे वाढू लागला.

ह्यानंतर ज्योतिषांनी राजकुमाराची जन्मकुंडली केली. त्यांनी सांगितले - ''महाराज, राजकुमार चक्रवर्ती बनेल. सर्व जगातील राजे, महाराजे, प्रजा त्यांना नमून आपली श्रद्धा प्रगट करतील.'' हे ऐकताच राजाचा आनंद गगनात मानेनासा झाला.

''...पण महाराज, राजकुमार संन्यासी बनण्याची सुद्धां जास्त शक्यता आहे!''

शुद्धोधनाचे मन कासावीस होऊ लागले. त्याला सर्व आयुष्य फिके वाटू लागले. त्याने ज्योतिषाला विचारले - ''तुम्ही मुलगा चक्रवर्ती व भिक्षु होईल म्हणून सांगता, ही किती अजब व विसंगत गोष्ट आहे?''

ज्योतिषांनी पुन्हां राजकुमाराची जन्मपत्रिका नीट न्याहाळून, जुळवाजुळवी करून पाहिली व राजाला म्हटले - ''महाप्रभु! राजकुमार अत्यंत हळव्या, कोमल मनाचा आहे. त्याने त्याच्या आयुष्यात चार दृष्ये पहाता कामा नयेत. ते चार म्हणजे-रोग, वृद्धावस्था, मृत्यू व संन्यास. ही चार दृष्यें पाहिली तर राजकुमाराचे मन भयंकर उदास होईल. हे पाहिल्यावर त्याचे मन बदलून जाईल. ह्या गोष्टीवर कटाक्षाने लक्ष ठेवले पाहिजे. तरच तो चक्रवर्ती बनून राज्य करेल.''

सिद्धार्थला लहान असतांपासूनच सर्व प्रकारची काळजी, चिंता, ह्यांपासून दूर ठेवून नेहमीच आनंदात मनोरंजनात ठेवले जावे ह्याची शुद्धोधन जास्त काळजी घेई.

एकदा सिद्धार्थ बागेत बसलेला असतांना एक हंस बाण लागून तडफडत त्याच्या मांडीवर येऊन



पडला. राजकुमारांनी काळजीपूर्वक त्याच्या शरिरांत घुसलेला बाण काढला व त्याला निरगुडीच्या पानाचा रस लावून त्याचे प्राण वांचविले.

''हा हंस माझा आहे. मी ह्याला बाणाने मारले आहे. ही माझी शिकार आहे'' असे म्हणत ओरडत देवदत्त सिद्धार्थच्या जवळ आला.

देवदत्त हा सिद्धार्थचा नात्याने जवळचा भाऊ होता- ''ह्या हंसाचा प्राण मी वांचविला आहे. ह्यामुळे त्याच्यावर माझा अधिकार आहे.'' सिद्धार्थ म्हणाला. ह्या गोष्टीवर दोघांचे वाद-विवाद सुरू झाले. त्याचा निर्णय घेण्याकरीता दोघे दरबारांत आले. शेवटी ह्याचा निर्णय सिद्धार्थच्या बाजूने दिला गेला. हंसाचा प्राण वाचविल्यामुळें हंसावर पूर्ण अधिकार राजकुमाराचा आहे.

ह्याकारणाने लहानपणापासूनच देवदत्तच्या मनांत सिद्धार्थाविषयी द्वेषभावना निर्माण झाली.

शिकार खेळणे हे उत्तम काम आहे, परंतु राजकुमार शिकार खेळण्यास जात नव्हता. त्या-बद्दल त्याच्या मनांत घृणाच होती. अस्त्रशस्त्रविद्या ह्यामध्ये त्याने संपूर्ण विद्या संपादन केली होती. परंतु कोणत्याही जनावर अगर पक्षांना मारणे त्याला पसंत नव्हते. त्यामुळे तो शिकारीस जात नसे.

सिद्धार्थ शिकारीस जात नव्हता. मनोरंज-नाच्या कार्यक्रमात भाग घेत नव्हता. कोणत्याही प्राणीमात्रांवर इजा झालेली त्याला पहावत नसे. हिंसा केलेली त्याला सहन होते नसे. हे सर्व पाहून राजा शुद्धोदनला वाटे की, राजकुमाराच्या



रक्तवाहिन्यांत करूण रक्त तर वाहात नाही ना? त्याने दुसऱ्या राजकुमारांची बरोबरी करून त्याला बदलण्याचा खूप प्रयत्न केला. त्याच्या मनोरंजनाकरिता अनेक उपाय योजले. त्याला एकटे न सोडण्याचा कटाक्ष पाळला की तो कोणत्याही गहन गूढ विचारात मग्न होऊ नये. त्या करिता त्याने अनेक प्रकारे उपाय केले. व त्याचे मन बदलले.

राजकुमार जेव्हां राज्यांत फेरफटका मारण्यास जाई. तेव्हां त्याच्या सारथ्याला बजावून सांगत की, रस्त्यांत एकही रोगी म्हातारा, प्रेत किंवा संन्यासी दिसता कामा नसे. त्याची सर्व व्यवस्था केल्यावरच राजकुमाराला राजमहालातून रथामध्ये नेत असत.

सिद्धार्थ जेव्हां वयांत आला, तेव्हां त्याच्या मनांत सत्यप्रियता, तार्किक दृष्टी, व हेतूवाद,



ह्यांची भावना उफाळू लागली. दिसायला तो सुंदर होता. परंतु मनोरंजन व राजयोग ह्यांत त्याचे मन लागत नसे. राजकुमाराचे हे वागणे पाहून राजा शुद्धोदनला वाटले कीं जर आपण त्याचे लग्न करुन दिले तर त्याचे मन संसारात रमेल. सर्व राज्यांत त्याने क्षत्रिय वंशातील सुंदर मुलींना निमंत्रणे धाडली.

राजकुमाराचे मन आकृष्ट करण्याकरिता त्याने नृत्यशाळेत सर्व मुलींचे नाचगाणी ह्यांचे कार्यक्रम ठेवले. सर्व मुलींनी राजकुमाराचे मन आपल्याकडे आकृष्ट होईल ह्याची खबरदारी घेतली.

त्या मुलींना उचित भेट देण्याकरिता थाळ्यांमधून आभूषणे, स्वर्णभूषणे, ठेवलेली होती.

सर्वजणी आपला नाच संपवून जातांना राजकुमाराला आपल्या डोळ्याने छेडीत, व त्याच्याकडून बक्षीस घेऊन जात.

शेवट सिद्धार्थ आपल्या सिंहासनावरुन उठून जात असतानां त्याच्या नजरेला एक सुंदर युवती दिसली. तिचे अनुपम सौंदर्यपाहून क्षणभर तो विचलीत झाला. ती एक सामंताची मुलगी होती तिचे नांव यशोधरा होते.

सिद्धार्थ तिच्याकडे आकृष्ट झाला व तिच्याजवळ आला. परंतु त्या मुलीला देण्याकरीता थाळ्यांतून कांहीच उरले नव्हते. शेवटी त्याने आपल्या गळ्यांतील कंठहार काढून तिला दिला. त्याचे तिच्यावर प्रेम बसले.

त्याचक्षणी यशोधरा लाजली व त्याच्यावर तिचे प्रेम बसले. ही गोष्ट जेव्हां महाराजाला समजली, तेव्हां त्याने ताबडतोब सामंत राजाकडे निरोप पाठविला की, तुमच्या मुलीबरोबर सिद्धार्थ लग्न करण्यास तयार आहे.

देवदत्ताने त्यात मोडता आणला. त्याने यशोधराच्या स्वयंवराची घोषणा केली. जो कोणी आपल्या शौर्य व पराक्रम ह्याची परिक्षा त्याच्याचबरोबरीच्या व्यक्तीबरोबर करेल. त्याच्याबरोबर यशोधराचा विवाह होईल, तशी तिच्या वडिलांनी निमंत्रण पत्रे पाठविली.

हिंसा न होईल अशा अनेक योजना आंखण्यात आल्या. अनेकजणांनी त्यांत भाग घेतला. सर्वात सिद्धार्थच यशस्वी झाला. देवदत्तने त्याला आपल्याशी सर्वात भाग घेण्यास सांगितले. सर्व स्पर्धेत सिद्धार्थ प्रथम आला. अशा अपूर्व विद्या दाखवून त्याने यशोधरेबरोबर स्वयंवर ठरविले.

त्यांचे दोघांचे लग्न थाटामाटाने झाले. महाराज शुद्धोदनाला खूपच मानसिक शांतता मिळाली. त्याला कल्पनाच करवत नव्हती की, आपला



मुलगा एक विवाहित पुरुष झाला आहे. शेवट संसारपाशाल गुरफटून तो एक चक्रवर्ती राजा होईल असे आता त्याला वाटू लागले.

यशोधरा सिद्धार्थाबरोबर तन्मयतेने संसार करू लागली. तिला समजून आले की, आपल्या पतीमधे मनुष्यप्राण्यांमध्ये असलेल्या मूल्यांचे प्रथम स्थान आहे. त्यामुळे ती पती म्हणेल त्याप्रमाणे आपले जीवन घालवू लागली. त्यांचा संसार आनंदाने चालू लागला.

विवाहानंतर कांही दिवस सिद्धार्थने अंतःपुरातून बाहेर जाणे येणे सोडून दिले. कांही दिवसांत त्यांना एक मुलगा झाला. त्याचे नांव राहुल ठेवण्यांत आले. राहुल आपल्या आई-वडिलांच्या व आजोबांच्या प्रेमाच्या छत्राखाली हळूंहळू लहानाचा मोठा होऊ लागला. एकदा सिद्धार्थने आपला सारथी चेन्न ह्याला आपल्याला नगरात हिंडून आणण्याचा आदेश दिला. सारथ्याच्या मनांत प्रथमच शंका आली की, युवराजाने सांगितल्याचे पालन न करणे बरोबर नाही. त्यामुळे त्याने रथ तयार केला.

त्यांचा रथ कपिलवस्तु राजमार्गाने चालू लागला. एका ठिकाणी त्याची नजर एका अस्थिपंजर वृद्ध माणसावर पडली. तो लडबडत चालत जात होता. परंतु त्या माणसाच्या दयनीय अवस्थेकडे कोणाचेच लक्ष नव्हते.

जरा दूर गेल्यावर एक भयंकर रोगग्रस्त माणूस त्याच्या नजरेस पडला. दिसायला तो दरिद्री दिसत होता. दारू प्याल्याने त्याचा तोल जात होता, ते त्याला कळत नव्हते. तो आपल्याला कसाबसा सांभाळत होता. त्यानंतर कांही लोक



एक मृत माणसाचे प्रेत स्मशानात नेत असल्याचे त्याच्या दृष्टीस पडले.

सर्वांत शेवटी संसार, मायापाश ह्यांना सोडून भिक्षाटन करीत असलेला एक साधु संन्यासी त्यांना दिसला. त्यावेळेपर्यंत सिद्धार्थाच्या मनांत वैराग्य भावना होती, ती उफाळून बाहेर आली. सिद्धार्थाची बुद्धी दैदिप्यमान झाली.

त्याचक्षणी सिद्धार्थच्या मनांत संन्यासी होण्याचा विचार आला. राजकुमाराने सारथ्याला ह्या चारी दृष्यांविषयी अनेक प्रश्न विचारले. तेव्हां त्याला खरे कारण सांगणे भाग पडले.

राजकुमाराने सारथ्याला रथ महालांत परत नेण्याविषयी सांगितले. तेव्हां सारथ्याने रथ राज-महालात परत आणला. त्या रात्री राजकुमाराला झोप आली नाही. बाहेर आकाशात स्वच्छ चांदणे पसरले होते. यशोधरा आपल्या शय्येवर गाढ झोपली होती. तिच्याजवळच कुशीत राहुल झोपला होता. आई व मुलाच्या चेहऱ्यावर निरागस भाव पसरलेले होते. सिद्धार्थाचे मन त्यांच्याकडे पाहून राजमहालातून निघून जाण्यास डगमगू लागले. परंतु त्याने आपल्या मनाला आवरले. दोनदा तो जाऊन परत आला. परंतु तिसऱ्या वेळेस त्याने मन घट्ट केले.

त्याने यशोधरेच्या पायाशी एक फल ठेवले तिच्या पायाला स्पर्श करून त्याने प्रणाम केला व घाईने तेथून बाहेर पडला.

सिद्धार्थ तेथून सरळ अंतःपुरातून बाहेर पडून अश्वशाळेत गेला व सारथी चेन्नाला आपला घोडा तयार करावयास सांगितला.

सारथ्याने विचार केला की चांदणी रात्र आहे. तेव्हां घोड्यावर बसून फेरफटका मारण्याच्या विचारात राजकुमार असावेत. थोड्या वेळापूर्वीच त्यांच्यात बोलणी झाली होती.

सिद्धार्थ घोड्यावर बसला. सारथी चेन्नाने घोड्याचा लगाम आपल्या हातात घेतला व तो चालू लागला. चोहीकडे नीरव शांतता पसरली होती. त्यामुळे घोड्यांच्या टापांचा आवाज स्पष्ट येत होता. घोडा राजमहालापासून लांब असलेल्या राजपथावर आला. सिद्धार्थाचे मन आता स्थिर झालेले होते. घर-गृहस्थी, संसार, प्रेमपाश सर्व त्यांनी तोडून टाकले होते. आता काय करायचे ह्याचा पक्का निश्चय झाला होता.







# स्वावलंबन

एका गावात रामशर्मा आणि सोमगुप्त नावाचे दोन मित्र रहात होते. दोघेही गरीब होते. एक दिवस दोघांनी ठरवले की पैसा मिळवण्यासाठी आपण गांव सोडून कुठेतरी जाऊं. दुसऱ्या दिवशी सकाळीच दोघे निघाले. बराच प्रवास करुन दमल्यानंतर ते एका ऋषींच्या आश्रमाजवळ विश्रांतीसाठी थांबले. ऋषींनी त्या दोघांची संपूर्ण विचारपूस केल्यावर त्यांना नीट समजावले, "मुलांनो, मी खूप कष्ट करुन अनेक विद्या शिकलो आहे. तुमच्यापैकी एकजण ब्राम्हण आहे. ब्राम्हणाने पैशाचा लोभ धरणे चांगले नाही. त्यांच्या जन्माचे सार्थक तेव्हाच होईल जेव्हां तो ज्ञान मिळवून इतरांनाही ते देईल! दुसरा वैश्य आहे. तो माझ्याकडून व्यापारातील रहस्ये जाणून घेऊन पैसा मिळवू शकेल. खरा वैश्य फक्त पैसा न मिळवता जनसेवाही करतो."

ऋषींच्या सल्ल्यानुसार दोघा मित्रांनी तीन वर्षे विद्याभ्यास केला. रामशर्माने अनेक शास्त्रांत प्राविण्य मिळवले. सोमगुप्ताने व्यापारातील रहस्ये समजून घेतली. आपल्या ज्ञानसामर्थ्यावर रामशर्माने एका राजाच्या दरबारी पंडिताची जागा मिळवली. सोमगुप्तने व्यापारांत खूप प्रगती केली. चार-पाच वर्षांत दोघेही सुसंपन्न झाले.

कांही वर्षे अशीच गेली. रामशर्माला एक मुलगा झाला. त्याचं नाव 'कृष्णशर्मा' ठेवलं. पण रामशर्माला आपल्या मुलाची खूप काळजी वाटू लागली. तो अतिशय व्रात्य होता. शिक्षणाची त्याला अजिबात आवड नव्हती. तो नुसत्या उनाडक्या करण्यात सारा वेळ वाया घालवत असे. रामशर्माने मुलाला आपल्या योग्य बनवण्याचा खूप प्रयत्न केला. पण सारे प्रयत्न फोल ठरले.

त्याचवेळी एक विचित्र घटना घडली. रामशर्मा विद्यार्थ्यांना कांही श्लोक शिकवत होता.



ते श्लोक खूप अवघड असल्याने खूप वेळा सांगूनही विद्यार्थ्यांच्या लक्षांत येत नव्हते. शेवटी कंटाळून रामशर्मा विश्रांतीसाठी आंतल्या खोलीत निघून गेला.

आपल्या वडिलांना विद्यार्थ्यांना शिकवून दमलेले कृष्णशर्माने पाहिले. वडील आंत जाताच कृष्णशर्मा त्यांच्याच आसनावर बसून स्वतः विद्यार्थ्यांना शिकवूं लागला. आणि आश्चर्याची गोष्ट म्हणजे रामशर्माने शिकवल्यावर जे श्लोक मुलांना कळत नव्हते, तेच श्लोक कृष्णशर्माने शिकवल्यावर त्यांना लगेच समजले.

आंतून हे दृश्य पाहून रामशर्मा अगदी चकित झाला. त्याच्या लक्षांत आलं की आपला मुलगा मूर्ख नाही. त्याची स्मरणशक्तीही चांगली आहे. विद्याभ्यास केला तर तो कठीण शास्त्रांतील ज्ञानही सहज मिळवूं शकेल. रामशर्माने ही गोष्ट कृष्णशर्माला सांगितल्यावर त्याने विचारले, ''विद्याभ्यास कशासाठी करायचा?''

तेव्हां रामशर्माने सांगितले, ''लोकांचा आदर प्राप्त करण्यासाठी, तसेच पैसा मिळविण्यासाठीही, ज्ञानार्जन अत्यंत आवश्यक आहे.''

त्यावेळी कृष्णशर्माने उलटा प्रश्न विचारला, ''लोक माझा आत्ताही आदर करतात, कारण मी एका महापंडिताचा मुलगा आहे. मी ब्राम्हण असल्याने ते माझी पूजाही करतात. तसेच मी एका धनिकाचा मुलगा आहे. त्यामुळे मला पैसा कमविण्याची तरी काय आवश्यकता आहे?''

आपल्या मुलाला कसे समजवावे या विचारांत रामशर्मा असतानाच सोमगुप्त त्याच्याकडे आला. त्याच्या बोलण्यावरुन स्पष्ट झाले की सोमगुप्तचा मुलगा वसुगुप्तही असाच बेजबाबदार आहे. सोमगुप्तनेही त्याला समजावण्याचा प्रयत्न केल्यावर तोही असंच म्हणायचा की ''मी धनिकाचा मुलगा असल्याने मला पैसा कमावण्याची काय आवश्यकता आहे?''

तेव्हां दोन्ही मित्रांनी विचार करुन एक योजना आंखली. त्या योजनेप्रमाणे सोमगुप्त आपला मुलगा वसुगुप्त याला रामशर्माच्या घरी सोडून आपल्या पत्नीबरोबर व्यापारासाठी बाहेरगांवी गेला. जाताना आपल्या मुलाच्या सेवेसाठी दोन नोकरांनाही ठेवून गेला.

कृष्णशर्मा आणि वसुगुप्त लौकरच एकमेकांचे चांगले मित्र बनले.



दोन महिने निघून गेले. एके दिवशी रामशर्माने वसुगुप्तला बोलावून सांगितले की, ''तुझ्या वडिलांनी पैसे पाठवायला सांगितले आहे. तू तुझं घर विकून त्यांना पैसे पाठवून दे.'' पण वसुगुप्तने कांही लक्ष दिले नाही.

आणखी एक महिना गेला. एक दिवस रामशर्मा-कडे एक व्यक्ती येऊन सांगू लागली, ''सोमगुप्तचे जहाज बुडाले. त्याबरोबरच सोमगुप्त, त्याची पत्नी आणि सगळी संपत्तीही बुडाली. मी कसातरी त्यांना कांठावर घेऊन आलो आणि त्यांच्या घरी त्यांना पोहोचविले, पण दुर्दैवाने त्यांचा जीव वांचला नाही.''

हे ऐकून वसुगुप्त रडूं लागला. रामशर्माने त्याचे सांत्वन केले. पण त्याने एक गोष्ट स्पष्ट केली की, ''मी तुझ्या वडिलांसारखा मोठा व्यापारी नाही. तुझा भार उचलणे मला शक्य नाही. तेव्हां तुझी व्यवस्था तूच पहा.''

वसुगुप्त रागांतच रामशर्माच्या घरांतून बाहेर पडला. पण त्याला कुठेही आसरा मिळाला नाही. कोणी त्याला खायलासुद्धां दिलं नाही. म्हणून शेवटी आपला स्वाभिमान सोडून तो रामशर्माकडे परत आला आणि कांही खायला मागूं लागला. रामशर्माने वसुगुप्तला जेवण दिलं, पण त्याबरोबर हेही सांगितलं की फार दिवस हे शक्य नाही.

हे ऐकून कृष्णशर्माला खूप राग आला. त्याने आपल्या वडिलांना विचारलं,

''आपण आपल्या मित्राच्या मुलाला एवढीही मदत करणार नाही?'' त्यावेळी रामशर्माने उत्तर



दिले, ''सोमगुप्त माझा मित्र आहे. तो अडचणीत असता तर मी नक्कीच त्याला मदत केली असती. परंतु वसुगुप्तशी माझा कांहीही संबंध नाही.''

तेव्हां कृष्णशर्मा म्हणाला, ''वसुगुप्त तुमचा कोणीही नसला तरी माझा चांगला मित्र आहे. तेव्हां माझ्या मित्राला या घरी कांहीच मान नाही कां?''

रामशर्मा बेपर्वाईने म्हणाला, ''तुझी काय पात्रता आहे?'' तेव्हां कृष्णशर्मा म्हणाला, ''देवाची नुसती पूजा करणाऱ्या पुजाऱ्यालाही लोक देवाइतका मान देतात. तसा मी महापंडित रामशर्माचा मुलगा आहे; ही माझी पात्रता होऊ शकत नाही?''

रामशर्माने क्षणभर विचार करून सांगितले की, ''मी तुझ्या प्रश्नाचे जरूर उत्तर देईन, पण

त्याआधी तुला एक काम करावं लागेल. तुझी आणि वसुगुप्तची सेवा करणाऱ्या त्या नोकरांना बोलाव आणि त्यांना दोन दिवस वसुगुप्तची सेवा करायला सांग. नंतर मला येऊन भेट.''

कृष्णशर्मा अगदी उत्साहाने तिथून निघाला व नोकरांकडे झाला. यापूर्वी कांहीही पैसे न मागता नोकर सगळी सेवा करीत होते. पण आता तेच वसुगुप्तविषयी अपमानास्पद बोलले आणि त्यांनी सांगितलं कीं अशा गरीबाची सेवा यापुढे आम्ही करणार नाही.

त्यांचं उत्तर ऐकून कृष्णशर्मा चकित झाला आणि आपल्या वडिलांकडे येऊन त्याने हा सारा वृत्तांत सांगितला.

रामशर्मा अर्थपूर्ण हंसत म्हणाला, ''नोकरांनी बरोबर उत्तर दिलं. वसुगुप्ताचे स्वतःचे कांहीच व्यक्तिमत्व नाही. जोपर्यंत तो वडिलांच्या छत्राखाली होता, तोपर्यंत त्यांची संपत्ती त्याची संरक्षक होती. ती संपत्ती नष्ट झाल्यावर तोही एक सामान्य माणूस बनला. तसंच तुलासुद्धा माझ्या पांडित्यामुळे आदर मिळतो आहे. माझी संपत्ती म्हणजे पांडित्य आहे. ती संपत्ती जर तू मिळवली नाहीस, तर तुझीही अशीच अवस्था होईल. आपण स्वावलंबनाने जे मिळवतो तीच आपली खरी संपत्ती असते.''

त्यावर कृष्णशर्मा म्हणाला, ''खरंच! स्वावलंबन अत्यावश्यक आहे. म्हणून तुम्ही जशी तुमच्या मित्राची मदत करूं शकतां, तशी मी करूं शकत नाही.''

तेव्हां रामशर्मा म्हणाला, ''तू आणि तुझा मित्र मी सांगतो तिथे जाऊन कांही वर्षे विद्याभ्यास करा.'' आणि त्याने आपल्या विद्याभ्यासाविषयी सर्व सांगून त्या ऋषींच्या आश्रमाचा पत्ता कृष्णशर्माला दिला.

कृष्णशर्मा आणि वसुगुप्त दोन वर्षे ऋषींच्या आश्रमांत विद्याभ्यास करून आले. परत आल्यावर वसुगुप्ताने पाहीले की आपले वडील जिवंत आहेतच आणि त्यांनी आपली संपत्तीही दुप्पट केली आहे. शेवटी त्या दोघांच्या लक्षांत आलं कीं रामशर्मा आणि सोमगुप्तने मिळून आपल्याला स्वावलंबी बनवण्यासाठी हे नाटक केले होते.










# सर्वोत्तम कथा



## दोन मित्र

मंत्र्याने त्यावर उत्तर दिले, "महाराज, मला क्षमा करा. मी आपल्याला सांगतो, मोहनसिंग हा एक जमीनदार आहे आणि विकत घेतलेला हत्ती त्याने आपल्याला भेट म्हणून दिला. पण चंदनसिंग हा एक गरीब शेतकरी, स्वतःच्या कष्टाने पिकवलेला, आपल्या शेतांतला भोपळा तोडून त्याने आपल्याला भेट म्हणून आणून दिला." मंत्र्याचे बोलणे ऐकून राजालाही प्रश्न पडला. आपण ह्याला बक्षीस म्हणून काय द्यायचे? राजाने मंत्र्याच्या बोलण्यावर खूप विचार केला. चंदनसिंग हा एक गरीब शेतकरी आणि मोहनसिंग हा एक जमीनदार आहे. चंदनसिंगने आपल्या शेतांत घाम गाळून कष्टाने आपल्यासाठी प्रेमाची भेट म्हणून त्यांनी आपल्याला भोपळा आणून दिला. चंदनसिंगच्या मनांत अशी कोणतीही अपेक्षा नव्हती की, आपण भोपळा दिल्याबद्दल राजाने आपल्याला बक्षीस द्यावे. राजा मोहनसिंगला म्हणाला, "हा हत्ती तू कष्टाने आणलेला नसून पैशाने विकत घेतलेला आहे. तुझा मित्र चंदनसिंग याने आपल्या शेतांतून कष्टाचा भोपळा आणला होता. म्हणून मी त्याला शंभर मोहरा दिल्या. पण कष्टाची किंमत माणसाने पैशाने करूं नये. ही तू फार मोठी चूक केली आहेस." राजाचे बोलणे ऐकून त्याला आपली चूक समजली आणि तो राजवाड्यांतून मान खाली घालून गेला. राजाने त्याला कांहीच बक्षीस दिले नाही.

तात्पर्य : कोणाचेही पाहून आपण अनुकरण करूं नये. त्याचे फळ वाईट असते. माणसाचे मन प्रेमाने जिंकू शकते. पैशाने मन जिंकता येत नाही.

कु. शिवानी विलास दिकोंडा,
घर नं. ४२३६, पापय्या गल्ली,
चितळे रोड, जि. अहमदनगर, महाराष्ट्र - ४१४ ००१.





# धर्माचा विजय

लक्ष्मीपूर गांवात अनुपम नांवाचा एक धनिक रहात होता. भरपूर पैशांबरोबरच त्याच्याकडे स्वतःच्या मालकीच्या बऱ्याच कसदार शेत-जमिनीही होत्या. तो गरीब शेतकऱ्यांकडून शेती करून घेत असे व त्याचा योग्य तो मोबदला त्यांना देत असे. त्यामुळे ते शेतकरी खाऊन पिऊन सुखी होते. ते प्रेमाने अनुपमला जमीनदार म्हणत असत. अनुपमचे पूर्वज महान कुस्तीगीर होते. तसेच तो स्वतःही एक उत्तम कुस्तीगीर होता. आपल्या पूर्वजांच्या स्मरणार्थ तो दरवर्षी कुस्तीच्या स्पर्धा भरवीत असे. त्यातील विजेत्यांना तो भरघोस बक्षिसें देऊन प्रोत्साहित करत असे. त्यामुळे अनुपमचे नांव सर्वतोमुखी झाले होते.

लक्ष्मीपूर हे समस्तपुर जमीनदारी गांवापैकी एक होतं. समस्तपुरचा जमीनदार कृष्णभूपती याच्याही कानावर अनुपमची ख्याती गेली होती. एकदा तो आपल्या दिवाणजीला म्हणाला, "लक्ष्मीपूर आमच्या जमीनदारीचा हिस्सा आहे ना? तेथील अनुपम हा आमच्यापेक्षाही जास्त प्रसिद्धी मिळवतो आहे. हे असंच चालू राहिलं तर तो आणखी प्रसिद्ध होईल, नि नांव कमावेल. आम्ही जमीनदार असल्यामुळे तुम्ही असा कांहीतरी तोडगा काढा की त्याच्या मालकीच्या जमिनीवर आपल्याला कब्जा करता येईल."

दिवाणजीने नम्रतापूर्वक उत्तर दिले, "मालक, अशा बाबतीत शत्रुत्व पत्करण्यापेक्षा मैत्री करणं जास्त योग्य ठरेल. अनुपमला एक सुंदर मुलगी आहे. आता आपले चिरंजीवही विवाहयोग्य झाले आहेत. तेव्हां अनुपमच्या मुलीला आपण सून करून घ्या."

कृष्णभूपतीला हा विचार एकदम पसंत पडला. तो आपल्या लवाजम्यासह वाजत-गाजत लक्ष्मीपूरला गेला. अनुपमनेही त्यांचे यथोचित स्वागत केले. दोघांच्यात कांही वेळ गांवच्या परिस्थितीवर चर्चा झाली. शेवटी कृष्णभूपतीने अनुपमसमोर लग्नाचा प्रस्ताव मांडला.

त्यावर अनुपम विनम्रतेने म्हणाला, "मालक, आपण जमीनदार आहात. मी एक सामान्य

मार्कंडेय शास्त्री



माणूस आहे. मला असं वाटतं की माझ्या मुलीला अशा बड्या जमीनदार परिवाराशी जुळवून घेणं कठीण जाईल. आणि दुसरी गोष्ट अशी आहे की मी माझ्या एका जिवलग मित्राला त्याच्या मुलाशी माझ्या मुलीचं लग्न लावून देण्याचं वचन खूप आधीच दिलं आहे. थोड्याच दिवसांत त्या दोघांचं लग्नही होणार आहे. तेव्हां कृपया मला माफ करा.''

हे ऐकून जमीनदार कृष्णभूपती खूपच नाराज झाला. शेजारीच बसलेला दिवाणजी अनुपमला म्हणाला, ''घरी आलेल्या लक्ष्मीला तुम्ही धुडकावून लावता आहात. तसंच हेही विसरता आहात की ह्या विवाहाचा प्रस्ताव नाकारण्याचे वेगळे परिणाम होतील!''

आता अनुपम मनांतून घाबरला. तो म्हणाला, ''मला विचार करण्यासाठी थोडा वेळ हवा आहे.''

कृष्णभूपती परत निघून गेला. तो गेल्यावर अनुपमने या सर्व गोष्टींचा खूप बारकाईने विचार केला. पण त्याला वाटलं की जमीनदाराला घाबरण्याचं कांहीच कारण नाही. आणि त्यानं पक्का निर्णय घेऊन टाकला की आपल्या मित्राच्या मुलाशीच आपल्या मुलीचं लग्न लावून द्यायचं. अनुपमने हा निर्णय लवकरच अंमलातही आणला, आणि आपल्या मित्राच्या मुलाबरोबर आपल्या मुलीचं लग्न लावून दिलं.

जमीनदार कृष्णभूपतीला हा स्वतःचा खूप मोठा अपमान वाटला. तो दिवाणजीला संतापून म्हणाला, ''तुमच्या सांगण्यावरून मी लक्ष्मीपूरला गेलो होतो. पण त्याचा कांही उपयोग झाला? तुम्हाला माहिती आहे की मला अनुपमची मुलगी नाही, त्याची संपत्ती हवी आहे. तेव्हां दवंडी पिटवा, कीं त्याची संपूर्ण मालमत्ता आता आमच्या मालकीची झाली आहे.''

यावेळी युवराज शांतिवर्माही तिथं होता. तो आपल्या वडिलांना म्हणाला, ''अनुपमने फक्त तुमचाच नाही, तर माझाही अपमान केला आहे. त्याने मला आपला जांवई करून घेण्यास नकार देऊन मोठा गुन्हा केला आहे. आता मीच त्याला धडा शिकवीन. त्यासाठी मी एक योजनाही आखली आहे.''

शांतिवर्माने मग आपली योजना सांगायला सुरवात केली. तो म्हणाला, ''पिताजी, आपण जाणताच की कुस्तीमधे माझा हात कोणीही धरू शकत नाही . त्या म्हाताऱ्या अनुपमला तर मी अगदी सहज हरवू शकेन. कुस्तीतील नियमां-प्रमाणे मी अनुपमला कुस्तीसाठी आमंत्रण देईन. त्यावेळी मी अट घालीन की अनुपम हारल्यास त्याने आपली पूर्ण संपत्ती माझ्या हवाली करावी. हा कदाचित अन्याय वाटेल, पण याशिवाय दुसरा कांही पर्यायही दिसत नाही''

सर्वांना वाटलं होतं त्याप्रमाणे कुस्ती स्पर्धेत शांतिवर्माने मोठमोठ्या, प्रसिद्ध मल्लांना सहज मात दिली.

नंतर त्याने सर्वांसमोर जाहीर केलं ''ही स्पर्धा यशस्वी झाल्याचं तेव्हाच मानलं जाईल ज्यावेळी माझी लढत श्री अनुपम यांच्याशी होईल. अनुपम जर जिंकले तर मी त्यांना माझ्या बरोबरीचा जमीनदार समजेन. पण ते हरले तर त्यांची सगळी मालमत्ता माझी होईल आणि ते एका सामान्य नागरिकाचं जीवन जगतील.''

हे ऐकल्यावर अनुपमची शेती करणारे शेतकरी, तेथील नागरिक व उपस्थित असलेल्या इतर लोकांनी ह्याला जोरदार विरोध केला. ''हा अन्याय आहे,'' असं ते ओरडू लागले. पण अनुपमने सर्वांना गप्प करत सांगितलं, ''आपण शांत रहा. मी म्हातारा झालो असलो तरी अजूनही माझ्यांत लढण्याची ताकद आहे. मी हे आव्हान स्वीकारतो आहे, माझी पूर्ण खात्री आहे की धर्माचाच विजय होईल.''

अनुपमच्या चेहऱ्यावरील तेज व आत्मविश्वास पाहून शांतिवर्मा चकित झाला. आता त्याला मनांतून भीतीही वाटू लागली. अनुपमचे 'धर्माचाच विजय होईल'' हे शब्द त्याला सारखे आठवू लागले.

शेवटी अनुपम व शांतिवर्मा यांच्यात कुस्ती सुरू झाली. आणि गंमत म्हणजे सुरवातीला युवराज जमिनीवर पडला. आता त्याला अगदी असहाय्य वाटू लागलं. तो पूर्णपणे समजून चुकला की अनुपमला हरवणं अशक्य आहे. त्यानं स्वतःची हार मान्य करून सर्वांसमोर जाहीर केलं की, ''वय, ताकद, शिक्षण या गोष्टींचा विचार करताना, मीच जिंकायला हवं होतं. पण पहिल्याच क्षणी अनुपमनी मला चीतपट केलं, याच कारण कदाचित त्यांच्या पाठीशी असलेलं धर्माचं बळ हेच असेल''.

कृष्णभूपतीला अशी कुस्ती अगदीच अनपेक्षित होती. त्याचा स्वतःच्या मुलावर, तोच जिंकणार, यावर पूर्ण भरवसा होता . या प्रकाराने तो खूप दुःखी झाला. नाहीतरी आता त्याच्या हातात काय उरलं होतं? त्यानं अनुपमचं अभिनंदन केलं आणि युवराजबरोबर समस्तपुरला तो परत आला.

अनुपम नेहमीप्रमाणेच शेतकऱ्यांशी चांगला वागत राहिला, वेळेला त्यांना मदत करत राहिला आणि दीर्घकाळ सुखी जीवन जगला.





# जगण्याची दिशा

सत्यवान हा लक्ष्मीचा एकुलता एक मुलगा होता. लक्ष्मीने खूप प्रेमाने त्याचं पालन-पोषण केलं होतं. सत्यवान पांच वर्षांचा असतानाच त्याचे वडील देवाघरी गेले. तेव्हांपासून लक्ष्मीनेच खूप प्रेमाने त्याचा सांभाळ केला होता.

सत्यवान स्वभावाने तसा चांगला होता, पण वाईट संगतीमुळे तो बिघडत चालला होता. खूप वायफळ खर्च करायचा. त्यामुळे हळू-हळू त्यांची संपत्ती, जमीन, पैसा-अडका याचा ऱ्हास होऊ लागला. लक्ष्मीने त्याला समजावून सांगायचा खूप प्रयत्न केला पण त्याचा कांहीच उपयोग झाला नाही. सत्यवान वीस वर्षांचा झाल्यावरही त्याच्या अशा वर्तणुकीमुळे लक्ष्मीला त्याची खूपच काळजी वाटू लागली. शेवटी या काळजीने, मानसिक तणावाखाली ती हे जग सोडून गेली.

आईच्या मृत्यूनंतर थोड्याच दिवसांत सत्यवान आपले घरही गमावून बसला. आता तो पूर्णपणे कंगाल झाला. यापुढे कसे जगायचे, हे त्याला कळेना. शेवटी आपले गांव सोडून तो दुसऱ्या गांवी राहायला गेला; परंतु तिथेही त्याला आसरा मिळाला नाही. मग मात्र तो खूप निराश झाला. त्याने ते गांवही सोडले. त्याला वाटू लागले की आता मरण्याशिवाय आपल्यापुढे दुसरा कोणताही पर्याय नाही.

विचार करत करत रस्त्यांतून जात असताना त्याला एक म्हातारी बाई दिसली. ती चिंचेच्या झाडाखाली बसून कांही पैसे मोजत होती. सत्यवानकडे तिचे लक्ष जाताच तिने त्याला झाडाच्या सावलीत बोलावलं आणि विचारलं, ''बाळा, इतक्या कडक उन्हातून कुठं चालला आहेस?'' मग सत्यवानचा उतरलेला चेहरा पाहून ती म्हणाली, ''घे, ही दोन केळी. तुझी थोडी भूक भागेल.''

सत्यवान संकोचून म्हणाला, ''पण माझ्या-जवळ पैसे नाहीत.'' त्यावर ती म्हातारी बाई म्हणाली, ''अरे पैशांचं राहू दे. तू मला माझ्या नातवासारखा आहेस. थोडंसं खा.''

सत्यवानने दोन्ही फळे खाल्ली आणि तिने दिलेलं पाणीही प्यायला. थोडा वेळ ती म्हातारी स्वतःशीच कांहीतरी पुटपुटत होती आणि मग सत्यवानला म्हणाली, ''बेटा, मी ऐंशी वर्षांची आहे. माझ्या डोळ्यांदेखत माझी मुलं, नातवंडं हे जग सोडून गेली. पण जोपर्यंत मला देवाघरुन बोलावणं येत नाही, तोपर्यंत जगायला तर हवंच ना? म्हणून ही फळे विकून त्यावर जगते. हा एकच माझ्या जगण्याचा मार्ग मी निवडला आहे.'' नंतर फळांची टोपली डोक्यावर ठेवून ती म्हातारी निघून गेली.

सत्यवानला त्या म्हातारीच्या जगण्याच्या इच्छेचं खूप आश्चर्य वाटलं. तोही तिथून उठून जंगलातून पुढे जाऊं लागला. अचानक एका झाडाच्या फांद्या खाली पडताना त्याला दिसल्या. त्याने झाडावर पाहिलं तर एक बारा-तेरा वर्षांचा मुलगा झाडाच्या फांद्या तोडत असलेला त्याला दिसला.

सत्यवानला त्या छोट्या मुलाची खूप दया आली. त्याने त्या मुलाला विचारले, ''तू खूप लहान आहेस. इतक्या लहान वयात असं अवघड काम करण्याची काय आवश्यकता आहे? घर सोडून तू इथं कशासाठी आला आहेस?'' फांद्यांतून सत्यवानकडे डोकावून पहात तो मुलगा म्हणाला, ''अहो महाशय, मी घरीच बसून राहिलो तर खायला कोण घालेल? ही लांकडे विकून मी स्वतःचं पोट भरतो. मला आई-वडील नाहीत. तेव्हां स्वतः कष्ट करीन, तरच मला जगता येईल.''

त्या मुलाच्या बोलण्याने सत्यवान खडबडून जागा झाला. त्याच वेळी त्याला वाटेत भेटलेल्या फळवालीचीही आठवण झाली, जी इतक्या म्हातारपणी पोट भरण्यासाठी कष्ट करत होती. आणि हा अनाथ मुलगाही इतक्या छोट्या वयांत पोट भरण्यासाठी कष्ट करतो आहे. आता



नारायण मार्ग

सत्यवानला कळून चुकलं की आपल्या सध्याच्या परिस्थितीला आपण स्वतःच कारणीभूत आहोत. तो लगेच आपल्या गांवी आला आणि गांवचा पाटील परांकुश याच्याकडे गेला.

सोप्यावर बसलेल्या परांकुशने सत्यवान दिसताच त्याला विचारले, "सत्यवान, काय झालं? इतके दिवस कुठे होतास? माझ्याकडे कांही काम आहे कां?"

त्याला नमस्कार करून सत्यवान म्हणाला, "साहेब, आपण माझ्या वडिलांना ओळखता. त्यांनी जे कमावलं होतं, ते सगळं मी व्यसनांच्या आहारी जाऊन गमावलं. आता पोट भरण्यासाठी आपण मला कांही काम मिळवून दिलंत, तर मी जन्मभर आपला ऋणी राहीन. मी अगदी मोलमजुरी करायलाही तयार आहे."

यावर हंसून परांकुश म्हणाला, "मोलमजुरीचं कामही असं आपल्याला हवं तेव्हां मिळत नसतं. तुझ्यांत अशी सुधारणा व्हावी, हीच तुझ्या आईची इच्छा होती पण बिचारी निराश होऊन हे जग सोडून गेली. परंतु तू सुधारलास, कष्ट करून जगण्याची तयारी दर्शविलीस, तर तुला देण्यासाठी ती माझ्याकडे थोडे पैसे आणि दोन एकर कसदार जमीन मरण्यापूर्वी देऊन गेली आहे." मग परांकुशने घरातून ती रक्कम आणि जमिनीशी संबंधित कागदपत्रे आणून सत्यवानला दिली.

ती घेऊन सत्यवानने पाटलाला आदराने नमस्कार केला. तेव्हां परांकुश म्हणाला, "सत्यवान, तुझ्या आईला खात्री होती की एक ना एक दिवस तू नक्की सुधारशील. आणि आज खरंच तसं घडलं. जर कष्ट केलेस, स्वाभिमानानं जगलास आणि वर्तणूक चांगली ठेवलीस तर आईनं दिलेली संपत्ती दसपटीनं वाढवू शकशील. तू स्वतः गरजू लोकांना जगण्याची दिशा दाखवू शकशील. स्वकष्टाच्या कमाईवर जगण्यात अतिशय आनंद आहे."

सत्यवानने पुन्हा एकदा परांकुशला नमस्कार केला. आणि मनांतल्या मनांत आपल्या आई-विषयीही त्याला कृतज्ञता वाटली. त्याच्या उज्वल भवितव्यासाठी तिने काळजी घेतली होती. त्याच क्षणी त्यानं ठरवलं कीं मी कष्ट करीन, लोकांकडून मान-सन्मान प्राप्त करीन आणि आईची इच्छा खरंच पूर्ण करीन.








# भयंकर घाटी

खूप खूप वर्षांपूर्वी ब्रम्हपुरी नगरीच्या जवळ एक मोठे अरण्य होते. तिथे केशव हा तरुण मुलगा आपल्या पित्याबरोबर राहात होता. त्याची आई तो लहान असतानाच वारली होती. केशवचा पिता सकाळी गायींचे दूध काढून ते रोज नगरांत विकायला नेत असे. येताना घरांत लागणाऱ्या अन्नधान्य, व इतर साऱ्या वस्तू व पदार्थ तो घेऊन येई.

त्या अरण्यांतच त्यांची झोपडी होती. आसपास वस्ती नव्हती. अरण्याच्या चारी बाजूंनी उंच पर्वत होते. तिकडे केशव रोज गुरे चरायला घेऊन जात होता. कधीकधी त्याला ते पर्वत चढून जाण्याची उंचउंच हिरवेगार फारच इच्छा होई. पण त्याच्या वडिलांनी त्याला फार पूर्वीच सांगितलेले होते कीं पर्वतांतल्या त्या गुहांमधे वाघ, साप, अस्वलें, अशी भयंकर जनावरे राहातात.

एकदा केशवने गुरे हिरव्या गवतांत चरायला सोडली आणि तो एका झाडाच्या बुंध्याला टेकून बसला. त्याने हातांत धनुष्य घेतले आणि उगीचच चाळा म्हणून त्या झाडाच्या फांद्यांवर व त्यावर बसलेल्या पक्ष्यांच्यावर बाण सोडायला सुरवात केली.

त्याचे हे काम चालू असतानाच पर्वतावरून एक विचित्र आवाज ऐकू आला. प्रथम तो खूप घाबरला, पण नंतर त्याला धीर आला. त्या आवाजाच्या दिशेने तो पाहू लागला.

एक निराळाच प्राणी एका उंच दगडावर उड्या मारीत उभा होता, तो केशवच्याजवळ धावत आला. तो घोड्यासारखा दिसत होता,



पण त्याच्या अंगावर पट्टे होते आणि डोक्यावर एक शिंग होते.

त्याला पाहून केशव चकित झाला. असल्या प्राण्याबद्दल त्याने अद्याप कधी ऐकलेही नव्हते. तो गोंधळून गेला; त्याच्यावर बाण सोडावा असे केशवच्या मनांत आले, पण तोपर्यंत तो प्राणी शेपटीने आपले शरीर साफ करीत होता व त्याची आयाळ हालवीत केशवकडेच बघत होता हे त्याला दिसले.

ही चांगली संधी आहे असे वाटून केशवने धनुष्याच्या दोरीला आपल्या कानापर्यंत खेचून त्यावरुन एक बाण सोडला.

पण त्यापूर्वीच तो विचित्र प्राणी ज्या खडकावर उभा होता, तिथून एक लांब उडी मारून तो जमिनीवर उभा राहिला.

आश्चर्यचकित झालेला केशव त्याच्यावर आणखी एक बाण सोडणार होता, पण त्यापूर्वीच तो प्राणी वेगाने दौडत केशवजवळ आला आणि केशवच्या हातांतला बाण त्याने तोंडाने ओढून लांब फेकला.

केशवला वाटलं कीं आता त्याचे प्राण संकटात आहेत. पण त्याने धीर सोडला नाही. कांहीही होवो, येणाऱ्या संकटाला सामोरे जायचे, असे त्याने मनाशी ठरवले.

वृक्षाजवळच पडलेली त्याची काठी तो उचलणार होता पण तेवढ्यांत त्या प्राण्याचा नूर बदललेला त्याला दिसला.

तो प्राणी डोके हालवीत नम्रपणे केशवजवळ आला व त्याने आपले तोंड केशवच्या खांद्यावर ठेवले.

केशव थक्क झाला. या प्राण्यामधे माणसाच्या मनांतले भाव जाणण्याची दिव्य शक्ती असावीसे त्याला वाटले. हा प्राणी घातक नाही हे ही त्याला कळले.

केशवने उत्साहाने त्या प्राण्याच्या पाठीवर हात ठेवला. झालं, तो प्राणी घोड्यासारखा उड्या मारत आपले डोके हालवीत, खिंकाळू लागला.

केशवला वाटलं की बहुतेक हा घोडाच असेल. त्याच्या पाठीवर बसायची त्याला सुरसुरी आली व तो बसला.

तो प्राणी आता जास्तच जोरांत खिंकाळला आणि हळूंहळूं पर्वताच्याकडे जाऊं लागला.

लगाम व खोगीर नसतानादेखील त्या प्राण्यावर



स्वार होता येत होतं. जसा तो पुढे जायला लागला, तसा त्याचा वेगही वाढला. केशव त्यामुळे पडलाच असता, पण त्या प्राण्याची आयाळ त्याने घट्ट धरली आणि स्वतःला सांवरले.

तितक्यांत तो प्राणी एखाद्या चेंडूसारखी उसळी मारुन एका खडकावर चढला. केशव भेदरला.

त्याच्या बावरलेल्या मनांत विचार आला, "हा विचित्र बावरलेल्या प्राणी आता मला पर्वतावर नेणार बहुतेक. पण तिथे तर भयंकर श्वापदे, मायावी राक्षस असतात. ते एकांतात मांत्रिक, तांत्रिक साधना करतात. म्हणूनच तर त्याच्या पित्याने त्याला पर्वतावर जायची मनाई केलेली होती.

"पण आता कशाला भ्यायचं?" असं म्हणून त्याने खाली उडी मारली.

तो विचित्र प्राणीही खडकावरुन खाली उतरला आणि त्याच्याभोवती गोलगोल फिरूं लागला. काय करावं ते केशवला समजेना. तो नेहमी बसत असे, त्या वृक्षाजवळ परत आला. तो प्राणीही त्याच्या मागोमाग आला.

केशवने आजपर्यंत असा प्राणी पाहिला नव्हता किंवा कुठे ऐकलाही नव्हता. तो पर्वतावर राहात असावा असे त्याला वाटले. याला पकडून ब्रम्हपुरीला नेऊन विकले तर भरपूर पैसे मिळतील. पण तसे करणे हे बरोबर आहे कां?

केशवला कांही निर्णय घेता येईना. तेव्हां तो प्राणी केशवाच्या गुराढोरांमधे मिसळला व



चरायला लागला. अगोदर त्याला बघून गायीही घाबरल्या होत्या, पण नंतर तो त्यांच्यात मिसळला. केशवला वाटलं कीं सूर्यास्त झाल्यावर तो प्राणी पर्वतावर परत जाईल.

पण घडलं निराळंच! अंधार पडल्यावर केशव गुरे घेऊन झोंपडीकडे परत आला. तेव्हां तो प्राणीही त्याच्या त्याच्या घरी बरोबर आला. केशवने संवयीनुसार रोजच्याप्रमाणे गुरांचे चारापाणी केले नि तो झोंपडीत गेला.

वडिलांना याबद्दल काय सांगावे, हे त्याला कांही समजेना. तो निमूटपणे जेवला आणि झोंपून गेला.

दुसऱ्या दिवशी सकाळीं केशवच्या पित्याने त्याला उठवून म्हटले, "केशू, उठ. आपण वांचलो बघ. रात्रीं गोठ्यामधे बहुधा एक लांडगा घुसला

होता. इथे कसा आला असावा ते उमगत नाही.'' घाबरलेल्या आवाजांत तो केशवला सांगत होता.

केशव दचकून उठला. त्याला त्या विचित्र प्राण्याची आठवण झाली. त्याच्या पित्याला तो प्राणी म्हणजे लांडगा वाटला होता. म्हातार-पणामुळे त्याची दृष्टी अधू झालेली होती, म्हणून घोड्यासारखा उंच प्राणीसुद्धां त्यांना लांडगा वाटला असावा. कीं रात्री त्या प्राण्याने लांडग्याचे रूप घेतले आणि आपली गुरें मारली बिरली नसतील ना? नाना शंका त्याच्या मनांत तरळत होत्या.

''त्या लांडग्याने काल रात्री आपल्या किती गायी मारल्या आहेत?'' केशवने विचारले.

''देवाच्या कृपेने तसं कांहीएक झालेलं नाही. मला पाहिल्याबरोबर तो लांडगा अरण्याकडे पळून गेला.'' पित्याने खुलासा केला.

एक लांबलचक श्वास घेत केशवने म्हटले, ''जे जनावर तुम्ही पाहिलंत, तो लांडगा नसावा. काल संध्याकाळी एक विचित्र प्राणी पर्वत उतरून माझ्याजवळ आला आणि आपल्या गाईंच्या कळपांत शिरला.'' त्याने पित्याला काल घडलेली सविस्तर हकीकत सांगितली. त्यावर त्याचा पिता म्हणाला,

''मला कुणीही तू म्हणतोस तसला विचित्र प्राणी दिसला नाही. तो पर्वतावरुन आलाय कां? तर मग तू सावध राहा.

ती कुणीतरी दुष्ट मायावी राक्षसी असेल. पर्वतांच्या दऱ्यांतून हे असले राक्षस जादुगार राहतात आणि प्राण्यांचे रूप घेऊन फिरतात. पित्याला काल घडलेली सविस्तर आणि तुझ्यासारख्या चांगल्या सज्जन मुलांमाणसांना पकडतात.''




पित्याच्या बोलण्यावर केशवला हंसू आले. तो म्हणाला, ''जर खरोखरच एखाद्या राक्षसीला मला पकडायचे असेल, तर ती राक्षसीच्याच रूपांत येईल. प्राण्याच्या रूपांत कशाला येईल? तो प्राणी रात्रीच अरण्यांत परत गेला असेल.''

पण तो प्राणी कांही त्याच्या मनांतून जाईना. त्याच्या मनांत अनेक प्रश्न उभे होते.

केशवचा पिता रोजच्याप्रमाणे दूध घेऊन नगराकडे निघाला, तेव्हां केशवने लवकर हातपाय धुतले, आंघोळ केली आणि रात्रीचा शिळा भात खाऊन तो गाई चरायला नेण्यासाठी झोंपडीच्याबाहेर आला.

त्याला तो प्राणी कुठेही दिसला नाही. केशव रोजच्यासारखा रानांत गेला, त्याने गाई चरायला सोडल्या आणि तो नेहमीच्याच वृक्षाजवळ बसला. कांहीतरी हाताला चाळा, म्हणून तो उगीचच बाण मारत बसला. अचानक त्याला मागून त्या विचित्र प्राण्याचे खिंकाळणे ऐकूं आले. केशवने चमकून मागे पाहिले. तो प्राणी मागल्या दोन पायांवर उभा राहून जोराने खिंकाळायला लागला, व केशवसमोर येऊन उभा राहिला.

''तू इथे पुन्हां कशासाठी आलास? माझ्या मागे मागे येऊन तुला काय मिळणार?... मी तुला विसरलेच व पुन्हां आलास? मी तर तुला विसरलोच होतो.''

केशव म्हणाला. त्या प्राण्याने होकारार्थी मान हालवली. केशवला पित्याचे शब्द आठवले.

''ही कुणी जादुगारीण मायावी राक्षसी तर




नसेल?'' पण माझा तिला काय उपयोग असणार आहे म्हणा! मी माझ्या गायींकडे जातो. कदाचित तिचा त्यांचावर डोळा असेल. गाई सुखरूप आहेत ना हे अगोदर पाहायला हवे मला!'' तो बिचारांत पडला. तो विचित्र प्राणी लगेच मागे वळला आणि गायींच्या कळपाकडे जाऊं लागला. त्याच्या या कृतीवरुन केशवच्या मनांतले भाव त्याला कळत होते असं दिसलं. केशव त्याच्याकडे शंकित नजरेने पाहात होता आणि मग कंटाळून तो पुन्हां बाण सोडूं लागला.

असाच कांही वेळ गेला. दूरून घोड्यांच्या टापांचे आवाज जवळ येऊं लागले. दोन घोडेस्वार केशवकडे आले व त्याला पाहून त्याच्याबद्दल ओरडून बोलूं लागले.

''महासेनानी, हा कुणी एकलव्य दिसतोय.''

"एकलव्या! मग उशीर कशासाठी? ताबडतोब त्याचा उजव्या हाताचा आंगठा कापून टाका!" असं म्हणत आणखी एक घोडेस्वार तिथे आला. त्याचा पोशाख किंमती होता. त्याचा घोडाही छान सजवलेला होता.

"एवढी कसली घमेंड? उभा कां राहात नाहीस रे? हे इथे आले आहेत, ते कोण समजलास तू? ते ब्रम्हपुरीचे महासेनानी आहेत. हे ही ठाऊक नाही वाटतं तुला?"

एक घोडेस्वार त्याला रागाने म्हणाला, केशव ताडकन उठून उभा राहिला आणि हात जोडून त्याने त्या महासेनानीला प्रणाम केला. केशवच्या धनुष्यबाणांकडे तो सेनानी निरखून पाहात राहिला, आणि आपल्या मिशांवरुन हात फिरवीत त्याने म्हटलं,

"अरे, तू कोण आहेस? क्षत्रिय आहेस कां? कोणाचे प्राण घेण्यासाठी तू धनुर्विद्या शिकतो आहेस?"

त्याचा स्वर कठोर, कर्कश होता.

"महाशय, मी एक शेतकऱ्याचा मुलगा आहे. या जगांत मला कुणीही शत्रू नाही. वेळ घालवण्यासाठी मी हा धनुष्यबाण घेऊन आलो आहे. त्या पहा, त्या हिरव्या रानांत माझ्या गायी तिकडे चरत आहेत." केशवने विनयाने उत्तर दिले.

सेनानी गाईकडे बघत होता, तेवढ्यांत एक घोडेस्वार ओरडून म्हणाला,

"बघा महासेनानी, हा पंचकल्याणी दैवी घोडा असावा हा, जरा बघावं!" आणि त्याने त्या विचित्र प्राण्याकडे पाहात खूण केली.

सेनानी आश्चर्याने त्या प्राण्याकडे एकटक बघत राहिला, व नंतर थोड्या वेळाने विचार करीत तो आपल्या सैनिकांना ताठरपणे म्हणाला, "तो पंचकल्याणी घोडा नाही कीं एखादा देवलोकांतला अश्वही नाही. तो दिसतोय रानटी गाढव. पण रानटी गाढव इतका उंच नसतो. असला प्राणी असतो, असे मीही कधी ऐकले नव्हते. त्याला हांकलत इकडे माझ्याकडे घेऊन या."

*(अपूर्ण)*





वेताळ कथा

# निराश स्वर्णरेखा

निश्चयाचा पक्का विक्रमार्क पुन्हां त्या जुन्या झाडाजवळ गेला. त्याने प्रेत खाली उतरवले आणि ते आपल्या खांद्यावर घेतले. नेहमीप्रमाणे त्याने स्मशानाची वाट धरली. तेव्हां प्रेतांत लपलेल्या वेताळाने म्हटलं, "राजन्, अडथळ्यांची तमा न बाळगता, आपले ध्येय साधण्यासाठी तू इतके कठोर परिश्रम करतो आहेस, ही फार प्रशंसनीय गोष्ट आहे. एखादे ध्येय गांठायचे ठरवले कीं त्यांत अडचणी अनंत येतात व त्यांच्याशी सामना करावा लागतो. पण कांही असेही शाहाणे लोक असतात कीं ध्येयपूर्तीच्या जवळ जाऊन ती संधि हातांतून घालवतात.

अनंत कष्ट सोसून मयूर-



ध्वजाची प्रेयसी त्याच्याजवळ येऊन पोंचली. पण त्याने तिला न्याय दिला नाही, उलट तिचा त्याने त्याग केला. तिची गोष्ट तू ऐक म्हणजे चालताना तुला थकवा जाणवणार नाही.'' आणि वेताळाने मयूरध्वजाची पुढील कहाणी सांगितली.

मयूरध्वज हा अवंती राज्याचा राजा होता. करमणुकीसाठी एकदा त्याने शिकारीसाठी अरण्यांत जायचा बेत केला. अरण्यांत गेल्यानंतर सैनिकांची व त्याची चुकामूक झाली, व तो खूप दूर गेला.

दुपारपर्यंत तो अगदी दमून गेला, व एका मोठ्या वृक्षाच्याखाली बसला. अचानक झाडीतून एक वाघ त्याच्यावर चालून आला. जवळच ठेवलेले धनुष्य बाण घेण्याइतकी उसंतही त्याला मिळाली नाही.

तरीही त्याने आपल्या दोन्ही हातानीच वाघाशी लढत दिली व सारी शक्ती एकवटून त्याला ठार मारले. पण या हल्ल्यांत तो जबर जखमी झाला व बेशुद्ध पडला.

त्याच वेळी स्वर्णरेखा नांवाची एक गंधर्व-कन्या आपल्या मैत्रिणींसह तिथे आली होती. मयूरध्वजाचे अचाट साहस पाहून ती मंत्रमुग्ध झाली. त्याचे शौर्य व हातांचे सामर्थ्य पाहून ती चकितच झाली होती.

बेशुद्ध राजाजवळ ती आली आणि तिने अगदी हलकेच त्याला स्पर्श केला. बघताबघता त्याच्या जखमा भरून आल्या व तो उठून बसला. त्याचे मदनासारखे रूप पाहून स्वर्णरेखा त्याच्यावर मोहित झाली व त्याच्याकडे एकटक पाहू लागली. तेव्हां तिला जाणवले की राजाही अनिमिष नेत्रांनी तिच्याकडेच बघत होता. तिने लाजून खाली मान घातली. तिचे अद्भुत सौंदर्य पाहून राजाही भारला गेला होता. दोघांनी एकमेकांना पाहिले, गप्पागोष्टी केल्या व एकामेकांबद्दल माहिती सांगितली.

स्वर्णरेखा म्हणाली, ''राजन्, मी मनःपूर्वक आपल्यावर प्रेम करते. जर आपली संमती असेल तर आपल्याशी गांधर्व विवाह करायला मी तयार आहे.''

तिचा प्रस्ताव ऐकून राजा खूष होऊन म्हणाला, ''मलाही तू खूप आवडली आहेस. पण मला वाटतं कीं तू हा विषय जास्त गंभीरपणे घेऊन त्याच्यावर विचार करायला हवास. त्यांत एवढी घाई करूं नकोस. पृथ्वीवरचे आयुष्य सरळ, सुलभ नसते. पावलोपावली अडचणींशी, कष्टांशी झुंजावे लागते. तुम्ही गंधर्व अतिशय नाजूक, कोमल असता. कष्ट म्हणजे काय ते तुला ठाऊक नसेल. तू भूलोकांत सुखी होणार नाहीस.''



''पतीचे साहचर्य हे पत्नीसाठी स्वर्गधाम असते. आणि स्वर्गधाम हे दिव्यलोकांपेक्षांही श्रेष्ठ असते हे आपल्याला माहीत नाही कां?'' स्वर्णरेखाने विचारले.

''मला वाटतं कीं क्षणिक मोहाच्या आहारी जाऊन तू असे बोलते आहेस.'' राजा म्हणाला, ''नाही, माझे प्रेम खरे आहे, शाश्वत आहे.'' स्वर्णरेखाने ठामपणे सांगितले.

''तुझे प्रेम खरे असले तर त्यासाठी एक लहानशी परीक्षा...''

राजाचे बोलणे पूर्ण होण्या अगोदरच स्वर्णरेखाने विचारले, ''सांगा, ती कोणती परीक्षा आहे?''

''आता तू तुझ्या लोकी परत जा. सहा महिने याच गोष्टीचा गंभीरपणे विचार कर. त्यानंतर जर तुझी इच्छा तितकीच तीव्र असली, आणि तुझा निर्णय सर्वतोपरीने तुला योग्य वाटला, तर पुढच्या भाद्रपदांतल्या बहुलाद्वादशीला तू इथे ये. हा वृक्ष बघ, या शांभवी वृक्षाच्या खाली उभा राहून मी तुझी वाट पाहीन. तेव्हां आपला विवाह होईल. तुला हे मान्य आहे कां?''

''हो, हो, अवश्य मान्य आहे. मी त्यावेळी निश्चित येईनच.'' असं म्हणून मैत्रिणींसह ती परत गेली.

गंधर्वलोकांत परत गेल्यानंतरही स्वर्णरेखा मयूरध्वज राजाचाच सतत विचार करीत होती, आणि सहा महिने उलटले. आपल्या निर्णयाबद्दल ती ठाम होती. भाद्रपद दशमीच्या दिवशी ती एकटीच पृथ्वीवर जाण्यासाठी निघाली. मयूरध्वजने सांगितलेल्या शांभवी वृक्षाजवळ



तिला एक रमणीय सरोवर दिसले. त्यांत स्नान करावे म्हणून तिने आपल्या गळ्यांतला शक्तिमान हार काढला, आणि तो जवळच्या एका फुलझाडावर लटकावला. त्यानंतर ती सरोवरांत उतरली. त्या थंडगार पाण्याचा आनंद तिने मनमुरादपणे घेतला आणि तिला स्वतःचाच विसर पडला. अचानक तिला जाणवलं कीं तिचा रंग निस्तेज होऊं लागला आहे. ती चमकली व अशुभ शंका मनांत येऊन ती लगेच सरोवराच्या-बाहेर आली.

कांठावर आल्यानंतर तिने पाहिलं कीं तिचा तो शक्तिमान हार दुसऱ्याच एका तरुणीच्या गळ्यांत आहे. स्वर्णरेखा थक्क झाली आणि रागाने तिला म्हणाली, ''कोण आहेस तू? आणि माझा हार कां चोरलास? दे तो मला.''

''माझं नांव कादंबरी आहे. शशांकपुर



गावांतली आहे मी. मी तुझ्या हाराची चोरी केली नाही. तो तुझा आहे, हे देखील मला माहीत नव्हतं. मला दिसला, तो मी घेतला, आणि गळ्यांत घातला. मला तो खूपच आवडला. आणखी थोडा वेळ तो माझ्याच गळ्यांत राहिला तर तुला काय त्याचा त्रास?'' त्या भोळ्या तरुणीने म्हटलं.

''कांदबरी, असल्या आभूषणांना स्पर्श करण्याचीही तुझी योग्यता नाही. फक्त गंधर्वकन्याच ही असली आभूषणें वापरण्याच्या योग्यतेच्या असतात. शिवाय हा हार देखील साधासुधा नाही. यांत अद्भुत शक्ती भरलेली आहे?'' स्वर्णरेखाने चिडून जाऊन म्हटले.

''मला कोणत्याही प्रकारच्या अद्भुत शक्तींची आवश्यक नाही. हा हार जर माझ्या गळ्यांत शोभून दिसला तर आमचे महाराज मयूरध्वज माझ्याशी विवाहाला नकार देणार नाहीत.'' कांदबरीने उत्तर दिलं. ते ऐकून स्वर्ण-रेखाला हंसू आवरेना. ती म्हणाली, ''काय म्हणालीस? राजा मयूरध्वज तुझ्याशी लग्न करतील? तुझ्याशी?''

''कां नाही करणार? त्या कामासाठी तर मी राजधानीला जाते आहे. मी ठाम निश्चय केला आहे, लग्न करीन ते महाराजांशीच करीन. पण माझे आईवडील, व गांवातले इतर लोक माझ्या सांगण्यावर विश्वास ठेवत नाहीत. त्यांचं म्हणणं कीं मी कुरूप आहे, वेडसर आहे. ते माझी चेष्टा करतात. त्यांना जे कांही म्हणायचं असेल ते म्हणूं देत; पण मी मात्र प्रतिज्ञा केलीय कीं मी महाराजांशीच लग्न करीन आणि त्यांची राणी होईन. माझी प्रतिज्ञा पार पडेल याची मला पूर्ण खात्री आहे.''

''तुझी प्रतिज्ञा कधीही पूर्ण होणार नाही. कारण महाराज व मी एकमेकांवर प्रेम करतो. त्यांनी मला विवाहाचं वचनही दिलेलं आहे. त्या शांभवी वृक्षाखाली कांही वेळानंतर आमचा विवाह होणार आहे.'' स्वर्णरेखेने खुलासा केला.

हे ऐकून कादंबरी चमकली. तिच्या मार्गांत स्वर्णरेखा ही एक मोठीच धोंड होती हे तिच्या लक्षांत आले, आणि स्वर्णरेखाचा अंत हा एकच उपाय त्यावर होता हे तिला जाणवले. ती म्हणाली, ''माझ्या गळ्यांतला हा हार जर खरोखरीच अद्भुत शक्तींनी भारलेला असेल तर याक्षणीं तुझे एका पोपटांत रूपांतर होईल.'' हाराला स्पर्श करीत कादंबरीने सांगितले.

दुसऱ्याच क्षणीं स्वर्णरेखाचे रूप एका पोपटांत झाले, आणि त्यानंतर कादंबरीने स्वर्णरेखाचे रूप



घेतले आणि ती शांभवी वृक्षाजवळ गेली. तिलाच खरी स्वर्णरेखा मानून मयूरध्वज अतिशय आनंदित झाला, आणि तिच्याशी लग्न करण्यासाठी तिला राजधानीला घेऊन गेला.

कादंबरीचा विवाह मयूरध्वजशी मोठ्या थाटामाटांत झाला. आता ती राणी झाली आणि तिची इच्छा अगदी विचित्र परिस्थितींत पूर्ण झाली.

पोपटाच्या रूपांतली स्वर्णरेखा आपल्या दुर्दैवाबद्दल शोक करीत होती. एका भिल्लाने तिला पकडले आणि एका कलाकाराला विकून टाकले. त्या कलाकाराने तिला निरनिराळे खेळ शिकवले. बोलायला शिकवले. एके दिवशी पोपटाने आपली दुखःद कहाणी त्या कलाकाराला सांगितली. त्याने तिला धीर दिला.

एका सेवकाची मदत घेऊन त्या कलाकाराने राजाची भेट घेतली. राजाने आपले खेळ पाहावेत म्हणून विनंती केली. राजाने त्याला अनुमती दिली. त्या कलाकाराचा खेळ पाहाण्यासाठी राजाराणी, त्यांचे नातलग, शहरांतले प्रतिष्ठित नागरिक व राजसेवक उपस्थित होते.

कलाकाराचा खेळ पाहून सर्वांनाच समाधान वाटले. विशेषत: चेंडूवर उभे राहून तो ढकलणे, आगीच्या चक्रांतून दुसऱ्या बाजूला जाणे, कला-कारांच्या बाणांच्या वर्षावांतून वांचणे इ. खेळ सुंदर होते.

पोपटाने गोड स्वरांत गोष्ट सांगितली. पोपटावर खूष होऊन राजाने विचारले, ''तुझा खेळ अद्भुत आहे. सांग, तुला काय हवंय? माग!''



''जे मी मागेन ते महाराज देतील कां? आपला शब्द तर बदलणार नाहीत ना?'' पोपटाने विचारले.

''माझा शब्द मी बदलणार नाही. अगदी संकोच न करता माग.'' राजाने प्रेमाने सांगितले.

''महाराणींच्या गळ्यांतला हार कांही क्षण माझ्या गळ्यांत असण्याचे भाग्य मला लाभावे.'' पोपटाने मागणी केली.

राजाने राणीला तशी खूण केली. राणी घाबरली. तिला नाही म्हणता येईना. राणीने हार काढून पोपटाच्या गळ्यांत घातला. दुसऱ्याच क्षणीं पोपटाचे रूप बदलून तिथें स्वर्णरेखा मूळ रूपांत उभी होती. व कादंबरीचे पहिले कुरूप रूप तिला प्राप्त झाले. स्वर्णरेखाने चकित झालेल्या राजाला खरी गोष्ट सांगितली. तोपर्यंत कादंबरी पळतच राजवाड्याच्या गच्चीवर गेली व तिथून

तिने खाली उडी मारली. तात्काळ ती मरण पावली.

"त्या कपटी स्त्रीला योग्य शिक्षा मिळाली महाराज. आता आपण राणी म्हणून माझा स्वीकार करावा." स्वर्णरेखाने विनवले.

राजाने विचार करून तिला सांगितले, "मला क्षमा कर. मी तुझी इच्छा पूर्ण करूं शकत नाही. कादंबरीच्या लबाडीचा परिणाम केवळ मलाच नव्हे, तर तुलाही भोगायला लागतो आहे. आपण दोघेही त्याला कारणीभूत आहोत. पृथ्वीवर येऊन तुला फार कष्ट भोगावे लागले. झालं गेलं ते विसरून जा. आणि तुझ्या लोकी तू परत जा. तिथे तुला आनंदात राहाता येईल."

राजाचे बोलणे ऐकून स्वर्णरेखा दुःखी झाली. पण स्वतःला सावरून ती म्हणाली, "आपण म्हणता आहात तसेच मी करीन." आणि ती गंधर्वलोकीं परत गेली.

वेताळ पुढे म्हणाला, "राजन्, राजाने स्वर्ण-रेखाला कां झिडकारले? त्याचे तिच्यावर खरे प्रेम नव्हते कां? त्या कारणासाठीच त्याने सहा महिन्यांचा अवधि मागितला कां? माझ्या या शंकांची उत्तरे माहीत असूनदेखील जर तू गप्प बसलास तर तुझ्या मस्तकाचे तुकडे तुकडे होतील."

विक्रमार्कने त्याला उत्तर दिले, "राजाचे तिच्यावर गाढ प्रेम होते. त्या दोघांनाही स्वतःची परीक्षा व्हावी म्हणून त्याने सहा महिन्यांचा अवधि ठरवला होता. त्यानुसार राजा शांभवी-वृक्षापाशी गेला होता. पण कादंबरीच्या रूपाने त्याचे दुर्दैव आड आले. खरी स्वर्णरेखा पाहिल्या-नंतर त्याचे मन सैरभैर झाले. बाह्य सौंदर्यावर मोहित झाल्यामुळे ही दुर्दशा झाली असे त्याला वाटले. पुन्हां अशी चूक होऊं नये म्हणून त्याने तिचा स्वीकार केला नाही. हे त्याच्या समंजस-पणाचे व विचारी वृत्तीचे द्योतक आहे. यांत राजाची चूक मुळीच नाही. हे समजून स्वर्णरेखाही परत गेली."

राजाचा मौनभंग झाल्यामुळे वेताळ पुन्हां शवासहित अदृश्य झाला व झाडावर जाऊन बसला.

*(मनोहर शास्त्रींच्या रचनेवर आधारित)*








## 'पोलो'चा जन्म

बुद्धीबळ, हुतुतू हॉकी, यासारख्या अनेक खेळांची भारत ही जन्मभूमी आहे. यामध्ये 'पोलो'चा ही समावेश करता येईल. एके काळी या खेळाला 'चौगन' म्हणत, प्रभु रामचंद्र व त्यांचे भाऊ मिळून हा खेळ खेळत असत, असा समज आहे. सध्या हा खेळ 'पर्शिया'तून (सध्याचा इराण) आला आहे असं म्हटलं जातं, खरं तर 'मणिपूर' मधे हा खेळ जन्माला आला. 'पुला' म्हणजे बांबूच्या मुळांपासून बनवलेला चेंडू, घोड्यावर बसलेला खेळाडू लांकडी मूठ असलेल्या वेताच्या काठीने हा चेंडू उडवतो, आणि पुढे पळवत नेतो. या खेळांत एका बाजूला चार खेळाडू असतात. १७व्या व १८व्या शतकांत पोलो ('पुला'पासून) हा खेळ राजे-रजवाडे आणि सरदार अशा लोकांत खूपच लोकप्रिय होता. मणिपूरमधे साधारण ऑक्टोबर व एप्रिल महिन्यांत, जेव्हां शेतीची विशेष कामे नसत, त्यावेळी शेतकरी हा खेळ खेळत. सध्या 'पोलो' फक्त लष्करी अधिकाऱ्यांमधेच खेळला जातो.

## वर्षाचे दिवस



एखादं लहान मूलही सांगेल की एका वर्षात ३६५ दिवस असतात आणि 'लीप ईयर' मधे एक दिवस जास्त येतो. साधारणतः १५०० वर्षांपूर्वी भारतीय खगोलशास्त्रज्ञ भास्कराचार्य यांनी शोध लावला की सूर्याभोवती एक प्रदक्षिणा पूर्ण करायला पृथ्वीला ३६५.२५८७५६४८४ दिवस लागतात. ज्याला एक वर्ष असं म्हणतात. अर्थातच, आणखी एक गोष्टही तुम्ही सर्वजण जाणता की आणखी एका भारतीय व्यक्ती आर्यभट्ट यांनी शून्याचा शोध लावला, शून्याची संकल्पना अस्तित्वात आणली आणि तोपर्यंत केवळ नऊ अंकांची माहिती असणाऱ्या अंकगणन पद्धतीमधे परिपक्वता आणली.



# महालक्ष्मी सासूबाई

नुकतंच सुनीताचं लग्न झालं होतं. तिची सासरी पाठवणी करताना तिच्या आईनं तिला सांगितलं होतं, "आजपासून तुझ्या सासूबाई ह्याच तुझी आई आहेत. परमेश्वराइतकाच त्यांचा मान राख, त्यांना आदराने वागव."

सुनीताने आईच्या ह्या सूचनेचे अगदी तंतोतंत पालन केले. तिच्या अशा चांगल्या वर्तणुकीमुळे सासूबाई पद्मावती तिच्यावर खूप खूष होत्या.

पद्मावती घर अगदी नीटनेटकं ठेवत असे. स्वयंपाक उत्तम करत असे. ती चांगली गातही असे. सुनीतानेही आपल्या सासूबाईंकडून अशा अनेक गोष्टी शिकून घेतल्या. ती एक दिवस पद्मावतीला म्हणाली, "सासूबाई, तुम्ही महालक्ष्मीसारख्या सुंदर दिसता आणि सरस्वतीसारख्या अनेक कला तुम्हाला अवगत आहेत. माझ्या आईलाही इतक्या गोष्टींचं ज्ञान नाही. मी जर तुमची सून झाले नसते, तर मलाही या गोष्टी माहित झाल्या नसत्या. मग मी खूपच संकुचित जीवन जगले असते."

यावर पद्मावती आनंदून म्हणाली, "तुझ्या आईला काय येतं आणि काय नाही हे कांही मला माहित नाही. पण तिनं तुला सद्गुणी बनवलं आहे, ही गोष्ट हजार कला येत असण्याच्या बरोबरीची आहे."

सुनीताला सासरी येऊन जेमतेम महिना होतो आहे, तोच तिच्या नवऱ्याला राजदरबारी नोकरी लागली. आता त्याला जास्त चांगला पगार, पत, प्रतिष्ठा मिळणार होती. म्हणून पद्मावती सगळ्यांना सांगत असे की माझी सून पायगुणाची आहे. तिनं घरांत पाय ठेवताच हा चमत्कार झाला.

नवऱ्याबरोबर नोकरीच्या गांवी निघताना सुनीता सासूबाईंना म्हणाली, "सासूबाई, आपण जणू महालक्ष्मीच आहात, तशाच दिसता. आता मला दररोज आपलं दर्शन होणार नाही, ही मोठी उणीव माझ्या आयुष्यांत राहील."

बघता बघता चार वर्षे लोटली. राजधानीला बस्तान बसतं आहे तोच सुनीताला एक मुलगी झाली. तिचा पती राघव याच्यावर नोकरीत खूपच जबाबदारी असल्याने तो आपला छोटा भाऊ गणपती याच्या लग्नालाही घरी येऊं शकला नाही.

गणपतीची बायको तपति थोड्या फटकळ स्वभावाची होती. पद्मावती नेहमी आपल्या मोठ्या सुनेची प्रशंसा करीत असे. ते ऐकून तपतिला अगदी उबग आला आणि एक दिवस ती पद्मावतीला म्हणाली, "सासूबाई, दुरुन डोंगर साजरे. तुम्ही नेहमी म्हणता की सुनीता मला महालक्ष्मी आणि सरस्वती म्हणत असे. आता ती तुमच्याविषयी काय बोलते कोणास ठाऊक!"

धाकट्या सुनेचं हे बोलणं ऐकून पद्मावतीला धक्काच बसला. तिनं आपल्या नवऱ्याजवळ हट्ट धरला, की आपण सगळे एकदा राजधानीला जाऊया. चांगला दिवस पाहून ते सगळेच राजधानीला गेला जायला निघाले. राजधानीबाहेर राघव त्यांना आणायला गेला आला आणि प्रेमाने आपल्या घरी घेऊन आला.

आता राघवची मुलगी सहा वर्षांची झालेली होती. तिनं स्वतःच सगळ्यांची ओळख करून घेतली. पद्मावती तिची आजी असल्याचं तिला कळल्यावर ती आश्चर्याने तिला म्हणाली, "अरे, तू कां माझी आजी आहेस? आई तुझ्याविषयी सर्वांना जे काही सांगते त्यावरुन मला वाटायचं की तू काळी, जाड आणि दिसायला बेढब असशील. पण तू तर छान गोरी आहेस, नाजूक आहेस आणि अगदी देवीसारखीच दिसतेस!"

हे ऐकून पद्मावतीचा चेहरा एकदम उतरला. तपतिनंही पद्मावतीला खूण केली की "पहा, मी म्हणत होते. तेच बरोबर आहे ना?"

मुलीचं बोलणं ऐकून क्षणभर सुनीताही गोंधळून गेली पण तिला लगेच खूप हंसायलाही आलं. राघवही जोरात हसूं लागला. तिथे बाकी कोणालाच या दोघांच्या हंसण्याचं कारण समजेना.

तितक्यांतच मोलकरीण स्वयंपाकघरातून बाहेर येऊन सुनीताला म्हणाली, "मालकीणबाई, स्वयंपाक झाला आहे."

ती मोलकरीण खूपच काळी, जाड आणि बेढब होती. सुनीता तिचं कौतुक करत म्हणाली, "अरेच्या, इतक्या लवकर स्वयंपाक झाला? अग महालक्ष्मी, तुझ्यांत जणूं अन्नपूर्णेचाच अंश आहे हो!"

हे ऐकल्यावर पद्मावतीसह सर्वांच्याच लक्षात आलं की सहा वर्षांच्या छोट्या निर्मलाच्या बोलण्याचा काय अर्थ आहे तो! आता सगळेजण हसू लागले. पद्मावती कौतुकानं निर्मलाचा पापा घेत म्हणाली, "किती हुशार आहेस ग तू!"

श्री. रामकमल



# खास बातम्या

## व्याघ्रगणना

वन्यप्राण्यांच्या संवर्धनातील महत्वाचा हिस्सा असणाऱ्या राजस्थानमधील 'सारिस्का टायगर सँक्चुअरी' (सारिस्का व्याघ्रारण्य) मधून नुकतेच २६ वाघ गायब झाले आणि अधिकारी वर्गात खळबळ माजली. आता नव्याने संपूर्ण देशातील व्याघ्रगणना करण्याचं ठरविण्यात आलं आहे. या राष्ट्रव्यापी गणनेत इतर प्राण्यांची गणनाही करण्यात येणार आहे. ही गणना येत्या नोव्हेंबर महिन्यात सुरु होणार असून फेब्रुवारी २००६ पर्यंत पूर्ण होईल. ३७,८०० चौरस किलोमीटरच्या क्षेत्रांत असलेल्या २७ अभयारण्यांमधील वाघांची संख्या ३६०० होईल असा अंदाज आहे. ही संख्या १९८९ मधे असलेल्या वाघांच्या संख्येपेक्षा ७२०ने कमी आहे. स्वातंत्र्यापूर्वी, आपल्या देशात ४०,००० वाघ होते!

## भारताची चीनवर मात



लोकसंख्येच्या बाबतीत कांही वर्षातच भारत चीनवर मात करेल. २००४ साली केल्या गेलेल्या, आणि गेल्या फेब्रुवारीत प्रसिद्ध झालेल्या जगव्यापी जनगणनेच्या अहवालानुसार भारताची लोकसंख्या २०५० सालापर्यंत १.६ अब्ज इतकी होईल, ज्यावेळी चीनची लोकसंख्या १.४ अब्ज इतकी भरेल. २०३० सालापासून पुढील कांही वर्षे दोन्ही देशांची लोकसंख्या साधारण सारखीच राहील. मध्यंतरी, गेल्या ६ जानेवारीला चीनमधील बिजिंग हॉस्पीटलमधे झांग टोंग यांच्या मुलाचा जन्म झाला आणि चीनची लोकसंख्या बरोबर १.३ अब्ज झाली. त्यावेळी त्या मुलाचे वडील सांग टोंग यांनी आनंदाश्रूसहित ''मी जगांतील सर्वात आनंदी मनुष्य आहे'' अशी प्रतिक्रिया व्यक्त केली.



देशविदेशी दंतकथा (ग्रीस)

# सर्वोत्तम आशिर्वाद



प्राचीन काळांत ग्रीस व रोमचे नागरिक अनेक देवीदेवतांची भक्ती करीत असत. त्यापैकी बरेच देव आता विस्मृतींत गेलेले आहेत. त्यापैकीच हेरा ही देवी होती. स्त्रियांची ती खास देवी होती आणि विशेषतः विवाहसभारंभात तिची प्रमुख पूजा केली जात असे. रोमन पौराणिक कथांमधे तिचा उल्लेख जुनो असा केला जाई.

हेरादेवीचे मंदिर एका डोंगरावर होते. एका विशिष्ट शुभदिवशी शेकडो स्त्रिया या मंदिरांत दर्शनाला येत. प्रमुख पुजारीणबाई मोठ्या समारंभाने थाटामाटांत देवीची पूजा करी. त्याप्रसंगी दर्शन घेणे हे सर्व स्त्रियांसाठी, खास करून कुमारिकांसाठी भाग्याचे मानले जात होते.

पुजारीणबाई आपल्या दोन तरुण मुलांसह त्यांच्या खेडेगांवी गेली होती. ते गांव मंदिरापासून कित्येक कोस दूर होते. मंदिरांतल्या वार्षिक उत्सवासाठी ते गांवाहून अगोदर येणार होते. पण खेडेगांवी गेल्यावर पुजारीणबाई आजारी पडली. तिचा आजार कांही बरा होईना. उत्सवाला एक दिवस उरला, तेव्हां तिने तसेच मंदिरात जायचे ठरवले. अंतर बरेच होते तेव्हां गाडीची सोय पाहायला तिचे मुलगे आसपासच्या खेड्यांत चौकशी करीत होते. त्यांना एक गाडी मिळाली. पण घोडे नव्हते. बैलही कुठे मिळेनात. ते देखील चालले असते.

पुजारीण अस्वस्थ झाली. संध्याकाळ झाली. तिला पहाटे पूर्वी मंदिरात पोचणे आवश्यक होते. नाहीतर देवीचा कोप झाला असता ना! शेकडो भाविक निराशेने परत गेले असते. तिच्या मदतनीस पुजारिणींना पूजा करण्याचा अधिकार अद्याप दिलेला नव्हता.

तिचे दोघे मुलगे, बायटन आणि क्लिओनिस, यांना बैल किंवा घोडे, कांही मिळाले नाहीत. तरी त्यांनी आईला मंदिरात घेऊन जाण्यासाठी नवा उपाय केला. दोघेही तिच्या खोलीत गेले आणि तिला त्यांनी गाडीत बसण्यास सांगितले.

तिचा चेहरा उजळला. ''माझी खात्री होती कीं तुम्ही कांहीतरी माझी सोय कराल आणि

कुठूनतरी घोडे किंवा बैल नक्कीच मिळवाल.'' ती आनंदाने गाडीत बसली. अंधार पडला होता म्हणून गाडी ओढणारी जनावरे तिला दिसली नाहीत तिने मुलांना गाडींत बसायला बोलावले. पण त्यांनी आम्ही चालत येणार आहोत असे सांगितले. ती कांही बोलली नाही. दोघेही धडधाकट, तरुण होते. आणि एकच माणूस आंत असला कीं गाडीही लौकर जाईल असे त्यांना वाटले असेल, असा तिने तर्क केला.

गाडी खरंच वेगाने जाऊं लागली. पुजारिणीला गाढ झोंप लागली. तिला जाग आली तेव्हां पहांट झाली होती. आपले मुलगे मागाहून येत आहेत कां, ते तिने वाकून पाहिले. पण तिला कुणीही दिसले नाही. नंतर तिने समोर बघितले. तर काय, तिचे दोन्ही मुलगे गाडीला जुंपलेले होते. रात्रभर न थकता त्यांनी गाडी ओढत आणली होती. त्यांचा हा प्रवास आता पूर्ण झाला होता. सूर्योदय होण्यापूर्वी मंदिर केवळ कांही हातांच्या अंतरावर होते.



प्रमुख पुजारिणीने स्नान केले आणि ती पूजाविधीसाठी तयार झाली. तिचे दोन्ही मुलगेही मंदिरांत उपस्थित होते. पूजासमारंभ संपल्यानंतर पुजारिणीने देवीची मनोमन प्रार्थना करून म्हटले, ''हे सर्वशक्तिमान देवते, माझ्या या दोन्ही कर्तव्यतत्पर पुत्रांसारखे मुलगे किती मातांना मिळाले असतील? त्यांच्या या सत्कृत्याबद्दल त्यांना सर्वोत्कृष्ट बक्षीस मिळायला हवं. दोघेही बिचारे अगदी पार थकून गेले असतील. त्यांना तू सर्वोत्तम असा आशिर्वाद दे की त्यांना यापुढे कधीही थकवा जाणवणारच नाही. कोणत्याही गोष्टीची यापुढे कधी भीती, चिंता वाटणार नाही! खरंच, परमपूज्य देवते, हा सर्वांत उत्कृष्ट असा वर तू त्यांना द्यावास म्हणून मी तुला विनवते.''

''तथास्तु!'' फक्त तिलाच हा शब्द ऐकूं आला. दुसऱ्याच क्षणीं उभे असलेले तिचे दोन्ही सुपुत्र जमिनीवर आडवे झाले.

त्यांना झोंप लागली. आणि ती झोंप कधी संपलीच नाही. कित्येक वर्षांनंतर झोपेतच ते दोघे निधन पावले. भीती, चिंता त्यांना कधी जाणवण्याचे किंवा थकवा येण्याचेही कारण नव्हते!

*(एम्. डी.)*





THE ADVENTURES OF G-man

# ॲंड्रोमेनिया रेप्टिलिया भाग-1

















पंजाबची लोककथा

# लठ्ठपणावरील उपाय

राजा राजाधिराजचा राज्यकारभार सुरळीत चालू होता, फारसे कांही प्रश्न नव्हते. त्यामुळेल्या निवांतपणा होता, म्हणून त्याने आपलं लक्ष चांगलंचुंगलं खाण्याकडे आणि उच्च प्रतीचं मद्य पिण्याकडे वळवलं. परिणामी तो खूप लठ्ठ झाला. तो इतका लठ्ठ झाला होता की जर चारचौघांत तो आला तर त्याच्याकडे पाहून लोकांना हंसू आवरत नसे. कांही लोकांना इतके हंसू येई, की राजाला ते दिसू नये, म्हणून ते त्याच्यापासून आपला चेहरा लपवत.

पूर्वी, तो राजकुमार असताना अतिशय सडपातळ शरीरयष्टीचा आणि देखणा होता. तो घोड्यावरून जात असताना लोक पाहात रहायचे. त्यांना त्याच्या रुबाबदारपणाचं कौतुक वाटायचं वडील वारल्यानंतर राजाधिराज गादीवर आला. कांही काळांतच त्याच्या लक्षांत आलं की त्याच्या मंत्र्यांमधे आपापसांत चांगलीच भांडणे आहेत. त्या मंत्र्यांपैकी प्रत्येकाला प्रधानमंत्री व्हायची इच्छा होती. एखाद्या बाबतीत राजानं निर्णय घ्यायला थोडा जरी विलंब केला तरी मंत्री आपल्या कामाकडे दुर्लक्ष करीत, आणि राज्याची प्रशासन अवस्था कोलमडून जाई. तेव्हां राजाधिराजने एक-दोन चांगल्या मंत्र्यांना विश्वासांत घेतलं आणि त्यांच्या मदतीने राज्य-कारभाराची घडी पुन्हां व्यवस्थित बसविली. त्याने कोणा एकालाच 'प्रधानमंत्री'पद देण्याऐवजी वेगवेगळ्या विभागांची मंत्रीपदे वाटून दिली आणि उरलेल्यांना कांही जास्ती अधिकार देऊन त्यांनाही खूष ठेवलं. आता राज्यांत पुन्हा शांतता प्रस्थापित झाली. आता असे कोणतेही प्रश्न राहिले नव्हते, ज्यांत राजाधिराजला तातडीने, जातीने लक्ष घालायला हवं होतं. अशा निवांतपणी आता तो चांगलंचुंगलं खाण्यापिण्यांत मग्न झाला होता.

राजाधिराज जेव्हां आपल्या मंत्र्यांना कांही कामासाठी, चर्चेसाठी बोलावीत असे, त्यावेळी त्यांना आपले हसूं आवरणे खूपच अवघड होते आहे, ही गोष्ट त्याच्या नजरेतून सुटली नव्हती. म्हणून



त्याने एका मंत्र्याला विश्वासात घेऊन त्यांच्या हंसण्याचे कारण विचारलं. तो मंत्री म्हणाला, "महाराज, आपण रागावणार नसाल तर मी सांगतो." राजाकडून तसं अभय मिळाल्यावर तो मंत्री हळू आवाजांत म्हणाला, "महाराज, तुम्ही किती लठ्ठ झाला आहात हे तुमच्या लक्षांत येत नाहीये कां?"

राजाने हंसून त्या मंत्र्याकडे पाहिले आणि म्हणाला, "होय, मला मान्य आहे मी खूप लठ्ठ झालो आहे. पण त्याला मी काय करुं?" यावर मंत्री म्हणाला, "महाराज, तुम्ही सारखं असं चांगलंचुगलं अन्न खाणं थांबवीत कां नाही?" राजाने "अशक्य" असं म्हणून एका शब्दातच मंत्र्याची सूचना गुंडाळून ठेवली.

आता आणखी कांही बोलण्यात अर्थ नाही, हे समजून मंत्री गप्प बसला. मग एकदम राजाधिराज उद्गारला, "मला कळलं मी काय करायला पाहिजे ते! मी आज्ञा द्यायला हवी की चांगलंचुगलं खाऊन माझ्या राज्यांतील प्रत्येक व्यक्तीने माझ्याइतकं लठ्ठ व्हायला पाहिजे. आत्ताच्या आत्ता अशी दवंडी पिटा! त्याचबरोबर सर्व दुकानांमधे असं अन्न स्वस्त दरांत उपलब्ध होईल याचीही काळजी घ्या. लोकांना हवं तितकं, हवं तेव्हां खाऊं-पिऊं दे. असेही जाहीर करा की येत्या सहा महिन्यांत जो कोणी लठ्ठ न होता सडपातळच राहील, त्याला तुरुंगात डांबून जबरदस्तीने खायला घालण्यांत येईल."



राज्यांत लगेचच दवंडी पिटण्यांत आली. कोणालाही तुरुंगात जाण्याची इच्छा नव्हती. त्यामुळे सर्वांनी मनसोक्त खाण्यापिण्यास सुरुवात केली. कांही कालावधीतच पहावे तिकडे नुसती लठ्ठ माणसे दिसायला लागली. राजा राजाधिराज राज्यांतून फेरफटका मारायला गेला असताना त्याला सगळीकडे लठ्ठ स्त्री पुरुष दिसू लागले. आता तो खूप खूष झाला.

पण त्याचा हा आनंद फार काळ टिकला नाही. एकेकाळी खूप सुंदर दिसणारी त्याची एकुलती एक मुलगी, राजकुमारी मालविका जेव्हां खूप लठ्ठ झालेली त्याने पाहिली, तेव्हां तो अतिशय अस्वस्थ झाला. त्याने त्याच्या मंत्र्यांचा सल्ला घेतला (त्यांच्यातही लठ्ठ होण्याची चढाओढ सुरुं होती) आणि सगळ्यांनी एकमताने ठरवलं की राजकुमारीला या आज्ञेतून सूट देण्यांत यावी आणि सडपातळ होण्याची परवानगी देण्यात यावी. पण आता ही गोष्ट अंमलात आणणे राजकन्येला अशक्य झालं. कारण आत्तापर्यंत तिला चांगलंचुंगलं खायची चांगलीच चटक लागली होती. आता



खाण्यावर नियंत्रण ठेवणं तिला शक्य झालं नाही आणि परिणामी ती लठ्ठच राहिली.



राजाच्या मनांत आलं की यावर कांहीतरी औषधोपचार नक्कीच असेल. म्हणून त्याने आणखी एक दवंडी पिटवली की, "जो कोणी राजकन्येला तिच्या लठ्ठपणातून बरे करेल त्याला भरघोस बक्षिस देण्यात येईल. आणि उपचार करणारा वैद्यही सडपाडळ शरीरयष्टीचा असेल तर त्याचे राजकुमारीशी लग्न लावून देण्यात येईल व तो राज्याचा वारस बनेल." पण ज्यांनी ज्यांनी राजकन्येला सडपातळ करण्याचे प्रयत्न केले, ते सगळे असफल झाले, त्यांचे पुढे काही डोकंच चालेना.

आता राज्यातील कांही वैद्य तर लपून बसू लागले, न जाणो त्यांना पकडून राजासमोर उभे केलं गेलं तर? असेच दिवस, आठवडे, नि महिने सरले. राजा, राजकुमारी, सर्व मंत्री आणि सगळे प्रजाजन अनिर्बंधपणे खातच राहिले, आणि अधिकाधिक लठ्ठच होत राहिले.

एके दिवशी राजधानीजवळच्या जंगलातील वनस्पतीमधे कांहीतरी शोधाशोध करणाऱ्या एका युवकाला राजाच्या शिपायांनी राजासमोर हजर केले. त्याबाबतीत त्याला विचारल्यावर त्याने सांगितले की, तो शेजारच्या राज्यांतील एक वैद्य असून कोणती तरी वनौषधी शोधत होता. या शिपायांनी कसे तरी त्याचे मन वळवून त्याला राजवाड्यात यायला लावले होते.

त्या वैद्य युवकाला पाहून राजा खूप आनंदित झाला. राजाच्या लक्षांत आलं की तो युवक सडपातळ व नीटनेटक्या शरीरयष्टीचाही आहे.

त्याने आपला जंगलात येण्याचा हेतू स्पष्ट केला, पण राजकुमारीला साधे पहाण्याचेही नाकारले. तो विनम्रपणे राजाला म्हणाला, "मी पाहिलंय, कीं या राज्यांतील प्रत्येक व्यक्ती लठ्ठ आहे. मी एकट्या राजकुमारीला कसं बरं करूं शकणार आहे? मला वाटतं, या संपूर्ण राज्यालाच कसल्याशा विशिष्ट, चमत्कारिक रोगाने पछाडलेले आहे. कृपया मला माझ्या कामासाठी पुन्हां जंगलात जाण्याची परवानगी घ्या."

पण राजा त्याला म्हणाला, "मला तू कोणतीही सबब सांगू नको. माझ्याबरोबर चल. तुला कल्पना आहे का, तू किती बक्षिसे मिळवूं शकतोस ते? तुझे राजकुमारीशी लग्न होईल आणि तू राज्याचा वारस होशील. राजकुमारीला तपासून सांग की तू तिला बरं करूं शकशील का? त्यासाठी तुला जे हवं असेल ते सर्व मिळेल." असे म्हणत राजाने त्या युवकाला हात धरून जवळ जवळ ओढतच राजकुमारीच्या दालनांत नेले.



त्या वैद्य युवकाने राजकुमारीच्या डोळ्यांत रोखून पाहिले आणि कपाळाला हात लावून तिला ताप आहे कां, हे तपासले. नंतर त्याने तिचा हात हातांत घेऊन हाताचा तळवा कुरवाळला. आता त्याने वळून हेतुपुरस्सरपणे राजाकडे पाहिले व म्हणाला, "महाराज, माफी असावी. आता तुमची मुलगी फक्त एकशे तीन दिवसांची सोबतीण आहे! त्यामुळे तिच्यावर उपचार करण्यांत कांही अर्थ नाही."

हे ऐकून राजा, राजकुमारी आणि दालनांत उपस्थित असलेल्या सर्वांना चांगलाच धक्का बसला. पण राजाने लगेच स्वतःवर ताबा मिळवला आणि म्हणाला, "तू वर्तवलेल्या भविष्याबद्दल मी आत्ता तुला कांहीही शिक्षा देत नाही. पण जर माझी मुलगी एकशे तीन दिवसांपेक्षा जास्त जगली तर तू मात्र जीवाला मुकशील! तोपर्यंत तुला तुरुंगात ठेवण्यात येईल."

पहिले कांही दिवस राजकुमारी मालविका जवळ येऊन ठेपलेल्या मरणाच्या कल्पनेने खूपच अस्वस्थ होती. तिला तिच्या सोबत्यांपासून दूर जायची अजिबात इच्छा नव्हती. तिची अन्नावरची वासनाच उडाली आणि खाणें बंदच झालं. ती फक्त पाण्यावर राहूं लागली. आपली लाडकी लेक आपल्याला दुरावणार याच विचारात सारखे रहाणाऱ्या राजाचेंही चांगले चुंगले, वेगवेगळे खाणे-पिणे बंद झाले.

शंभर दिवस अगदी भर्रकन निघून गेले. मालविकाचा दुःखी चेहरा पहायला लागू नये म्हणून राजा आता तिला भेटायचं पूर्णपणे टाळू लागला. त्याच वेळी तो तिच्या मैत्रिणींना बोलावून तिची ख्यालीखुशाली मात्र विचारत होता. एकशे एकाव्या दिवशी तिची एक मैत्रीण येऊन राजाला म्हणाली, "महाराज, राजकुमारी हसूं लागली आहे. ती म्हणते आहे की ती खूप दिवस जगणार आहे." राजानं आपल्या गळ्यांतली मोत्याची एक माळ काढून त्या मैत्रिणीला बक्षिस दिली.

दुसऱ्या दिवशी आणखी एक राजकुमारीची सखी येऊन सांगू लागली, "महाराज, आज राजकुमारीने आपण होऊन एक पेलाभर डाळिंबाचा रस मागून घेतला." तिलाही राजाने बक्षिस दिले. आता निर्वाणीचा एकशे तिसरा दिवस उजाडला आणि राजकुमारीच्या आणखी एका मैत्रिणीने चांगली बातमी आणली, ती म्हणाली, "महाराज, आज किती तरी दिवसांनी राजकुमारीने थोडे अन्न ग्रहण केले." राजाने हिलाही बक्षिस दिले आणि म्हणाला, "मालविकाला सांग की मी उद्यां तिची भेट घेईन!" राजकुमारीची ती सखी गेल्यावर मात्र राजा एकदम चिंताक्रांत झाला की 'माझी मुलगी उद्यांचा सूर्य पाहूं शकेल का?"

दुसरा दिवस उजाडला. राजा लवकर उठून राजकुमारीच्या दालनांत जाण्यासाठी तयार झाला.



पण त्याच वेळी मालविका आपल्या सर्व सख्यांच्या घोळक्याबरोबर राजाच्या दालनांत आली. राजा तिला पाहताच म्हणाला, "मालविका, तू किती सुंदर दिसते आहेस!"

राजकुमारी म्हणाली, "पिताजी, कृपया त्या वैद्याला बोलवा. मला त्याला भेटायचं आहे."

"मालविका, मी त्या वैद्याला नक्कीच तुझ्याकडे पाठवीन. पण चुकीचे भविष्य वर्तविण्याबद्दल मी त्याला वधस्तंभाकडेही पाठवणार आहे." राजा म्हणाला.

राजकुमारी कळवळून म्हणाली, "पण पिताजी, मी तर जिवंत आहे! मग त्याला कशाला मारायचं?"

लवकरच त्या वैद्याला राजासमोर हजर करण्यात आले. राजाने त्याला विचारले, "तुझ्या भाकिता-विषयी तुला कांही सांगायचं आहे कां?"

स्वतःला फांशी दिली जाण्याच्या शक्यतेने थरथर कांपण्याऐवजी खो खो हंसत, तो वैद्य म्हणाला, "महाराज, आता राजकुमारी सडपातळ आणि सुंदर दिसते आहे ना? तुम्हाला काय वाटतं, तिचा लठ्ठपणा कुठे गेला? आणि तुम्ही जर स्वतःकडेही पहा. आता तुम्ही स्वतःला लठ्ठ म्हणाल कां? आता तुम्हाला हलकं आणि उल्हसित वाटत नाही का?"

राजाने त्याच्याकडे प्रेमाने पाहात म्हणाला, "हो, तू म्हणतोस ते खरं आहे. पण हे कसं शक्य झालं?"

तो युवक हसून म्हणाला, "महाराज, मी कसलंही भाकित वर्तवलं नव्हतं. मला फक्त अशी परिस्थिती निर्माण करायची होती की ज्यामुळे तुम्ही सर्वजण अनिर्बंध खाणे-पिणे बंद कराल. सगळ्या प्रश्नांचं मूळ असं खाणे-पिणे हेच होते. कृपया तुमची आज्ञा मागे घ्या आणि तुमच्या प्रजेला हवं ते खाण्यापिण्याचं स्वातंत्र्य त्यांना असूं द्या."

राजा राजाधिराज हसून म्हणाला, "ते तर मी करीनच. पण तुला दिलेल्या वचनाची पूर्तताही मला करायला हवी. लवकरच मला माझ्या लाडक्या लेकीचं लग्न तुझ्याशी लावून दिलं पाहिजे."

राजकुमारीच्या लग्नानंतर थोड्याच दिवसांनी राजाने आपल्या निवृत्तीची घोषणा केली. त्या नवीन, तरुण राजकुमाराला गादीवर बसल्यानंतर तो वनौषधी शोधताना जंगलात रस्ता चुकून शिपायांच्या हाती लागला होता, तो दिवस आठवला!





# विश्वासघात

ब्रह्मदत्त काशी येथे जेव्हां राज्य करीत होते, त्यावेळी बोधिसत्व त्यांच्या येथे पंडितामात्याच्या पदावर होते.

एकदा राजा ब्रह्मदत्त कांही कारणांमुळे आपल्या मुलावर रागावला व त्याने त्याला देशाबाहेर हांकलून लावले. राजकुमार आपल्या पत्नीसमवेत खूप दिवस भटकत, पुष्कळ हालअपेष्टा सहन करीत राहिला. त्यांना राहायला जागा नव्हती आणि खायला अन्न मिळत नव्हते; तरीपण त्या महासाध्वीने आपल्या नवऱ्याचे कष्ट बघून आपली सहनशीलता पणाला लावली व सर्व कष्ट झेलले.

काही वर्षांनंतर ब्रह्मदत्त निवर्तला. आपल्या वडिलांच्या मरणाची वार्ता समजताच राजकुमाराला खूप आनंद झाला. काशीला पोहचून गादीवर बसण्याच्या हेतूने तो उतावळेपणाने त्याची यात्रा संपुष्टात आणण्याचा प्रयत्न करू लागला.

परंतु त्या मूर्खाला एवढी समजूत नव्हती की त्याची पत्नी त्याच्या प्रमाणे लवकर चालूं शकणार नाही. कारण तिनेही पतीबरोबर तेवढेच कष्ट सोसले होते. परंतु त्याने रात्रंदिवस खाणेपिणे व विश्रांती ह्याकडे दुर्लक्ष केले व बरोबर पत्नीला पण त्याच वेगाने चालण्यास सांगितले.

राज्याच्या लालसेने कितीही जलद जाऊं लागला तरी खाणे पिणे व विश्रांती शिवाय माणूस किती चालूं शकेल? त्यामुळे त्याच्या बायकोबरोबर त्यालाही भूक लागली. तहानभुकेने व्याकूळ होत शेवटी ते एका गांवात येऊन पोहोचले. तिथे पोहोचताच तिथले कांही लोक त्यांचे झालेले हाल पाहून म्हणाले - "काय हो, असे वाटते आहे की भूक आवरून तुम्ही हा प्रवास करीत आहात. आम्ही थोडे कांही तुम्हाला खायला देतो, ते तुम्ही बांधून तुमच्या बरोबर घेऊन जा. जेव्हां भूक लागेल तेव्हां खा."

राजकुमाराने आपल्या पत्नीला एका जागी थांबायला सांगितले व तो त्यांच्या पाठीमागे गेला. त्या लोकांनी दोघांना पोटभर खाऊन आणखी उरेल, इतके अन्न एका पत्रावळीत दिले.

खाद्यपदार्थ घेऊन परत येत असतांना राजकुमाराने असा विचार केला, हे खाणे दोघांनी मिळून खाल्ले तर दुसऱ्या दिवशी परत भूक लागेल व नंतर परत अन्न केव्हां दृष्टीस येईल कोण जाणे! आपल्याला तर पुष्कळ दूरचा प्रवास करायचा आहे. लांब प्रवासाने आधीच आपली पत्नी रोडावली आहे. तेव्हां तिला काशीपर्यंत चालणे शक्यच नाही. तेव्हां कांहीतरी कारण सांगून हे सर्व आपणच खाल्ले पाहिजे. त्या दुष्टाने असा विचार करून आपल्या पत्नीजवळ पोहोचताच सांगितले - "तू पुढे जा, मी माझे सर्व विधी आटोपून लवकरच परत येतो."

राजकुमाराच्या बायकोने त्याचे म्हणणे खरे मानले व ती चालू लागली. ती पुढे जायचाच अवकाश, त्याने पत्रावळीतले सारे अन्न खाल्ले व परत पत्रावळ पोकळ बांधली व लवकर आपल्या बायकोजवळ येऊन पोहोचला.

पत्नीने डबडबलेल्या डोळ्यांनी त्या पुड्याकडे पाहीले. तेवढ्यांत त्याने राग आल्याचे नाटक करून तिला सांगितले - "बघ, ह्या गांवातले लोक किती लुच्चे आहेत. खाद्यपदार्थांच्या नांवाने रिकामी पत्रावळ बांधून दिली आहे!"

राजकुमाराच्या बायकोने सत्य परिस्थिति ओळखली. तरीपण ती आपल्या पतीचा आदर करत होती. त्यामुळे ती गप्प बसली. थोड्या दिवसांचा प्रवास संपवून ते काशीला येऊन पोहोचले. राजकुमाराने आपला राज्याभिषेक मोठ्या सोहळ्याने साजरा केला व तो काशीचा राजा झाला.

राजा झाल्यावर तो आपल्या पत्नीविषयी विचार करायलासुद्धा विसरला. त्याला असे वाटले नाही की, पूर्वीच्या हालअपेष्टा सहन करत असताना आपल्याचप्रमाणे आपली पत्नीसुद्धा बरोबरीने सर्व सहन करीत होती. तरी तिला आता सुखाचा उपभोग बरोबरीने मिळाला पाहिजे. तिने व्यवस्थितपणे खाणेपिणे व कपडे केले की नाहीत याची कधीही राजाने चौकशी केली नाही. त्यामुळे



राणी नेहमीच चिंताक्रांत दिसत असे. राजाकडे पंडितामात्याच्या पदावर असलेल्या बोधिसत्वांनी राणीची ही करुण परिस्थिती पाहिली व ते तिला भेटायला गेले. राणीने मोठ्या आदराने त्यांचे स्वागत केले.

बोधिसत्व म्हणाले - "महाराणी, कष्टांपासून मुक्तता मिळवून राजा झालेल्या आपल्या पतीने मला आतापर्यंत कित्येक वस्तू भेट म्हणून दिल्या. परंतु आतापर्यंत आपण मला एखादी भेट म्हणून कांही दिले नाहीत."

"पंडितामात्य, मी नांवापुरतीच राणी आहे. परंतु विचार केला तर अंतःपुरातल्या दासी आणि माझ्यांत कांहीही फरक नाही. आपणच सांगावे की, कष्टाला सोडून सुखोपभोगात जी भाग घेऊ शकत नाही, तिला राणी कसे म्हणावे?" या शब्दांत सांगून राणीने सर्व हकिगत सांगण्यास सुरवात केली व काशी परतण्याच्या वाटेवर पतीने आपल्या वांट्याचे अन्नसुद्धा कसे खाऊन टाकले ते सांगून म्हणाली -

"ह्या वेळेस सुद्धां माझे पती माझी विचारपूस करीत नाहीत. मी जेवले की नाही, चांगले कपडे वापरते किंवा नाही, याची फिकीर त्यांना नाही." असे म्हणत ती अश्रू ढाळू लागली.

बोधिसत्वांनी राणीची समजूत घातली - "राणीसाहेब, आपण चिंता करू नका. ही गोष्ट मी आपल्या तोंडून ऐकण्याकरिताच आलो होतो. मी उद्या भरसभेत आपल्याला प्रश्न करीन, त्याचे उत्तर आपण निःसंकोचपणाने द्यावे. म्हणजे मी आपली चिंता दूर करू शकेन."

दुसऱ्या दिवशी राजसभेत महाराणी येऊन बसली. तेव्हां बोधिसत्वांनी तिला प्रश्न केला. "महाराणी, आपण राज्य ग्रहण केल्यानंतर आपल्या नोकरचाकर दासदासींकडे अजिबात लक्ष देत नाही, हे खरे का?"

ह्यावर राणीने भर सभेत सर्व गोष्टी सांगितल्या व हे ही सांगितले की तिच्या वाट्याचे अन्न सुद्धा राजाने कसे खाल्ले; तेव्हां ही गोष्ट भरसभेत राजाला अपमानकारक वाटली.

राणीचे म्हणणे संपताच बोधिसत्वांनी सर्वांना समजावून सांगितले - "महाराणी, जर महाराज तुमची नीट काळजी घेत नाहीत तर आपणसुद्धां त्यांच्याबरोबर रहाण्याची जरूरी नाही. असे सांगतात-

चजे चजतं वन्थं न कइरा,<br>
आपेत चित्तेन न संभजेय्य;<br>
द्विजो दुमं खीण फलंति इत्वा;<br>
अंड समेक्खेय्य महाहे लोके ।

(ज्यांनी तुम्हाला सोडले, त्याचा त्याग करा. अशा माणसाशी स्नेहभाव ठेवू नका. जो तुमच्या-बद्दल आदर ठेवीत नाही, तुम्ही सुद्धा त्याच्याबद्दल आदर ठेवण्याची कांही गरज नाही. पक्षी सुद्धा शेवटी फळे नसलेले झाड सोडून दुसऱ्या झाडाकडे निघून जातात. हे जग खूप विशाल आहे.)

तसे तुम्ही ह्या राजमहालाचा त्याग करून त्या विशाल जगांत निघून जा. जिथे तुमचा आदर होईल, तेथेच तुम्ही सुखी जीवन जगू शकाल."

बोधिसत्वांचे हे म्हणणे संपले नाही तोच राजा सिंहासनावरून उठून आला व बोधिसत्वांच्या पायावर डोके ठेवून त्यांची क्षमा मागू लागला व म्हणाला - "पंडितामात्य, आपण माझे अपराध पोटात घालून मला क्षमा करा. माझी अब्रू वाचवा, जी गोष्ट झाली ती झाली. ह्यापुढे मी माझ्या पत्नी-बरोबर धर्मपूर्ण व्यवहार ठेवीन." त्या दिवसापासून राजा राणीचा आदर करू लागला व आनंदाने दिवस घालवू लागला.







# विष्णु पुराण

कपिलवस्तु नगरातून बाहेर पडून बऱ्याच लांब आल्यावर सिद्धार्थने आपले उत्तरीय वस्त्र, तलवार आणि आपली आभूषणे काढून आपला सारथी चेन्ना ह्याच्या हातात देत म्हटले - "चेन्ना, तू माझ्या वडिलांच्याकडे जाऊन माझा नमस्कार त्यांना कळव. त्यांना असेही सांग की सिद्धार्थने ह्या विशाल जगात आपले पाऊल ठेवले आहे. प्राणीमात्रांना ह्या दुःखापासून दूर करणारा धर्म-चक्र संचालक सिद्धार्थ गौतम ह्या रूपाने कपिल-वस्तु नगरात पुन्हां तो येईल."

चेन्नाच्या तोंडून एकही शब्द बाहेर पडला नाही. त्याच्या डोळ्यातून अखंड अश्रूधारा वाहू लागल्या. त्यावर विचलीत होत सिद्धार्थ म्हणाला, - "चेन्ना, लहानपणी आईच्या मातृप्रेमाला वंचित झालेल्या मला आपल्या हातात घेऊन, माझे प्रत्येक म्हणणे मानून, मला खेळवून, तू लहानाचा मोठा केलास. मी तुझे ऋण कधीही फेडू शकणार नाही. मानवजन्म घेऊन ह्या व्यथांचा अनुभव घेण्याकरिता ह्या अर्धरात्री तू मला नगराच्या पार आणून सोडलेस. हे तुझे उपकार मी कधीही विसरणार नाही. जर माझ्या मनाची तृप्ती झाली ती, तर ह्या माझ्या प्रयत्नांना सहयोग देणारी प्रथम व्यक्ती तूच आहेस. आता तू घरी जा." असे म्हणून सिद्धार्थने त्याला परत पाठवून दिले.

चेन्ना बराच वेळ तेथून हलला नाही. शेवटी नाईलाजाने पाय ओढीत घोड्याजवळ पोहोचला.

सिद्धार्थने महानिर्वाणाकडे आपले पाऊल उचलले. शुक्राची चांदणी आकाशांत चमकत होती. सूर्यदिशा फांकू लागल्या.



चेन्नाने राजमहालात येऊन मोठ्या गद्‌गद्‌लेल्या स्वरांत महाराजा शुद्धोदनला सिद्धार्थचा निरोप कळविला. त्यावर अत्यंत व्याकुळ होऊन राजा बेशुद्ध पडला.

यशोधरा आपल्या मुलाला छातीशी कवटाळीत म्हणू लागली - "बाळा, तू सुद्धा आपल्या वडिलांना थोपवू शकला नाहीस ना?" असे म्हणून ती आपल्या पतीचे मुखकमल आठवू लागली. त्यांचा तो दैदिप्यमान सर्वगुणसंपन्न चेहरा आठवून ती मोठ्या कष्टाने उठून उभी राहिली.

"महाराज, आपण आपल्या मुलाला एक साधारण मानव समजलात. त्याला शाक्यवंशाला पुनीत करणारा असा एक समजा. जशा प्रकारे कपिलवस्तु राज्यांतील जनतेचे कल्याण व्हावे असे वाटते, त्याचप्रमाणे ह्या विशाल जगातील सर्वजण त्यांची प्रजा आहे. त्यांचा उद्धार करण्याकरिता त्यांनी सिद्धार्थ गौतम हे रूप धारण केले आहे. आणि त्याच्याच कल्याणाकरीता ते राजमहाल सोडून गेले आहेत." यशोधरेने आपल्या सासऱ्याला सांगितले.

यशोधराच्या तोंडचे हे सत्य ऐकून शुद्धोधनाने आपल्या दुःखाला आवर घातला.

त्यानंतर यशोधरेने राहुलला त्यांच्या हातात देत म्हटले, "तात, हे त्यांचेच प्रतिबिंब आहे."

शुद्धोदनने त्याला आपल्या हातांत घेऊन आपल्या मुलाचे स्मरण केले. बरोबर एवढाच लहान असतांना सिद्धार्थला आपल्या जवळ सोडून आपली बायको निर्वतली होती.

सिद्धार्थ लौकरच कपिलवस्तुला परत येईल आशी आशा धरून शुद्धोदन राज्यकारभार सांभाळू लागला.

यशोधराने मनोमन संकल्प केला की, राहुलला शिक्षणाबरोबरच त्याच्या वडिलांसारखा कर्तृत्व-वान बनवायचे.

प्राणीमात्रांचा उद्धार करणारा व सत्याचा शोध करणाऱ्या सिद्धार्थला बऱ्याच कष्टांना तोंड द्यावे लागले. श्रम, दुःख, सहन करीत त्याने अनेक देशांतून भ्रमण केले. असेच जात असतांना एका ठिकाणी तहानेने व्याकुळ होऊन ते खेरी येऊन खाली पडले. एका गवळ्याने त्यांना दूध पाजवून वाचविले. त्याच वेळेला सिद्धार्थला अनुभव आला की प्राणाचे रक्षण करणे आवश्यक असते. त्यांनी जाणले की, समाजातील लोकांची सेवा करणे व त्यांना मदत करणे हा मनुष्यधर्म आहे.

भिक्षुकाच्या वेषांत ते देशाटन करीत अनेक साधुसंन्याशांना व योगी लोकांनी ते भेटले, त्यांच्याकडून त्यांनी अनेक भिन्न भिन्न मार्गांचे अवलोकन केले. व अपार ज्ञान संपादन केले.

सिद्धार्थ अत्यंत कठोर तपश्चर्या करू लागला. त्याच वेळेला सुजाता नांवाची एका गवळ्याची बायको गरोदर होती. तिने नवस केला की, जर आपल्याला मुलगा झाला, तर आपण सिद्धार्थाचे दर्शन पुन्हां करायचे. त्याप्रमाणे तिला मुलगा झाला. तेव्हां तिने मुलाला बरोबर घेतले व फळे, खीर घेऊन ती त्याच्या दर्शनाला गेली.

सिद्धार्थ तपश्चर्येमुळे अस्थिपंजर अवस्थेत क्षीण होत चालला होता. तेव्हां तशा अवस्थेत सुजाताच्या हातची खीर खाऊन त्याने आपले प्राण वाचविले.

सुजाताने सिद्धार्थला नमस्कार केला व म्हणाली - "आपल्या कृपेने मला मुलगा झाला." व तिने त्यांच्या संमतीशिवायच मुलाला त्याच्या पायाचा स्पर्श करविला.

त्यावर सिद्धार्थ म्हणाला - "माते, मी तू समजते आहेस तसा कोणी महान माणूस नाही. तू कोणत्या तरी भावनेने मला खीर दिलीस. परंतु मी तुला एक स्वरूपिनीचे रूपच मानतो. तुझ्या ह्या भूतदयेची भावना माझ्या मनाला आल्हाद देऊन गेली. जशी तू माझ्या प्राणांची रक्षा केलीस तसेच प्रकृती सदासर्वदा प्राणीमात्राची करेल."

"भगवन्, आपण आपले महत्व प्रकट करण्याची इच्छा करीत नाही, त्यामुळे असे सांगता आहात. परंतु मी मात्र जाणून आहे. आपण खरोखरी, एक महान महापुरुष आहात. माझी



एकच इच्छा आहे की, आपण आमच्या घरी येऊन आमचे आतिथ्य स्विकारून आमच्या मुलाला आशिर्वाद द्यावा. मी एक साधारण गृहिणी आहे." सुजाता म्हणाली.

"माते, मी एक खरी गोष्ट सांगतो. माझी तपस्या अजून पूर्ण सफल झाली नाही. मी सुद्धां तुमच्यासारखाच एक मानव आहे. मनुष्याने आपल्यामध्ये असलेल्या गुणांचे वेगवेगळे भेदभाव जाणणे आवश्यक आहेत. हे म्हणणे चूक आहे की कोण मोठा आहे व कोण लहान आहे! सर्व मानव प्राण्यांत जीव एकच आहे, त्याच प्रमाणे सर्व मानव एकच आहेत. मी जेव्हां कृतार्थ होईन, तेव्हां तुझ्या मुलाला आशिर्वाद देण्यास नक्की येईन." सिद्धार्थ म्हणाला.

"स्वामी, आपण अवश्य आले पाहिजे." असे म्हणत तिने त्यांना नमस्कार केला. तपश्चर्या



करण्याऱ्या अनेक लोकांच्यात एकच भावना त्यांना दिसून आली ती म्हणजे स्वार्थ. परंतु मानवाप्रती प्रेम किंवा मदत ही भावना कुठेच आढळली नाही. तपश्चर्या म्हणजे स्वतःच्या शरिराची हिंसा करणारी आत्महत्या असल्याचे त्यांना दृष्टीस आले. त्यामुळे सिद्धार्थ गौतमला पुन्हां त्याची आवश्यकता वाटली नाही, त्याच्या बरोबर साधना करणाऱ्यांनी त्याची चेष्टा केली, की गौतम तपस्याभ्रष्ट झाला.

कांही तपस्वी साधक अद्भुत शक्ति प्राप्त करून, जादूटोणा इत्यादी विद्या प्राप्त करून जनतेला आकृष्ट करून घेऊ लागले. व त्यांचे गुरु बनले.

अज्ञान व अंधविश्वास ह्यावर विश्वास ठेवणारी जनता कशी बोलेल?

यज्ञ व याग ह्या नांवाने केले जाणारे मारक होम वाढत चालले आहेत. राजाना प्रलोभन दाखवून यज्ञयागादी कृत्ये व अत्यंत मांसाहारी बनून मानव प्रथम क्रमांकाच्या लोकांचे अधिकाधिक पतन होण्यास कारणीभूत होत आहेत. त्याला जास्ती पापकृत्ये करावी लागत आहेत.

असे सर्व प्रकार सहन करीत, तर्क-वितर्क ह्यापासून दूर राहून, आपल्या कर्तव्य-धर्मावर विश्वास ठेवून सिद्धार्थ गया क्षेत्री एका विशाल पिंपळाच्या झाडाखाली मौन होऊन अंतर्मुखी होऊन बसला. एके दिवशी त्यांना ज्ञानोदय झाला.

तो वैशाख पौर्णिमेचा दिवस होता. पूर्णचंद्र आकाशांत दैदिप्यमान होता. त्यावेळी सिद्धार्थला आपल्या बुद्धत्वाची सिद्धी प्राप्त झाली. ते पूर्ण बुद्धाच्या रूपाने विकसित झाले.

सिद्धार्थगौतमला जेव्हां ज्ञानोदय झाला. तेव्हां त्यांनी एका अनिर्वचनीय अनुभूतीचा अनुभव केला. त्याच ध्यानमग्न अवस्थेला त्यांनी निर्वाण मानले.

वैशाख पौर्णिमेचा तो दिवस बुद्ध पौर्णिमेच्या रूपाने लोकप्रिय झाला. पिंपळाचे झाड बोधि-वृक्षाच्या रूपाने पूजेस प्राप्त झाले. बुद्धांना बोधिसत्व म्हणून मानले जाऊ लागले.

प्राणिजगतात मानवाला आपल्या बुद्धी सामर्थ्यामुळेच सर्वात श्रेष्ठ मानले जाते. बुद्धीच्या विकासामुळे मनुष्यप्राणी आपला उद्धार स्वतः करू शकतो. अहिंसेच्यामुळे मानव एक खरा माणूस बनून बुद्ध होऊ शकतो. आपल्या काम, क्रोध, मद, लोभ, मत्सर ह्यावर नियंत्रण ठेवून सुख दुःखापासून दूर राहून निर्वाण करू शकतो. अशा प्रकारे अनेक मनुष्यप्राण्यांत बुद्धत्व पैदा होऊ शकते व जगाला अंधकारापासून दूर नेऊन प्रकाशमय असे प्रथम स्थान देऊ शकते. बुद्ध हीच जगातील एक ज्योत आहे.

गौतम बुद्धाने जे सत्य जाणले, त्याचा प्रसार करण्यास आरंभ केला. बुद्धाला ज्यांनी परिहासाने पाहिले, तेच त्याचे प्रथम शिष्य अनुयायी बनले.

सर्वसाधारण जनतेला समजण्या सारखी सोपी भाषा वापरून, आचरण करण्यास योग्य असा धर्म, व उत्तम जीवनाची सूत्रे ह्याचा त्यांनी लोकांमधे प्रचार केला.

बुद्धाने केलेल्या सत्याचा बोध समजून घेऊन हजारो लोक त्याचे शिष्य बनले.

अहिंसा करणे पाप आहे. अहिंसा परमधर्मरूप मानून त्याचा प्रचार करीत गौतम बुद्ध देशाटन करीत निघाला. त्यामधे मगध देशाचा राजा चक्रवर्ती बिंबिसार बुद्धांच्या उद्बोधनाने उत्तेजित होऊन गेला. त्याने आपल्या राज्यांत चाललेल्या हजारो प्राण्यांच्या बळी देणाऱ्या यज्ञाला थांबवले, आपला मुकुट काढून त्याने बुद्धाच्या चरणाशी काढून ठेवला, आपल्या प्रजेला बुद्ध धर्माचे आचरण करण्यास सांगितले व बुद्धधर्म शिरोधार्य मानला.

बुद्धाचा उपदेश सिद्धान्त सूत्र बौद्ध धर्माचा विस्तार खूप प्रख्यात झाला. धर्मावलंबी सर्वांना बौद्ध म्हणू लागले.

अज्ञानाच्या अंधकारात निमग्न असलेल्या जगांतील मानवाला मार्गदर्शन करणारा बुद्ध धर्म सर्वत्र पसरला.

अहिंसेच्या ज्योतिच्या रूपी धर्म-चक्राचे पालन करणारे धर्म-चक्रवर्ती म्हणून संबोधू



लागले. बुद्धाने त्यावेळेस अनेक राज्यांत जाऊन बौद्ध संघ स्थापन केले व सेवाधर्म स्थापित केले.

गौतम बुद्ध देशाटन करीत असताना अनेक राजांनी त्याचे धार्मिक आधिपत्याचे आचरण केले. महाराजांनी आपले मुकुट त्याच्या चरणी अर्पण केले व बुद्धांची चक्रवर्ती राजा म्हणून स्तुती करूं लागले. त्याच्या आदेशानुसार राज्यकारभार केला. त्यात अहिंसा, दया व प्रेम ह्याचे अवलंबन केले. जाती-भेद न मानणाऱ्यांना सर्व लोकांनी बौद्ध धर्माचा स्वीकार केला.

त्याच्या आयुष्यात पंडित, पामर, ज्ञानी, राजा, सम्राट, हे सुद्धां बुद्धाला देवाचा अवतार मानूं लागले. व त्यांना बुद्धदेव म्हणू लागले. परंतु बुद्धाने कोणच्याही प्रकारची आराधना मानली नाही. त्याने त्या गोष्टीवर इतका जोर करून सांगितला की, केवळ भक्ति व आराधना ह्यांच्या मुळे मानव निर्वाण प्राप्त करू शकतो.

सहा वर्षानंतर बुद्ध कपिलवस्तूला जायला निघाले. ते येणार हे समजताच जनतेचा उत्साह जास्तच वाढला. त्याच्या आगमनाची जोरांत तयारी सुरूं झाली. त्याची आरती करण्यास लोक आतुरतेने वाट पाहूं लागले.

राजा शुद्धोदन अत्यंत आनंदित झाला. राहुल आता पूर्ण सहा वर्षांचा झाला होता.

''बाळा, तुझे वडील एक भिक्षु बनून इथे येत आहेत. त्या सम्राटांना आता आपण भिक्षा घातली पाहिजे.'' यशोधरा म्हणाली.

''काय म्हणालीस? माझे वडील सम्राट आहेत?''

राहुलने विचारले - ''होय, बाळा, ह्या जगांत तेच सम्राट आहेत.'' यशोधरने सांगितले.

''तुझ्या वडीलांना हे ऐश्वर्य नको आहे. त्यामुळेच तर ते सर्वाचा त्याग करून निघून गेले. आता ते सांगतील तसेच करणे हीच त्यांना घातलेली सर्वात मोठी भिक्षा आहे.'' यशोधरा म्हणाली.

''आई, मी असेच करीन. वडील जे सांगतील त्याचेच मी पालन करीन. त्यांचे अनुकरण करीन.'' राहुल असं म्हणत असताना यशोधराचा आनंद गगनात मावेनासा झाला.







# वीरदासचे भूत

एका गांवात वीरदास नांवाचा एक शेतकरी होता. त्याच्या पत्नीचे नांव जमुना व मुलाचे नांव किशनदास होते. मुलगा दिसायला बापासारखाच होता.

शेतांत लावणी चालली होती. एकदा पहाटे अंधारातच वीरदास शेतांत गेला. पण त्याला सांप चावला व गांवकऱ्यांनी त्याचे शव घरी आणले. इतरांच्या मदतीने किशनदासने पित्याचा अग्निसंस्कार केला.

जमुना रडूनरडून बेहोष झाली. त्या ग्लानींत तिला एक स्वप्न पडले. तिचा पती भूत होऊन विकृतपणे हंसत, घुबडासारखा घुत्कार करीत स्मशानाजवळच्या वडाच्या झाडावर उडतो आहे, असे तिला दिसले.

ती भिऊन किंचाळत उठली. तिचे सांत्वन करायला आसपासच्या बायका आल्या होत्या. त्यापैकी एकीने विचारले, ''ताई, तुम्ही कांहीतरी विचित्र स्वप्न पाहिलेत कां?''

''माझे पति भूत झाले आहेत.'' असं म्हणून जमुनाबाईने आपल्याला पडलेले स्वप्न सर्वांना सविस्तर सांगितले.

वीरदासचा मृत्यू झाला त्याच्या तिसऱ्याच दिवशी वडाखाली बेशुद्ध पडलेल्या एका बनियाला गांवकरी घेऊन आले. तो शुद्धीवर आल्यानंतर त्याने आपला अनुभव सांगितला.

तो बनिया शेजारच्या गांवात राहात होता. या गांवात येऊन तो आपल्या दुकानासाठी खरेदी करीत असे. त्यादिवशीही तो तसाच सराईत वाटेने येत होता. वेळीअवेळी त्या वाटेने जात असल्यामुळे रस्ता ओळखीचा होता. त्या दिवशी स्मशानाजवळ पोंचल्यावर त्याला कोल्ह्यांचा व घुबडांचा भीतीदायक आवाज ऐकूं आला. वडाच्या पानांतून खसखस आवाज ऐकूं आला. वडाच्या पारंब्यांना धरून पांढरे धोतर व सदरा घातलेला कुणीतरी पारंबीवर झुलत होता. आधीच बनियाला भुतांची भीती वाटत होती. त्याला पाहून ते भूत

**२५ वर्षांपूर्वींची चांदोबात प्रकाशित झालेली कथा**




गरजले, "अरे बनिया, तुझी सारी संपत्ती देऊन जा. माझ्या बायको व मुलाचे पोट भरायला तर हवे ना! मी कोण आहे, माहीत आहे? माझे नांव वीरदास आहे."

बनियाच्या सांगण्यावर गांवकऱ्यांनी विश्वास ठेवला. गांवकऱ्यांनी जमुनाबाईच्या घराची झडती घेतली. पण त्यांना फुटकी कवडीदेखील मिळाली नाही.

या अपमानाने जमुनाला रडणे आवरेना. आपला पती देवमाणूस होता, तो आता नुसता भूत झालेला नाही, तर तो वाटसरुंना लुटायला लागला आहे, हे पाहून तिला फार वाईट वाटले.

त्या दिवसापासून गांववाल्यांनी जमुनाबाईला वाळींत टाकले. तिच्याशी बोलणेचालणे बंद झाले. या गोष्टीचा तिला जास्तच त्रास होऊं लागला.

दुसऱ्या दिवशी रात्रीच्या वेळी कुणीतरी स्त्री शेजारच्या गांवाहून येत होती. भुताने तिचे सगळे दागिने लुटले आणि म्हटलं, "हे दागिने घालून माझी बायको जास्तीच सुंदर दिसेल.

दुसऱ्या दिवशी गांवकऱ्यांनी पुन्हां तिच्या घराची झडती घेतली. पण त्यांना कांही सांपडले नाही, तेव्हां ते तिला धमकी देऊं लागले, "तुझा नवरा हा गांवाला आता एक त्रासच व्हायला लागला आहे. त्याला इथून पळवून लाव, नाहीतर बघ!"

जमुनाबाईला कांही समजेना. तिची तिच्या नवऱ्याशी भेट होत होती, असं गांवकऱ्यांना वाटत होतं. गांव सोडून निघून जायला त्याच्या भुताला तरी ती कसं काय सांगणार होती म्हणा!

त्यानंतर आणखी तिघाजणांना ते भूत दिसलं होतं. आता गांवातला कुणीही माणूस अंधार पडल्यानंतर स्मशानाकडे येत जात नव्हता.

गांवकऱ्यांनी आपापसांत चर्चा करुन जमुनाबाईला सूचना दिली, "तू आणि तुझा मुलगा गांव सोडून गेला नाहीत, तर हे भूत कांही आमचा पिच्छा सोडणार नाही. उद्या संध्याकाळपर्यंत तुम्ही जर इथून गेला नाहीत, तर आम्हीच तुम्हाला इथून पळवून लावूं."

आता घरदार सोडून जायचं तरी कुठे? म्हणून जमुनाबाईने धीर धरुन आपल्या पतीला विनंती करायचे ठरवले आणि ती स्मशानाच्या दिशेने जाऊं लागली.

तिला कोल्हेकुई ऐकूं येत होती. जेव्हां ती वडाच्या झाडाजवळ पोंचली, तेव्हां तिला शब्द ऐकूं आले, "ए, थांब जरा! माझ्या बायको पोराचं पोट कसं भरणार? तुझ्याजवळ जे कांही असेल ते इथें काढून ठेव. मी कोण आहे ते माहीत आहे कां तुला? मी वीरदास आहे!"

जमुनाबाई थक्क झाली. तो आवाज कांही वीरदाससारखा नव्हता. ती घरी परतली. तिने सारी हकीकत आपल्या मुलाला, किशनदासला सांगून पुढे म्हटले, "बाळ, कुणीतरी लबाड माणूस तुझ्या वडिलांचे नांव खराब करतोय. त्याला पकडलं पाहिजे."

त्यावर किशनदासने एक योजना ठरवली व आपल्या आईला सांगितली. तिला ती कल्पना पटली.

दुसऱ्याच दिवशी जमुनाबाईने गांववाल्यांना सांगितलं, "आम्ही उद्यां हे गांव सोडून जाणार आहोत."

त्या रात्री मायलेकांचे जेवण झाले. किशनदासने आपल्या केसांना पांढरी खडूची पूड लावली; तो थेट वडिलांसारखा दिसायला लागला. दोघेही स्मशानाजवळ पोंचले. पांढरे धोतर व सदरा घातलेला किशन वडाच्या झाडाच्या पोकळ ढोलींत लपून बसला.

जमुना जवळच्या झाडाआड लपली. थोड्याच वेळानंतर गांवातून पांढरा सदरा व धोतर या वेषांतला एकजण तिथे येऊन पोंचला. तो झाडावर चढला व फांदीवर बसला. त्याने घुबडासारखा घुत्कार काढला व कोल्ह्यासारखाही आवाज काढला.

जमुनाबाई निराश होऊन किशन केव्हां बाहेर



पडतोय त्याची वाट बघत होती. तेवढ्यांत तो ढोलींतून बाहेर आला. झाडावर बसलेल्या व्यक्तिला तो म्हणाला, "अरे बदमाश! तू मला बदनाम करतो आहेस कां? बघ, आता मी तुझी काय दशा करतो ते? मी कोण आहे, माहिती आहे कां तुला? मी वीरदास आहे!"

त्याचे बोलणे ऐकून झाडावरचा माणूस घाबरुन खाली पडला. तो लटपटत म्हणाला, "वीरदास! माझी चूक झाली. मला माफ कर. मला कांही करुं नकोस. मी तुझ्या पाया पडतो."

"मी तुला कांही एक करणार नाही. पण तू मला सांग कीं आजपर्यंत तू लोकांना धाक दाखवून जे धन लुटले आहेस, ते कुठे लपवलं आहेस?"

वीरदासचे शब्द ऐकून ती व्यक्ती थरथर कांपत झाडाच्या मुळालगत खोदायला लागली.

आपली कल्पना यशस्वी झालेली पाहून जमुनाला आनंद झाला आणि ती गांवात जाऊन सांगू लागली, "माझ्या पतीच्या नांवाला बट्टा लावणाऱ्या बदमाशाला पकडलेलं आहे. चला, तुम्ही सारेजण स्वतः येऊनच खात्री करून घ्या."

ती त्यांच्याबरोबर स्मशानाकडे परत आली. मशाली घेऊन येणाऱ्या गांवकऱ्यांना पाहून भुताचा तोतया घाबरला. लुटीचा सारा माल त्याने बाहेर काढून ठेवला. "अरे भामट्या! काय ही तुझा लबाडी?" असं म्हणून त्यांनी त्याला बेदम मार दिला.

त्याच वेळी झाडाच्या ढोलींतून किशनदासने वांकून बाहेर बघितले व म्हटले, "हे काय चाललंय? माझा जरा डोळा लागला बघा!"

जमुनाबाईला तर फारच आश्चर्य वाटले. हे सारे नाटक किशननेच तर रचलेले होते. त्यानंतर जमुनाबाईने लोकांना खरी हकीकत सांगितली. तेव्हां कुठे लोकांना समजलं कीं वीरदासच्या भुताने तोतया भुताला पकडलं आहे. चोरीला गेलेला सारा माल सांपडला.

गांवकऱ्यांनी जमुनाची क्षमा मागितली व तिने गांव सोडून जाऊं नये म्हणून तिला विनंती केली. भुताचा तोतया पहाटेपूर्वीच गांवातून निघून गेला. त्यानंतर वीरदासचे भूत कुणालाही कधीही दिसले नाही.



















# जगांतली सर्वात जुनी व चालूं रिफायनरी



"आणि मुलांनो, "खनिज तेल उद्योगाच्या इतिहासाबद्दल बीणाच्या वर्गात माहिती देताना श्री.दास म्हणाले, "जगांतल्या अजूनही चालूं असलेल्या, सर्वांत जुन्या शुद्धिकरण कारखान्या-बद्दल मला तुम्हाला सांगायचंय. तो भारतांत आहे!"

"खरंच? काका, तो कुठे आहे?" सर्वांनी एकदम विचारले.

"तो दिग्बोईमधे आहे. इंडियन ऑईल कॉर्पोरेशनच्या आसाम तेल विभागाचे मुख्य कार्यालय इथेंच आहे. दिग्बोई दोन गोष्टी अभिमानाने मिरवते - शंभर वर्षे चालूं असलेल्या तेल विहिरी आणि साऱ्या जगांतला सर्वांत जुना, चालूं असलेला खनिज तेलशुद्धिकरणाचा कारखाना."

"काका, तेलाचा इथे शोध कसा लागला?" श्रोत्यांनी अधीरपणे विचारले.

"१८६७ साली रेल्वेमार्ग टाकण्यासाठी दिग्बोई जवळच मजूर काम करीत होते. त्यांना तिथे अंधारलेल्या, दलदलीच्या प्रदेशांत काम करावे लागत होते. सोबतीला पाहुणे म्हणून होते फक्त रानटी पशुपक्षी, आणि कीटक! एक दिवस एक हत्ती ओंडका उचलून नेत होता, तेव्हां त्याच्या पावलांवर तेलाचे डाग आढळले. त्याच्या पावलांचे ठसे पाहात लोक उत्साहाने पुढे गेले, आणि त्यांना जमिनीवरती तेलाचे बुडबुडे येत असलेले दिसले. एक इंग्लिश अधिकारी त्या लोकांना आनंदाने ओरडून म्हणाला, "डिग् बॉय, डिग!" त्यावरुन त्या जागेचे नांव डिग्बोई झाले आणि पेट्रोल उद्योगाच्या दुनियेत या नांवाला स्थान मिळाले.

"किती मनोरंजक आहे ही गोष्ट!"

गेल्या शंभर वर्षांत, डिग्बोईचा जुना कारखाना आता जागतिक, आधुनिक तंत्रज्ञानाने विकसित झालेल्या कोणत्याही शुद्धीकरण कारखान्याच्या तोडीचा आहे.





# नशीबाचा खेळ

हेलापुरीची दुर्गा एक सधन स्त्री होती. रघुनाथ तिचा एकुलता एक मुलगा होता पतिच्या मृत्यूनंतर तिने त्याला लाडाकोडांत व प्रेमाने वाढवले होते.

आता तो जाणता झाल्यामुले ती त्याचा विवाह करूं इच्छित होती. सुगंधिपुरचे रहिवासी, नारायण यांची मुलगी सिंधू, हिला पाहता क्षणीच रघुनाथ तिच्यावर मोहित झाला होता. ती खरोखरच मोठी सुशील व सुंदर मुलगी होती.

परंतु नारायण कांही श्रीमंत नव्हता. हुंडा देण्याची त्याची परिस्थिती नव्हती. म्हणून दुर्गाला हा विवाह संबंध मान्य नव्हता, कारण ते लोक हुंडा देऊ शकत नव्हते. पण रघुनाथ मात्र हटूनच बसला की लग्न करीन तर सिंधूशीच. दुर्गाने सरळ स्पष्ट सांगितले, की कोणत्याही परिस्थितीत हे लग्न होणार नाही. आईला विरोध करूं न शकल्याने रघुनाथ गप्प राहिला. पण मनांतून तो सिंधूला विसरूं शकला नाही.

अशाच परिस्थितींत एक सत्तरीचा म्हातारा, पण व्यवहार चतुर, असा नारायणचा नातेवाईक श्रीकर, दुर्गाला भेटायला आला. स्वतःची ओळख दिल्यानंतर तो दुर्गाला म्हणाला, "सिंधूचे वडील नारायण हा माझा जवळचा भाऊ आहे, त्याच्या-जवळ पैसाअडका किंवा स्थावर नाही, म्हणूनच तुम्ही तुमच्या मुलाचे लग्न त्याच्या मुलीशी करुन देण्यास नकार देत आहात. पण मी तुम्हाला एक गुपित सांगतो: सिंधूच्या मावशीकडून तिला खूप मोठी संपत्ती मिळणार आहे. ज्या क्षणी तुमचा मुलगा सिंधूच्या गळ्यांत मंगळसूत्र बांधील, त्याच्या दुसऱ्या क्षणी वीस लाखांपेक्षां जास्त रकम सिंधूची होईल. ह्यापेक्षा जास्त कांही मी सांगू इच्छित नाही."

हे ऐकताच दुर्गा हरखून गेली. तिने विचार केला की सिंधूच्या श्रीमंत मावशीने नक्कीच ह्या विषयीचे मृत्युपत्र लिहीले असणार. दुर्गा श्रीकरला बारकाईने निरखत म्हणाली, "तुम्ही वयाने मोठे आहात, वृध्दही आहात. माझा पूर्ण विश्वास आहे

की तुम्ही खोटे बोलणार नाही. परंतु एक लक्षांत ठेवा, की जसं आपण म्हणता तसं झालं नाही तर लग्न मोडायला सुध्दां मी मागेपुढे पाहाणार नाही. नारायणला सांगा की त्याने लग्नाच्या तयारीला लागावं.''

पंधरा दिवसांच्या आंत मोठ्या थाटामाटांत सिंधूचे रघुनाथबरोबर लग्न झाले. लोक दुर्गाच्या औदार्याचे कौतुक करत होते. नारायणचे नातेवाईक तिला भेटून तिच्यावर स्तुतिसुमनांचा वर्षाव करू लागले.

नारायणला जेवढे शक्य होते तितके देऊन त्याने सिंधूची सासरी पाठवणी केली. परंतु दुर्गाच्या डोळ्यांपुढे मात्र वीस लाख रुपये सतत तरळत होते. त्यामुळेच तिने नारायणाने मुलीला काय दिले किंवा नाही, ह्याच्याकडे फारसं लक्ष दिलं नाही. बघता बघता एक महिना सरला. सिंधूच्या मावशीकडून संपत्ति न मिळाल्याने दुर्गाने सुगंधिपुराहून श्रीकरला बोलावून घेतले. तो येताच दुर्गाने त्याला कडक शब्दांत विचारले, ''तुम्ही तर सांगितले होते की ज्या क्षणी रघुनाथ सिंधूला मंगळसूत्र बांधील, त्याच्या दुसऱ्या क्षणी तिला मावशीची संपत्ति मिळेल. पण अजूनपर्यंत असं कांहीच झालं नाही. असं कां? ह्यावर तुमचे काय म्हणणे आहे?''

हंसत हंसतच श्रीकरने तिला सांगितले ''हे बघा दुर्गाताई, मी म्हटलं होतं की सून होता क्षणीच सिंधूला वीस लाख रुपये मिळतील. मला वाटतं माझ्या म्हणण्याचा भावार्थ तुम्हाला नीट समजला नाही. सिंधूची आई कांही आता जिवंत नाही. तुम्ही तिची आई नसलात तरी मावशीसमान तर आहातच ना! आता सिंधू गरीब नारायणची मुलगी नाही, तर श्रीमंत सासूची म्हणजे दुर्गामावशीची सून आहे.''

हे ऐकताच दुर्गा आश्चर्यचकित होऊन स्तब्ध झाली. पण आता झाल्या गोष्टीबाबत कोणाला दोष देऊन काय उपयोग होता? तिने मनांतल्या मनांत विचार केला 'भले लाखो रुपये न मिळोत, पण मुलाची इच्छा तर पूर्ण झाली. शिवाय गुणी मुलगी सून म्हणून मिळाली. ह्यापेक्षां आणखी काय पाहिजे? ''आपल्याच भाग्यावर खूष होऊन दुर्गाने श्रीकरच्या बुध्दिचातुर्याची प्रशंसा केली, आणि मनाशी म्हणाली, ''हा सारा तर शेवटी नशीबाचा खेळ आहे!''







# कांतचे महाभाग्य

केशवपुरांत राहणारा कांत अनाथ होता. त्याचं आपलं असं कुणीही नव्हतं. मात्र तो अतिशय कष्टाळू होता. प्रत्येक काम तो मन लावून करत असे. सर्वच जण त्याच्या ह्या गुणाचं कौतुक करीत असत. त्याच्या ह्या गुणांनी प्रभावित होऊन एक जमीनदार त्याला म्हणाला, ''माझा जांवई कामेश शहरांत राहतो. त्याला तुझ्यासारख्या मेहनती माणसाची जरूर आहे. तुला इथल्यापेक्षां पगारही जास्त मिळेल, तेव्हां तू तिकडे कां जात नाहीस?''

कांतने त्याचे म्हणणे ऐकले व तो शहराकडे जायला निघाला. शहरांत पोचण्यासाठी एक छोटेसे जंगल पार करून जावे लागत असे. त्या जंगलातून जाताना कांतने खिन्न होऊन बसलेल्या एका तरुणास व तरुणीस बघितले. त्या तरुणाचे नांव होते माधव व त्याच्या बहिणीचे नांव होते वंदना. ते दोघेही शहराकडेच निघाले होते. चालता चालता वंदना अतिशय थकल्यामुळे ती एक पाऊलही पुढे जाऊं शकत नव्हती.

रात्रीच्या वेळी जंगलात राहण्यात मोठा धोका होता. त्यांची अडचण कांतने ताबडतोब ओळखली. स्वतःचा परिचय देत त्याने दोघांना धीर दिला. त्याच्या मदतीने माधव आणि वंदना अंधार पडायच्या आंतच शहरात पोचले.

त्यांचा निरोप घेऊन कांत निघणार, एवढ्यांत माधवने त्याला दहा मोहोरा दिल्या आणि म्हटले, ''तू ह्या मोहोरा घेतल्यास तर मला आनंद होईल.''

परंतु कांतने ''वंदना माझ्याही बहिणीसारखीच आहे'' असं म्हणून ती रक्कम स्वीकारण्यास नकार दिला.

ह्यावर माधव म्हणाला 'मी एक ज्योतिषी आहे. तुझा चेहरा पाहून मी ओळखलं आहे की कांही वर्षे तरी आपण मित्र बनून राहूं शकणार नाही. पण तू आम्हाला मदत केलीस त्याबद्दल थोडीशीच पण कांही रक्कम तरी घ्यावी लागेल.''

कांतने माधवकडून एकच मोहोर घेतली. आणि म्हणाला, ''तू खरोखरच ज्योतिषी असशील तर



माझ्याकडून ही मोहोर घे, आणि सांग की शहरांत गेल्यावर माझी काय स्थिति असेल?'' असं म्हणतच त्याने ती मोहोर माधवच्या हातांत कोंबली.

माधवने कांतच्या हातावरील रेषा बारकाईने निरखून त्याला सांगितले, ''तू मोठा भाग्यशाली ठरशील. पण जेव्हां तुझं लग्न होईल व तू आणि तुझी पत्नी एकमेकांना एकाच नावाने हांक माराल, तेव्हांच हे शक्य होईल. जर हे शक्य झाले नाही तर ह्यावर एक दुसरा उपाय आहे. तुझ्या मुलांपैकी कोणी ह्या पध्दतीचा (एकमेकांना नांवाने हांक मारण्याचा) स्वीकार केला, तर तुझं भाग्य उजळून निघेल. तोपर्यंत तुझं नशीब फळफळण्याची कांही शक्यता नाही. तू हे रहस्य कुणास सांगत कामा नयेस. जर हे रहस्य जाहीर करशील तर तू भाग्यवान बनणार नाहीस.''

बंदना म्हणाली ''माझ्या भावाची भविष्य वाणी खरी ठरते. तू भाग्यशाली व्हावेस यासाठी माझ्या बाजूने मीही भरपूर प्रयत्न करीन.'' ह्या घटनेनंतर कांत कामेशकडे पोचला. कामेश मोठा सज्जन मनुष्य होता. थोडयाच काळांत कांत कामेशच्या घरचे सर्व कामकाज सांभाळू लागला. कांतच्या चांगल्या स्वभावाने प्रभावित होऊन कामेशने कांतचे लग्नही करून दिले. वधूचे नाव कांता असल्यामुळे कांत लग्नाला लगेचच तयार झाला. कामेश अनेक वेगवेगळ्या गोष्टींचा व्यापार करीत असे. त्यापैकी किराणा दुकानाची जबाबदारी त्याने कांतकडे सोपवली होती. आता कांत आपल्या पत्नीबरोबर वेगळं घर घेऊन राहू लागला. पहिल्याच दिवशी तो बायकोस म्हणाला, ''आपल्या दोघांची नावे किती सारखी आहेत. आपण एकमेकांना प्रेमाने कांत म्हणूनच हांक मारू या.''

ह्यावर कांता म्हणाली ''माझी आई असं म्हणायची की आपल्या नवऱ्याला त्याच्या नांवाने कधीही हांक मारू नये. त्यामुळे मोठा अनर्थ होतो.''

ह्यामुळे कांतचे उजळू पाहणारे भाग्य परत कांही काळ थांबल्यासारखे झाले. यथावकाश त्याला तीन मुले झाली. मोठ्या मुलीचे नांव ठेवले पद्मावती. त्यानंतर जन्मलेल्या मुलाचं नाव ठेवले गेलं कृष्ण. तिसऱ्या मुलीचे नाव ठेवण्याआधीच मरणोन्मुख पडलेल्या त्या मुलीस पाहून कल्प वैद्याने जाहीर केलं, की ती जिवंत राहणे शक्य नाही. तो म्हणाला, ''भास्कर देवता आणि वरूण देवता तुझ्यावर कोपले आहेत, त्याचमुळे, तुझं उजळणारं भाग्य टळलं आहे. पण एक उपाय आहे,



त्यामुळे तू हे संकट टाळू शकतोस, ह्याच दोन्ही देवतांच्या नावांची आद्याक्षरे घेऊन मुलीचं नांव ठेवशील तर तुझं कल्याण होईल. आद्याक्षराप्रमाणे मुलीचं नांव होईल''भाव.''

कांतने वैद्याचा सल्ला मानला. बघता बघता मुलीची तब्येत सुधारू लागली. कालांतराने पद्मावती वयांत आल्यावर कांतने पद्मनाथ नांवाच्या मुलाशी तिचे लग्न लावून दिले. तिची सासरी पाठवणी करताना कांत तिला म्हणाला, ''तू आपल्या पतीस प्रेमाने पदम म्हणून हांक मार. तोही तुला पदम नांवानेच हांक मारेल. ह्यामुळे तुमचं वैवाहिक जीवन सुखाचं होईल.''

परंतु पद्मावतीच्या सासरी स्वतःच्या पतीला नांवाने हांक मारण्यास बंदी होती, त्यामुळे पद्मनाथ आपल्या पत्नीस 'अग ए' म्हणून बोलावत असे. पुन्हां एकदा कांतच्या महाभाग्यशाली बनण्यात अडथळा आला.

राहता राहिली मुलगी, भाव, जिच्याकडून कांतला कुठलीच विशेष आशा वाटत नव्हती. त्यामुळे कांतच्या मनाने घेतलं की आता आपले भाग्य फळफळण्याची कुठलीच शक्यता नाही. त्याचं मन फार उदास झालं.

तिकडे कांतचा निरोप घेऊन माधव आणि बंदना कांही काळ शहरांत राहिले, आणि मग परदेशी निघून गेले. तेथे बंदनाचे लग्न शाम नांवाच्या एक व्यापाऱ्याबरोबर झाले, तर माधवचे लग्न रमा नांवाच्या एका व्यापाऱ्याच्या मुलीशी झाले. वेगवेगळ्या प्रकारचा व्यापार करून त्यांनी भरपूर संपत्ति मिळवली.

वीस वर्षे तिकडे राहिल्यानंतर बंदना आपल्या



एकुलत्या एक मुलास, भाव याला घेऊन स्वदेशी येऊन बंदना कांतच्याच शहरांत राहू लागली. बंदनाचा पती श्याम व माधवही आपल्या कुटुंबियां-समवेत तिथे लवकरच येणार होते.

इतक्यांत बंदनाला कांतबद्दलची माहिती समजली व ती त्याला भेटायला गेली. दोघांनी एकमेकांना ओळखलं. बंदना कांतला म्हणाली, ''त्या दिवशी आपली बहीण समजून तू मला मदत केली होतीस आज वेळ आली आहे की आपण आपला स्नेह, नातेसंबंधात बदलू शकतो. मुलगा आणि मुलगी जर, राजी असतील तर तुझ्या मुलीला मी माझी सून करून घेऊं इच्छिते.''

कांतने मोठ्या आनंदाने तो प्रस्ताव स्वीकारला. दुसऱ्याच दिवशी मुलामुलींनी एकमेकाला बघितले. दोघांनीही विवाहाला आपली संमती दर्शविली तेव्हां बंदना भावला म्हणाली, ''मी तुझी आत्या आहे.

तू माझ्या मुलास आपल्या नांवानेच हांक मारत जा.'' तिने आपल्या मुलासही तेच सांगितले. दोघांनाही आपली नावे एकच आहेत, ह्या गोष्टीचे आश्चर्य वाटले, आणि आनंदही झाला.

कांत आनंदाने, गद्गदलेल्या स्वरांत म्हणाला, ''वंदना, तू त्या दिवशी मला वचन दिले होतेस की मी नशीबवान व्हावं, ह्यासाठी तू भरपूर मदत करशील, आणि आज तू तुझं वचन पूर्ण केलं आहेस. आता माझी मुलगी आणि होणारा जांवई एकमेकांना नावाने हांक मारतील ह्यापेक्षां मला आणखी काय पाहिजे?''

दोघांचे लग्न मोठ्या थाटामाटांत पार पडले दुसऱ्याच दिवशी कांतला कामेशकडून बोलावणे आले. कामेश कांतला म्हणाला, ''बराच काळ तू माझा व्यापार सांभाळलास. आता स्वतःचा व्यापार धंदा सुरू कर. माझ्या देखरेखीखाली हे कर. त्यासाठी तुला लागेल ती मदत मी देईन''.

हे ऐकताच कांत एकदमच निराश झाला त्याला वाटलं की माधवची भविष्यवाणी चुकीची ठरली आणि हा विवाहसबंध कांही त्याला लाभलेला नाही.

वंदनाला ह्याविषयी सर्व समजले तेव्हां कांतला धीर देत ती म्हणाली, ''कुणा दुसऱ्या-कडे नोकरी करून कुणी महाभाग्यशाली बनत नाही. नोकरदार हा शेवटी नोकरच राहतो, मग किती कां मोठ्या पदावर असेना! आता अशी वेळ आली आहे की तू मालक व्हावेस. ही संधी हातची दवडूं नकोस. मी आणि माझा भाऊ तुला सर्वतोपरी मदत करूंच. स्वतंत्रपणे जगण्याची संधी आता तुला मिळाली. जे स्वतंत्रपणे काम करतात त्यांनाच नशीब साथ देते. आता तुझे भाग्य फळफळणार आहे. तेव्हां निश्चिंत मनाने व्यापारांत लक्ष घाल.''

कांतला आपली चूक समजली. तो म्हणाला, ''मला कळून चुकलंय की ज्योतिष केवळ भविष्याची दिशा दाखवते. खरं तर मनुष्य स्वतःच स्वतःचं भविष्य घडवतो. आता मी माझं आयुष्य माझ्या कष्टांनी घडवेन, आणि मिळालेल्या या संधीचा पूर्ण फायदा करून घेईन.''

ह्यानंतर त्याने आपला स्वतःचा व्यापार सुरुं केला, आणि एका वर्षाच्या आंतच शहरांतील प्रमुख व्यापाऱ्यांत त्याची गणना होऊं लागली.







# भयंकर घाटी

## 2

*(ब्रम्हापुरजवळच्या अरण्यांत केशव नावाचा एक शेतकरी मुलगा रहात होता. जेव्हां तो डोंगरावर गुरे चरायला घेऊन गेला, तेव्हां तिथे एक विचित्र प्राणी आला. त्यावेळी तिथे ब्रम्हापुरचा सेनापतीही शिकारीसाठी आलेला होता. तो प्राणी बघून त्याला आपल्याकडे हांकलत आणण्याची आज्ञा त्याने सैनिकांना दिली.)*

सेनापतीची आज्ञा ऐकून एका सैनिकाने आपला घोडा त्या प्राण्याकडे वळवला व त्याला सेना-पतीकडे हांकलत आणले.

सेनापती त्याच्याकडे थोडावेळ टक लावून निरखून बघत राहिला नि सैनिकाला म्हणाला,

''हा अगदी निराळा प्राणी आहे. असला प्राणी जगांत असतो यावर कुणाचा विश्वास बसणार नाही. हा जर महाराजांना भेट दिला तर ते खूष होतील.''

सेनापतीने केशवकडे वळून विचारले,

''अरे, तू हा प्राणी कुठून चोरला आहेस? असले प्राणी हे राजाच्या मालकीचे असतात, हे तुला ठाऊक नाही कां? तुला राजाची आज्ञा माहीत नाही कां?''

सेनापतीच्या या बोलण्याचा केशवला फारच राग आला, पण त्याने तो दाखवला नाही.

केशवने राग आवरून नम्रपणे उत्तर दिले, ''हुजूर, मी हा प्राणी चोरलेला नाही. तो लहान



होता तेव्हां मला या डोंगरावर सांपडला होता. मी याला वाढवलाय. हा माझ्या गुरांबरोबर इथे हिंडतो. मी अडाणी आहे. हे रान सोडून मी कुठेही कधीही गेलो नाही. तेव्हां राजधानीतून दिलेल्या व जाहीरझालेल्या राजाच्या आज्ञेची मला कांहीच माहिती नाही.''

''तसं असेल तर तुला मी क्षमा करतो. अरे, त्या प्राण्याच्या गळ्यांत दोरी बांधा आणि त्याला नगराकडे घेऊन चला. आपण हा विचित्र प्राणी महाराजांनाच नेऊन दाखवू या. हे काम प्रथम करायला हवे व नीटपणे करायला हवे. नगरांत पोचेपर्यंत ह्या प्राण्यावर नीट लक्ष ठेवून त्याला घेऊन चला.''

असे म्हणून सेनापतीने आपला घोडा पुढे काढला.

एका सैनिकाने दोरीचा फांस तयार करून त्या प्राण्याच्या गळ्यांत घातला. आणि त्या दोरीचा कासरा आपल्या घोड्याच्या खोगीरांत अडकवला, आणि तो सेनापतीच्या मागेमागे जाऊं लागला.

दुसरा सैनिक केशवजवळ येऊन आपली तलवार उपसून त्याला दरडावून आणि धमकावून म्हणाला, ''याद राख, मी एका महिन्यानंतर येईन. यावेळी आणखी एक रानगाढव मला पकडून दे. नाहीतर तुझी कांही धडगत नाही.''

आणि तोही पहिल्या सैनिकाच्यामागून जाऊं लागला.

सेनापतीचा व त्या सैनिकांचा हा उद्धटपणा पाहून केशव चिडला होता. त्याने भात्यांतून एक बाण काढला व धनुष्यावर चढवला. पण त्याच्या मनांत विचार आला, ''कितीही मोठा शत्रू असला तरी त्याच्यावर मागून बाण सोडता कामा नये.'' आणि आपला राग आवरुन त्याने बोटांतून बाण हळूंच जमिनीवर सोडला.

इकडे ते सैनिक त्या प्राण्याला नेत होते आणि अरण्यांत पुढे जणारा सेनापती आनंदाने फुलून निघाला होता.

''मी हा प्राणी महाराजांना दाखवीन, हा पकडायला मला किती धाडस करावे लागले ते सांगीन, आणि मग महाराज मला मोठे इनाम देतील...

तो मनांत मनोरे बांधत होता.

''मी एका खेडवळ मुलाला दरडावून हा प्राणी



आणला आहे हे नगरांत कुणालाही कळता कामा नये. त्यासाठी अगोदर या दोघा सैनिकांना पटवून ठेवायला हवं!''

असा विचार करुन त्याने आपला वेग कमी केला, आणि घोडा थांबवून सैनिकांशी बोलावे म्हणून मागे वळून तो पाहणार, तेवढ्यांत सैनिकांचा आरडाओरडा व हलकल्लोळ त्याच्या कानावर पडला, ''हुजूर, हा तर कुणीतरी राक्षसी घोडा दिसतोय. माझ्या घोड्याच्या पोटावर याने जखम केली आणि त्याला मारले. शिवाय मलाही त्याने...'' आणि तो मोठ्याने रडायला लागला.

सेनापतीने भांबावून मागे पाहिले तो काय?

एक सैनिक आणि त्याचा घोडा रक्ताने माखलेले होते. दुसरा सैनिक घोडा सोडून अरण्यांत पळत सुटला होता.

सेनापती खूपच घाबरला होता. घोड्याला पुढे न्यायची त्याला इच्छा होती, पण तितक्यांत त्या प्राण्याने आपले शिंग सेनापतीच्या घोड्याच्या पोटांत घुसवले.

घोडा खिंकाळत एका बाजूला आडवा पडला. सेनापतीने खाली उडी मारण्यापूर्वीच त्या प्राण्याने सेनापतीच्या पाठीवर ढुशी दिली व शिंगाने त्याला जखमी केले.

तो धाडकन जमिनीवर आपटला आणि असह्य वेदनेने तडफडत ओरडायला लागला, ''मेलो, मेलो, मला वांचवा! या राक्षसी घोड्याने मला मारलंन. बाप रे, वांचवा, वांचवा!''.

असं कण्हत, ओरडत तो थोडा वेळ कळवळत



होता आणि नंतर त्याचा आवाज कायमचा बंद झाला.

''वांचवा, वांचवा, एक भयंकर राक्षस घोडा आलाय'' असं ओरडून सांगत तो सैनिक ब्रम्हपुरात पोचला.

ज्या लोकांनी त्याला असा ओरडत पळत जाताना पाहिले, त्यांना तो वेडा असावासे वाटले.

जेव्हां तो राजमहालाच्या द्वारापाशी पोचला, तेव्हां त्याने तिथल्या पहारेकऱ्यांना सांगितले, ''आपला सेनापती मारला गेलाय, त्यांचा घोडा मारला गेलाय, त्यांच्याबरोबरचा सैनिक व त्याचा घोडाही मारला गेला आहे. तो राक्षस घोडा सर्वांना तुम्हाला आम्हाला बोचकारुन फाडून खाईल.''

प्रमुख पहारेकऱ्याने मंत्र्यांना हळूंच सांगितले, ''बहुतेक ह्याचे डोके फिरले असावे. सेनापतींना

एका शिंगवाल्या राक्षसघोड्याने अरण्यांत मारून टाकलं असं हा सांगतोय.''

''असं काय, त्याला माझ्या महालांत पाठवा.'' असं सांगून मंत्री महालांत गेला. तो सैनिक दारांत दिसल्यावर मंत्र्याने हंसून त्याला आंत बोलावले व प्रेमळ स्वरांत म्हटले, ''काय घडलं ते न घाबरता सांग.''

सैनिकाला जरा धीर आला. अरण्यांत केशव दिसल्यापासून ते राजधानीला परत पळून येईपर्यंत त्याने सविस्तर हकीकत सांगितली.

आता मात्र मंत्री विचारात पडला, ''म्हणजे त्या दोघांना जेव्हां तो विचित्र प्राणी मारीत होता, तेव्हां तू हात बांधून लांबून बघत होतास. तुला भीती वाटली नाही कां?''

''भीती? माझे वरचे प्राण वरच राहिले होते. कारण जेव्हां तो प्राणी माझ्या साथीदाराला मारायला पुढे सरसावला, तेव्हां मी मागेपुढे न पाहाता धूम पळत सुटलो.'' सैनिकाने अडखळ व सविस्तर सांगितले.

''त्याचा अर्थ, सेनापती मरताना कांही तुझ्या डोळ्यांनी तू पाहिले नव्हतेस!'' मंत्र्याने त्याच्याकडे रोखून बघत विचारले. ''हुजुर, मी स्वत: पाहिले नसले तरी त्यांचे ओरडणे ''मेलो, वांचवा,'' हे मी स्वत: नक्की ऐकले होते की!'' सैनिकाने उत्तर दिले.

''तो राक्षस दिसायला भयंकर आहे कां? खूप विचित्र प्रचंड मोठ्या आकाराचा आहे कां?''

मंत्र्याने विचारले. ''नाही हुजूर, तो भयंकर दिसत नाही किंवा प्रचंड मोठाही नाही. घोड्यापेक्षां लहान, पण गाढवापेक्षां मोठा, असा दिसतो. त्याच्या डोक्यावर एक शिंग आहे.

दिसायला ते साधे जनावर वाटते पण विचित्र आहे. सुरवातीला त्याला बांधले होते, त्या घोड्याच्या मागोमाग तो निमूटपणे चालत होता. पण अचानक...''

आणि सांगता सांगता ते आठवून सैनिक गप्प झाला व घाबरुन थरथर कांपायला लागला.

सैनिकाचे उत्तर ऐकून मंत्र्याला हंसू आले. ''अरे, मला वाटतं, तू अरण्यांत कुठलं तरी विषारी फळ खाल्लं असशील. सेनापती खरंच मेला असेल तर त्याचं कारण वेगळं असेल. कारण असला प्राणी दुनियेत नाही. तो शेतकरी मुलगा धनुष्यबाण चालवीत होता ना? त्यानेही सेनापतीला मारले असेल. कारण तो प्राणी त्याचा होता ना? सेनापतीने बळजबरीने तो प्राणी आणायचा प्रयत्न केला होता.

आता तू असं कर, मी कांही सैनिक बरोबर देतो, व त्यांना तपास करायला सांगतो. तू त्यांना अरण्यांत घेऊन जा आणि त्यांना वाट दाखव.'' मंत्र्याने सांगितले.

''होय हुजूर''

सैनिकाने मान डोलावली. पण अरण्यांत पुन्हां जायच्या कल्पनेचे त्याचे हृदय धडधडू लागले, पण मंत्र्याची आज्ञा त्याला मोडता येईना.

मंत्र्याने प्रमुख पहारेकऱ्याला आज्ञा दिली व अरण्यांत जाऊन सेनापतीचा शोध घेण्यास सांगितले. तिथे कायकाय घडले त्याची चौकशीही करायला सांगितले. जमल्यास केशवला पकडून नगरांत आणले तर खरी वस्तुस्थिती समजेल असे मंत्र्याने ठरवले.





इकडे नगरांत सेनापतीच्या मृत्यूबद्दल अनेक वावड्या शहरांत पसरल्या. लोक नाना तर्कवितर्क करु लागले.

राजमार्गावरुन तो सैनिक ओरडत जात होता ते बऱ्याच लोकांनी ऐकलेले होते. एका विचित्र प्राण्याच्या डोक्यावर शिंग आहे, हे ही त्यांनी ऐकले होते. शिवाय त्या प्राण्याला मोठेमोठे पंख आहेत, शिकारीसाठी जंगलात गेलेल्या सेनापतीला त्या प्राण्याने पकडलं आणि त्याला घेऊन तो प्राणी आकाशमार्गाने उडून गेला म्हणे, असं लोक बोलत होते.

केशवचा पिता शहरांत दूध विकायला आला होता, त्याने या साऱ्या अफवा ऐकल्या. त्याला मुलाने जे सांगितलं होतं ते आठवलं. जर त्या प्राण्याने सेनापतीला मारलं असेल तर तो केशवला

सुद्धां मारून, टाकू शकेल, या विचाराने. विचारा बाप फारच कष्टी झाला. आणि या काळजीने तो लगबगीने घरी परत जायला निघाला.

जेव्हां तो नगराच्या दाराजवळून जात होता, तेव्हां त्याला आणखी एक विचित्र गोष्ट समजली.

ती ही की शेजारच्या शत्रूराजाने गुप्तहेरांकरवी सेनापती व त्याच्या सैनिकांना मारले. शक्यतोवर त्या हेराला जिवंत पकडून आणायला मंत्री आणखी सैनिकांना पाठवणार आहेत, आणि ते सैनिक जंगलाच्या दिशेने निघालेले आहेत.

हे ऐकून तर म्हाताऱ्याला वाटलं कीं खरोखरच आपल्या मुलावर आता संकट आलेलं आहे.

जर त्या विचित्र प्राण्याने आत्तापर्यंत केशवला मारलेलं नसेल, तर मंत्र्याचे हे मूर्ख सैनिक केशवलाच शत्रूचा हेर समजून ठार मारतील. आपण लौकर जाऊन तिथली परिस्थिती कशी आहे ते पाहावे, व मुलाला सावध करावे, असा विचार त्याने केला.

तो झोंपडीपाशी पोंचला तर तिथे कुणीच नव्हतं. आता काय झालं असेल असं वाटून त्याने आपल्या घरांत वाडवडिलांची तलवार भिंतीवर लावलेली होती, ती हातांत घेतली आणि तो त्या चराईच्या बाजूला गेला. नेहमीच्या झाडाखाली केशव बसला होता, त्याला पाहून बापाच्या जिवांत जीव आला. तो लगबगीने मुलाजवळ गेला.

"केशव, तुला जिवंत पाहीन असं वाटलं नव्हतं. शहरांत कित्येक अफवा पसरल्या आहेत. शेवटी, इथें झालंय तरी काय?"

रोजच्यासारखा केशव शांतपणे बसला होता. सेनापती व सैनिकांवरचा त्याचा राग आता शांत झाला होता. घाबरलेला पिता हातांत तलवार घेऊन आलेला पाहून केशवला फारच आश्चर्य वाटलं. त्याला कांहीच समजेना त्याने वडिलांकडे निरखून पाहात विचारले, "तलवार कशाला आणलीत? कसल्या अफवा आहेत?"

"ब्रम्हपुरच्या सेनापतीला व त्याच्या सैनिकांना एका विचित्र प्राण्याने मारून टाकले अशी नगरांत बातमी आहे. कांही लोक म्हणताहेत कीं शत्रूचे हेर इथे वेष बदलून फिरत आहेत, त्यांनाही मारलंय म्हणे!" पित्याने घाबरून सांगितलं.

*(अपूर्ण)*





वेताळ कथा

# राजकुमारीचे प्रश्न

निश्चयाचा पक्का विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला. झाडावरून त्याने शव खाली काढले व ते खांद्यावर घेतले. नेहमीप्रमाणे त्याने स्मशानाची वाट धरली. तेव्हां प्रेतांत लपलेल्या वेताळाने म्हटले, "राजन, आपण नेहमी पाहातो कीं कांही विद्वान, विवेकी व विनम्र असतात. ते आपले ज्ञान इतरांना वाटतात. पण कांही बुद्धिवंत ह्यांच्यासारखे दिलदार नसतात, ते वेगळे असतात. आपल्या विद्वत्तेचा त्यांना फार गर्व असतो. आपल्या शब्दांच्या मोहजाळ्यांतून ते इतरांची अवहेलना करतात, त्यांचा अपमान करतात. मला तर शंका वाटते कीं असल्या कुणी व्यक्तीने हे असाध्य कार्य करण्यासाठी तुला सांगितले तर नाही ना? मला



मनापासून वाटतं कीं तू त्यांचा स्वभावदोष जाणून घ्यावास. असल्याच एका अहंकारी राजकुमारीची, विलासिताची गोष्ट मी तुला सांगतो; आपल्या हुशारीचा व बुद्धिमत्तेचा तिला प्रचंड गर्व होता. ही गोष्ट लक्षपूर्वक ऐक, म्हणजे तुझा थकवा दूर होईल.'' आणि वेताळाने गोष्टीला सुरवात केली.

भूपतीसेन हा माल्य देशाचा राजा होता. विलासिता ही त्याची एकुलती एक मुलगी होती. तिला सर्व विद्या शिकवण्यासाठी राजाने एका महापंडिताची नेमणूक केली होती. लग्नाचे वय होईपर्यंत तिचे सर्व शिक्षण पूर्ण झाले. तिच्या ज्ञानाबरोबरच तिचा स्वभाव फारच अहंकारी झाला होता, असे तिच्या गुरुजींच्या लक्षांत आले होते. म्हणून तिचा पती तिने स्वतःच निवडावा, असा सल्ला त्यांनी राजा व राणीला दिला. त्यांत तिला पूर्ण स्वातंत्र्य देण्यास त्यांनी सांगितले होते.

बुद्धिमान, सौंदर्यवती विलासिताशी विवाह व्हावा म्हणून अनेक राजकुमार पुढे आले. पण तिच्यापुढे ते सारे दुय्यम प्रतीचे ठरले. तिचे ठाम मत होते कीं तिचा पती तिच्यासारखाच प्रतिभावंत असायला हवा!

भूपतीसेनने तिच्या स्वयंवराची घोषणा केली होती. त्याला एक वर्ष उलटून गेले. पण तिच्या प्रश्नांची योग्य उत्तरे एकाही राजपुत्राला देता आली नाहीत.

एका सकाळी रुद्रपुरचा राजपुत्र अभिलाषवर्मा तिथे आला. त्याने आपला घोडा राजवाड्यासमोर थांबवला, आणि एक सेवक त्याला घेऊन आंतल्या दालनांत गेला. घटकाभरांतच वनदेवतेसारखी दिसणारी, रेशमी साडीत सजलेली, राजकुमारी विलासिता, आपल्या माता पित्यांबरोबर तिथे आली, आणि अभिलाषवर्माच्या समोरच बसली. तिच्या अनुपम सौंदर्यावर राजपुत्र मोहित झाला. त्याने आपला परिचय करुन दिला.

मंदस्मित करुन विलासिता म्हणाली, 'मी आपल्याला कांही प्रश्न विचारीन. जर आपण त्या प्रश्नाची योग्य उत्तर दिलीत, म्हणजे माझ्या मनांतल्या उत्तरांशी ती मिळतीजुळती असली, तरच आपल्या दोघांचा विवाह होऊं शकेल.''

अभिलाषवर्माने मान डोलावून त्याला संमती दिली. घसा साफ करीत विलासिताने विचारले, ''आपल्या राज्यांतले प्रजाजन कावळे आहेत कीं कुत्री?''



अभिलाषने क्षणभर विचार करुन उत्तर दिले, ''आमच्या राज्यांतले प्रजाजन सगळे कावळे आहेत. कुत्र्यांसारखा एकही जण नाही.''

त्याच्या या उत्तरावर किंचित हंसून विलासिताने दुसरा प्रश्न विचारला, ''आपण जन्माने चंद्रवंशज आहात. स्वभावांत देखील चंद्राचा अंश आहे कीं...?'' असं म्हणून ती थांबली.

या प्रश्नाला ताबडतोब उत्तर देत अभिलाष म्हणाला, ''मी स्वभावाने सूर्यवंशज आहे.''

''छान! राजकुमार, आता माझा शेवटचा प्रश्न आहे. पिता वनांत जाताना सारेजण दुःखी कां होतात? ते परत तर येतीलच ना?''

अभिलाषवर्माने म्हटलं, ''अज्ञानामुळे!''

''जो पिता बनलेला आहे, तो परत कसा काय येईल?'' विलासिताने आपला संशय व्यक्त करीत म्हटले. ''हो तर, परत येईलच ना, पण हो, तो स्वतःच्या घरी येणार नाही.'' अभिलाषवर्माने गंभीर स्वरांत म्हटले.

ही उत्तरे ऐकून विलासिताने आपल्या माता-पित्यांकडे वळून पाहिले व म्हटले, ''या राज-कुमारांनी माझ्या कल्पनेशी जुळणारी उत्तरें दिलेली आहेत, म्हणून या स्वयंवरात ते विजयी झालेले आहेत.''

राजकन्येचा निर्णय ऐकून राजा व राणी अतिशय आनंदून गेले. भूपतीसेनने आपल्या आसनावरुन उठून आपल्या होणाऱ्या जांवयाला प्रेमाने आलिंगन दिले.

वेताळाने ही गोष्ट सांगून राजा विक्रमार्काला विचारले, ''राजपुत्र व राजकन्येची ही प्रश्नोत्तरे, जणूं कांही मूकबधिरांची आपसांत बोलणी



असावीत, असे नाही कां वाटत? सगळेच प्रश्न असंबद्ध, अस्ताव्यस्त आणि उत्तरे देखील विचित्र नि विसंगत वाटतात, नाही कां? माझ्या या शंकांची उत्तरे तुला माहीत असूनही जर तू दिली नाहीस, तर तुझ्या मस्तकाची अनेक शकले होऊन ते फुटून जाईल.''

विक्रमार्कांनी उत्तर दिले, ''राजकुमारी विलासिताने राजकुमार अभिलाषवर्माला जे प्रश्न विचारले, त्यांची उत्तर त्याने त्याच पद्धतीने गूढ शब्दांत दिली. ''तुमच्या राज्यांतले प्रजाजन कावळे आहेत कीं कुत्री?'' याचे उत्तर त्याने ''आमच्या राज्यांतले सर्व प्रजाजन कावळेच आहेत'' असे दिले. याचा अर्थ आहे, जो कांही आहार उपलब्ध होतो, तो सारे कावळे एकत्र मिळून खातात, कुत्र्यांसारखे एकमेकांशी भांडण करीत पत्रावळ फाडून टाकीत नाहीत. हा वर्माच्या सांगण्याचा अर्थ होता. दुसरा प्रश्न होता, ''आपण चंद्रवंशज आहात पण स्वभावांतही चंद्राचा अंश आहे कां?'' या प्रश्नाचे जे उत्तर वर्मानि दिले, त्याचा अर्थ असा होता कीं तो चंद्र नाही, कारण चंद्राला स्वतःचा प्रकाश नाही. तो स्वभावाने सूर्यवंशज आहे कारण सूर्य स्वयं-प्रकाशी असतो, व चंद्र परप्रकाशी असतो.''

आता राहिला तिसरा प्रश्न, ''पिता अगर वनांत गेले (पितृवनाचा दुसरा अर्थ आहे स्मशान) तर सर्वांना अपार दुःख होते. ते परत येतील? जे पिता वनांत गेले ते परत येतील कां?'' याच्या उत्तराचा अर्थ असा कीं जे पिता तिकडे गेले त्याबद्दल प्रत्येकाला खूप दुःख होते.

पण त्यांचे परत येणे, न येणे हे त्या त्या व्यक्तीच्या विश्वासावर अवलंबून असते. पुढच्या जन्मांत पिता भले आपल्याच घरांत जन्म घेईलच असे नाही. पण दुसऱ्या कोणत्यातरी घरांत जन्म घेऊं शकतो. असा वर्माच्या बोलण्याचा अर्थ होता. जेव्हां आपण या प्रश्नोत्तरांचा खोलवर अर्थ काय आहे तो जेव्हां पाहातो, त्यावरुन ही प्रश्नोत्तरे कांही मूकबधिर मंडळींच्या गप्पा नाहीत हे लक्षांत येते.''

राजाचे मौन अशा रीतीने भंग करण्यांत वेताळ सफल झाला. तो लगेच शवासहित अदृश्य झाला आणि पुन्हां झाडावर जाऊन बसला.

*(आधार : वसिष्ठांची रचना)*






इतर देशांतल्या दंतकथा (उत्तर अमेरिका, सिऊ जमात)

# दरीतला विचित्र खडक

**त्या** खोऱ्यांतल्या कोणत्याही खेड्यांपासून खूप दूर असणारा एक उंच सरळसोट खडक आहे. तो इतका मोठा व उंच आहे कीं केव्हांतरी त्याचे टोंक ढगांत दिसेनासे होते. मी त्या टोकाला शिखर म्हणतो, पण कोणत्याही डोंगराच्या शिखरासारखे ते टोंक नाही. तो डोंगरमाथा चांगला प्रशस्त व सपाट आहे. शाळकरी मुलांमुलींची छान सहल झाली असती तिथें!

पण तुम्हाला मात्र तिथे चढून जाता येत नाही. एकदा कांही गिर्यारोहकांनी दोर, मोठे खिळे व हातोड्यांच्या सहाय्याने वर जायचा यशस्वी प्रयत्न केला, पण वरती पोंचल्यानंतर मात्र त्यांच्या तोंडचे पाणी पळाले, कारण त्यांना खाली उतरणे अशक्य होते. पण ते हुशार होते. एका हेलिकॉप्टरने त्यांना वरुन उचलले आणि खाली सुखरूप उतरवले.

पण आपली ही गोष्ट त्यांची नाही. फार फार वर्षांपूर्वी, जेव्हां हेलिकॉप्टर, विमाने, रेडियो, बिनतारी यंत्रे अस्तित्वांत यायला शेंकडो वर्षे अवकाश होता, त्या प्राचीन काळांत तिथलेच दोन मुलगे कुणाच्याही मदतीशिवाय खाली उतरले. कसे? खरं तर तुम्हाला अगोदरच सांगायला हवं कीं ते तिथे चढलेच नव्हते.

मी कांहीतरीच सांगतोय कां? ते जर वर चढलेच नव्हते, तर खाली यायचा प्रश्न येतो कुठे? होय ना? पण ते तिथे गेले होते!

आता पूर्ण गोष्ट सांगायला हवी-ती मुले तिथे गेलेली नव्हती तरी खाली कशी व कां आली ते!

त्याचं असं झालं कीं ते दोघेजण हलक्या लांकडाचा चेंडू एकमेकांकडे फेकत खेळत होते. एकदा तर त्यांचा चेंडू जुन्या टेकडीच्या पलीकडे गेला. तेव्हां त्यांना त्या टेकडीवर चढून जायची इच्छा झाली. आजपर्यंत त्यांनी कधी तसे केलेले नव्हते. टेकडीपलीकडचे जग कसे असेल ते पाहायची उत्सुकता त्यांना होती. तिथून त्यांना खालची दरी





अतिशय सुंदर दिसली. रंगीबेरंगी फुले फुलली होती आणि फळांनी झाडे लगडली होती. छोटे मोठे पक्षी व प्राणी तिथें लपंडाव खेळत होते.

ते दोघेजण त्या अनोळखी दरींत उतरले आणि त्यांचा चेंडू शोधावला लागले. पण त्यांना कांही तो सांपडला नाही. चेंडू शोधत शोधत ते लांबवर गेले. वाटेंत दिसली ती रसाळ फळे चाखत ते पुढे गेले. आपले गांव खूप मागे पडले आहे हे त्यांच्या ध्यानांत आले नाही. जेव्हां एकदम सुरेखसा पूर्णचंद्र आकाशांत चमकायला लागला, तेव्हां त्यांना संध्याकाळ झाल्याची जाणीव झाली. ते संबंध खोरें सोनेरी रंगाचे दिसूं लागले.

ते मनोहर दृश्य पाहून दोघेही भारावून गेले होते, पण, चंद्र-प्रकाशामुळे एक मोठे, भले मोठे केसाळ अस्वल गुहेमधून बाहेर आले. ही दोन मुले पाहून अस्वल तर फारच खूष झाले. कां, ते तुम्हाला ठाऊक आहेच कीं!

अस्वल आता त्यांच्यावर उडी घेणार हे त्या दोघांना चंद्र-प्रकाशांत स्वच्छ दिसले.

''थांबा थोडा वेळ, अस्वलराव, घाई कसली आहे? आम्हाला शेवटची प्रार्थना म्हणायला जरा वेळ द्याल कां?'' सगळा धीर एकवटून त्यांनी अस्वलाला विचारण्याचे धाडस केले.

''प्रार्थना? त्याने काय होणार आहे? तुम्हाला इथे लपायला कुठेही जागा नाही. माझ्याशी सामना करायला तुमच्यापाशी कांही शस्त्रही नाही. आसपास तुमच्या मदतीला यायला कुणीही नाही. आजपर्यंत मला बघूनच सगळ्यांना घेरी येत असे. तुम्ही दोघे मात्र निराळे दिसता आहात. तुम्ही तसेच खूप चविष्ट असाल अशी माझी खात्री आहे!'' अस्वल त्यांना म्हणाले.

ती मुले व त्यांचे जातभाई तिथल्या बांकन टांका या देवाची उपासना करीत असत. ''अरे बांकन टांका, या सुंदर वनराईच्या खोऱ्यांत तू आम्हाला इथपर्यंत आणलेस, ते फक्त या भल्यामोठ्या अस्वलदादाला स्वादिष्ट भोजन देण्यासाठीच कां?



अस्वलदादा म्हणतात की आता इथून आमची सुटका होणे शक्यच नाही. अरे देवा बांकन टांका, तुला यांतून कांहीच मार्ग दिसत नाही कां रे?'' आणि त्या दोघांनी बांकन टांकाची मनोभावे आळवणी केली. त्यांच्या डोळ्यांतून घळाघळा अश्रू वाहात होते.

बांकन टांकाने त्यांचे ऐकले. एकाएकी, त्या दोन्ही मुलांना किंवा अस्वलालादेखील कांही समजण्यापूर्वीच त्या मुलांच्या पायाखालच्या जमिनीचा भलामोठा तुकडा झरझर वरती येऊं लागला. तो इतका वर गेला कीं अस्वलाला कांही तिथपर्यंत जाऊन भोजन करता आले नसते.

रागावून अस्वलाने त्या नव्या अतिउंच दगडावर बोचकारले, त्याच्याभोवती गोलगोल फेऱ्या मारल्या, पण व्यर्थ! मुलांनी त्यांच्या देवतेचे आभार मानले, पण आता पुढे काय करायचे ते त्यांना कळेना. पण बांका टांकाला माहीत होते की! देवच होता ना तो! त्या जमातीचा मित्रपक्षी गरुड, त्याचे नांव वानली होते - त्याने खाली झेंप घेऊन एकेका मुलाला आपल्या पायांत उचलून घेतले आणि त्यांच्या खेडेगांवालगतच्या टेंकडीवर आणून सोडले. अशा दोन खेपा त्याने केल्या. मध्य रात्र होईपर्यंत मुले घरी पोंचली. त्यांच्या आईनें गरमागरम जेवण तयार ठेवलेले होते आणि त्यांचा हा चित्तथरारक अनुभवही मोठा बहारदार होता. दुसऱ्या दिवशी सर्वांना तो सांगायचा होताच, त्या रात्रीं त्यांना थकव्याने शांत झोप लागली. तो नवा खडक लांब क्षितिजावर दिसत होता तो पाहायला गांवकरी गेले आणि त्यांनी भक्तिभावाने त्या खडकाला वंदन केले

ही गोष्ट स्थानिक रेड इंडियन लोकांची आहे. युरोपांतून गोरे लोक जाऊन तिथे वसाहती करण्या-पूर्वीच्या काळांतली आहे. त्या एकांड्या खडकाला गोरे लोक सैतानाचा खडक कां म्हणतात ते तिथल्या या जुन्या रहिवाशांना समजले नाही. म्हणून त्यांना वाटतं कीं सैतान हा गोऱ्या परकीयांचा मित्र आहे. ते मात्र त्याला अस्वलाचा खडक म्हणतात.

त्या अस्वलाला त्या रात्री चांदणीभोजन मिळाले नाही, त्याची आठवण बहुधा गांवकऱ्यांनी कृतज्ञतेने ठेवली असावी. *(एम्. डी.)*





# गुरुची जबाबदारी

ब्रह्मदत्त काशी येथे राज्य करीत असताना बोधिसत्त्वांनी तक्षशिला नगरीत एका प्रसिद्ध शिल्पकाराच्या रूपांत जन्म घेतला. त्यांच्याकडे शिल्पविद्या शिकण्यासाठी देशाच्या कानाकोपऱ्यांतून अनेक राजकुमार येत असत.

तक्षशिला नगरांतील शिल्पाचार्यांचे यश ऐकून काशीच्या राजाने आपल्या मुलाला त्यांच्याकडे विद्याभ्यासासाठी पाठविण्याचे ठरविले. परंतु सोळा वर्षांच्या तरुण राजकुमाराला एकट्याला एवढ्या लांब तक्षशिला येथे पाठविणे मंत्र्याला व दरबारी लोकांना काही आवडले नाही.

त्यावर विचार करून सर्वांनी म्हटले - "महाराज, शिल्पविद्या शिकविणारे कित्येक लोक आपल्या राज्यांत सुद्धां आहेत, तेव्हां राजकुमाराला तक्षशिला येथेच पाठविण्याची गरजच काय?"

राजाने कोणाचेही ऐकले नाही. आपल्या मुलाला राजधानीत शिल्पकला आत्मसात् करणे कठीण जाईल, असा विचार करून राजाने आपल्या मुलाच्या हातांत एक खडावांचा जोड व एक ताडपत्री छत्री दिली व म्हणाला - "तू तक्षशिला येथे जाऊन तेथील शिल्पाचार्यांकडे शिक्षण घे, शिक्षण संपताच परत ये. त्यांना गुरुदक्षिणेसाठी द्यायला एक हजार चांदीची नाणी आपल्याबरोबर घेऊन जा."

राजकुमार आपल्या वडिलांची आज्ञा घेऊन तेथून निघाला. जातांना एक हजार चांदीच्या नाण्यांच्या भरलेल्या गाठोड्याच्या वजनाने थकून जाऊन वाटेत ठिकठिकाणी विश्रांतीकरिता थांबत तो तक्षशिलेला येऊन पोहोचला.

राजकुमाराने गुरूचे दर्शन घेऊन आपल्या येण्याचे कारण सांगितले व एक हजार चांदीच्या नाण्यांनी थैली त्याने गुरूच्या हातात सोपवून विद्याभ्यासास आरंभ केला. राजकुमाराचा विद्याभ्यास चांगल्या तऱ्हेने सुरू झाला. त्याच्या प्रखर बुद्धीने गुरुसुद्धा प्रभावित झाले.

थोडे दिवस लोटले. गुरु आणि शिष्य रोज गांवाच्या बाहेर असलेल्या नदीत आंघोळ करून परत येत. एक दिवस ते दोघे स्नान करीत होते, त्या वेळी एक म्हातारी तेथे आली. हातातील तीळ स्वच्छ धुऊन तिने नदीच्या कांठावर एका फडक्यावर वाळत घातले. राजकुमार तीळ पाहून झटपट आपली आंघोळ उरकून तेथे गेला व म्हातारीची नजर चुकवून त्याने एक मूठभर तीळ घेतले व तोंडात टाकले. ते म्हातारीने पाहिले, परंतु ती गप्प बसली.



दुसऱ्या दिवशी पण राजकुमाराने तसेच केले, म्हातारीने पाहून न पाहिलेसे केले. तिसऱ्या दिवशी पण राजकुमाराने मूठभर तीळ खाल्ले. त्याने चोरून तीळ खाल्लेले पाहून म्हातारीला राजकुमाराचा खूप राग आला.

जेव्हां शिल्पाचार्य स्नान करून कांठावर येऊन बसले तेव्हां म्हातारीने गुरूकडे तक्रार केली - "गुरुवर्य, तीन दिवस आपला शिष्य माझे तीळ चोरून खात आहे. तीळ नाहीसे झाल्याबद्दल मला दुःख होत नाही, परंतु त्या तरुणाची चोरी करण्याची संवय पाहून मला दुःख होत आहे. ही गोष्ट आपल्या यशाला काळिमा फासणारी आहे. कृपा करून त्याला तुम्ही अशी शिक्षा करा, की पुन्हां तो चोरी करणार नाही."

घरी परत येताच गुरूंनी बाकीच्या शिष्यांना राजकुमाराचे हात घट्ट बांधण्यास सांगितले व राजकुमाराच्या पाठीवर काठीने तीन वेळा मारले आणि म्हणाले - "तू जे वाईट काम केलेस त्याबद्दल ही शिक्षा तुला मिळाली आहे. पुन्हां असे काम करू नकोस."

राजकुमाराला गुरूचा खूप राग आला. तो फक्त काशी राज्यापुरता राजकुमार होता. येथे सर्वांच्या प्रमाणे तो सर्वसाधारण माणूस होता. त्याला शिक्षा करण्याचे काम गुरुचेच होते.

राजकुमार क्रोधाने लाल झाला. त्याने मागचा पुढचा विचार न करता शपथ घेतली - "मी राजा झाल्यावर ह्या दुष्टाला कांहीतरी कारणाने काशी



राज्यात बोलावून त्याचा प्राण घेईन." कांही दिवसांनी राजकुमाराचे शिक्षण पूर्ण झाले. काशीला परत निघतांना त्याने आपल्या गुरूला नमस्कार करून त्यांचा आशीर्वाद घेतला.

त्यानंतर राजकुमार आपल्या गुरूंना म्हणाला - "गुरुवर्य, मी राजा झाल्यानंतर आपण काशी राज्यात नक्की आले पाहिजे. त्या वेळेस मी आपला चांगल्या तऱ्हेने आदर सत्कार करावा म्हणतो."

आपल्या शिष्याचे आमंत्रण ऐकून गुरुवर्यांना खूप आनंद झाला. त्यांनी येण्याचे आश्वासन दिले.

काशी राज्यात पोहोचताच थोड्या दिवसांनी [illegible]राचा राज्याभिषेक झाला. एके दिवशी [illegible] गुरुची आठवण झाली. त्याने तावडतोब [illegible] नोकराला बोलावून आज्ञा केली - "तू तक्षशिला येथे जाऊन तेथील शिल्पाचार्यांचे दर्शन घे आणि त्यांना माझे हे निमंत्रण-पत्र दे."

शिल्पाचार्य निरोप मिळतांच काशीला गेले नाहीत. त्यांनी विचार केला की, राजा गादीवर

बसण्याच्या आनंदात असणार त्याला राज्य-कारभाराचा अनुभव आल्यानंतर त्याला भेटायला जाणेच चांगले.

असा विचार करून शिल्पचार्य कांही दिवसांनी काशी राजाला भेटायला काशी राज्यात आले व राजमहालात रहाणाऱ्या आपल्या शिष्याला भेटायला गेले. राजाचा गुरु म्हणून दरबारी लोकांनी त्यांची बडदास्त चांगल्या तऱ्हेने ठेवली आणि त्यांना आदरपूर्वक एका उंच आसनावर बसण्यास सांगितले.

गुरूंना पाहताच राजाला त्यांचे पूर्वीचे वागणे आठवले व राग जास्तच वाढला. त्याने गुरूकडे क्रोधाने दृष्टिक्षेप केला व विचारले - ''मूठभर तीळ खाणाऱ्या मला शिक्षा देणाऱ्याला असा हातात आलेला असतांना सोडून देता येईल काय?''

राजाने विचार केला की, राजदरबारी लोकांना सर्व सांगून शिल्पाचार्यांच्या मनांत मरणाचे भय निर्माण करून त्यांना वेळ साधून मारणेच जास्त सोयीस्कर होईल. परंतु राजाला वाटले तसे शिल्पाचार्य बावरले नाहीत. उलट ते सौम्य शब्दात राजाला म्हणाले - ''हे राजा, जेव्हां तू माझ्याजवळ शिष्य म्हणून होतास, तेव्हां तुझी जबाबदारी माझ्यावर होती व तू लायकीप्रमाणे काम केले नाहींस. शिष्याला वाईट मार्गापासून परावृत्त करून चांगल्या मार्गी लावणे हे गुरूचे कर्तव्य आहे. परंतु त्यावेळेस मी तुला शिक्षा न करता तसेच सोडून दिले असते, तर आज तू काशी नगराचा राजा न होता काशी राज्यांतला चोर लुटेरा झाला असतास. बुद्धिमान लोक जेव्हां कांही अपराध करतात तेव्हां त्यांना शिक्षा देणाऱ्यावर नाराज होऊन चालत नाही. तर त्यांच्याबद्दल जास्त प्रेम व आपुलकी वाटावयास पाहिजे.''

त्यामुळे राजदरबाऱ्यांसमोर खरी गोष्ट बाहेर आली. राजाचा अपमान झाला. राजा सिंहासना-वरुन उतरून आला व त्याने खाली वाकून गुरूचे पाय धरले आणि म्हणाला - ''गुरुवर्य, माझे मन परत एकदा वाईट मार्गाने जात होते, परंतु परत आपण मला चांगला मार्ग दाखविलात, मी आपला कायम ऋणी राहीन.''

राजांत झालेला हा बदल पाहून सर्व दरबारी लोकांना व त्यांच्या बरोबर शिल्पाचार्यांना खूप आनंद झाला.

त्यानंतर राजाच्या सांगण्यावरून शिल्पा-चार्यांनी आपले निवासस्थान काशीला आणले आणि राजाच्या दरबारी आचार्यांच्या पदावर ते राजाला चांगले मार्गदर्शन देत राहिले.





# एकदा चूक झाली खरी!

प्रतापराय जमीनदाराने, सूर्यभूपती नांवाच्या दुसऱ्या एका जमीनदाराच्या मुलीशी, अनंतलक्ष्मीशी, विवाह केला. सूर्यभूपतीच्याकडे प्रतापरायच्यापेक्षां पन्नास गांवे जास्त होती. म्हणून लग्न झाल्या दिवसापासून अनंतलक्ष्मीला त्या गोष्टीचे वाईट वाटत होते. आपल्या पित्याच्या मानाने एका लहानशा जमीनदाराशी आपले लग्न झालंय म्हणून ती कायम असमाधानी होती. त्यावरुन नेहमी ती पतीला टोमणे मारीत असे किंवा कांहीतरी उलटसुलट बोलून त्याचा पाणउतारा करीत असे. घरांतले सारे नोकरचाकर तिला भांडखोर, कर्कशा, जमीनदारीणबाई असं म्हणून तिच्यामागे तिची टिंगल करीत असत. प्रतापराय मात्र यांत फारसे लक्ष घालीत नव्हता. बायकोचे कटु शब्द या कानाने ऐकून त्या कानाने सोडून देत होता.

पन्नास वर्षे असा त्यांचा संसार चालला होता. एकदा ती दोघेजण घोडागाडीत बसून सकाळीच बाहेर फिरायला डोंगराच्या बाजूला गेली. तिथली फळझाडे, फुले, वृक्षराजी व कुरणांत चरणारी गुरे, पाहून त्यांना खूप आनंद झाला. बकऱ्यांच्या कळपांत एक मेंढी होती. ती पाहून अनंतलक्ष्मी उत्साहाने म्हणाली, ''हे पाहा, आपल्या लग्नाला आता पन्नास वर्षे झाली. या शुभप्रसंगी आपण ती मेंढी कापून तिचे मांस शिजवून, आपल्या सर्व कर्मचाऱ्यांना एक मोठी मेजवानी देऊं या.''

प्रतापरायने अनिच्छेने नकारार्थी मान हलवली, व पुढे त्याने म्हटले, ''पन्नास वर्षांपूर्वी जी चूक झाली, त्याची शिक्षा त्या गरीब बिचाऱ्या मेंढीला कशापायी द्यायची?

*- रमेश पटेल*






# एका उत्सवाची दंतकथा

तमिळनाडमधील काराईकल ही एके काळी फ्रेंच वसाहत होती. तिथें दरवर्षी चार दिवसांचा आम्र महोत्सव भरतो.

काराईकल अम्मैयार उर्फ पुनितावती हिला आदरांजली म्हणून हा उत्सव असतो.

पुनितावती ही तिथल्या एका धनाढ्य व्यापाऱ्याची, परमदत्ताची पत्नी होती.. ती शिवाची परमभक्ती करीत असे.

एकदा परमदत्ताने एका दुर्मिळ प्रतीचे दोन आंबे घरी आणले. त्याच दिवशी, त्यांच्या दारी एक याचक आला.

जेव्हां तोही शिवभक्त आहे असे त्यांना कळले, तेव्हां व्यापाऱ्याला व पत्नीला फार आनंद वाटला. पुनितावतीने सांबार-भाताबरोबर तो दुर्मिळ आंबाही त्याच्या पानांत वाढला. त्या दिवशी तमिळ 'आनि' महिन्यांतली पौर्णिमा होती. तमिळनाडमधल्या त्रेसष्ट नायन्मार संतामधे ही कराईकल अम्मैय्यार ही एकच स्त्री-संत आहे.



'आनि' पौर्णिमेच्या दिवशी काराईकलचे रहिवासी रस्त्यावर आंबे पसरतात. ती फळे परमेश्वरापर्यंत पोंचतील अशी त्यांची श्रद्धा असते. हा मांगानी उत्सव यंदा वीस जूनपासून साजरा केला गेला.





# विष्णुपुराण

बुद्धांच्या आगमनाचा निरोप कळताच कपिल-वस्तु नगरातील सर्वांनी त्यांचे स्वागत करण्या-करीता सर्व नगर फुलांनी सुशोभित केले. सर्व लोकांच्यात आनंदोत्साह निर्माण झाला होता. कारण, सर्व जगतात ज्योतिर्मय बनलेले भगवान बुद्ध आपल्या नगरातील रहाणारे होते. राज्याचा राजा सिद्धार्थ बनणार होते, परंतु ते विश्वाचे चक्रवर्ती बनले. ह्याचा अभिमान वाटून सर्व नगरवासियांनी रस्त्यावर फुलांच्या पायघड्या टाकल्या.

आपल्या मुलाला केव्हां एकदा आपल्या बाहुपाशांत घेऊन कवटाळतो आहे असे राजा शुद्धोदनाला वाटत होते.

नगरांत बुद्धांचे आगमन झाले. अर्धोन्मिलीत नेत्र, गंभीर मुखमुद्रा, असलेले व करुणामूर्ती बनलेले बुद्ध व त्यांच्या पाठीमागून हजारो लोक 'बुद्धं शरणं गच्छामि', 'धर्मं शरणं गच्छामि', 'संघं शरणं गच्छामि', असा जयजयकार करीत येत होते.

तिकडे राजमहालांत यशोधरा, राहुल व महाराज शुद्धोदन राजवाड्याच्या पायऱ्या उतरून मुलाची येण्याची प्रतिक्षा करीत होते. सारथी चेन्ना आंगणात पुढे जाऊन उभा होता. त्याच्या डोळ्यातून आनंदाश्रू गळत होते. तो आपल्या मालकाची उत्कंठतेने वाट पाहात होता.

हातांत भिक्षापात्र घेऊन बुद्ध राजमहालासमोर आले. राहुलने धावत जाऊन आपल्या वडिलांचे पाय धरले व नमस्कार केला. अनेक वर्षानंतर दर्शन देणाऱ्या आपल्या पतीच्या प्रसन्न चेहऱ्याकडे यशोधरा एकटक नजरेने पहात राहिली. त्यांना तिने साष्टांग नमस्कार घातला व त्यांच्या पायाला



स्पर्श करीत आपल्या डोळ्यांतील अश्रूंनी त्यांचे पाय धुतले.

बुद्धाच्या आलिंगनाकरीता पुढे आलेले महाराज शुद्धोदनाचे हात, त्याचे ते परिव्राजक रूप व हातांत भिक्षापात्र पाहून लुळे पडले. ते निश्चल झाले. वृद्ध महाराजांचे काळीज भिक्षु रूपांत आलेला आपल्या मुलाला पाहून तडफडू लागले. त्यांच्या डोळ्यांतून अखंड अश्रुधारा वाहू लागल्या.

"बाळा, सिद्धार्थ! गौतम! हे काय झाले? तू हे काय करून बसलास!" असे म्हणत ते कळवळून रडूं लागले आणि बेशुद्ध झाले.

बुद्धांनी आपल्या वडिलांचे डोके आपल्या मांडीवर घेतले व त्यांना आपल्या शुभ्र वस्त्राने ते वारा घालू लागले. आपल्या मुलाचा स्पर्श होताच राजा शुद्धोदनना शुद्धीचा अर्थ प्राप्त झाला. "बौद्ध रूपाने सिद्धार्थ म्हणूनच परत आलो आहे." हे ऐकताच शुद्धोदनांच्या कानांना अमृतवाणी ऐकल्यासारखे वाटले. त्यांच्या अर्धवट उघडलेल्या डोळ्यांतून एक किरण प्रकाशमान झाल्यासारखे वाटत होते. बुद्धांच्या तोंडावर एक प्रकारचे तेजोवलय चमकत होते. त्या वलयाच्या अनिर्वचनी प्रभावाने शुद्धोदनला उत्तेजित केले. अशांततेतून शांतिकडे, अंधकारातून प्रकाशाकडे, व भ्रमापासून सत्याकडे त्यांना खेचले गेले. "बुद्धं शरणं गच्छामि" हेच वाक्य त्यांच्या मनपटलावर वारंवार पडू लागले. त्यांच्या तोंडूनही ते शब्द बाहेर पडूं लागले. राहुल सुद्धा तेच म्हणत होता. सर्व लोकांच्या तोंडूनही तेच शब्द बाहेर पडत होते. यशोधरा आपले डोळे मिटून छातीवर हात ठेऊन ध्यानस्थ मुद्रेने पुटपुटता म्हणत "बुद्धं शरणं गच्छामि" चा जप करीत होती.

त्या स्थितीत बुद्धाने राहुलच्या डोक्यावर हात फिरवीत म्हटले, "मी तुला आशीर्वाद देतो की; तूसुद्धा बुद्ध बनून धर्माचे व संघाचे अनुकरण करीत मानवाला सार्थकता मिळवून देशील. माहित आहे कां? बुद्ध याचे तात्पर्य काय आहे? तुझ्या धारणेने केवळ मीच बुद्ध नाही. उत्तम धर्माचरण व अहिंसा पाळणारे सर्व बुद्ध होतात. बुद्धत्व हीच मानवता आहे. बुद्धत्व प्राप्त करणारा मनुष्यच बुद्ध होऊ शकतो. असा मनुष्य जन्म धारण करणारा बुद्धच ह्या जगांत मार्गक्रमण करतो. बुद्धांच्या द्वारा उपदेशीत धर्मच मनुष्याच्या जीवनाला खरेपण मिळवून देते. हा धर्मच खरा मानवाला अनुकूल आहे."

यशोधरा आपले डोळे उघडीत बुद्धांकडे निश्चल दृष्टी टाकत म्हणाली - "स्वामी! मी मला



स्वतःला आपल्या हातांत भिक्षारूपाने अर्पित करीत आहे. आजपर्यंत मी एक गृहिणी म्हणून राहिले. परंतु आत्तापासून मी एक मानवाच्या सेवाधर्माकरिता म्हणून एक संन्यासिनी बनत आहे. आपल्या पावलांवर पाऊल ठेऊन हे जीवन घालवणे हाच माझा आता धर्म आहे. ह्याकरिता आपण नारीजातीला समाजांत एक बौद्ध संघ काढून द्या." असे म्हणत यशोधराने बुद्धांच्या पायांना वाकून नमस्कार केला.

अशा तऱ्हेने यशोधरा बौद्ध धर्माचा स्वीकार करणारी पहिला महिला झाली.

बुद्धांना भगवान रूपांत पहाणाऱ्या, अखंड अश्रू वहात असलेल्या चेन्नाला गौतम बुद्धांनी पाहिले व त्याला आपल्या बाहुपाशांत घेण्याकरीता ते पुढे झाले. तेवढ्यांत खाली वाकून चेन्नाने त्यांना नमस्कार केला, तेव्हां त्याला उठवीत बुद्ध म्हणाले - "चेन्ना, कोणीही मनुष्य कितीही महान व मोठा बनला, तरी लहानांनी मोठ्यांचाचा आदर केला पाहिजे. त्यांची पूजा केली पाहिजे. ह्या क्षणी तू मला पूज्य आहेस. ह्या कपिलवस्तू नगरांतून ह्या विशाल जगांत मला प्रवेश करून देणारा पुण्यात्मा तूच तर आहेस. मी ज्या सत्याचा व धर्माचा बोध व ज्ञान प्राप्त केले. त्या आधाराला धरून कोणीही मला देव समजला व माझी आराधना केली तर ते मला आवडणार नाही. कोणत्याही व्यक्तीची आराधना अनुचित आहे. भगवान मानणे सुद्धां तसेच आहे. खरी एकच गोष्ट आहे, मानव धर्माचे आचरण करणे!"



बुद्ध भगवानाचे वचन ऐकून गदगदलेल्या स्वरांत चेन्ना म्हणाला, "बुद्धदेवा! तसे मानण्याने आम्हाला एक प्रकारचा आनंदच प्राप्त होतो. ह्या भावनेचे एक कारण धर्माचरण किंवा संघ सेवेच्याकरीता आमच्या हृदयांत अत्यंत भक्तिभाव उत्पन्न होत आहेत. आम्ही एक शक्तिशाली संबंध जोडत आहोत. तेव्हां कृपया आपण आपल्याला भगवान मानून आम्हाला आमच्या आराधनेच्या भावना व आपल्याला तसे म्हणण्याच्या इच्छेला आडकाठी घालूं नका."

तेव्हांपासून बुद्धांना बुद्धदेव व भगवान बुद्ध अशा नावाने संबोधले जाऊ लागले. असा उत्तम मनुष्यच देव आहे.

शाक्यवंशातील कांही मोजके लोक सोडले तर बाकीच्या सर्वांनी बौद्ध धर्माचा स्वीकार केला. व त्याचबरोबर बुद्धाच्या आदेशाचा उपदेशाचा



प्रसार केला. ते सर्व भिक्षू बनले. त्यांनी सर्वांनी आपापली संपत्ती संघाला अर्पित केली, व ते सेवाधर्म स्वेच्छेने करायला तयार झाले.

देवदत्ताला सुरवातीपासूनच बुद्धांच्याबद्दल द्वेषभाव होता. म्हणून त्याने इर्षेने प्रेरित होऊन बौद्ध धर्माला विरोध केला व बुद्धाच्या विरुद्ध आपले एक संगठन निर्माण केले.

बुद्ध कपिलवस्तू नगरांतून जायला निघाले. त्यांच्या बरोबर अनेक अनुयायी, शिष्य यशोधरा व राहुलही होते. बुद्ध वाटेने जाताना सुजाताच्या घरी भिक्षू बनून गेले. बुद्धाने सुजाताच्या मुलाला आशीर्वाद दिला. आणि राहुलला म्हटले - ''राहुल, सुजाताच्या मुलाला तुझा भाऊ मान. तुम्ही दोघांनी मित्र बनून भावांच्या प्रेमाने जाती, वर्णभेद यांना तोडून विश्व मानवतेचे कुटुंब एक आहे, ही भावना जगाला पटवून द्या.''

सुजाता बुद्धांची शिष्या बनून यशोधरेबरोबर चालूं लागली. बुद्धाने त्यांना उपदेश केला, की गृहिणींचा धर्म घरसंसार चालवणे. बायकांनी बौद्ध धर्माचे अवलंबन करून आपल्या मुलाबाळांना उत्तम मानव बनवणाऱ्या माता म्हणून राहिले पाहिजे. हाच संदेश सर्व मनुष्य जातीत पसरून त्यांनी धर्म संचालन करावे.''

बुद्धाने आपल्या अनुयायी व शिष्यांना धर्म-चक्राचे संचालन करण्याच्या हेतूने सर्वत्र पाठविले. व नंतर यशोधरा व राहुलला समजावले की, त्यांनी परत कपिलवस्तुला जाऊन बुद्ध शुद्धोदनाची देख-भाल करावी व शाक्यवंशाला धर्माने चालण्यास सांगावे.

ह्यानंतर बुद्ध एकटेच मार्गक्रमण करुं लागले, व जंगलातून जाऊं लागले. त्या भयंकर जंगलात अत्याचार करणारा एक अंगुलीमाल नांवाचा दरोडेखोर रहात होता. त्याने माणसांची हत्या करून त्यांच्या बोटांची माळ करून गळ्यांत बांधलेली होती. ती बोटे अशा माणसांची होती, की जी त्याला घाबरून त्याच्या आधीन होत होती, आणि आपले प्राण वांचविण्याकरीता त्याच्या हातून मारले जात होते.''

अंगुलीमालला असे वाटे की, अशा प्रकारे आपण प्रभावशाली बनण्याने लोक आपले नांव ऐकताच थरथर कापतील.

अरण्याच्या मध्यभागी गेल्यावर त्याला कांही गुराखी भेटले. त्या रस्त्याने जाणाऱ्या बुद्धांना पाहून त्यांनी विचारले - ''स्वामी, आपण त्या बाजूला जात आहात कां? चाळीस पन्नास माणसे एकत्र



असल्याशिवाय तिकडे जाण्याचे धाडस कुणी करीत नाहीत. तिकडे एक भयंकर डाकू रहातो. एकटा कोणी त्याच्या हातांत सापडला, तर तो त्याला ठार-मारल्याशिवाय रहात नाही.''

बुद्ध त्यांच्या म्हणण्याची पर्वा न करता त्या अरण्यमार्गाने जाऊ लागले.

समोरून एकट्याच येणाऱ्या बुद्धांना अंगुलमालने लांबूनच पाहिले. ते आपल्या भगव्या वस्त्रांत कांहीतरी लपवीत होते. अंगुलीमाल आपल्या हातांतली रक्ताने थबथबलेली चकचकीत धार असलेली कुऱ्हाड हवेत उगारीत जोरांत ओरडून म्हणाला, ''तू कांहीतरी लपवलेले आहेस. ते ताबडतोब माझ्या हातांत दे.''

बुद्धाने मंदहास्य करीत आपल्या कफनीत लपवलेले भिक्षापात्र बाहेर काढले व अंगुली-मालच्या हातात दिले.

अंगुलीमाल ते उलटसुलट करून म्हणाला, ''उफ्! हे तर भिक्षापात्र आहे. तू भिक्षुक कां असेनास. पण माझ्या शोधांत आलेला दिसतोस माझ्यासमोर हंसत रिकामे भिक्षापात्र धायची तुझी ही हिम्मत?. तुला भीती वाटत नाही? माहीत आहे कां मी कोण आहे?''

''तू मनुष्य आहेस. मी सुद्धा एक मनुष्य आहे. असे असतांना आपण एकमेकांना भ्यायचे कशाला?'' बुद्ध म्हणाले.

''तू मला घाबरून आपला अंगठा देऊन आपले प्राण वाचव. नाहीतर मी तुला मारून टाकेन. त्यानंतर तुझा अंगठा माझ्या माळेत अडकवीन.''

''तू मला मारून टाकणार, बस् एवढेच ना? मृत्यू हा केव्हांना केव्हांतरी येणारच आहे. मारून टाक मला. मी आनंदाने मरावयास तयार आहे. आज तू मला मारून टाकणार आहेस. उद्यां तू



मरणार आहेस. पण काय रे, उद्यां मरायच्या वेळेस तू हंसत मरणाचे स्वागत करशील कां? मी कोणत्याही प्राण्याची हिंसा केली नाही. त्या संतोषानेच मी तुझ्या कुऱ्हाडीसमोर आपली मान बांकवली, पण जेव्हां तुझे मरण तुझ्या समोर येईल, तेव्हां तू हंसतमुखाने त्याला सामोरा जाशील कां?'' बुद्धानी विचारले.

हे ऐकताच अंगुलीमालचे डोके चक्रावल्यासारखे झाले. तो कोणत्यातरी गहन विचारांत बुडून गेला. त्याला स्वतः केलेल्या भयंकर कृत्यांची आठवण झाली. तो भीतीने थरथर कांपू लागला. त्याच्या पापांना कोणतेही प्रायश्चित नव्हते. मोठी पापे करणारा मी, मला क्षमा करणारा, कोण आहे? ती दयाळू व्यक्ती कोण आहे? या विचारात असतांना बुद्ध त्याच्या मनासमोर साकार झाले. त्यांची महानता, पुण्याई त्याने पूर्वी कैक वेळा ऐकले होते.

असेही ऐकले होते की, त्याच्या दृष्टीला वाघ, हरिण, साप व मेंढी हे सर्व एकसारखे दिसतात. ते करुणाकर आहेत. उद्धारकसुद्धां बुद्धच आहे. असे विचार त्याच्या मनांत मोठ्याने साद घालत होते. आणि तो आंतला आवाज मोठा होत गेला. ''बुद्धं शरणं गच्छामि.''

''अंगुलीमाल! तो बुद्ध तर मीच आहे. तुझ्या करिताच मी येथे आलो आहे. तुझ्या हातांत भिक्षापात्र दिले आहे. तू तुझे भूतकाळचे आयुष्य सर्व विसरून जा. आणि एका बुद्ध भिक्षूच्या रूपाने माझा शिष्य बनून रहा.''

''बुद्ध भगवान!'' असे म्हणत अंगुलीमालने बुद्धाच्या पायावर लोटांगण घातले, व त्याना निवेदन केले.'' भगवान, फक्त मला माझाच उद्धार व्हावा वाटत असे नाही. माझे इतर अनुचरसुद्धा आपले शिष्य आहेत.'' असे म्हणत अंगुलीमालने आपल्या सर्व साथीदारांना हांका मारल्या.

ह्यानंतर अंगुलीमाल व त्याचे सर्व साथीदार बुद्धाचे शिष्य बनले.

बुद्धाचा उपदेश ऐकून अनेक दुष्ट व अत्याचारी लोक मागील क्रूर जीवन आठवून पश्चाताप करीत बुद्धाचे शिष्य बनले. भिक्षू बनले. त्यांनी संघाची सेवा करीत आपल्याला समर्पित करून आपले शेष जीवन पुन्हा पुनीत केले व चांगले मार्गक्रमण केले.







# शापच झाले वरदान

एका गांवामध्ये रामनारायण नांवाचा एक गरीब शेतकरी रहात होता. दुसऱ्यांची शेतजमीन भाड्याने वा कराराने घेऊन तो शेती करत असे, आणि त्यावरच आपल्या कुटुंबाचे पालन पोषण करीत होता. त्याच्या मनांत दोन अतृप्त अशा इच्छा होत्या एक देशाटन करण्याची आणि दुसरी सुग्रास जेवण जेवण्याची. परंतु त्याच्यासारख्या गरीब शेतकऱ्याच्या दृष्टीने ह्या फारच महागड्या गोष्टी होत्या.

एकदा त्याने विचार केला की कमीत कमी राजधानीच्या शहरांत साजरा होणारा वसंतोत्सव तरी पहावा, हा विचार मनांत येताच तो आपला मित्र केशव ह्याच्या बरोबर राजधानीकडे निघाला. दिवसभर प्रवास करून रात्री अंधार पडता पडता ते एका जंगलात पोचले. रात्री विश्रांतीसाठी त्यांना तेथे एक देऊळ दिसले. रामनारायणने विचार केला की भयंकर जंगलात देवळापेक्षा सुरक्षित असे दुसरे कुठले ठिकाण असणार? म्हणूनच उत्साहाने त्याने आपल्या मित्राला सांगितले कीं आजची रात्र येथेच झोपलेले बरे. ह्या देवळांतील देवताच आपले रक्षण करेल.

परंतु केशव ह्या गोष्टीस विरोध करीत म्हणाला, ''हे तर चण्डमुखी नांवाच्या देवीचे देऊळ आहे. ही देवी रागीट स्वभावाची आहे. दिवसभर बाहेर संचार करून ती रात्री मंदिरात येते. त्यावेळेस जर तिला कुणी देवळांत दिसलं तर त्याला ती शाप देते.''

''देवी जर माझ्यावर रागावली तर रागावूं दे पण मी आता येथून एक पाऊलही पुढे येणार नाही'' असं म्हणतच रामनारायण देवळांत शिरला केशव पुढे निघून गेला.

रामनारायण देवळांत जाऊन आडवा झाला. दुसऱ्याच क्षणी त्याचा डोळा लागला आणि तो गाढ झोपी गेला. मध्यरात्रीच्या वेळी त्याला जाणवले की कोणीतरी त्याला चाबकाने फटके मारीत आहे. तो खडबडून उठून बसला. त्याने पाहिले की समोर डोळे तांबडे लाल करत देवी चाबूक घेऊन उभी आहे. देवीने त्याला विचारले

२५ वर्षांपूर्वी चांदोबात प्रसिद्ध झालेली गोष्ट



"अरे तू आहेस तरी कोण ? माझ्या परवानगी शिवाय माझ्या मंदिरात येऊन झोपण्याची तू हिम्मतच कशी केलीस?"

रामनारायणने देवीला नमस्कार करून निवेदन केले, "माते, मी एक गरीब शेतकरी आहे. राजधानीकडे जाताना वाटेत थकून गेलो. अंधारही पडला होता रात्री जंगलात वाट चुकण्याच्या भयामुळे पुढे जायची माझी हिम्मत झाली नाही. ह्याच कारणामुळे मी इथे आराम करीत होतो. सकाळ होताच मी माझ्या वाटेने निघून जाईन."

"तुला क्षमा केल्याची गोष्ट जर लोकांना समजली तर सर्व लोक ह्या देवळाची धर्मशाळाच करून टाकतील. मी तुला क्षमा करू शकत नाही तुला शापच द्यावा लागेल. तू शेतकरी आहेस म्हणूनच असा शाप देते की ज्या झाडाला तू पाणी घालशील ते झाड मरेल." अशी शापवाणी उच्चारून देवी अंतर्धान पावली. "वर्षभर शेती केल्याशिवाय कसे बरें जगायचं?" असा विचार करीतच तो राजधानीकडे निघाला.

त्या वर्षी वसंतोत्सव मोठ्या थाटांत साजरा झाला. देशाच्या कानाकोपऱ्यांतून आलेल्या सर्व शेत कऱ्यांनी राजाला आपापल्या अडचणी कथन केल्या. सर्वच शेतकऱ्यांना एक कठीण समस्या भेडसावत होती. ती म्हणजे एक विचित्र प्रकारचे गवत उगवून साऱ्या पिकांचा नायनाट करत होते. मुळांपासून उपटूनही ते गवत वारंवार उगवत होते.

त्याचा नाश करण शक्य नव्हते. ही गोष्ट ऐकताच रामनारायण राजाला वंदन करून म्हणाला, "महाराज, मला जर संधी दिलीत तर एक वर्षभरात मी या विचित्र गवताचा समूळ नायनाट करीन."

राजाने रामनारायणच्या बोलण्यांतली सत्यता पारखून घेतली. त्यांतील खरेपणा सिध्द झाल्यावर राजाने त्यासाठी आवश्यक ते लोक व इतर मदतीची सारी व्यवस्था केली. रामनारायणने त्या लोकांसह सगळ्या गांवोगावी भ्रमण केले आणि नवीन पिके पेरण्यापूर्वीच सगळ्या शेतांना स्वतःच्या हाताने पाणी घातले, त्यामुळे शेतांत आधी असलेल्या झुडुपांचा, गवताचा पूर्ण नायनाट झाला.

आशा प्रकारे रामनारायणच्या दोन्ही इच्छा पूर्ण झाल्या. एका वर्षाच्या आंत त्याने देशभर भ्रमंती केली, आणि जागोजागी त्याचे उत्तमरित्या सत्कार होऊन त्याला सुग्रास भोजनही मिळाले. राजानेही त्याला शंभर एकर जमीन बक्षीस दिली.

दुसऱ्या वर्षीही रामनारायण जेव्हां वसंत उत्सवात भाग घेण्यासाठी राजधानीकडे निघाला



होता तेव्हां चंडमुखी मंदिराजवळ पोचेपर्यंत अंधार पडला होता. म्हणून त्याने त्याच देवळांत विश्रांती घेतली.

मध्यरात्र होताच देवी पुन्हां प्रकट झाली. रामनारायण देवीला वंदन करून म्हणाला, "हे देवीमाते, आपण दिलेल्या शापामुळेच माझ्या सर्व इच्छा पूर्ण झाल्या. शिवाय देशाच कल्याणही झालं."

क्रोधित होऊन चण्डमुखी म्हणाली, "अरे मूर्खा, तू परत मला त्रास देण्यास आलास कां? या वर्षी तू जेथे जेथे पायी चालत जाशील, तिथे तिथे तुझ्या शरीरभर उंचीचा खड्डा तयार होईल" असा शाप देऊन देवी गुप्त झाली.

रामनारायणने ओळखले की आता तो तिथून हलूंच शकत नाही. सकाळ होईपर्यंत तो ह्याच विचार करत देवळांत बसून राहिला की, ह्या शापाचा प्रजेच्या कल्याणासाठी कसा बरे फायदा करून घेता येईल? सकाळ होताच वाटेने जाणाऱ्या एका प्रवाशामार्फत त्याने राजास निरोप पाठवला आणि एक पालखी मागवून, त्यात बसून तो निघाला.

राजाचे दर्शन घेऊन त्याला त्याने आपल्या शापाचा सारा वृतांत ऐकवला. त्या शापापासून फायदा कसा करून घेता येईल, अशी एक योजना ही राजाला सांगितली.

ती योजना अशी होती की राज्यभरांत जेथे जेथे कालवे खोदायचे होते, त्या जागेवर रांगोळीच्या खुणा केल्या जाव्यात. रामनारायण त्यावरून पायी चालेल. तो चालताच त्याच्यामागे शरीरभर उंचीचा खड्डा बनून कालवा खोदला जाईल.

ही योजना अंमलात आणली गेली. रामनारायणला कालव्यांसाठी जेथे पायी चालण्याची आवश्यकता



नव्हती, तेव्हां तो पालखीतून प्रवास करी. तो जेथे कुठे थांबे, तेथे त्याला ताटांतून सुग्रास राजस भोजन मिळत होते.

अशा प्रकारे देवीने रामनारायणला जे शाप दिले, त्यामुळे देशाचे जास्तीत जास्त कल्याण झाले. परिश्रमांशिवाय थोडक्या खर्चात, साऱ्या देशांत कालवे खोदले गेले. नवी जमीन सुपीक व शेती करण्यालायक बनली. रामनारायणलाही देशाटनाबरोबरच स्वादिष्ट जेवणाचा लाभ मिळत राहिला.

तिसऱ्या वर्षीही वसंतोत्सवात भाग घेण्यासाठी जाताना रामनारायण संध्याकाळानंतर चंड-मुखीच्या देवळांत पोंचला. परत त्याने त्याच देवळांत विश्रांती घेतली. अर्ध्या रात्री देवीने परत त्याला दर्शन दिले.

तेव्हां रामनारायण हाथ जोडून म्हणाला, "देवीमाते, आपले शाप खरोखरच अद्भुत आहेत. आपण दिलेल्या शापामुळेच मला परत एकदा देशभ्रमणाची संधी, व सुग्रास भोजन प्राप्त झाले, त्याशिवाय जनतेचे कल्याण केल्याचे पुण्यही प्राप्त झाले. आपण शाप देण्याचे थांबवलेत, तर दररोज आपली साग्रसंगीत पूजा करण्याची मी व्यवस्था करीन."

ह्यावर जास्तच रागावून देवीने परत शाप दिला, "अरे मूर्खा, तू आतापर्यंत दोन वेळा माझे आदेश धुडकावून शापांचा अपमान केला आहेस. ह्या वेळेला तुझे देशभ्रमण आणि परोपकार कसे फळतात ते मी पाहाते. तुझ्या नजरेसमोर जी कांही गोष्ट येईल, त्याची लगेच राख होईल. आयुष्यभर आपल्या डोळ्यांवर पट्टी बांधून आंधळ्याप्रमाणे आपले दिवस कसेबसे तू रेटशील."

ह्यावर रामनारायणने ताबडतोब आपल्या पगडीची पट्टी डोळ्यांवर बांधली. रात्रभर तो विचारांत गढला. सकाळ होताच तो चांचपडत देवळाबाहेर आला आणि त्याने पट्टी काढून आपली नजर देवळावर टाकली. मग काय, दुसऱ्याच क्षणी देऊळ जळून राख झाले. त्याबरोबरच रामनारायणचीही शापांतून मुक्ती झाली.

त्यानंतर रामनारायणने त्या जागी एक धर्मशाळा बांधली, येणाऱ्या जाणाऱ्या प्रवाशांना ती एक वरदान ठरली.










वाचकांसाठी कथास्पर्धा (ऍप्रिल '०५)

# सर्वोत्तम कथा



## प्रामाणिक माणूस

जमीनदाराने जेव्हां वीरला कोषागारासाठी पहारा करावयास सांगितले, तेव्हां जमीनदार नंतर आपल्या स्वतःच्या घरांत जाऊन झोंपला.

वीरने या संधीचा फायदा घ्यायचे ठरवले, व तो पहारा न देता त्याच जागी झोपला. त्याने रात्रभर कांहीच काम केले नाही व म्हणून तो थकला नव्हता.

सकाळी जेव्हां जमीनदाराने वीरला बागकाम करायला सांगितले, तेव्हां तो ते काम सहज करूं शकला, कारण तो दमलेला नव्हता.

जमीनदार हे सर्व नीट पाहात होता.

जमीनदाराने वसंतलाही कोषागारावर पहारा करायला सांगितले, व आदल्या रात्रीप्रमाणे जमीनदार त्याच्या घरी जाऊन झोंपला.

पण या संधीचा फायदा न घेता वसंत मात्र प्रामाणिकपणे पाहारा देत रात्रभर जागा राहिला. सकाळी जमीनदाराने त्याला बागकाम करायला सांगितले. परंतु तो रात्रभर जागा राहिला होता, म्हणून खूप थकला होता. साहजिकच त्या बागेत त्याला गाढ झोप लागली व तो बागकाम करूं शकला नाही.

जमीनदाराने त्या दोघांची अशी परीक्षा घेतली व त्या परीक्षेंत वसंत पास झाला म्हणून जमीनदाराने वसंतला कामावर ठेवले.

प्रवीण नामदेव थोरात,
२५/१९४३, जुनी एम्.एच्.बी. कॉलनी, गोराई रोड,
बोरिवली (पश्चिम), मुंबई - ४०० ०९१.





# कोणाला विचारावे?

सूरज आणि चांद बालपणापासूनचे मित्र होते. दोघेही धर्मपुरीच्या 'ज्ञानानंद' विद्यालयातून शिकले. मोठा होऊन सूरज शिक्षक झाला, तर चांद त्याच शहरांतील एका व्यापाराकडे उच्चपदावर काम करू लागला.

दोघेही घनिष्ट मित्र होते, परंतु एका विषयावर मात्र त्यांची मते संपूर्णतः वेगळी होती. कोणत्याही विषयाबाबत चारचौघांशी चर्चा करूनच सूरज कांही निर्णयाप्रत येत असे. जेव्हां इतरांनाही त्याचे म्हणणे स्वीकारार्ह वाटे, अथवा ते त्याचा विचार मानत असत, त्याच वेळी सूरजला समाधान मिळत असे.

परंतु चांद मात्र कोणत्याही विषयावर स्वतःच गंभीरपणे विचार करूनच कोणताही निर्णय घेत असे. त्याचा निर्णय जरी चुकीचा असला, तरी एकदा घेतलेल्या निर्णयाला धरून तो वागत असे. ना तो कधी इतरांबरोबर विचारविनिमय करी, अथवा ना कोणाच्या टीकेला भीक घाली! त्याचा अगदी ठाम विश्वास होता, कीं दुसऱ्यांशी चर्चा करून मामला जास्तच क्लिष्ट होतो व विनाकारण नसत्या शंका उपस्थित होतात.

दोघेही मित्र आठवड्यांतून कमीत कमी एकदा तरी भेटतच असत. दर शनिवारी संध्याकाळी ते श्रीकृष्णाच्या देवळांत जात असत. मंदिराच्या पायऱ्या उतरता उतरता त्या आठवड्यातील विशेष घडामोडींवर ते चर्चा करीत असत.

असेच एकदा ते देवदर्शनासाठी पायऱ्या चढत वर चालले होते, तेव्हां वरून येणाऱ्या एका माणसाने त्यांना सांगितले, "मंदिराचे दरवाजे बंद आहेत. पुजारी नाही आहे," असे म्हणून तो खाली निघून गेला.

"इतक्या दूरवर आपलं येणं व्यर्थच गेलं" सूरजने म्हटले.

"इतक्या छोट्याशा गोष्टीने एवढा त्रासतोस कशाला?" चांदने म्हटले.

"आणखी कोणाला तरी विचारूं," असे म्हणत सूरजने खाली उतरणाऱ्या दुसऱ्या एका माणसाला

मंजू भारती

थांबवले आणि विचारले, "मंदिराचे दरवाजे उघडे आहेत कां?"

"मला माहीत नाही," असं म्हणून तो माणूस पुढे गेला. चांद पुढे चालता चालता म्हणाला, "जर इतक्या दूर आलोच आहोत, तर स्वतःच जाऊन पाहू या. उगाच येणाऱ्या जाणाऱ्याला विचारण्यांत तरी काय फायदा?"

वर जाऊन पाहिलं तर मंदिराचे दरवाजे उघडेच होते. देवदर्शन घेऊन दोघे परत निघाले. चांदने म्हटले "बघ सूरज, मंदिराची दारं तर उघडीच होती. उगीच डोळे मिटून कोणाच्या तरी सांगण्यावर विश्वास ठेवू नये. आपल्या बुद्धीचा वापर करावा. इतकंच नव्हे तर कुणाला काय विचारावे अथवा विचारू नये, याबाबत पूर्ण जागरुकता बाळगली पाहिजे. नाहीतर आपल्या पदरी निराशा येते, किंवा आपल्याला अपमान सोसावा लागतो."

एवढ्यांत मंदिराच्या पायऱ्यांवर बसलेल्या एका भिकाऱ्याने म्हटले 'साहेब, कांही दान द्या." सूरजने त्याच्या थाळीत एक चार आण्याचे नाणे टाकले. हे पाहून भिकारी बोलला, 'साहेब, पहिल्यांदा तर रुपया देत होतात. आता मात्र फक्त चार आणे का?"

"खरं आहे तुझं. त्या वेळी मी अविवाहित होतो, एकटाच होतो, खर्चही कमी होता. म्हणून एक रुपया देऊं शकत होतो. लग्नानंतर घरगुती जबाबदाऱ्या वाढल्या, मग आठ आणे देऊ लागलो. आता तर मुलं शिकत आहेत. उद्या ती मोठी होतील, त्यांची लग्ने करावी लागतील. म्हणूनच आताशा मी चार आणेच देतो. काय बरोबर आहे ना माझा निर्णय?" सूरजने भिकाऱ्याला विचारले.

"म्हणजे तुम्ही असं म्हटतां की जी रक्कम मला मिळायला हवी, ती वाचवून तुम्ही तुमच्या मुला-बाळांची लग्ने करणार, असंच ना?" भिकाऱ्याने विचारले.

हे ऐकून सूरज मिनिटभर आश्चर्याने थक्क झाला.

"बघ सूरज, एखाद्या गोष्टीबद्दल अभिप्राय जाणून घ्यायचा असेल तर तो योग्य, जाणकार व्यक्तीलाच विचारला पाहिजे. नाहीतर असे टीकायुक्त शेरे ऐकून घ्यावे लागतात." चांदने हंसतच म्हटले.

चांदच्या अशा दृष्टिकोनामुळे सूरज खूपच प्रभावित झाला आणि तेव्हांपासून त्याने चांदचा सल्ला मानायला सुरवात केली.







# गोंडेदार टोपीवाला मांत्रिक

वनमाळी हा एक वैद्य होता. प्रताप नांवाचा एक तरुण त्याच्याकडे काम करत असे. औषधे घोटणे, झाडापाल्याचा अर्क काढणे, इत्यादि कामांत तो दिवसभर व्यग्र असे.

त्याच गांवात मांत्रिक नांवाचा एक वृद्ध रहात होता. गांवदेवीची उपासना करून त्याने कांही अद्भुत शक्ती मिळवल्या होत्या. वनमाळीच्या आवाक्याबाहेरच्या आजारांवरही उपचार व उपाय करण्यांत तो तरबेज होता. अर्थात याचा अर्थ असा नव्हे की दोघांमध्ये कांही स्पर्धा होती. दोघेही आपापल्या परीने लोकांची सेवा करीत.

या मांत्रिकाकडे काम करण्याची प्रतापची प्रबळ इच्छा होती. वेगवेगळे मंत्रतंत्र आत्मसात करण्याची त्याची तीव्र इच्छा होती. मांत्रिकाकडे जाऊन त्याने आपली इच्छा प्रकट केली, तेव्हां त्याने प्रतापला सांगितले "हे पहा, माझे मंत्रतंत्र वैद्यकशास्त्रावर आधारीत आहेत. तेव्हां तुझी वैद्यकी शिकून झाल्यावरच मी तुला मंत्रतंत्र शिकवेन."

नंतर एकदा मांत्रिक आजारी पडला, तेव्हां तो वनमाळीकडे भेटावयास गेला. त्याच्या आजाराचे निदान करून वनमाळीने त्याला म्हटले, "आता तुम्ही खूप म्हातारे झाला आहात. आता जास्तीत जास्त विश्रांती घेतली पाहिजे. आजच्यापुरते तुम्हाला औषध देतो. उद्यां पुन्हां तपासून मग औषध देईन."

"घरांतून बाहेर पडणं सुद्धा मला त्रासाचं होतं. उद्यांचं औषध कुणाच्या तरी हातीं घरी पाठवशील कां?" मांत्रिकाने विचारले. वनमाळीने दुसऱ्या दिवशी प्रतापच्या हाती औषध पाठवले. त्याला समोर बघताच मांत्रिकाने म्हटले, "काल रात्री ग्रामदेवता प्रत्यक्ष माझ्या स्वप्नांत आली. तिने स्पष्ट सांगितले की आता माझ्या मृत्यूची वेळ जवळ आली आहे आणि कोणत्याच औषधाचा आता कांही उपयोग होणार नाही. माझी मंत्रविद्या माझ्याबरोबरच विनाश पावली, तर मला शांती मिळणार नाही."

कमलकांत



प्रतापने लगेच म्हटले, 'मी थोडीफार वैदकी शिकलो आहे. मला मंत्र शिकवाल तर तुमच्या आत्म्याला शांती मिळेल.'' प्रतापच्या स्वरांत आशेचे भाव होते.

मांत्रिकाने त्याच्याकडे एकवार बारकाईने बघितले आणि मग बाजूच्या टेबलावरील एक सुंदर झालरवाली गोंडेदार टोपी त्याला देत म्हटले, ''ही टोपी आपल्या डोक्यावर घाल. मृत्यूनंतर थोड्याच वेळात मी ह्या टोपीवर स्वार होईन. ही टोपी तू ज्याच्या डोक्यावर ठेवशील, त्याला त्या दिवशी काय काय लाभ होईल, हे मी तुझ्या कानांत सांगीन. मात्र तुला ह्या टोपीचा उपयोग दिवसांतून एकदाच करता येईल.''

प्रताप आनंदाने मोहरून गेला. त्याने डोक्यावर टोपी घातली आणि वनमाळीस भेटून सांगितले की मांत्रिकाचा मृत्युसमय जवळ आला आहे. टोपीचे रहस्य मात्र त्याने लपवून ठेवले.

त्याच रात्री मांत्रिक मरण पावला. गांवातील लोकांनी मिळून त्याचा अंत्यसंस्कार केला. त्यानंतर प्रतापच्या डोक्यावरील टोपीत कांही हालचाल झाली, त्याच्या कानांत आवाज आला ''आता मी तुझ्या टोपीवर स्वार झालो आहे. आता तू त्याचा उपयोग करू शकतोस.''

प्रतापने वनमाळीकडचे काम सोडून दिले, आणि तो दुसऱ्या गांवी गेला. तेथे एका रस्त्यावरून चालत असताना त्याच्या कानी आवाज आला. ''समोरुन निळ्या रंगाचा अंगरखा घातलेला जो पुरुष येत आहे त्याचे नांव नक्षत्र आहे. त्याला त्याचे भविष्य ऐकव.''

इतक्यांत निळ्या कपड्यांतला तो माणूस प्रतापच्या जवळ आला. प्रतापने त्याला म्हटले, ''माझी टोपी मला असं सांगते की तुझं नांव नक्षत्र आहे. एक अनपेक्षित असा लाभ तुला होणार आहे. त्याच्या बदल्यात तुला मला दोनशे मोहोरा द्याव्या लागतील.''

प्रतापने त्याचे नांव बरोबर सांगितले, म्हणून नक्षत्रने प्रतापच्या बोलण्यावर विश्वास ठेवला आणि त्याची अटही मान्य केली. प्रतापने जशी त्याच्या डोक्यावर टोपी ठेवली, तसा प्रतापच्या कानांत आवाज आला ''भूषण नांवाच्या एका व्यक्तीने ह्याच्याकडून दोन हजार मोहोरा कर्ज घेतल्या होत्या. त्या कर्जाच्या वसुलीची कांही आशा नव्हती. तेच कर्ज आज वसूल होईल.''

प्रतापने नक्षत्रला ही गोष्ट सांगितली, आपली टोपी परत घेतली. दोघेही भूषणच्या घरी गेले. दारांतच भूषणने नक्षत्रचे स्वागत केले व प्रेमाने म्हटले, ''या, या, मी तुमच्याच घरी यायला निघालो



होतो. ही तुमची रक्कम घ्या, शिवाय ह्या जास्तीच्या दोनशे मोहोरा'' असं म्हणतच त्याने सर्व रक्कम नक्षत्रच्या हातांत सुपूर्द केली.

नक्षत्रने प्रतापच्या अटीनुसार त्याला त्याची रक्कम दिली आणि एक सुग्रास मेजवानी दिली. आगीसारखी ही बातमी गांवभर पसरली आणि खूप लोक प्रतापकडे येऊं लागले. प्रताप दिवसांतून, एकदाच ती गोंडेदार झालरीची टोपी घालत असे. त्याच्या भविष्यवाणीमुळे कांही लोकांना भरपूर संपत्ती मिळाली, तर कुणाला धनाचे साठे मिळाले. पुष्कळशा लोकांना व्यापारांत फायदा होऊन त्यांचा व्यापार वाढला.

थोड्याच दिवसात प्रताप श्रीमंत झाला. असेच एक वर्ष सरले. एक दिवस त्याच्या कानांत आवाज ऐकू आला, ''माझ्यामुळे किती लोकांचे कल्याण झाले. आता माझ्या आत्म्याला शांती मिळाली. आता मी ह्या गोंडेवाल्या झालरीच्या टोपीस सोडून जातो आहे.''

दुसऱ्या दिवसापासून त्या टोपीतून आवाज येणं थांबलं. लोकांना तो स्पष्टपणे हे सांगून परत पाठवू लागला, की आता त्यांचं भविष्य फळणार नाही.

परंतु त्याच्या ह्या विद्येचा लाभ उठवण्याच्या हेतूने कांही स्वार्थी लोकांनी त्याच्याविषयी अपप्रचार सुरुं केला. ते म्हणूं लागले की प्रतापकडे अजूनही ती मंत्रशक्ती तशीच आहे, पण लोकांबद्दलच्या असूयेमुळे तो हे काम करीत नाही.

शेवटी ही अफवा राजापर्यंत पोचली. महाराजांनी प्रतापला बोलावले व सत्य काय ते सांगण्यास सांगितले. प्रतापने मांत्रिकाविषयी बोलण्याचे लपवून सांगितले, ''महाराज मला ही



गोंडेदार झालरीची टोपी मिळाली होती. तिच्या महात्म्यावर व शक्तीवर मी बराच काळपर्यंत ज्योतिष सांगत होतो. पण आता तिचे महात्म्य अन् शक्ती नष्ट झाली आहे.''

त्याच्या बोलण्यावर राजाचा विश्वास बसला नाही. त्याने रागीट स्वरात म्हटले, ''तू हे कां सांगत नाहीस कीं... की टोपीला ही शक्ति कशी प्राप्त झाली, आणि ती अचानक गायब तरी कशी झाली? तू जाणून बुजून कांहीतरी गुपित लपवतो आहेस.'' नंतर राजाने सर्व मंत्र्याना दरबारांतून घरी पाठवून दिले व प्रतापच्या कानांत हळूं आवाजात सांगितले की ''मी सम्राटांची एकुलती एक मुलगी विद्युल्लता हिच्याशी लग्न करण्याचा निश्चय केला आहे. परंतु माझ्या मंत्र्यांचं म्हणणं असं आहे की दूताद्वारे हा संदेश सम्राटाकडे पाठवला तर गोष्ट बिघडेल. कदाचित मोठ्या संकटाशीही सामना करावा

लागेल, कारण शेवटी ते एक महान सम्राट आहेत. मी आत्ताच एक अगदी नवा निर्णय घेतला आहे की सम्राटावर चढाई करून विजयी होऊनच विद्युल्लताचा हात आपल्या हाती घ्यावा. पण ह्यासाठी माझी तलवार तेवढी शक्तीशाली आहे कां?''

राजाचे बोलणे ऐकून प्रतापच्या शरीरांत एक थरथर निर्माण झाली. कांपऱ्या हाताने त्याने राजाच्या डोक्यावर टोपी ठेवली. पुढच्याच क्षणी राजाचा हात थरथर कापूं लागला, व हातांतील तलवार खाली पडली. राजा सिंहासनावरून पडता पडता ओरडला ''अरे ए मांत्रिका, हे तू काय केलंस?''

इकडे प्रतापही भीतीने थरथर कांपत असतानाच त्याच्या कानात आवाज आला ''घाबरू नकोस. मला माहीत आहे की असमर्थ माणसांच्या हातांत शक्ती दिली, तर असेच अनर्थ घडतात, म्हणून अजूनही मी तुझ्या टोपीवर स्वार आहे. घमेंडी आणि अहंकारी राजाने टोपीला आज्ञा देण्याचा प्रयत्न केला. परंतु त्याला हे ठाऊक नाही की जे घडणार आहे, तेच टोपी सांगते. आपल्या अशा कर्तुतीमुळेच तो शापग्रस्त झाला आहे. त्याला विचार की अजूनही तो सम्राटाच्या कन्येशी विवाह करण्याचे इमले रचीत स्वप्नें पाहणार आहे कां? त्याचा जो हात निकामी झाला आहे, त्याला तो शक्ती देऊं इच्छितो आहे कां? जर त्याची इच्छा असेल तर टोपीच्या शक्तीमुळे परत त्याचा हात पूर्ववत होईल.'' मांत्रिकाने म्हटले.

मांत्रिकाने सांगितलेल्या सर्व गोष्टी प्रतापने राजाला सांगितल्या. तेव्हां राजाने म्हटले, ''ना मला विद्युल्लता पाहिजे, ना चंपकलता, मला माझा तलवार घट्ट पकडणारा हात पाहिजे.''

बघता बघता राजाच्या हातांत शक्ती आली. खाली पडलेल्या तलवारीस आपल्या हातांत उचलत त्याने प्रतापला म्हटले, 'ए गोंडेदार टोपीवाल्या मांत्रिका, तुझ्यामुळे मी आज एक चांगला धडा शिकलो. योग्य, अयोग्य काय ह्याचा नीट विचार मी करत नव्हतो. सतत सर्व गोष्टीचा लोभ धरत होतो. गुणहीन व्यक्तीच दिवास्वप्नें बघण्याचे वेडे साहस करतात. आज मला माझी चूक तुझ्यामुळे समजली.'' असे म्हणून त्याने प्रतापला भेटवस्तू देऊन त्याचा योग्य सत्कार केला.







# भयंकर घाटी

## 3

*(केशवच्या गुरांमधे जो विचित्र प्राणी येऊन मिसळला होता, त्याने ब्रम्हापुरचे सेनापती व त्याचा सैनिक यांना ठार मारलं. दुसरा एक सैनिक वांचला, तो नगरांत पळून गेला. नगरांत अफवांना उत आला. त्या अफवा ऐकून केशवचा पिता अरण्यांत आला आणि त्याने मुलाला नगरांतली सविस्तर बातमी सांगितली.)*

पित्याचे बोलणे ऐकून केशव चकित झाला. जवळपास चरत असलेल्या गुरांकडे आश्चर्याने पाहात तो म्हणाला, ''आता सारं कांही माझ्या लक्षांत आलंय. ज्या प्राण्याबद्दल मी काल रात्रीं तुम्हाला सांगितलं, तोच हा प्राणी आहे. काल संध्याकाळी तो आपल्या गाईगुरांबरोबर घरी आला होता. पण रात्रीं अरण्यांत परत केव्हां गेला ते कांही कळलं नाही. आज सकाळी तो कांही आपल्या गोठ्यांत नव्हता. पण तो मात्र आपल्या सर्व जनावरांशी खेळीमेळीने वागतो. आज सकाळी सेनापती व त्याचे सैनिक त्याला पकडून राजाकडे नेऊं लागले. असला विचित्र प्राणी राजाकडे न्यायचा, आणि राजाकडून इनाम मिळवायचा त्यांचा विचार असावा.

''एका सैनिकाने ह्या प्राण्याला पकडून त्याच्या गळ्यांत फांस अडकवला आणि आपल्या घोड्याला पाठीमागून त्या फांसाची दोरी अडकवली होती. बहुतेक वाटेतच जाताजाता त्याने सैनिक व सेनापती या दोघांना मारून टाकलं असावं. पण तसं पाहिलं तर तो इतका साधा दिसतो, कीं हा



कुणाला ठार मारील असं कांही वाटत नाही. पण त्याच्या शिंगाला लागलेले रक्त व डाग पाहिले कीं त्यावर विश्वास ठेवावाच लागतो. पहा, जरा त्याच्या शिंगाकडे पाहा, किती रक्त सांठलंय शिंगावर!''

इतका वेळ म्हाताऱ्याशी मुलगा जेव्हां बोलत होता तेव्हां तो प्राणी दिसला नव्हता. आता मात्र तो त्यांना दिसला. म्हातारा चकित झाला. केशवने त्या प्राण्याला हाताने पकडलं आणि त्याला पित्याजवळ आणलं. त्याच्या शिंगाकडे बोट दाखवून तो म्हणाला, ''बघा, तोंडालादेखील रक्त लागलंय. इकडे पहा, हे सगळे रक्ताचेच डाग आहेत.''

''म्हणजे नगरांत ज्या बातम्या फैलावल्या होत्या, त्यांत चुकीचं कांही नाही. सेनापती व त्याच्या सैनिकाला ह्यानेच मारलेलं आहे. सैनिक इकडे येत आहेत. कुणीतरी बातमी पसरवली कीं तू शत्रुदेशाचा गुप्तहेर आहेस आणि वेषांतर करुन इथे राहातो आहेस. या सैनिकांमुळे आता तुझ्यावर मात्र नवीनच संकट कोसळणार आहे.'' पित्याने इकडेतिकडे नजर टाकीत म्हटले.

''त्यांत माझा कांहीच दोष नाही, सेनापतीने स्वतःवर संकट ओढवून घेतलं होतं. या निर्दोष विचित्र जनावराच्या गळ्यांत फांस अडकवला आणि त्याला तो घेऊन गेला. म्हणूनच ह्याने त्यांना मारलं आणि तो इथे परत आलाय. त्याच्या शिंगावरचं रक्त मला दिसलं, तेव्हांच मला कळलं कीं हा कांहीतरी मारामारी करुन आलेला आहे.'' केशव म्हणाला.

''असूं दे, कुणाचीही चूक असली तरी सैनिक इकडे आले, की ते आपल्याला सोडणार नाहीत. तू नीघ इथून, कुठेतरी पळून जा. जेव्हां तुझा आजा वारला, तेव्हांपासून ही तलवार भिंतीवर लटकत राहिलीय; ही तलवार आणि तुझे धनुष्यबाण, हे तुझ्या संरक्षणासाठी तुला उपयोगी पडतील. राजाच्या सैनिकांच्या हातांत तू सांपडण्यापेक्षां तू लढतालढता जरी प्राण गमावलेस तर ते जास्त चांगलं ठरेल!''

केशवने वडिलांच्या हातातली तलवार घेतली व विचारले, ''पण तेव्हां तुम्ही काय कराल?''

''मी?.... मी माझा जीव वांचवीन. त्यांतून मी आहे म्हातारा. हजार वर्षें कांही मी जगणार नाही. पण मी राजाच्या सैनिकांच्या नजरेस कांही पडणार नाही. मी या गाईगुरांना अरण्यांत हांकलत नेईन. शिपायांच्या दृष्टीला ही जनावरेदेखील पडता कामा नयेत. त्यांचं ते काय करतील ते आपल्याला



काय माहीत?'' म्हातारा म्हणाला.

दोघेही बोलत असताना अरण्यांत दुरुन घोड्यांच्या टापांचा आवाज आला.

म्हाताऱ्याने मुलाकडे बघितले. केशव लगेच त्या विचित्र प्राण्याकडे गेला. त्याच्या मानेखालचा भाग पकडून केशव म्हणाला, ''जर या सैनिकांपासून माझा बचाव करायचा असेल, तर मला याच्यावर स्वार झालं पाहिजे. हा माझ्यासमोर इतका सरळपणे कसा असतो, ते कांही कळत नाही.'' आणि तो त्या प्राण्यावर चढून बसला.

त्या प्राण्याने क्षणभर आपले डोळे मिटले. केशवने ''हं, चल पळ, तुला हवे त्या दिशेला पळत जा.'' केशवने घोड्याच्या मानेवरचे केस घट्ट धरले आणि त्याच्या पोटावर पायाने दाबून खूण केली. तो प्राणी वाऱ्याच्या वेगाने पर्वताच्या दिशेला पळायला लागला.

त्या विचित्र प्राण्याची ही तुफानी दौड पाहून केशव घाबरला. त्याची मांड थोडीशी जरी ढिली पडली, तरी तो खाली पडला असता. तो प्राणी एखाद्या पक्ष्याप्रमाणे ह्या खडकावरुन त्या खडकावर पाय रोवीत पर्वताच्या शिखराकडे भरभर जाऊं लागला.

तो पर्वतांचा प्रदेश फार भयंकर होता. तिथे मोठे वृक्ष, झाडी, व गुहा होत्या. तिथे डरकाळी फोडणार चित्ते होते, अस्वले होती, सांप होते. तिथल्या भागांत पावलोपावली मृत्यूचा सांपळा होता. तो भाग पाहून, ''आपण कांही इथून जिवंत परत जाणार नाही, या क्रूर श्वापदांकडून मारले जाण्याऐवजी ब्रम्हापुरच्या सैनिकांनी पकडून नेलं असतं तर फार तर तुरुंगात डांबलं असतं.



ह्या विचित्र प्राण्याने मला फसवलंय.'' असं केशवला प्रथम वाटलं. पण नंतर त्याला शंका आली कीं त्याचे वडील म्हणाले, त्याप्रमाणे हा कुणी मायावी राक्षस असेल. कांहीही असलं तरी आता त्याचा कांही उपयोग नव्हता. हा प्राणी नेईल तिकडे जाणे भाग होते. जरी केशवने तलवारीने त्या प्राण्याला ठार मारले असते, तरी त्याला इतर क्रूर जनावरांच्याबरोबर राहावे लागले असते. तिथून जिवंत बाहेर निघणे अशक्यच होते. त्याला कांहीच सुचेना.

केशव पुरता गोंधळून गेला होता. तितक्यांत त्या विचित्र प्राण्याने एका उंच दगडावरुन एका खड्ड्यांत उडी घेतली आणि समोरच्या गुहेजवळ झटकन जाऊन तो खिंकाळत उभा राहिला.

त्यानंतर त्या अंधाऱ्या गुहेत कुठेतरी उजेडाची तिरीप आली. आणि पाठोपाठ मशालीचा प्रकाश



दिसूं लागला. काळा धूरही दिसला व आवाज ऐकूं आला, ''हां ओम्, आता ठीक आहे!''

केशव स्तब्धपणे उभा होता. त्याने लागलीच आपली तलवार उपसली आणि त्या विचित्र प्राण्याच्या पाठीवरुन खाली उडी घेतली.

गुहेंत पूर्वीसारखा अंधार झाला. मशाल, उजेड, धूर कांही दिसेना. तो आवाजही बंद झाला. सर्वत्र नीरव शांतता होती. क्षणांत झालेला हा बदल पाहून केशव थक्क झाला.

गुहेंत कुणीतरी होतं हे नक्की! ''तो कदाचित राक्षस असेल, मांत्रिक असेल किंवा कदाचित एखादा नरमांसभक्षकदेखील असूं शकेल.'' तो मनांत म्हणत होता.

त्याने क्षणभर विचार केला. जो कुणी गुहेत आहे, त्याला केशव अंधारांत नाही तरी जेव्हां उजेड होता तेव्हां नक्कीच दिसला असेल. केशवला पकडण्यासाठी त्याची कांहीतरी चाल असेलच. तिथून जितक्या लवकर निसटता येईल, तितके बरेच होईल असे केशवच्या मनांत आले.

त्याने त्या प्राण्याकडे बघितले. पण तो जरा अंतरावर होता. एका दगडाला टेकून उभा होता आणि आपले शिंग दुसऱ्या दगडावर घासत होता. त्याच्याजवळ जाण्यासाठी केशवने उडी घेतली. पण तितक्यांत तो दुसऱ्या मोठ्या खडकावर जाऊन उभा राहिला.

केशव फारच निराश झाला. जेव्हां त्याच्या जिवांत जीव आला होता, तेवढ्यांत तो प्राणीच दूर गेला. तिथून पायी चालत जाणे बरोबर नव्हते. त्या खडकांच्या मागून कुणीही श्वापद त्याच्यावर चाल करूं शकले असते व त्याचा फडशा पाडला असता.

आता काय करावे? केशवने धीर एकवटला. ज्या हातांत तलवार होती, त्याच हातांत त्याने थोडेसे बाणही घेतले. दुसऱ्या हातांत धनुष्य घेऊन तो मोठ्या हुशारीने एकएक पाऊल टाकीत गुहेच्या समोरुन मागे जात राहिला.

एकाएकी गुहेत प्रकाश उजळला. त्या उजेडांत केशवला एक कुरुपी इसम दिसला. त्याला टोंकदार दाढी होती. काळे तोंड, व डोक्यावर शिरस्त्राण होते. त्याला पाहूनच केशव निश्चल होऊन उभा राहिला.

''वत्सा, घाबरुं नकोस, अगदी घाबरुं नकोस, मी तुला अभय दिले आहे. तुला आणि तुझ्या पित्यालादेखील या दुष्टांपासून वांचवण्याची जबाबदारी माझ्यावर आहे.'' असे म्हणत तो कुरुपी गुहेच्याबाहेर आला.

त्याचे बोलणे ऐकून केशव थरारला, ''हा कुणी



का असेना, माझ्याबद्दल त्याला सारं कांही ठाऊक आहे.'' आता तिथून पळून जाणं व्यर्थ होतं, भल्यापेक्षां वाईट घडेल कीं काय, अशी मनांत शंका होती. ''हा कुरुपी, जो इतका प्रेमळपणे बोलतो आहे, तो काय उगीचच माझे व माझ्या वडिलांचे रक्षण करील?''

''वत्सा! माझ्या शक्तीबद्दल तुला शंका येतेय ना? इकडे ये, गुहेंत चल.'' असं म्हणून तो मागे फिरला. पुन्हां थांबून, केशवला निरखून बघत त्याने विचारले, ''माझ्याबरोबर गुहेंत यायची तुला भीती वाटतेय कां?''

केशवला ह्या प्रश्नाचा राग आला. ह्याला मी काय घाबरट वाटलो कीं काय? केशव जरा चिडलाच.

''तुझ्याबरोबर गुहेतच नव्हे, तर म्हणशील तिथे मी यायला तयार आहे. मी अरण्यांत जन्मलो आणि तिथेंच वाढलो आहे. भीती कशाला म्हणतात ते मला माहीत नाही. पण एक शंका माझे मन कुरतडते आहे, ती ही कीं माझे वडील आणि मी, यांची माहिती तुला कशी कळली?''

''ये, गुहेंत ये. मी तुझ्या शंकेचे समाधान करतो. जर तू गुहेंतल्या कालभैरवाच्या डोळ्यांमधे पाहिलंस, तर या जगांत जे कांही चाललंय, जे जे होते आहे, ते सगळं तुला समजेल.'' त्या कुरुपीने केशवच्या डोळ्यांत बघत म्हटले.

केशव त्याच्याबरोबर गुहेंत शिरला. गुहेत संपूर्णपणे अंधार होता. त्या अंधारात दहा पावले चालल्यानंतर त्याला तिथे दगडांत एक मोठी खोबण दिसली. त्यांत एका दगडी कुत्र्याची आकृती दिसत होती. त्या कुत्र्याचे दोन्ही डोळे निखाऱ्यासारखे लालभडक असून चमकत होते.

''हा कालभैरव आहे. त्याच्या भक्तांसाठी



वटवृक्ष, आणि शत्रूंसाठी काटेरी झाड; जय काल-भैरव!'' असं म्हणताना कुरुपीने कसलीतरी मुळी त्या मूर्तीच्या डोळ्यांना लावली आणि झटकन मागे पाऊल ठेवत तो केशवला म्हणाला, ''केशव, आता तू कालभैरवच्या डोळ्यांत बघ. तिकडे बघ, तुझा पिता, ती तुझी गुरे. ते तलवारी घेतलेले सैनिक पाहा तरी! वा वा!'' आणि तो जोराने हंसू लागला.

केशवने कालभैरवच्या डोळ्यांत पाहिले. त्याचा म्हातारा पिता झाडीत लपून बसलेला होता. त्यांची गुरे अरण्यांत इकडेतिकडे पळत होती. घोड्यावर स्वार होऊन सैनिक त्यांचा पाठलाग करीत होते.

ते दृश्य पाहून केशवला फारच वाईट वाटले. त्याचा पिता घाबरुन झाडांच्यामागे लपला होता. राजाच्या सैनिकांना केशवच्या गायी पकडून न्यायच्या होत्या. गुरे नसली तर त्याच्या पित्याला अरण्यांत झाडपाला खाऊन पोट भरावे लागले असते. ''नेमकी याच वेळी मला इथे या डोंगरांत यायची बुद्धी कां झाली?'' हा विचार मनांत येऊन केशव फारच कष्टी झाला. पित्याला एकटा सोडून इकडे आल्याबद्दल तो स्वतःला दोष देऊं लागला.

केशवच्या मनांतले विचार कुरुपीला कळले. तो हंसून म्हणाला, ''वाईट वाटून घेऊं नकोस. तुझ्या पित्याचे, तुझ्या गुराढोरांचे रक्षण मी करीन.'' तो गुहेच्याबाहेर आला.

''शिष्या, शिष्या, कुठे आहेस तू? त्या सैनिकांना तू जाऊन पळवून लाव, आणि गाईचे रक्षण कर.'' तो जोराने ओरडला.

कालभैरवाच्या डोळ्यांत बघत असलेल्या केशवला एक विचित्र दृश्य दिसले. एक विचित्र काळी आकृति; तिचे तोंड माणसासारखे आणि पंख वटवाघळासारखे होते. त्या सैनिकांच्या डोक्याजवळून ही आकृति गिरक्या घेत उडायला लागली. हा भयंकर पक्षी बघून सैनिकांची गाळण उडाली. ते ओरडत, किंचाळत अरण्यांत घाबरुन सैरावैरा पळायला लागले.

ते पाहून केशवच्या जीवांत जीव आला. आता आपल्या वडिलांना सैनिक कांही करुं शकणार नाहीत अशी त्याला खात्री वाटली. या अद्भुत शक्ती असलेले तो विचित्र प्राणी व कुरुपी, हे दोघेही आपले शत्रू नसून मित्र व रक्षक आहेत, याची त्याला खात्री पटली. *(क्रमशः)*





वेताळ कथा

# धर्म सिंहासन

निश्चयाचा पक्का राजा विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला, त्याने शव खाली उतरवले आणि आपल्या खांद्यावर घेतले - राजाने स्मशानाची वाट धरली व तो चालूं लागला. तेव्हां प्रेतांत लपलेल्या वेताळाने विचारलं, ''राजन्; तुझे इतके कठोर परिश्रम पाहिले कीं वाटतं कीं तू एक राजा नसून एक सामान्य सेवक असावास. राजाने दक्षतेने राज्याचा कारभार चालवावा, देशाचं रक्षण करावे, प्रजेला सुखी ठेवावं; पण तू तर तुझे कर्तव्य विसरुन इथे नोकराचे काम करतो आहेस. आणि तुझ्या दृष्टीने हे अगदी अयोग्य आहे. या कठीण साहसामागे काय रहस्य आहे, हे मला माहीत नाही. कांहीतरी अद्भुत शक्तीची वस्तू मिळवण्या-साठी हे सारं तू करतो आहेस कां?

Restore



तशी वस्तू जरी मिळाली, तरीही तिचा योग्य उपयोग करण्यासाठी तीक्ष्ण दृष्टी व सारासार विवेक आवश्यक असतो. ज्या व्यक्तीमधे हे गुण नसतात, तो राजा नवनीतवर्माप्रमाणे मूर्ख ठरतो. त्याला अशी अद्भुत वस्तू मिळाली होती, तरीही त्याने ती हातातून जाऊं दिली. त्याची गोष्ट ऐकताना तुझा थकवा दूर होईल." आणि वेताळाने पुढील कहाणी सांगायला सुरवात केली.

प्रणवगिरीचा राजकुमार नवनीतवर्मा ह्याने विवेचनशर्मा नांवाच्या एका महान पंडिताकडे विद्याभ्यास केला.

शिक्षणक्रम संपल्यानंतर त्याला निरोप देताना गुरुने त्याला सांगितलं, "शिष्या, तू इथे गुरुकुलांत राहून तुझा शिक्षणक्रम नीट पूर्ण केलेला आहेस. कांही काळानंतर तू प्रणवगिरी राज्याचा राजा बनणार आहेस. राजाला कितीतरी समस्यांचे निराकरण बुद्धिचातुर्याने व कौशल्याने करावे लागते. म्हणून मी तुला एक तांब्याचे बनवलेले सिंहासन भेट म्हणून देतो, आहे. हे एक शक्तिशाली धर्मसिंहासन आहे. जर कधी एखाद्या कठीण समस्येशी सामना करावा लागला, तर त्या समस्येशी संबंधित असलेल्या व्यक्तीला या सिंहासनावर बसव. समस्येचे उत्तर सहज मिळूं शकेल. जर कधीकाळी तुला असं वाटलं कीं या सिंहासनाची जरुरी नाही, तर त्यावेळी तू ते मला परत पाठवून दे." असं म्हणून त्यांनी शिष्य नवनीतवर्माला आशिर्वाद दिला व ते तांब्याचे सिंहासनही दिले.

नवनीतवर्मा सिंहासनासह राजधानीला पोंचला. थोड्याच दिवसानंतर त्याच्या पित्याने राज्य-कारभाराची जबाबदारी त्याच्यावर सोंपवली. नवनीतशर्माने ते तांब्याचे सिंहासन आपल्या सिंहासनाशेजारी ठेवले व तो चांगल्याप्रकारे राज्य-कारभार करूं लागला.

एक दिवस सेनाधिपती धीरमल्लने वीरबाहू नांवाच्या एका दरोडेखोराला पकडून राजासमोर आणले. गेली दोन वर्षे राजधानीतल्या धनवंतांना तो लुटत होता. शिपायांना त्याला पकडता येत नव्हते. असला भयंकर दरोडेखोर पकडला गेला म्हणून राजाला फार समाधान वाटले. पण त्याला काय शिक्षा द्यावी हे राजाला ठरवता येईना. अखेरीस राजाने वीरबाहूला तांब्याच्या सिंहासनावर बसण्याची आज्ञा केली.

वीरबाहू जसा सिंहासनावर बसला, तसा आवाज उमटला, "हा महाचोर आहे. याला जन्मभर बंदीवासांत ठेवायला हवं!"



तितक्यांत गुप्तहेरांचा प्रमुख सरदार तिथे आला. त्याने राजाला विनयपूर्वक वंदन केले आणि तो म्हणाला, "महाराज, वीरबाहूने अनेक नागरिकांच्या घरी चोऱ्या केल्या आहेत हे खरंच आहे, पण या कामांत त्याने कधी कुणाची हत्या केलेली नाही. त्याशिवाय, त्याने सर्वसामान्य नागरिकांना कधीही लुटले नाही. फक्त ज्यांची कमाई अयोग्य व अन्यायी होती, अशाच लोकांकडे त्याची दृष्टी होती. त्याने लुटलेली सारी धनराशी त्याने गोरगरीबांमधे वाटली. व त्यांची अडचण कमी करण्याचा प्रयत्न केला." आपल्या युक्तिवादाच्या समर्थनासाठी त्याने एक पत्रही राजाला दिले.

पत्र वाचल्यानंतर राजा पुन्हां विचारांत पडला. थोड्या वेळानंतर राजाने सभेंत जाहीर केलं, "वीर-बाहूला मी राज्याच्या भ्रष्टाचार विरोध विभागाचा प्रमुख अधिकारी म्हणून नेमतो आहे."

राजाचा निर्णय ऐकून सारे उपस्थित प्रजाजन सुन्न झाले. वीरबाहुने लवून राजाला वंदन केले व म्हटले, "महाराज, माझी इमानदारी आपण ओळखलीत आणि माझ्यावर आज ही जबाबदारी सोंपवलीत, त्याबद्दल मी आपल्याशी सदैव कृतज्ञ राहीन."

या घटनेनंतर कांही दिवसानंतर, महाराजाच्या वाढदिवसानिमित्त अनेक मनोरंजक कार्यक्रम झाले आणि त्यांत युद्धविद्येच्या स्पर्धाही होत्या. मल्लयुद्ध व खड्गयुद्ध यांच्या स्पर्धा झाल्या. त्यांचे विजयी वीर घोषित केले गेले, पण धनुर्विद्येचा विजेता कोण आहे याचा निर्णय झाला. नाही कारण या स्पर्धेत दोघे तरुण बक्षीसास पात्र ठरले. पण नियमाप्रमाणे त्यांच्यापैकी एकालाच पारितोषिक देता आले असते.

त्याच्यासाठी पुन्हां त्यांची परीक्षा घेतली. शंभर





गज अंतरावरच्या एका झाडाच्या फांदीला एक बाहुली अडकवली गेली. त्या दोघा स्पर्धकांना त्या बाहुलीच्या निशाणावर बाण सोडायला सांगण्यात आले.

दोघांनीही अचूक नेम धरला. त्यांच्यापैकी एकाचे नांव होते विजय. तो राजाचा भाचा होता. दुसऱ्याचे नांव होते भैरव. तो भिल्ल युवक होता.

या स्पर्धेत विजयी कोण ते ठरवण्यासाठी नवनीतवर्माने पुन्हां एकदा धर्मसिंहासनाचा आधार घेतला.

प्रथम विजय जेव्हां सिंहासनावर बसला, तेव्हां त्या तांब्याच्या सिंहासनाने आपला निर्णय ऐकवला, "धनुर्विद्या स्पर्धेतल्या विजेत्याचे अभिनंदन!"

सभेत उपस्थित असलेल्या सर्व लोकांनी जोर-जोराने टाळ्या वाजवल्या आणि विजयचे अभिनंदन केले.

त्यानंतर राजाने भैरवला सिंहासनावर बसण्याची आज्ञा केली. राजाची ही आज्ञा ऐकून सारेजण चकित झाले. कुणाला याचे कारण समजेना. त्या धर्मसिंहासनाने तर आपला निर्णय सांगितलेला होता.

तर मग राजाने भैरवला सिंहासनावर बसायला सांगितले, त्याचे काय कारण असावे? पण त्या सिंहासनाने पुन्हां एकदा आपला निर्णय सांगितला, "धनुर्विद्या स्पर्धेतल्या विजेत्याचे अभिनंदन." उपस्थित मंडळींना मात्र यावेळी सिंहासनाने केलेले अभिनंदन विचित्र वाटले.

परंतु नवनीतवर्माने हंसून मान डोलावली आणि भैरवला विजेता म्हणून घोषित केले. नंतर तो सेनाध्यक्षाला म्हणाला, "उद्या सकाळींच हे सिंहासन माझे गुरुवर्य विवेचन यांच्या गुरुकुलांत पोंचते करा."

ही गोष्ट सांगून वेताळाने राजाला म्हटले, "राजन्, ते तांब्याचे सिंहासन अद्भुत शक्तीने भारलेले होते यांत शंकाच नाही. त्या वीरबाहू दरोडेखोराच्याबाबतीत सिंहासनाने दिलेला निर्णय तर राजाने पार धुडकावून लावला; आणि उलट आज्ञा केली की भ्रष्टाचार विरोधी विभागांत प्रमुख अधिकारी म्हणून वीरबाहूची नेमणूक केली आहे! हा निर्णय अयोग्य होता कीं नाही? आता दुसरी धनुर्विद्येच्या स्पर्धेची बाब. धर्मसिंहासनाच्या दृष्टीतून विजय व भैरव दोघेही या कलेत निष्णात होते. परंतु भैरवला राजाने विजयी घोषित करणे हे अगदीच अनुचित होते कीं नाही? राजा नवनीतवर्माचे हे निर्णय अगदी चुकीचे आहेत. त्यापेक्षांही त्याने आणखी एक मोठी चूक केली होती. ती म्हणजे ते धर्मसिंहासन त्याने आपल्या गुरुकडे परत धाडलं! तुला काय वाटतं? माझ्या या शंकांची उत्तरे माहीत असूनही तू जर गप्प बसलास तर तुझ्या मस्तकाचे तुकडेतुकडे होतील."

विक्रमार्काने वेताळाला उत्तर दिलं, "गुरुने दिलेलं धर्मसिंहासन अद्भुत अवश्य होतं, पण त्याच्याही कांही मर्यादा होत्या. राजा नवनीतवर्मा ही गोष्ट जाणून होता. वीरबाहुच्या बाबतीत सिंहासनाने जो निर्णय दिला होता, तो राजाने अंमलात आणला नाही, कारण गुप्तहेरांच्या प्रमुखाने राजाला आपले निवेदन व पत्र दिले होते. त्या दोन्ही गोष्टींचा विचार करुन राजाने सिंहासनाचा निर्णय बदलला. त्यामुळे वीरबाहु हा भ्रष्टाचारी, संपन्न लोकांसाठी सिंह होता, आणि गोरगरीबांचा तो रक्षक ठरला. त्याच्या जीवनांत स्वार्थासाठी जागा नव्हती. म्हणूनच राजाने त्याला भ्रष्टाचार-विरोध विभागाचा प्रमुख अधिकारी म्हणून नियुक्त केले. हे तर राजाच्या सूज्ञपणाचे द्योतक आहे.

धनुर्विद्या स्पर्धेच्या विषयांत सिंहासनाने जो निकाल ऐकवला, तो कोणत्याही दृष्टीने उचित आहे असे म्हणता येणार नाही. दोघा स्पर्धकांनी धनुर्विद्येत जे कौशल्य दाखवले, त्याची योग्य दखल सिंहासनाने घेतली व दोघांनाही विजयी ठरवले. परंतु राजाने मात्र पहिल्या वेळेप्रमाणेच हाही निर्णय फेटाळून लावला. विजय राजघराण्यांतला होता तर भैरव भिल्ल जमातींतला होता. धनुर्विद्येत त्याला शास्त्रोक्त शिक्षण देण्यासाठी त्याला कुणीही गुरु नव्हता. हे ध्यानांत घेऊन राजाने भैरवला विजयी ठरवले. धर्म-अधर्माचा निर्णय करण्यांत मनुष्याचे मस्तक सर्वांत जास्त अचूक असते आणि त्याची बरोबरी कुणालाही करता येणारी नसते. राजाला आपली विवेकबुद्धी व व्यवहारज्ञान यांच्यावर पूर्ण विश्वास होता, म्हणून त्याने त्या धर्मसिंहासनाचा निर्णय डोळे मिटून अंमलात आणला नाही. त्याकारणाने जेव्हां त्याला कळलं, कीं त्या सिंहासनाची खास आवश्यकता नाही, तेव्हां त्याने ते गुरुवर्याकडे पाठवून देण्याची आज्ञा केली. माझ्या मते हाही निर्णय अत्यंत योग्य होता."

राजाचे मौन भंग करण्यांत सफल झालेला वेताळ पुन्हां एकदा शवासहित अदृश्य झाला व झाडावर जाऊन बसला.

*(दिनेश भट्टाचार्यांच्या रचनेवरुन)*



# ढगांना शिवणारे नाक

जपानच्या मुख्यभूमीच्या भोवती अनेक लहानमोठी बेटे आहेत. एका बेटावर एक सरोवर आहे. आता तिथे आसपास इतकी सरोवरे व तलाव आहेत. तेव्हां यांत काय विशेष, असं तुम्ही म्हणाल! खरं तर सरोवरांत खास विशेष असं कांहीच नाही, पण तिथल्या एका जातीच्या माशांबद्दल मात्र एक वैशिष्ट्य आहे. असले मासे जगांत इतरत्र कुठेही नाहीत. त्यांना खूप लांबच लांब नाक असते.

त्याचं काय झालं कीं फार पूर्वीच्या काळी, तिथे एक ढोलकीवाला होता. सरोवराजवळच्या खेड्यांतून सणवार, लग्नसमारंभ असले कीं त्यावेळी तो ढोलके वाजवी असे. तो खूप गरीब होता - इतका गरीब कीं एका भूकंपात त्याची लहानशी झोंपडी पार जमीनदोस्त झाली, तर त्याला कांही ती झोंपडी पैसे खर्चून पुन्हां उभारता आली नाही. निमूटपणे तो सरोवरालगत डोंगराच्या पायथ्याजवळच एका गुहेंत राहायला गेला. कांही वर्षांनंतर तो म्हातारा झाला. त्याला आता ढोलके वाजवणे जमेना. साहजिकच त्याला पोटापाण्यापुरतेही पैसे मिळेनात. कांही खेडूत अधूनमधून त्याला अन्नपाणी पुरवत असत.

आता हा ढोलकीवाला मृत्युपंथाला लागला होता. एकदा गांवातला एक मुलगा त्या गुहेच्या बाजूने जात होता. त्याने म्हाताऱ्यासाठी थोडेसे जेवण आणले. तेच त्या बिचाऱ्याचे अखेरचे भोजन ठरले. त्या मुलाला म्हातारा म्हणाला, "पोरा, तू माझी सेवा केलीस म्हणून मला तुला कांहीतरी बक्षीस द्यायला हवेच. ही माझी ढोलकी आहे. मी इतकी वर्षे ती प्रेमाने सांभाळली, म्हणून इतक्यातच तिने मला एक मंत्र दिला आहे. जर एखाद्याच्या नाकाकडे बघत मी ढोलकी वाजवली आणि "वर, वर," असे पुटपुटलो, तर समोरच्या व्यक्तीचे, जो असेल त्याचे किंवा तिचे, नाक मोठे होईल. जर मी म्हटलं, "खाली, खाली," तर त्या व्यक्तीचे नाक लहान होईल. आता बघ, आपल्याकडे नकट्या-चपट्या, किंवा मोठ्या नाकाची कितीतरी माणसे असतात. त्यांना त्यांचे नाक प्रमाणबद्ध असावे, चेहऱ्याला शोभेसे असावे असे वाटत असतेच! ही ढोलकी मी तुला बक्षीस देतो आहे. पण मात्र तू लक्षांत ठेव, उगीच विनाकारण उत्सुकतेपोटी या शक्तीचा वापर कधीही करायचा नाही. माझ्या



मृत्यूनंतर माझ्यावर अंतिम संस्कार करण्याची व्यवस्था तू करावीस असं मला वाटतं."

थोड्याच वेळांत म्हाताऱ्याने प्राण सोडला. त्या मुलाने गांवकऱ्यांची मदत घेतली व म्हाताऱ्याचे रीतसर अंत्यसंस्कार केले. नंतर तो ढोलकी वाजवायला लागला. त्यांच्या घरमालकाच्या मुलीचे नाक फारच नकटे होते. हा मुलगा तिच्याजवळ जाऊन ढोलकी वाजवत स्वतःशी "वर, वर" असे पुटपुटायला लागला. तिच्या चेहऱ्याच्या प्रमाणांत तिचे नाक वरती आले. झालं, रातोरात त्या मुलाची सगळीकडे प्रसिद्धी झाली. अनेक लोक त्याच्याकडे आपापल्या नाकाचा आकार बदलायला येऊं लागले. हा अद्भुत चमत्कार घडवणारा ढोलकीवाला, म्हणून त्याला भरघोस बक्षिसेही मिळूं लागली.

दोन वर्षांतच तो एक श्रीमंत असामी बनला. एक दिवस तो त्याच सरोवराच्या कांठावर हिंडत होता. त्याच्या मनांत विचार आला कीं ही ढोलकी जास्तीत जास्त किती शक्तीमान असूं शकेल ते बघावं. तो गवतांत पहुडला आणि आपल्या स्वतःच्याच नाकाच्या शेंड्याकडे बघत तो ढोलकी वाजवायला लागला, आणि "वर, वर!" असे म्हणायला लागला. त्याच्या नाकाचा शेंडा वाढायला लागला. त्याला मजा वाटूं लागली. त्याने मोठ्याने म्हटलं, कीं नाक भराभर लांब होत होतं. त्याला हा खेळ गंमतीचा वाटू होता. तो आपला "वर, वर" म्हणत राहिला, आणि एखाद्या लांब बांबूसारखं नाकही लांबत गेलं. त्याच्या नाकाचं टोंक शेवटी आकाशांतल्या ढगांना जाऊन भिडलं.

हे चमत्कारिक दृश्य पाहून दोन गरुडपक्षी त्या नाकाजवळ घिरट्या घालूं लागले. आणि आता तर ढोलकीवाला जास्तच चेकाळला. पण तेवढ्यांत एका गरुडाने ते मऊ नाक मधेच चोंचीत पकडले आणि त्या ढोलकीवाल्याच्या लांबच लांब नाकांत एक महाभयंकर वेदनेची कळ आली. तो आता घाईघाईने



"खाली खाली" असं म्हणायला लागला. पण गरुड कांही आपली पकड सोडेना. उलट तो वर आभाळांत उंच उडायला लागला. तेव्हां ढोलकीवालाही हवेंत उचलला गेला. तो वर वर जाऊं लागला, तसे नाक लहानलहान होऊं लागले. ढोलकीवाला जेव्हां अगदी गरुडाजवळ गेला, तेव्हां गरुड जोराने किंचाळला. त्याने चोंच उघडली आणि ढोलकीवाला खालीखाली येऊं लागला. त्याने सरोवराच्या पाण्यांतच खोल बुडी मारली.

बिचारा! आता त्याचे रुपांतर एका लांब नाकाच्या माशांत झाले. म्हाताऱ्या ढोलकीवाल्याने त्याला बजावलं होतं कीं केवळ उत्सुकता म्हणून विनाकारण ढोलकी वाजवायची नाही. पण ही सूचना मात्र हा उत्साही तरुण पार विसरुन गेला, आणि आता फार उशीर झालेला होता!

# खास बातम्या

## नवे शिवमंदिर



महाशिवरात्रीच्या दिवशी वाराणसीमधे रुद्रेश्वर महादेवाचे एक नवीन मंदिर जनतेसाठी खुले झाले. या मंदिराचे वैशिष्ट्य असे कीं नूर फातिमा या भाविक मुस्लिम महिलेने याच्या बांधकामासाठी बराच खर्च केला आहे. ही महिला वकील आहे. गतवर्षी तिला स्वप्न पडले कीं गंगेशपुरांत तिने असे मंदिर बांधण्यांत पुढाकार घ्यावा. दुसऱ्या दिवशी तिने आपल्या शिलकीतली कांही रक्कम यासाठी बाजूला ठेवली. जेव्हां मंदिराचे बांधकाम सुरुं झाले, तेव्हां हिंदू भक्त, धार्मिक नेते व संस्थांकडून देणग्यांचा ओघ सुरुं झाला. वस्तूरूपाने अनेक मुस्लिम बांधवांकडून व संस्थांकडूनही मदत येत राहिली.

## वारसावृक्ष



अनंतपुर जिल्ह्यांत गुडीबायालु खेड्यांत ५५० वर्षांचा एक पुरातन वटवृक्ष आहे. त्याला तिमम्मा मारी मनु म्हणतात. आंध्रप्रदेश सरकारने ह्या वृक्षाचे संरक्षण व जतन करण्यासाठी दहा लाख रुपये खर्च करण्याचे ठरवले आहे. १९८९ मधे या वृक्षाचे नांव गिनेस बुकांत नोंदवले गेले आहे. आपल्या पतीचे प्राण वांचवण्याची जिने परमेश्वराला तळमळीने विनंती केली होती, त्या तिमम्मावरून या वृक्षाचे नांव पडले आहे. साऱ्या राज्यांतून हजारो स्त्रिया ह्या वृक्षाचे दर्शन घ्यायला वर्षभर येत असतात. २.१ हेक्टेअरमधे विस्तारलेल्या ह्या वृक्षाला १२००च्यावर पारंब्या आहेत.





# घरावरील प्रेम

अन्नपूर्णा ही पासष्ट वर्षे वयाची एक म्हातारी होती. नुकताच तिचा पती मरण पावला होता. सुरवातीला कांही काळ तिचे नातेवाईक येत जात होते, म्हणून तिला दुःखाची तीव्रता तेवढी जाणवली नाही. पण हळूंहळूं नातेवाईकांचे येणे जाणे कमी झाले. तिचा जांवई आणि मुलगी व्यापारानिमित्त शहरांत राहात होते. व्यापारी कामकाजांत व्यग्र असल्याने तेही कधीमधीच यायचे. अशा परिस्थितीत आता तिला जास्तच एकटेपणा वाटू लागला.

एक दिवस, घरातले कामधाम आटोपल्यावर दुपारच्या वेळी ती घरामागील ओट्यावरील झाडाच्या खाली एका बाजेवर झोपली होती. त्याच वेळी अचानक एक मोर त्या झाडावर येऊन बसला.

अन्नपूर्णाने डोळे उघडले तर समोर मोराला पाहिलं. तिने तिला दिसलं की त्याच्या पायाला जखम झाली आहे आणि कोणीतरी त्याची शिकार करूं इच्छित होतं. ती मोराला आंत घेऊन गेली आणि तिने जखमेवर हळद लावून पट्टी बांधली. इतक्यांत एका माणसाने बाहेरुन ओरडतच विचारले, "ए म्हातारे, इथल्या झाडावर एक मोर येऊन पडला होता. तू पाहिलं आहेस का त्याला?"

"नाही बाबा! आमच्या गांवात कुठले आले आहेत मोर? मग मला मोर कुठे नी कसा दिसणार?" आश्चर्याचे नाटक करत अन्नपूर्णा बोलली. कांही न बोलता तो माणूस निघून गेला. त्या दिवसापासून ती मोराच्या पायावर पट्टी बांधू लागली. वेळेवारी त्याला योग्य खाणंपिणं देऊन त्याचा चांगला सांभाळ करुं लागली. कांही दिवसांतच मोराची जखम भरून आली आणि तो कधीमधी पिसारा फुलवून नाचूंही लागला.

गांवच्या जमीनदाराला ही बातमी समजली, तेव्हां तो अन्नपूर्णाच्या घरी आला व त्याने म्हटले, "अन्नपूर्णा, एखादा मोर पाळण्याची माझी फार इच्छा आहे. मी खूप प्रयत्न केले, पण एकही मोर कांही माझ्या हातात सांपडला नाही. एवढ्यांतच मला समजले की तुझ्याजवळ एक पाळीव मोर आहे.

सोमनाथ



तो मला देऊन टाक. मी तुला दहा सोन्याच्या मोहोरा देईन.''

अन्नपूर्णाने निःसंकोचपणे म्हटले, ''हे काय बोलता आहात आपण जमीनदारसाहेब? ज्या मोराविषयी आपण बोलता आहात, त्याची मी आई आहे. त्याच्याशिवाय ना मी राहू शकते, ना माझ्याविना तो ! हे अगदी निखालस सत्य आहे.''

'ठीक आहे'' असे म्हणून जमीनदार निघून गेला. परंतु चार आठवड्यांनी तो परत आला आणि त्याने अन्नपूर्णाला म्हटले, ''हे पहा, अन्नपूर्णा, तू कधी गांव सोडून कुठे कुणाकडे गेलीस, तर ह्याचं पालनपोषण कोण करेल?''

अन्नपूर्णाने क्षणभर विचार केला व म्हटले, ''आपण योग्यच बोलता आहात. इतरांप्रमाणेच मलाही आपल्या नातेवाईकांकडे जावेसे वाटते, परंतु आठदहा दिवसांपेक्षा जास्त दिवस मी राहू शकत नाही. इथेच आपल्या मोराबरोबर माझा छान मजेत वेळ जातो.''

तिचे बोलणे ऐकून जमीनदाराच्या मनांत तिच्याविषयी करुणा उत्पन्न झाली आणि त्याने म्हटले, ''माझी एक गोष्ट ऐक. तुला आणि मोराला मी माझ्या घरी घेऊन जाईन. तिथे तुम्हाला कुठल्याही प्रकारचा त्रास होणार नाही. खुशाल जितके दिवस रहायचे तितकी रहा.''

जमीनदाराचे बोलणे ऐकताच अन्नपूर्णा एकदम उत्साहित झाली. जमीनदाराबरोबर त्याच्या घरांत राहण्याची इच्छा एक क्षणभर तिच्या मनांत निर्माण झाली, पण लगेचच तिला गवताने शाकारलेलं तिचं घर, त्याच्या चार भिंती, गांवाबाहेरील दोन एकर जमीन आणि आपलं सुंदर गांव आठवलं. ती एकदम भावूक झाली.

जमीनदाराने सर्व कांही जाणले व म्हटले, ''अन्नपूर्णा, संकोच करू नकोस. माझ्या घरी येशील तर मोराचे पालन पोषणही तुला चांगल्या पद्धतीने करता येईल व आमच्या घरांत स्वतंत्रपणे राहताही येईल. तुझ्यावर कोणीही कसली सक्ती करणार नाही. मी गांवच्या सरपंचास सांगेन की त्यांनी तुझ्या घराचं नीट रक्षण करावं.

तुला आपल्या शेतीवाडीतून जे उत्पन्न मिळतं, तेही तुला देण्याची व्यवस्था मी करीन.''

''ही खरोखरच आनंदाची बाब आहे, पण... पण'' बोलता बोलता ती मधेच थांबली.

''मला वाटतं, तू बोलताना जरा संकोच करते आहेस. निःसंकोचपणे बोल,'' जमीनदाराने म्हटले.

''तुमच्यापासून काय लपवायचं साहेब! रोज जेवणखाण झाल्यावर बोरीच्या झाडाखाली बाजेवर



मी लवंडते. तेव्हां झाडाच्या पानाची सळसळ जणू कांही थोपटत थोपटत मला झोपवते. जर हे घर सोडलं तर पानांची ती सळसळ मला कशी ऐकू येणार?''

जमीनदाराने प्रेमळ व भारलेल्या स्वरांत म्हटले, ''तू योग्यच बोलत आहेस. तुझं तुझ्या घरावर इतकं प्रेम आहे तर ते सोडून येऊ नकोस. तुझ्या घराच्या आजूबाजूचा परिसर हिरवागार होईल, याची मी व्यवस्था करीन. मोराला बघण्याची मला जेव्हां इच्छा होईल, तेव्हां मी स्वतःच इकडे येईन. आपल्या घराविषयी तुला जी ओढ आहे, मोराविषयी जो दयाभाव तुझ्या मनांत आहे, त्या दोन्ही गोष्टी खरोखरीच महान आहेत.'' हे बोलून जमीनदार निघून गेला व आपल्या वचनाप्रमाणे त्याने म्हातारीच्या घराभोवतालच्या परिसराचे सुंदर वनांत रुपांतर केले.

बघता बघता एक महिना सरला.

एक दिवस अन्नपूर्णाने नेहमीप्रमाणे थाळीमध्ये एक पिकलेला पेरु आणि दाणे भरुन मोरापुढे ठेवले, अन् ती घरात जायला वळली तोच मागून एक आवाज आला. ''आई, आता मी हे सर्व खाऊन नाही राहू शकत. मला भात, भाजी वगैरे वाढ.''

अन्नपूर्णाने लगेचच वळून मागे पाहिले. तिथे बघते तर दहा वर्षाचा एक मुलगा हंसत उभा होता. प्रथम ती आश्चर्यचकितच झाली, पण मग जरा नाराजीने बोलली ''अरे मुला, माझा इथला मोर कुठे आहे? काय केलंस तू? तुला माहीत आहे का, मला तो माझ्या मुलाप्रमाणेच आहे.'' असं म्हणतच तिने आजूबाजूस मोराला शोधायला सुरवात केली.

मुलाने खळखळून हंसतच म्हटले, ''अग आई, मीच तुझा तो पाळीव मुलगा आहे. तुझ्या प्रेमळ,



दयाळू आणि आदरणीय वागणुकीमुळेच मला ऋषींनी दिलेल्या शापांतून मुक्ति मिळाली आहे. हे बघ, ही त्याच जखमेची खूण, त्यावर तू पट्टी बांधायचीस. ही कधी न जाणारी खूण आहे.'' असं म्हणत त्याने आपल्या पायावरील खूण तिला दाखवली.

पायावरील खूण, ऋषींचा शाप, ह्या साऱ्या गोष्टी ऐकून अन्नपूर्णाला वाटले की तो खरंच खरे बोलतो आहे. प्रेमाने त्याला आपल्या जवळ ओढत तिने म्हटले, ''अरे माझ्या लाडक्या मोरा, ऋषि मुनी जसे शाप देतात तसेच वरदानही देतात, असं मी लहानपणी माझ्या आजीकडून ऐकले आहे. पण हे तरी सांग की त्या मुनींनी तुला शाप का बरं दिला?''

आई, ती तर एक मोठीच कहाणी आहे. आत्ता मला खूप भूक लागली आहे, म्हणून मी तुला थोडक्यांत सांगतो. मला माझे आईवडील कोण ते

माहित नाही जेव्हांपासून मला समज आली तेव्हांपासून मी भूपाल नांवाच्या एका शेतकऱ्याच्या घरी वाढलो अन् लहानाचा मोठा झालो. गांवामध्ये, इतर मुलांबरोबर मी गाईगुरांना गांवाबाहेर चरायला घेऊन जात असे, तिथे झाडांवर निरनिराळ्या प्रकारचे अनेक पक्षी असत. त्या सगळ्यांत मोर मला फार आवडायचा. एक मोर पकडायचा आणि पाळायचा, अशी माझी खूप इच्छा होती. परंतु मी एकही मोर पकडूं शकलो नाही. एकदा असाच त्यांना पकडण्याच्या प्रयत्नात असताना मी खूप थकून आणि निराश होऊन त्यांच्यावर दगड मारूं लागलो. मी ऐकत असलेल्या दगडांतील एक दगड एका तपोमग्न ऋषींना लागला. ते संतप्त होऊन उठले आणि त्यांनी मला 'मोर बनशील' असा शाप दिला, पण लगेचच कांही वेळाने माझ्यावर कृपा करून मला शापमुक्त होण्याचा मार्गही त्यांनी सांगितला.

त्यांनी मला सांगितले की, जो कुणी सर्व सजीवांचा आदर करतो, सर्व जीवजंतूंबद्दल प्रेमभाव ठेवतो, अशा व्यक्तीच्या मदतीने तुला पुन्हां मनुष्यरूप मिळेल. आई, तुझ्यामुळेच मला आज त्या शापांतून मुक्ती मिळाली आहे.''

अन्नपूर्णा अतिशय खूष झाली. त्याला लगेच जेवण देऊन तिने म्हटले, "अरे माझ्या लाडक्या मोरा, ह्या गांवच्या जमीनदाराला मोर फारच आवडतात. ते तुला घेऊन जाऊन सांभाळणार होते. त्यांच्या दयाळू स्वभावामुळेच आज आपल्या घराच्यासभोवती ही हिरवळ आहे. इतकी झाडे झुडुपे आहेत व त्यावर राहणारे अनेक जीव आहेत. तू त्यांना कांही मदत करूं शकतोस का?''

मुलाने जरा डोके खाजवले अन् म्हटले "मी मोर बनल्यामुळे कांही काळ मोरांच्या संगतीत राहिलो आहे. त्यांतील कांही मोरांना मी आपल्या घराच्या बागेतील झाडांवर राहायला सांगू शकतो.''

''हो तर, मग तू नक्कीच तसा प्रयत्न कर बाळा. जमीनदारसाहेब खूष होतील.'' अन्नपूर्णा मुलाला प्रोत्साहित करीत उद्गारली.

तो मुलगा घराच्या मागच्या बाजूस जाऊन मोराप्रमाणे ओरडूं लागला. थोड्याच वेळांत उत्तरेकडून कांही मोर तेथील झाडांवर येऊन बसले. कांही दिवसांतच अन्नपूर्णाची बाग हिरव्यागार झाडाझुडपांनी, व निरनिराळ्या पक्ष्यांनी भरलेले एक छानसे उद्यान बनले.





## वाचकांसाठी कथास्पर्धा

### सर्वोत्कृष्ट प्रवेशिकेला रु. २५०/-चे पारितोषिक

*खालील गोष्ट वाचा:*

श्रीपूरचा चक्रधर अत्यंत कंजूष होता. लोकांना त्रास देण्यांत आणि त्यांना नाडण्यांत त्याला आसुरी आनंद होई. तो दुष्ट स्वभावाचा होता आणि त्याने लग्न केलेले नव्हते. त्यांच्या वडिलार्जित घरांत तो एकटाच राहात होता. शेवटी तो म्हातारपणी आजारी पडला व मरण पावला.

आता त्याचे भूत त्या घरांत राहू लागले. आसपासच्या लोकांना ते भूत कधी दिसले नाही, पण वेळी अवेळी विचित्र आवाज मात्र ऐकूं येत राहिले.

कांही महिने उलटले. राम नांवाचा एक गरीब माणूस त्या रिकाम्या घरांत राहायला लागला. ते पाहून चक्रधरच्या भुताला राग आला. आपल्या घरांत शिरलेल्या या घुसखोराला त्याने बाहेर घालवायचे ठरवले. तेव्हांपासून राम घरांतून बाहेर निघाला कीं त्याच्या अंगावर दगडगोटे येऊन आदळायला लागले. रात्रीं अपरात्री घरावर दगड पडल्याचे आवाज येत. पण रामला तर त्या घरांत राहायचे होते. त्याने हा त्रास कांही दिवस सोसला. ते भूत कंटाळून निघून जाईल असा त्याचा होरा होता. पण चक्रधर जास्त हट्टी होता आणि त्याने आपला छळ चालूंच ठेवला. शेवटी, रामने भुताच्या या करणीचा फायदा घेण्याचे ठरवले.

ही गोष्ट तुमच्या शब्दांत, १००-१५० शब्दांत पूर्ण करा. त्याला योग्य शीर्षक द्या आणि तुमची प्रवेशपत्रिका खालील कूपनासह आम्हाला पाठवा. पाकिटावर 'वाचा आणि सुचवा' असे लिहा.

**शेवटची तारीख : ३१ डिसेंबर २००५**

नांव ............................................ वय ..................

जन्मतारीख ........................ शाळेचे नांव ........................

घरचा पत्ता ............................................................

..........................................................................

.................................................. पिनकोड ..............

पालकांची सही                                        स्पर्धकाची सही

CHANDAMAMA INDIA LIMITED

82 Defence Officers Colony, Ekkatuthangal, Chennai - 600 097.



# धर्माचरण

ब्रह्मदत्त काशी येथे राज्य करीत असताना बोधिसत्वानी धनंजय नांवाच्या कुरुराजाच्या रूपाने इन्द्रप्रस्थ येथे जन्म घेतला. त्याच्या राज्यांत वेळेवर पाऊस पडत असे, दुष्काळ कधीही पडत नसे. त्यामुळे सर्व प्रजा सुखी होती. साऱ्या जंबुद्वीपात अशी बातमी पसरली की, धर्माचरण आणि दानधर्म करण्यात इंद्रप्रस्थचा राजा धनंजय याची बरोबरी करणारा दुसरा कोणी नाही.

त्याचवेळेस कलिंग देशाचा राजा कालिंग हा दंतपूर ही आपली राजधानी करून तिथे राज्य करीत होता. त्याच्या राज्यांत एकदा भयंकर दुष्काळ पडला. लोक भुकेने मरू लागले. कांही मुले आपल्या आयांच्या मांडीवरच भुकेने तडफडू लागली. प्रजेत हाहाकार माजला.

देशाची वाईट परीस्थिती पाहून राजा कालिंगला राहवले नाही. त्याने आपल्या मंत्र्यांना बोलावून विचारले - ''ह्या वर्षी आपल्या देशात भयंकर दुष्काळ पडण्याचे कारण काय असावे? ह्या वाईट अवस्थेतून वांचण्यासाठी काही उपाय आहे कां?''

मंत्र्यांनी उत्तर दिले - ''महाराज, देशांत जेव्हां धर्माची हानी होते, त्यावेळेस असा उत्पात होतो. इंद्रप्रस्थचा राजा धनंजय हा मोठ्या ईमानदारीने आपल्या धर्माचे पालन करतो आहे! त्यामुळे त्याच्या देशांत महिन्यांतून तीनदा पाऊस पडतो. देशांत कधी दुष्काळ पडत नाही. प्रजा सुखी आहे आणि देश समृद्ध आहे.''

''तर मग तुम्ही लोक एक काम करा. आजच इंद्रप्रस्थला जाऊन राजा धनंजयाचे दर्शन घ्या, आणि एका सुवर्णपत्रावर धर्माचे नियम लिहून घेऊन या. आपल्यालासुद्धा त्या नियमांचे पालन करून देशाला सुखी व समृद्ध करता येईल.''

कलिंग देशाचे मंत्री सुवर्णपत्र घेऊन इंद्रप्रस्थला पोहोचले. आणि राजा धनंजयाचे दर्शन घेऊन म्हणाले - ''महाराज, आम्ही कलिंग देशाचे रहिवाशी आहोत. आमचा देश भयंकर दुष्काळात सांपडला आहे. आपण धर्मात्मा आहात, धर्माचे पालन करून प्रजेचा सांभाळ करीत आहात. त्यामुळे आपली प्रजा सुखी व संपन्न आहे. आमच्या राजाने ज्यां धर्माचे पालन करावयास हवे, ते आपण ह्या सुवर्णपत्रावर लिहून द्या. म्हणजे आमचा राजा त्या धर्मनियमांचे पालन करून दुष्काळापासून जनतेला वांचवील.'' असे म्हणत कलिंग देशाच्या मंत्र्यांनी सुवर्णपत्र धनंजयच्यासमोर आणून ठेवले.

धनंजय नमस्कार करीत म्हणाला - ''हे मंत्र्यानो, मला क्षमा करा. ह्या कागदावर धर्मसूत्र लिहिण्याची माझी योग्यता नाही. कारण एकदा माझ्याकडून धर्माचे उलंघन झाले. आमच्या देशांत तीन वर्षानंतर एकदा कार्तिक उत्सव होतो. त्यावेळेस राजाला तलावाच्या कांठावर यज्ञ करावा लागतो. व यज्ञाच्या चारी बाजूला चार बाण सोडावे लागतात. एकदा मी चारही बाण चार दिशेने सोडले. तीन बाण बरोबर गेले, परंतु चौथा तलावांत पडला. बाणाच्या आघाताने तळ्यांतले मासे, बेडूक, मरून गेले. अशा प्रकारे माझ्या हातून अधर्माचरण झाले. जर कां माझ्या राज्यांत अत्याचार, अन्याय, त्रास, नसेल, तर त्याचे कारण माझ्या पूर्वकालीन शासन करणाऱ्यांपैकी कोणीतरी असेल. तेव्हां आपण कृपा करून त्याचा शोध काढावा.''

ही गोष्ट ऐकताच सर्व मंत्र्यांना आश्चर्य वाटले. त्यानंतर ते सर्व राजमाता मायादेवीच्यापाशी आले. सर्व गोष्ट तिला सांगून म्हणाले - ''देवीजी, आपण कृपा करून आमच्याकरिता धर्मनियम लिहून द्या.''

''मुला, मी सुद्धा धर्माचे अतिक्रमण केले आहे. एकदा माझ्या मोठ्या मुलाने मला सोन्याची माळ भेट म्हणून दिली. मी माझ्या मोठ्या सुनेला श्रीमंत घराण्यातली समजून, तिला ती न देता धाकट्या सुनेला देऊन टाकली, परंतु दुसऱ्या क्षणीच मी पक्षपात केला असे मला उमजले, आणि झालेल्या गोष्टीचे मला खूप दुःख झाले, त्यामुळे दुसऱ्यांना धर्माचे सूत्र लिहून देण्याची माझी लायकी नाही. तरी तुम्ही कृपया कोणातरी योग्य अशा माणसाला शोधा व त्याच्याकडे जा.''



त्यानंतर कलिंग देशाचे मंत्री राजाचा भाऊ नंद ह्याच्यापाशी गेले. त्याने सुद्धा एकदा धर्माचे उलंघन केले होते ती गोष्ट त्याने सांगण्यास सुरवात केली - ''मी रोज संध्याकाळी रथांत बसून अंतःपुरात जात होतो. केव्हां केव्हां तेथेच रात्रभर रहात होतो. जर मी माझा चाबूक रथांत सोडला तर, त्याचा अर्थ मी रात्री अंतःपुरात राहाणार नाही. तेव्हां तशा परिस्थितीत माझा सारथी माझी वाट पहात बसे. आणि मी चाबूक बरोबर घेऊन गेलो, तर सारथी रथ घेऊन जात असे, व दुसऱ्या दिवशी सकाळी रथ घेऊन येत असे. एकदा मी चाबूक सोडून अंतःपुरात गेलो. त्या दिवशी माझा परतायचा विचार होता. तेव्हां राजाने, म्हणजे माझ्या मोठ्या भावाने, मला परत जावूं दिले नाही. त्यामुळे मी रात्रभर अंतःपुरातच राहिलो. माझी वाट पहात माझा सारथी रात्रभर पावसात भिजत रथांतच बसून

राहिला. अशा प्रकारे त्याला त्रास झाला व मी धर्माचे अतिक्रमण केले.''

त्यानंतर कलिंग देशाचे मंत्री असा विचार करून राजपुरोहिताकडे गेले की, कमीत कमी राजपुरोहित तरी त्याची इच्छा पूर्ण करतील. परंतु त्यानेसुद्धा धर्माचे अतिक्रमण केल्याची गोष्ट सांगितली - ''एके दिवशी मी राजमहालाकडे जात होतो. रस्त्यांत मला एक रथ दिसला. त्या रथाला सोन्याचा मुलामा केलेला होता. तो बघताच माझ्या मनांत लोभ उत्पन्न झाला. मी विचार केला की, जर राजाने हा रथ मला दान केला, तर किती छान होईल!

मी जेव्हां राजाच्याकडे पोहोचलो, तेव्हां मला बघून राजा म्हणाला - ''पुरोहितजी, हा रथ मी आपल्याला भेट दिला आहे. तो आपण घेऊन जा. त्यावेळेला माझ्यांत उत्पन्न झालेल्या लोभाची मला आठवण झाली आणि मी पश्चातापाने तो रथ घेण्यास नकार दिला. अशा तऱ्हेने मी धर्माचे आचरण केले नाही, तरी मी आपल्याला धर्मसूत्र लिहून देऊं शकत नाही.''

कलिंग देशाच्या मंत्र्यांच्या कांहीही लक्षांत आले नाही. शेवटी ते इंद्रप्रस्थच्या महामंत्र्यांच्याकडे गेले. त्यानेसुद्धा त्यांना निराश केले. म्हणाला - ''मीसुद्धां शेतकऱ्याच्या शेताचे माप घ्यायला गेलो होतो. माप घेऊन मला जेथे खुंटी ठोकायची होती, तिथे एक मोठे बीळ होते. माझ्या मनांत एक शंका आली की त्या बिळांत कोणीतरी रहात असावे. परंतु थोडे अलिकडे खुंटी ठोकायची, तर शेतकऱ्याचे नुकसान होणार; व थोडे पुढे ठोकायचे तर राजाचे नुकसान होणार, म्हणून मी त्या बिळांतच खुंटी ठोकायची आज्ञा केली. खुंटी ठोकताच आंतून एक खेकडा बाहेर आला, आणि त्या खुंटीच्या प्रहाराने मेला. तेव्हां मीसुद्धां धर्माचे अतिक्रमण केले आहे. तरी अशा अवस्थेत मी तुम्हाला कसे लिहून देऊ शकेन?''

त्यावर कलिंग देशाच्या मंत्र्यांनीच एक उपाय शोधून काढला. त्यांनी सर्वांनी सांगितलेल्या गोष्टी त्या सुवर्णपत्रावर लिहून घेतल्या व त्या नेऊन राजाला वाचून दाखविल्या. राजाला समजले की, धर्माचरण करतांना इमानदारीने राहणेच सर्वात उत्तम कार्य आहे.

त्याचप्रमाणे त्याने स्वतःच त्याचे पालन करून राज्यकारभार करण्यास सुरवात केली. त्यानंतर थोड्या दिवसांत पाऊस पडूं लागला व देशांतील दुष्काळ नाहीसा झाला. त्या दिवसापासून कलिंग देशाची प्रजा सुखाने व समृद्धीने नांदू लागली.







# मांत्रिकाचे जीवन

हरीपूर एक छोटे गांव होते. तिथले लोक शेती करीत. त्याशिवाय कांही पारंपारिक लहान उद्योग करण्यांतही ते वाकबगार होते. त्यांच्या हस्तकलांना लागणारी सामुग्री मोठ्या शहरांतच मिळत असे. म्हणून त्यांना नेहमीच शहरची वाट पकडावी लागत होती.

हरीपुरांत तयार होणाऱ्या कित्येक वस्तूंना शहरांत चांगली मागणी असे. हरीपुरांत सोमनाथ हा एक गरीब खेडूत राहात होता. त्याच्या मालकीचे शेत नव्हते. तो सधन लोकांच्या घरी जाऊन त्यांच्या शेतमळ्यावर काम करायचा. त्याची बायको सीता, तऱ्हेतऱ्हेचे फराळाचे व बेगमीचे पदार्थ करून गांवात विकत जायची. त्यांची बारा वर्षांची मुलगी रमा ही घरांतला स्वयंपाक करून एकीकडे सहा वर्षाच्या भावाला, छोट्या गणपतीला सांभाळत होती.

योगी आनंद आपल्या शिष्यांना घेऊन त्या गांवात अधूनमधून येत असत. त्यांचे वक्तृत्व अमोघ होते. सारा गांव त्यांची प्रवचने ऐकायला गोळा व्हायचा. आनंदजींनी आपल्या भाषणांत सांगितलं, ''चांगली प्रकृति आणि समाधान माणसाला असले, म्हणजे सुख व संतोष प्राप्त होतात. आपापली कामे स्वतः करावीत आणि घरांत शिजवलेले ताजे, सुग्रास, साधे अन्न खाल्ले कीं प्रकृति चांगली राहाते.''

त्यांचा हा संदेश लोकांना पटला. म्हणून अनेकजण आपापल्या शेतावर, बागांतून स्वतःच मेहनत करायला लागले. घरोघरी स्त्रिया स्वतःच स्वयंपाक करायला लागल्या. सोमनाथ व सीताला कामे मिळेनात. त्यांची उपासमार होऊं लागली.

आपली ही दुर्दशा योगी आनंद यांच्यामुळेच झाली हे सोमनाथच्या लक्षांत आले. त्याने आपली ही व्यथा त्यांना सांगितली. योगी आनंदानी त्यावर विचार करून म्हटले, ''या गांवात अनेक लोक असे आहेत कीं माझ्या सांगण्यामुळे त्यांचा फायदा झाला. फक्त तुझेच नुकसान झालेले दिसते. आता त्यांत चूक तुझी आहे कीं माझी?

''स्वामीजी, ही चुका काढण्याची वेळ नाही.

आलोक शर्मा



माझी मुले, बायको आणि मी भुकेने तडफडतो आहोत. त्याचे कारण तुम्ही आहात. आता आमची भूक आम्ही कशी भागवायची ते तुम्हीच सांगा.'' केविलवाण्या स्वरांत सोमनाथने विनवले.

"हे बघ सोमनाथ, लोकांची मागणी कधी एकाच तऱ्हेची नसते. इतकी वर्षे तू कांहीही विचार न करता आयुष्य कंठीत होतास. आता उशीर झाला तरी बिघडत नाही, पोटापाण्यासाठी तू कांहीतरी नवीन मार्ग शोधून काढला पाहिजेस.'' आनंदजींनी सल्ला दिला.

सोमनाथ रागावून म्हणाला, "आपल्यासारख्या लोकांना पोटभर खायला मिळते, म्हणून अशा तऱ्हेचा उपदेश सोपा असतो. पण या सांगण्यामुळे आमच्या पोटांतली आग कशी शांत होईल?''

आनंदने हंसून उत्तर दिलं, "एके काळी मीही खूप कष्ट करून माझे पोट भरत होतो. पुढेपुढे कांहीच काम मिळेनासे झाले. मी साधूंच्या जथ्यांत सामील झालो. ज्या गोष्टी सांगून जनतेला आनंद मिळतो, त्या मी सांगतो आणि माझे पोट भरतो आहे. तुलाही माझ्यासारखे बदलायला हवे.''

सोमनाथने लागलीच त्यांचा शिष्य होण्याची इच्छा व्यक्त केली. आनंदजींनी त्याला नकार देत सांगितले, "सर्वांसाठी एकाच मंत्राचा उपयोग होत नसतो. माझ्यावरसुद्धां माझ्या परिवाराची जबाबदारी आहेच की! तू कसं जगायचं त्याचा मार्ग तू स्वतःच शोधून काढ.''

"पण तोपर्यंत माझी बायको नि मुलं भुकेने व्याकुळ होऊन उपासमारीने मरतील हो!'' सोमनाथ दुःखी आवाजांत उद्गारला. आनंदजी म्हणाले, "असा धीर सोडूं नकोस. मी आजच दुसऱ्या गांवी जाणार आहे. टोकर हा माझा शिष्य आहे. मी तुझी त्याच्याशी ओळख करुन देईन. त्याला मंत्रतंत्र विद्येचे ज्ञान आहे. जोपर्यंत तुला कांही काम मिळत नाही, तोपर्यंत तो तुमचे पालनपोषण करील. तुम्हाला भुकेले राहूं देणार नाही.''

सोमनाथने जेव्हां मान डोलावली, तेव्हां योगी आनंद यांनी टोकरला बोलावले. टोकर सात फूट उंचीचा, धष्टपुष्ट, आणि दणदणीत होता. नीट वळवलेले केस, लांब लालसर डोळे, जाडजूड मिशा आणि भरघोस दाढीही त्याला होती. हा मांत्रिक आहे, हे बघितल्यावरच समजत होतं.

आनंदजींनी टोकरची पाठ थोपटत त्याला सांगितले, "मी दुसऱ्या गांवाला जातो आहे. ह्याचं नांव सोमनाथ आहे. तू पंधरा दिवस ह्याच्या परिवाराची काळजी घ्यायचीस. ह्याची मुले उपाशी राहाणार नाहीत याची जबाबदारी तुझ्यावर आहे. त्यानंतर मात्र तुझ्या मंत्रशक्तीनुसार तू माझ्याकडे परत ये.''



टोकरने गुरुला प्रणाम केला आणि तो सोमनाथच्या पाठीमागून जात त्याच्या घरी गेला. सीता व मुलांनी जेव्हां या दोघांना येताना पाहिले, तेव्हां ह्यांनी नक्कीच कांहीतरी खायला आणले असेल, असे त्यांना वाटले. मोठ्या आशेने ती सारीजण पुढे सरसावली. टोकरने त्यांना म्हटले, "आता तुम्ही सारेजण डोळे बंद करा पाहूं. जे जे पदार्थ खायची इच्छा आहे त्यांची नांवे सांगा, आणि नंतरच डोळे उघडा.''

सगळ्यांनी डोळे मिटले. सोमनाथने खीर नि पुऱ्या मागितल्या. इतरांनीदेखील आपली पसंती सांगितली, आणि नंतर डोळे उघडले. समोर पाहातात तर त्यांना हवी असलेली पक्वान्ने चांदीच्या ताटांत वाढून ठेवलेली होती. सर्वजणांनी ते पदार्थ मनापासून खाल्ले. त्यांचे जेवण झाल्याबरोबर ती चांदीची ताटे गायब झाली.

त्यांनी टोकरला ह्याबद्दल विचारले. त्याने उत्तर दिले, "मी इथें पंधरा दिवस राहाणार आहे. तोपर्यंत तुम्ही कांहीतरी जगण्यासाठी नवा मार्ग शोधून काढायला हवा.''

हे ऐकून सोमनाथ काळजीत पडला. तो टोकरला म्हणाला, "मला तू तुझे मंत्र शिकव आणि नंतर जा.'' टोकरने हंसून उत्तर दिले, "आपल्याला श्वास घ्यायला बाहेरची हवा, प्यायला पाणी, आणि जेवायला अन्न हवे असते. या सर्व गोष्टी आपल्याला निसर्गामार्फत मिळतात आणि सध्यां महामांत्रिक त्या आपल्यापर्यंत पोंचवतात. परंतु या मंत्रांच्या महिम्यामुळे मनुष्याला सुखापेक्षां जास्त पीडा सोसावी लागते आणि असमाधान मात्र सतत राहाते. तू माझं ऐक, कांहीतरी उपजीविकेसाठी नवीन मार्ग शोधून काढ.''



"मंत्रतंत्रामुळे तुला कसले कष्ट होतात आणि तुझ्यांत रे कोणते असमाधान आहे? जरा मला सांगशील कां?'' सोमनाथने विचारले.

टोकरने शांतपणे उत्तर दिले, "आपले दुःख वा पीडा कुणालाही सांगायची नाही, अशी माझ्या गुरुंची मला आज्ञा आहे. मी इथून जाण्यापूर्वी तू कोणते काम करुन पोट भरणार आहेस, ते मात्र मला सांग. त्यानंतर मी जाऊन तुला मंत्रशक्ति देण्यासाठी गुरुंची परवानगी मागेन.''

टोकरच्या बोलण्याने सोमनाथला थोडा दिलासा मिळाला. मंत्रविद्या शिकायची म्हणजे कांही साधीसुधी गोष्ट नव्हे हे त्याला पटले. घरांतल्या इतरांचा ह्याच्यावर विश्वास नव्हता. म्हणून सोमनाथ व सीता दिवसभर हिंडून नवीन कामांची माहिती काढून ती जमवायला लागले.

एके दिवशी सोमनाथने टोकरला विचारले, "तुझ्या गुरुंनीच मला एकदा सांगितलं होतं कीं

पोट भरण्यासाठी म्हणून ते योगी झाले. तू तर मांत्रिक आहेस ना, मग तू त्यांचा शिष्य कसा आहेस?''

''गुरु आनंद महाज्ञानी आहेत. तुझा संदेह दूर व्हावा म्हणून त्यांनी तसे सांगितले. केवळ पोटासाठी ते गुरु झालेले नाहीत. मांत्रिकांना स्वातंत्र्य नसतं. अल्लाउद्दीनच्या दिव्यांत जे भूत बंद झालेलं होतं, ते स्वतंत्र नव्हतं. त्याची किंवा पाताळभैरवीची गोष्ट तू ऐकली असशील ना? गुरुजी ज्ञानी आहेत, म्हणून ते मला गुलाम म्हणत नाहीत, मला शिष्य मानतात. हे असं आहे मांत्रिकाचं खडतर जीवन!'' टोकर म्हणाला.

सोमनाथने हे संभाषण आपल्या पत्नीला सांगितले व तो पुढे म्हणाला, ''मला आपली शंका वाटतेय कीं हा टोकर आपल्याला उगीचच घाबरवतोय. तो जे कांही सांगतोय ते अगदी खरं असलं, तरीसुद्धां मी मंत्रविद्या शिकेन आणि तुम्हाला सान्यांना सुखांत ठेवीन. आता मला एकट्यालाच त्रास होईल पण त्यांत कुठे बिघडलं?''

पण सीताचा विचार निराळा होता. तिने ठामपणे पतीला सांगितलं, ''मंत्रतंत्र विद्या शिकायची म्हणजे त्याची साधना फार कठीण असते. मधेच ही साधना थांबली तर प्राणांतिक संकटे येतात. म्हणून हा अघोरी विचार तुमच्या मनांत असला तर तो काढून टाका.''

शेवटी, टोकर जायचा दिवस उजाडला. त्याने सोमनाथला विचारले, ''मला काळजी वाटतेय कीं मी गेल्यानंतर तुम्ही मंडळी कशी जगाल?''

सोमनाथ व सीताने मिळून उत्तर दिलं, ''गांवकऱ्यांना कोणत्या गोष्टींची जरूरी असते, त्याची माहिती आम्ही गेल्या कांही दिवसांत गोळा केली आहे. त्या वस्तू आम्ही शहरांतून घेऊन येऊं. त्या विकू आणि इथे गांवात होणाऱ्या वस्तू शहरांत नेऊन तिथे विकू. नंतर आमचे जीवन सुरळीत चालेल. मंत्रतंत्राचे मोहजाल जाणून घेण्यांत आम्हाला रस नाही. त्याच्याशी आता आम्हाला कांहीही देणंघेणं नाही.''

त्यांचा हा निर्णय ऐकून टोकर अतिशय खूष झाला. त्यांच्या मनांतला आत्मविश्वास जागृत झाला. स्वतः कष्ट केल्याशिवाय सुखी जीवन जगण्याचा अन्य मार्ग सांपडत नसतो, हा प्रकाश त्यांच्या मनांत पडला आहे, याचे त्याला समाधान वाटले. खूष होऊन टोकरने त्यांचे कौतुक केले व त्यांचा निरोप घेतला. आणि तो आपल्या गुरुंकडे, योगी आनंद यांच्याकडे, जायला निघाला.







# विष्णुपुराण

अहिंसा, शांततामय जीवन, जातिधर्म व वर्ण ह्यांना धरून रहाणाऱ्या समाजाची स्थापना करून बौद्धधर्माची शिकवण देणारा वटवृक्ष प्रस्थापित झाला.

मानव जगतात उद्धार करणारे करुणाकर बनून आलेले सिद्धार्थ- ''गौतमबुद्ध'' किंवा ''बोधिसत्व'' ह्या नांवाने भगवान रूपांत अवतरले. आणि त्यांचे गुण हिमालयाच्या शिखरापर्यंत वाढतच गेले.

वृद्धावस्थेतसुद्धां गौतमबुद्ध सर्वत्र भ्रमण करीत. समाजाच्या कनिष्ठ वर्गातील अभागी लोकांवर श्रेष्ठ जातीतील लोकांनी केलेले अत्याचार, व अपमान सहन करीत राहिलेले दलित, पीडित या सर्व लोकांना आपल्या उपदेशांद्वारा सभ्य व सुसंस्कृत बनवून त्यांना आपले शिष्य करून घेत होते. ह्या कारणामुळे देवदत्तला बुद्धांबरोबर प्रतिकार करण्याकरीता चांगली संधी मिळाली.

त्याने बुद्धाच्या विरोधकांचे संगठन करून त्याच्यावर हल्ला केला. व अनेक यक्त्या योजल्या.

एकदा देवदत्तने टिंगल करीत बुद्धांना करीत म्हटले, ''तुम्ही अहिंसेचा प्रचार केलात, ही तर छान गोष्ट झाली. ह्याच सिद्धान्ताने प्रभावित होऊन बरेच लोक बौद्धभिक्षु बनले.''

''बाळ देवदत्त! मी सांगितले आहे की, बौद्ध धर्माच्या अनुयायांनी अहिंसेचे पालन केले पाहिजे. परंतु गरीबीमुळे कांही वेळा ज्यावेळी जे कांही मिळेल तो मांसाहार खाऊन त्यांना रहावयास लागत आहे. श्रीमंत लोकांना विनाकष्ट मिळणारा शक्तिवर्धक शाकाहार निर्धन लोकांना सहजसुलभ प्राप्त होत नाही. मनुष्यजातीची सेवा करण्याकरिता आपला धर्म मानणाऱ्या बौद्ध धर्मियांना फक्त जीवन जगण्याकरीताच आहाराची आवश्यकता असते. ते लोक भिक्षा मागून



खातात. परंतु मला त्यांना असा हुकूम देण्याचा अधिकार नाही, की जे सधन लोक भिक्षूंना आहार देतात, तो शाकाहारी असावा, व मांसाहारी नसावा. बौद्धधर्म जाती, भेदभाव, उच्चनीच या सर्वांपासून वेगळाच आहे. अशा प्रकारे सर्व ठिकाणी मांस वर्ज्य आहे, असे सांगणारा बौद्धभिक्षू लोकांमध्ये मांसाहारी किंवा शाकाहारी नांवाने, वेगवेगळा प्रकार आहे, हे सांगून भिक्षा मागणे, म्हणजे बौद्धधर्माविरुद्ध आहे. मला असे वाटते, भिक्षा मागायला म्हणून जो जातो त्याला जे कांही भिक्षारूपांत मिळेल तेच त्याने ग्रहण करणे अनिवार्य आहे." बुद्धाने सांगितले.

"तर तुमचे म्हणणे असे आहे की भिक्षूला भिक्षेच्या रूपांत जे कांही मिळेल तेच त्याने खाणे जरूरी आहे ना?" देवदत्तने चिडून विचारले.

बुद्ध हंसत हंसत म्हणाले - "जे लोक ज्या तऱ्हेच्या आहारावर आपले उदरभरण करतात, तेच त्याने भिक्षा रूपाने दिले. तर ते जातीभेद, वर्ण, वगैरे भेदभाव न ठेवणाऱ्या भिक्षूला भिक्षा म्हणून खायलाच पाहिजे ना?"

बुद्धाच्या तोंडून ते वाक्य ऐकून देवदत्त डोके हलवित तेथून निघून गेला.

देवदत्त मनापासून विचार करू लागला - "बुद्धाला मरण यावयास पाहिजे. नाहीतर हीन व कनिष्ट जातीतील लोकांना आपल्या ज्ञानाने आकर्षित करून ते बौद्धधर्माचे शिष्य बनवू लागतील, ते व गरीब, रोगग्रस्त, शोषित वर्ग, हे जर बौद्ध धर्माने मुग्ध झाले तर श्रेष्ठ वर्गातील लोकांचा आदर कोणीच करणार नाहीत. त्यांचे महत्त्वच निघून जाईल. त्यांची सेवा करणाऱ्याचा सुद्धां खातमा केला पाहिजे."

जीवक वेगळ्या जातीतला होता व तो बुद्धांचा शिष्य होता. बौद्धधर्मावर त्याचा गाढ विश्वास होता.

देवदत्ताने जीवकाला प्रलोभने दाखवून आपल्या गटात सामील करून घेतले. व त्याला सांगितले, "बुद्ध जे कांही सांगतात ते सर्व खोटे आहे. तुझ्या जातीतील व वर्णातील लोकांना आपल्या धर्मात ओढून घेण्याकरिता सर्व मानव प्राणी एकच आहेत म्हणून ते सांगतात. पण ते स्वतः तुमच्या लोकां-सारखे आयुष्य घालवू शकतील कां? तुमचे खाणे-पिणे खाऊं शकतील कां?" असे सांगून जीवकचे मत परिवर्तन देवदत्तने केले व जीवकाने बुद्धाला भिक्षा घेण्याकरिता निमंत्रित केले.

जीवकने बुद्धांना आपल्या घरी भिक्षा घेण्या-



करिता येण्याची विनंती केली, तेव्हां जीवका-बरोबर बुद्ध त्यांच्या घरी भिक्षा घेण्याकरिता आले. देवदत्त लपून बसून सर्व पहात होता.

जीवकने बुद्धांना आपल्या घरी बोलावून आणले खरे, पण त्यांना भिक्षा वाढावयास तो संकोच करू लागला. तो ते जाणून बुद्ध त्याला म्हणाले - "बाळा जीवका, तू संकोच करू नकोस. मला खावयाला तुझ्याकरिता जे भोजन तयार केले आहेस, त्यातलेच मला दे. आज मी तुझ्या घरच्या भिक्षेवर अवलंबून आलो आहे."

जीवकने आपल्या थरथरत्या हाताने त्यांना भिक्षा घातली. बुद्धाने संतोषाने ते ग्रहण केले.

परंतु वार्धक्यामुळे बुद्धांची तब्बेत ठीक नव्हती त्यांना ते पचवणे जड जात होते. त्यांची पचनशक्ति क्षीण झाली होती. जीवकने जी भिक्षा घातली, तो मांसाहार होता; तोही चांगला प्रतीचा नव्हता.

त्यानंतर जीवकला आशीर्वाद देत बुद्ध तेथून निघून गेले. जीवकच्या मनामध्ये पाप घडल्याची भीती वाटू लागली. अपराधी भावनेने त्याचा चेहरा कोमेजून गेला. लपून पहात असलेला देवदत्त मनांतल्या मनांत आश्चर्यचकित होऊन आंतल्या आंत पश्चातापाने होरपळू लागला.

बुद्धांना जीवककडे खालेल्या मांसाहाराची संवय नव्हती. त्यामुळे ते आजारी पडले. रोजच्या रोज त्यांचे स्वास्थ्य बिघडू लागले. व त्यांची शेवटची घटका जवळ आली.

बुद्धाच्या शय्येभोवती त्यांचे सर्व प्रमुख शिष्य मान खाली घालून चिन्तेने उभे होते. सर्वत्र



शांतता, स्तब्धता होती. त्याच क्षणी हातून घडलेला अपराध जाणून जीवक व देवदत्त मान खाली घालून लटपटत्या पायांनी चारी बाजूंना आपली घाबरलेली दृष्टी टाकत तेथे येऊन पोहोचले. त्यांच्या चेहऱ्यावर असा भाव प्रकट झाला होता, त्यांना म्हणायचे होते, "प्रभु, आम्ही आपल्या चरणांचा स्पर्श करून क्षमेची याचना करीत आहोत. आम्ही केलेल्या दुष्ट कृत्याचा आम्हाला पश्चाताप होत आहे. त्यामुळे आमच्यावर आपण कृपा करा."

बुद्धानीं त्यांच्या येण्याचे कारण ओळखले. डोळे उघडून प्रेमाने त्या दोघांना आपल्याजवळ बोलावून घेतले. व सांगितले - "तुम्ही दोघे काळजी करू नका, केव्हांना केव्हांतरी मृत्यू हा मनुष्याला येणारच. बस्, तुम्ही माझ्या मार्गाचे अंतिम यात्रेपर्यंत सहकार्य करा. मी तुमचा कृतज्ञ

आहे. मृत्यु हा तर तिसऱ्या डोळ्यांनी दिसणारा एक प्रकाश आहे. ज्योत जेव्हां विझते तेव्हां त्यावेळी त्याचा प्रकाश जिथे पोहोचतो, त्याच मार्गाने मीपण जात आहे.''

बुद्धांच्या सांगण्याने देवदत्तच्या मनांत एकदम परिवर्तन घडले. त्यांनी बुद्धांच्या चरणकमलांना स्पर्श करण्याची अनुमती मागितली. बुद्धांनी त्याला आपल्याजवळ बोलवत त्याचा खांद्यावर हात ठेवत म्हटले - ''बाळ देवदत्ता! जो मनुष्य मानवाच्या कल्याणाच्या हेतूने आपल्या बुद्धीचा उपयोग करून कष्ट करतो, तोच बुद्ध आहे. तो बुद्ध कधीच मरत नाही. मानवांच्या उद्धाराकरिता निर्माण झालेले सर्वच महात्मा बुद्ध आहेत. तू ज्ञानाच्या रूपाने वैर ओढून स्वतःच्या मनामध्ये माझ्याबद्दल द्वेषभाव निर्माण केलास. आता माझ्या अंताबरोबरच द्वेषभावाचा अंत कर, माझ्या निर्वाणानंतर तू असे मान की माझ्या जागी तू आहेस. माझे भाईबंधसुद्धां राज्याचा त्याग करून बौद्ध भिक्षू बनले आहेत व मानव समाजाच्या सेवा करण्याकरीता त्यांनी स्वतःला अर्पित केले आहे. तू सुद्धां माझे अनुसरण करून बौद्धधर्म स्वीकार व त्यांचा प्रसार कर. बौद्ध संघटनेचे संचालन कर. बौद्ध धर्मियांना सरळ मार्गाने जावयास शिकव. ह्या कार्याकरिता तू एक समर्थ व्यक्ति आहेस!'' असे सांगून बुद्धांनी देवदत्तच्या माथ्यावर हात ठेऊन आशिर्वाद दिला.

देवदत्त त्याने पुलकित झाला. त्याच्या डोळ्यांतून अश्रूबिंदू वाहू लागले - ''बुद्धं शरणं गच्छामि, धर्मं शरणं गच्छामि, संघं शरणं गच्छामि! अहो, बुद्ध भगवान! मानवाला देवाच्या रूपांत बदलून टाकणारा मार्ग दाखवून, आपला असा एक उच्च आदर्श प्राप्त होणारा धर्म तुम्ही दाखवून दिलात. देवाच्या संबंधात विचार करण्यालासुद्धां कांही वेगळे असे स्थान नाही. त्यामुळे आपण स्वतःच भगवान् आहात!'' असे म्हणत देवदत्तने गहिंवरत हात जोडून बुद्धांना नमस्कार केला.



तो वैशाख पौर्णिमेचा दिवस होता. पूर्णचंद्र आकाशांत प्रकाशमान झाला होता. पूर्व दिशा प्रज्वलित होऊन बुद्धांच्या निर्वाणाला यश प्राप्त करीत होत्या.

बुद्धांनंतर त्यांच्या द्वारे प्रसारित झालेला धर्म, उपदेशसूत्रें इत्यादि बौद्धधर्माच्या रूपाने प्रचलित झाले. बुद्धांना सर्वजण भगवानाचे रूप व ते एक अवतार पुरुष म्हणून मानू लागले. महर्षि सूतने अशा प्रकारे बुद्धावताराची कथा समाप्त केली. दशावतारापैकी दहावा अवतार कल्की यांच्याविषयी सांगण्यास सुरवात केली.

कृत, त्रेता, द्वापर, व कलियुग हे चार युग एकत्र केले की एक महायुग म्हटले जाते. प्रत्येक महायुगाच्या शेवटी, कलियुगाच्या शेवटी जेव्हां कलीचा प्रभाव वाढत जातो, तेव्हां सारे विश्व संकटात सांपडते.

त्या युगांत अशा शंका उत्पन्न होऊ लागतात की, देव आहे की नाही? आणि दुसऱ्या बाजूला अशी पण शंका वाटते की मानवप्राणी पण आहे किंवा नाही? असा हा काल आहे.



एकीतून अशा विभिन्न माणसाची समाजात उत्पती होऊ लागली आहे की, वर्गभेद, वर्गकलह जात-पात, भेद-भाव, अत्याचार, राक्षस नीती, हिंसा, असे अनेक दुर्गुण वाढू लागले आहेत. व चांगल्या लोकांना जगणे मुष्किल होऊ लागले आहे.

अशा संकटाच्या वेळी विष्णु असा अनुभव करतात की, दुष्टांचा संहार करून दुष्ट लोकांना शिक्षा करण्याशिवाय दुसरा कोणताही उपाय नाही. ह्या विचाराने त्यांनी कल्कीचा अवतार धारण केला. त्यालाच कल्की अवतार म्हणतात.

शंकर आपल्या अंशापासून एका पांढऱ्या घोड्याची परिकल्पना करून कल्कीची पूर्ती देत आहेत. तो महान अश्व कालापेक्षां अधिक तीव्र गतीने, पांढऱ्या शुभ्र घुक्याच्या रूपाने, धूर सोडत, धूमकेतुप्रमाणे आकाशांत भ्रमण करत, इतर ग्रहांच्या पुढे पळत जात आहे.

त्या अश्वावर आरूढ होऊन कल्की आकाशाला स्पर्श करीत लांब शस्त्र हातांत घेऊन दुष्ट लोकांचा संहार करण्याकरीता जात आहे. प्रलयाच्या वेळी भिन्न ढगांमध्ये विजेच्या रूपांत राहिलेली, आकाशातून पृथ्वीवर गळून पडत दुष्टांना संहार करत आहे.

कल्कीचा अवतार हा म्हणणे एक स्वरूप, वीर योध्द्याप्रमाणे चम्‌चम् करणाऱ्या, एक कवच धारण केलेल्या, व चांगल्याकरिता त्याचा उपयोग करणाऱ्या सुंदर पुरुषाच्या रूपांत व दुष्टांच्याकरिता एका महाभयंकर रूपांत, दर्शन देत आहे.

विष्णुच्याद्वारा अवतीर्ण झालेला कल्कीचा अवतार वेगवेगळ्या देशांत, वेगवेगळ्या रूपांत, दर्शन देत, वेगाने घोड्याच्याबरोबर जात आपले कार्य पूर्ण करीत आहे.

कल्कीच्या आक्रमणाने कलीचा प्रभाव अत्यंत कमी होत आहे. तेव्हां आपल्या धारदार शस्त्राने दुष्टांना भिऊन पळविणारे व जगांतील दुष्ट, अत्याचारी, पापी, ह्यांचा संहार करीत, चांगल्या लोकांचे रक्षण होते आहे.

कल्कीच्या अवताराबरोबरच एका नवीन युगाचा प्रारंभ होत आहे. ग्रहांची वेगमर्यादा बरोबर मार्गाने येऊ लागली आहे. भूदेवी (पृथ्वीमाता) कल्कीचा अवतार असलेल्या विष्णुची स्तुती करूं लागते. तेव्हां ब्रह्म व इतर देवता, सप्तऋषि, फुलांची वर्षा करीत त्याची प्रार्थना करत आहेत. नारदमुनी महतीवीणेवर सामगान गात आहे.

कल्की स्वतः पृथ्वीवर राज्यकारभार करून अत्याचार, अधर्म, अन्याय, इत्यादिचा नाश करून मानवसमाजात विभिन्नतेबरोबर एकता व शांतीपूर्ण सहजीवन जगायला शिकवत आहे. जेव्हां कृत युगाचे बीज रोवले जाईल, व आणखी एका महायुगाचा आरंभ होईल, तेव्हां विष्णु आपल्या कल्कीच्या रूपाने परत येऊन सर्व विश्व व्यापेल.

ह्या सांगण्याने एवढेच कळते की, विष्णु सर्वव्यापी परिणाम स्वरूप आहे. वेळ हीच त्यांची स्थिती आहे व अस्तित्व आहे. हे महाविश्व त्यांचे परिपूर्ण स्वरूप आहे. असा प्रकाश पाडून सूत महर्षींनी दशावतारांपैकी प्रमुख बनलेल्या विष्णु-पुराणाचे समग्र रूप संपूर्ण केले. *(समाप्त)*









# खरी होणारी स्वप्नें



अबदुल हा बगदादमधे राहाणारा एक गरीब इसम होता. त्याला कधी फारसे काम मिळाले नाही, म्हणून आपल्या परिवाराचे पालनपोषण करण्याइतके पैसेदेखील तो कधी कमावू शकला नाही. बायकोमुले नेहमी उपाशीपोटी झोपी जात होती. बिचारा अबदुल! तो कर्तबगार नवरा नाही म्हणून त्याची बिबी नेहमी त्याला घालूनपाडून बोलत असे. आणि त्याला ते निमूटपणे ऐकून घ्यावं लागत होतं. काय करणार?

''तुम्ही बावळट, आहात भेकड, आहात; आमची तुम्हाला काळजीच नाही; तुमची जबाबदारी तुम्हाला कळतच नाही, देव तुम्हाला कधीही क्षमा करणार नाही! ''एक ना दोन! अगोदरच अबदुल भुकेला, हवालदील आणि उदास होता, तो आणखीच दुःखी होई.

पोटाची भूक आणि बायकोची बडबड ही कमी होती म्हणून की काय, त्याला दर रात्री आणखी एका संकटाला सामोरे जावे लागत होते, एक विचित्र भयानक स्वप्न! रोज रात्री तेच स्वप्न! त्याला स्वप्नांत दिसायचं की तो एका मोठ्या वाळवंटातून एकटा जातो आहे. जेव्हां त्याला थोडी विश्रांति घ्यावीशी वाटे, तेव्हां कुणीतरी कठोर स्वरांत ओरडून सांगत होता,'' चालत राहा, काहिराच्या दिशेने चालत राहा. तुझे नशीब तिथेच उजळेल.'' तो प्रवास कष्टमय होता आणि आवाज कठोर होता. बिचारा अबदुल झोपेतून दचकून, घाबरुन उठे.

त्याला सतत आश्चर्य वाटत होतं की त्याने खरोखरीच काहिराच्या दिशेने कूच करावं कीं काय? पण याबद्दल जेव्हां तो आपल्या बिबीबरोबर बोलायचा विचार करी, त्यावेळी ती आणखीनच आरडाओरडा सुरुं करीत असे. ''हो, आता तुम्ही काहिराला जाणार आहात कां! आमच्या



कटकटींतून तुम्हाला निसटायची संधी हवीय. तिथे कांही आम्ही तुम्हाला पकडूं शकणार नाही!''

कधीकधी अबदुल उजाडतेवेळीच बगदाद शहराच्या सीमेवरच्या पडक्या विहिरीपाशी बसून राही. बगदादला जाणारा व्यापाऱ्यांचा काफिला त्या विहिरीचे पाणी घेण्यासाठी थांबत असे. अबदुल त्या व्यापाऱ्यांसाठी सटरफटर कामे करुन थोडेफार दिनार मिळवायचा.

एके दिवशी त्या विहिरीपाशी बसून तो आपल्या भयानक स्वप्नाबद्दल विचार करत होता, त्यावेळी एक मोठा लांबलचक काफिला तिथें येऊन पोचला. त्यांच्यासाठी पाणी काढून देण्यांत आणि त्यांच्या उंटांना चारापाणी देण्यांत अबदुल गुंतला. जेव्हां तो विहिरीचे पाणी काढीत होता, तेव्हां दोन माणसे बोलत होती ते त्याने ऐकले.

''फक्त दोन दिवसांतच आपण काहिराला पोंचू.'' एकजण म्हणाला.

''मलाही तसंच वाटतंय.'' दुसऱ्याने म्हटलं. ''मी या लांबच्या प्रवासने अगदी थकून गेलो आहे.''

काहिरा! त्याच्या स्वप्नांतलं शहर! त्याने आपले कान टवकारले. त्याला जाता येईल कां? त्याने त्या दोघांना आपल्याला बरोबर काहिराला न्याल कां? म्हणून विचारले. ते तयार झाले. अब्दुलने आपला चेहरा डोक्यावरच्या पागोट्याच्या शेमल्याने झांकला, म्हणजे त्याची बायको जरी रस्त्यांत भेटली तरी तिने त्याला ओळखला नसता.

वाळवंटाच्या तापलेल्या वाळूच्या रस्त्यावरुन बगदादहून काहिराला हा काफिला निघाला. वेडीवांकडी दमवणारी वाट होती. काहिराच्या वेशीवर पोंचल्यावर काफिला इकडे तिकडे पांगला. प्रत्येक व्यापारी आपापल्या रस्त्याला लागला. अब्दुल उभा राहून आपल्या मित्रांना त्या गर्दीत मिसळून जाताना फक्त पाहात राहिला. तो तर थकलेला, भुकेला आणि निर्धन होता. एका खजुराच्या झाडाखाली तो बसला आणि लगेच त्याचा डोळा लागला.

संध्याकाळ होत, आली आणि कुणीतरी त्याला हालवून जागे केले. कांही जाडजूड हात त्याच्या पायाला घसटत होते. ''एक नवीन भिकारी आलाय. कुठून रे आलास तू?'' एकाने विचारलं. आपण भिकारी नाही, हे सांगायचा अब्दुलने प्रयत्न केला. पण कुणीही त्याचे त्याचे म्हणणे ऐकले नाही. त्याने केलेली गयावया व विरोध याला न जुमानता त्यांनी त्याला ओढून नेले आणि तुरुंगात डांबले.



त्या रात्रीं खूप वर्षांनंतर प्रथमच अब्दुलला ते भितीदायक स्वप्न पडले नाही. दुसऱ्या दिवशी त्याला न्यायाधीशासमोर उभे केले गेले.

''आणकी एक भिकारी? नवीन दिसतोस?'' न्यायाधीशाने आवाज चढवून त्याला विचारले, ''काहिरामधे भीक मागणं हा गुन्हा आहे, हे तुला ठाऊक नाही कां?''

''मी भिकारी नाही हो'', अब्दुल गदगदल्या आवाजांत म्हणाला, ''बगदादहून मी इथे इतक्या दूरवर माझे भाग्य शोधत आलो आहे.''

''इथे बरेच लोक आपले नशीब आजमावयाला येतात. पण ते निराश होऊन आपले प्रयत्न सोडतात व परत जातात. तुला बगदादमधेही भाग्य शोधता आलं असतं! तू काहिराला कां आलास?'' जरा नरमाईच्या सुरांत न्यायाधीशाने विचारले.

जरी अब्दुल वैतागलेला, थकलाभागला, भुकेला व निराश होता, तरी त्याने आपल्या मनांतली खरीखुरी गोष्ट न्यायाधीशाला मनमोकळेपणाने सांगितली. आपल्याला रोज पडणारे विचित्र स्वप्नही त्याने सांगितले.

त्याचे बोलणे ऐकून न्यायाधीश खदाखदा हंसत सुटला. नंतर त्याने ठणकावून सांगितले. ''तू अगदीच भोळा आहेस रे! बगदादहून काहिरा-पर्यंतचा प्रवास किती खडतर आहे! तुझा जीव संकटात सांपडला असता. तू ते स्वप्नबिप्न सगळं विसर, आणि परत बगदादला जा. कांहीतरी काम करुन रोजीरोटी कमव.''

न्यायाधीशाने आपली रेशमी पिशवी उघडून त्यांतून कांही दिनार काढले आणि अब्दुलकडे आपला हात पुढे करीत म्हटले, ''अरे दोस्ता, स्वप्नांवर विश्वास ठेवण्याची चूक पुन्हां कधीही करुं नकोस. तुला माहिती आहे? मलादेखील अगदी रोज एकच स्वप्न पडते! पण मी कांही मूर्ख नाही. मी जर त्या स्वप्नावर विश्वास ठेवला तर ही छानशी नोकरी सोडून बगदादला गेलो असतो!''

अबदुलने न्यायाधीशाकडे निरखून पाहिले. काय? हा माणूसदेखील खजिन्याची स्वप्नें पाहातोय कां? ''हुजूर, स्वप्नांमधे आपल्याला काय दिसतं?'' त्याने उत्सुकतेने प्रश्न केला.

''तुला ऐकूं येत होता तसाच एक विचित्र आवाज रोज मला सांगतो, ''बगदादच्या पूर्व सीमेवर जुन्या महालाचे अवशेष पसरलेले आहेत. तिथल्या जुन्या विहिरीपाशी तुला एक मोठा दगड दिसेल. तो काढून टाक आणि तिथें खूप खोल खण. तिथें तुला खजिना सांपडेल.'' अब्दुलच्या तोंडातून



अस्फुट चित्कार बाहेर पडला. त्याने न्यायाधीशाचे आभार मानले आणि मोठ्या उत्साहाने त्याने बगदादची वाट धरली.

यावेळी त्याच्या सोबतीला त्या व्यापाऱ्यांचा तांडा नव्हता. पण त्याला त्याची चिंता नव्हती. तळपत्या सूर्याचे प्रखर उन आणि रात्री कडाक्याची थंडी. पण त्यामुळे त्याची हिंमत व चिकाटी कमी झाली नाही.

शेवटी तो बगदादला परत गेला. आणि त्या महानगरच्या पूर्व भागांत आला. न्यायाधीशाने सांगितल्याप्रमाणे एका जुन्या वाड्याचे अवशेष दिसत होते. तो त्या वाड्यांत शिरला आणि त्याला आत एक पडकी विहीर दिसली. जरा आसपास शोधाशोध केल्यानंतर त्याला एक मोठा दगड देखील दिसला.

त्याने तो हालवून जरा बाजूला सरकवला आणि जवळच पडलेली एक जुनी काठी घेऊन त्या दगडाखाली त्याने उकरायला सुरवात केली.

थोड्याच वेळांत त्याची काठी कांहीतरी कठीण वस्तूवर आपटल्याचा आवाज आला. त्याने मोठ्या मुष्किलीने ती वस्तू बाहेर काढली. ती एक चामड्याची मोठी पिशवी होती. अब्दुलने थरथरत्या हातांनी ती पिशवी उघडली आणि उत्सुकतेने पाहिलं तर काय? त्यांत हिरे, माणके, सोने, जवाहीर हे खचाखच भरलेले होते. तो त्याचा खजिना होता.

अबदुलने ती पिशवी खाकेंत घट्ट पकडली आणि तो घराकडे वळला. त्याच्या बिवीने दार उघडले आणि अबदुलकडे ती निरखून पाहात राहिली. तिचे शरीर ताठरले आणि संतापाने तिने ओठ आवळले.

"काय? परत घरी आलात वाटतं? कुठे पळून गेला होतात? काहिरांत खजिना मिळालाच असेल!" तिने कुजकटपणे म्हटले.

"हो ना!" अब्दुलने उत्तर दिले. त्याचे डोळे चमकत होते. बिवीच्या शब्दांचा तिखटपणा आत्ता त्याला जाणवला नाही. त्याने पिशवी उघडली. ते दागदागिने, जवाहीर, व रत्ने बघून ती बायको थक्क झाली.

तिच्या तोंडून शब्द फुटेना. तिची वाचा त्यावेळी जी बंद झाली ती कायमचीच तेव्हांपासून अब्दुलला मात्र शांति आणि समृद्धि लाभली आणि तो सुखी झाला.





# राजाचा मेव्हणा

एके काळी राजा महासेन साऱ्या भारताचा चक्रवर्ती राजा होता. महासेनाने ज्या राजांना पराभूत केले, ते सारे त्याचे मांडलिक बनले, त्याच्या आज्ञांचे पालन करुन त्याला नियमितपणे खंडणी देऊं लागले.

साम्राज्याची स्थापना करण्याच्या विचाराने महासेनाने अनेक युद्धें केली. पण त्याने कधीही प्रजेवर जुलूम केला नाही. उलट तो सदैव जनतेचे हितच पाहात असे. त्यासाठी त्याने अनेक योजना सुरुं केल्या. म्हणून महासेनाच्या साम्राज्यांत सारी राज्यें सुसंपन्न राहिली. फक्त कोसल देशाची स्थिती याहून जरा वेगळी होती.

आपल्या साऱ्या योजना सर्व राज्यांमधे सफल होतात, आणि कोसल राज्यांत मात्र त्या अयशस्वी कां होतात, ते महासेनाला समजेना. त्याबाबतीत त्याने बरीच माहिती गोळा केली, चौकशी केली, पण त्या राज्याच्या अपयशाचे कारण मात्र कळले नाही.

महासेनाकडे एक राजपुरोहित होता. त्याचा एक नातलग गुणनिधी हा अतिशय भोळा होता. गुणनिधीची बातचीत ऐकून सर्वांना हंसायला येई. महासेनदेखील सवड मिळाली की गुणानिधीला बोलावून घेई आणि त्याचे विनोदी किस्से ऐकून आपली करमणूक करुन घेत असे.

गुणनिधी फार भाविक व श्रद्धाळू होता. सगळ्या देवतांचे दर्शन घेऊन पुण्यसंचय करावा अशी त्याची इच्छा होती. गुणनिधीने ऐकलं होतं कीं कोसल राज्यांत प्रत्येक गांवात एक देवता असते, प्रत्येक गांवात मंदिर असतं, अगदी तिथल्या दुर्गम जंगलातदेखील प्राचीन मंदिरे आहेत. म्हणून त्या देशाची तीर्थयात्रा करण्याच्या विचाराने तो निघाला.

त्याचे तीर्थाटन सुलभ, आरामशीर व्हावे यासाठी राजपुरोहिताने त्याच्यासाठी आवश्यक त्या सर्व गोष्टीसह एक रथ व सारथी त्याला द्यायची व्यवस्था केली. कोसलदेशाच्या सीमेवर

२५ वर्षांपूर्वी चांदोबात प्रसिद्ध झालेली गोष्ट



पोंचल्यावर गुणनिधी रामपुरी गांवात शिरला. तिथे नटराजाच्या रुपांत शिवाचे अधिष्ठान होते.

लोकांनी नटराजाचे सुंदर मंदिर बांधले होते. ते पाहून गुणनिधि मोहरुन गेला. मंदिरातल्या ईश्वराची मूर्ती बघून तो मुग्ध झाला व आनंदाने ओरडला ''हर हर महादेव!''

दुसऱ्याच क्षणी दोन शिपाई तिथे आले आणि त्यांनी गुणनिधीला घट्ट पकडून ठेवले.

विस्मयाने गुणनिधीने विचारले, ''हे काय आहे? मी कांही अपराध केलेला नाही ना? तुम्ही मला कां त्रास देता आहात?''

''मंदिराच्या गाभाऱ्यांत ओरडणे हा अपराधच आहे! चल आता गांवाच्या पाटलाकडे. तिथेच याचा निवाडा होईल.'' शिपायांनी सांगितलं.

गुणनिधीने ही गोष्ट आपल्याला ठाऊक नव्हती हे अगदी निक्षून सांगितलं. तो त्या गांवात नवखा होता. हा त्याचा पहिलाच गुन्हा होता म्हणून त्याला सोडून द्यावं अशी त्याने विनंती केली. पण ते शिपाई ऐकेनात. उलट ते पाटीलाकडे जायचा आग्रह धरायला लागले. लाचार होऊन गुणनिधी त्यांच्याबरोबर जायला तयार झाला.

मंदिरांत बसलेला एक युवक हे सर्व बघत होता. तो हळूंच गुणनिधीजवळ आला आणि त्याच्या कानांत कुजबुजला, ''कशाला ह्यांच्याशी भांडतो आहेस? निमूटपणे दोघांना एकेक रुपया देऊन टाक. ते तुला सोडून देतील.''

गुणनिधीने दोघांना दोन रुपये दिले. शिपायांनी त्याला सोडून दिले व ते दोघे निघून गेले. त्या तरुणाचे आभार मानीत गुणनिधीने त्याला विचारले, ''गाभाऱ्यांत देवाचे नांव घेणे, हा अपराध कसा काय ठरतो?''

तो तरुण हंसून म्हणाला, ''या देशांत काय बरोबर नि काय चूक, याचे कांही नियम नाहीत. कुठली गोष्ट केव्हां चुकीची ठरेल हे आम्हा गांवकऱ्यांनाही माहीत नसते. आम्हाला फक्त इतकंच ठाऊक आहे की जेव्हां शिपाई आमच्यावर दोषारोप करतात, तेव्हां त्यांना लांच देऊन आपण आपली सुटका करुन घ्यायची. जर पाटलांकडे जावं लागलं तर त्यापेक्षांही जास्त मोठी रक्कम द्यावी लागते. कारण तिथे न्यायाचा विचार कधी होत नाही!''

चकित होऊन गुणनिधीने विचारले, ''पाटील



सुद्धां लांच घेतात? मग तुम्ही राजाकडे या लोकांची तक्रार करुं शकता ना?''

''तक्रार काय करणार? ते पडले राजाचे मेव्हणे ना?'' तरुणाने उत्तर दिले.

गुणनिधीने त्या तरुणाला सांगितले कीं तो ही राजपुरोहिताचा नातलग होता. त्यावर तो तरुण म्हणाला, ''जर तुम्ही ही गोष्ट पाटलांना सांगितलीत, तर याच्यापुढे तुम्हाला कांही त्रास होणार नाही.''

गुणनिधीने तसंच केलं आणि मग त्या गांवात त्याला कांहीच त्रास झाला नाही. इतर गांवांत गेल्यावरही त्याने तेच केलं आणि त्याची तीर्थयात्रा निर्विघ्नपणे पार पडली. पण प्रत्येक गावांत रामपुरीतल्याप्रमाणे शिपाई लहानसहान गोष्टींसाठी नागरिकांना त्रास देत होते, लांच घेत होते. त्यांतला कांही हिस्सा वरिष्ठ अधिकाऱ्यांना पोंचवत होते - या साऱ्या गोष्टी त्याने प्रत्यक्ष पाहिल्या. पण कुणीही अधिकाऱ्यांविरुद्ध राजाकडे तक्रार करायला धजावत नव्हते. कारण सगळे गांवपाटील राजाचे मेव्हणे होते!

प्रवासांत प्रत्येक गांवात गुणनिधी हेच ऐकत आला, ''आमचे पाटील आहेत राजाचे मेव्हणे, तेव्हां आम्ही तरी काय करणार?''

चक्रवर्ती महासेनला गुणनिधी यात्रा पूर्ण करून परत आला असल्याचे समजले. राजाने त्याला बोलावून घेतले व यात्रेसंबंधी माहिती विचारली. गुणनिधीने एक एक करीत सारे किस्से निवेदन केले व शेवटी तो म्हणाला, ''रसिक-



तेच्याबाबतीत कृष्णानंतर या कोसल नरेशाचं नांव घ्यावं लागेल बहुतेक! त्याला किती मेव्हणे असावेत त्याचा कांही अंदाजच बांधता येत नाही!''

आपले हंसू आवरीत महासेनने विचारले, ''तू ते मोजले कां नाहीस रे?''

''महाराज, मी कसे मोजूं? प्रत्येक गांवाचा पाटील राजाचा मेव्हणा आहे म्हणे! राज्याबद्दल काम पाहणारे सारे लोक राजाचे मेव्हणे म्हणवतात!'' गुणनिधीने उत्तर दिले.

यावेळी मात्र महाराजांना हंसू आले नाही. त्यांनी गुणनिधीला अनेक प्रकारे प्रश्न विचारुन तो जे सांगतो आहे, ते कितपत सत्य आहे त्याची शहानिशा केली. कोसलच्या जनतेनेच त्या गोष्टी सांगितलेल्या होत्या. त्यांत कांहीतरी गुप्त रहस्य

दडलेले असावे. महासेनाच्या माहितीनुसार कोसलराजाच्या दोन राण्या होत्या. त्यापैकी एकजण तर महासेनाची सख्खी बहीण होती. तेव्हां कोसल राज्याचा कारभार दुसऱ्या राणीचे भाईबंद बघत असले, तरी तिला हजार भाऊ असणे अशक्य होते.

गुणनिधीला महासेनाने निरोप दिला आणि राजा विचारांत पडला. राज्यकारभाराच्या ज्या योजना त्याने केलेल्या होत्या, त्या उत्तम होत्या. पण त्यांची अंमलबजावणी करणाऱ्या अधिकाऱ्यांच्याबाबतीत त्याने कधी विचार केलेला नव्हता. ते अधिकारी अयोग्य असले पाहिजेत म्हणूनच त्याच्या योजना कोसलमधे असफल झाल्या. महासेनाने दोन गुप्तचर कोसल राज्यांत लगेच धाडले. त्यांनी राज्यांत सर्वत्र हिंडून बरीच माहिती गोळा केली.

गुणनिधीने सांगितलं होतं, कीं कोसल देशांत मुद्दामच जनतेला त्रास दिला जातो. अधिकारी आपल्या सत्तेचा दुरुपयोग करतात. त्याचे प्रमुख कारण म्हणजे अधिकारी नेमताना त्यांची गुणवत्ता व पात्रता ध्यानांत घेतलेली नव्हती. उदाहरणार्थ, कोसलचा सेनापती शूर सिंहाला धड तलवार चालवता येत नव्हती. त्याचा सारा पराक्रम नांवापुरताच होता. तो राजाचा मेव्हणा होता. त्याचमुळे योग्यता नसताना वशिल्याने किंवा अन्य कारणाने अधिकारीपद मिळवणारे सगळेच-जण 'राजाचा मेव्हणा' या नांवाने ओळखले जाऊं लागले. आता महासेनाच्या लक्षांत खरी गोष्ट आली. कोसलराजा हा त्याचा मेव्हणा होता. म्हणून तिथे योजना असफल ठरत होत्या. तरीही मेव्हण्याच्या सांगण्यावर ठेवलेला अंधविश्वास जनतेचे अनहित किती मोठ्या प्रमाणांत करुं शकतो, हे त्याला स्पष्टपणे कळून चुकले.

त्यानंतर मात्र महासेनाने योग्य कारवाई करुन अयोग्य अधिकाऱ्यांना महत्वाच्या पदांवरुन हटवले. कांही वर्षांतच कोसलदेश पुन्हां संपन्न व समृद्ध झाला. राजाने जेव्हां त्या देशांत दौरा केला, तेव्हां लोकांनी त्याला सांगितले, "आमचा पाटील आता राजाचा मेव्हणा नाही, म्हणून आम्ही आता सुखी आहोत!"







# आर्य

## अज्ञात राजकुमाराचे रहस्य

वीरसिंहाबरोबरच्या द्वंद्वयुद्धांत वसंत त्याची तलवार खाली पाडतो आणि त्याला मारण्याची इच्छा करतो, तेवढ्यांत जयानंद हस्तक्षेप करतात. ते त्याची कुकर्मे त्याच्यासमोर ठेवतात. वांचण्याच्या प्रयत्नांत वीरसिंह मागेमागे सरतो आणि एका खोल दरींत पडतो.



चित्र : गांधी अय्या







तुमचे विज्ञान

## सर्वात मोठे मानवी इंद्रिय



मनुष्याच्या शरीरांत यकृत हे सर्वांत मोठे इंद्रिय आहे. अनेकदा त्याचा उल्लेख 'शरीरांतली रासायनी' असा केला जातो. पोटाजवळच्या पोकळीतल्या उजव्या भागांत, छाती व पोट यांच्यामधल्या पडद्याखाली, यकृत असते. खालच्या बरगड्या याचे संरक्षण करतात.

यकृत (लिव्हर) आपल्याला स्पर्शाने कळत नाही व दिसतही नाही. पण जर आजारामुळे त्याला सूज आली तर मात्र पोट आंत घेतले कीं बरगड्यांच्या-मागे यकृत हाताला जाणवते.

यकृताची दोन प्रमुख कामे म्हणजे नवीन रसाय-नांचा संयोग करणे आणि विषारी घातक रसायने निष्प्रभ करणे. यकृत निरनिराळी ५०० कामे करते, असा शास्त्रज्ञांचा शोध आहे. त्यापैकी चरबीचे विघटन करणे आणि ग्लुकोझचे ग्लायकोजेनमधे रुपांतर करणे ही आहेत. यकृतांत कोलेस्टेरॉल निर्माण होते.

तुमचा परिसर

## बियांचे मणी

फार प्राचीन काळांपासून मानवाला मण्यांचे आकर्षण आहे. मण्यांपासून दागिने, शोभेच्या वस्तू, मण्यांची सजावट व सौंदर्यदृष्टीला भावणाऱ्या अनेक ठिकाणी मणी वापरले जातात. साधारणपणे, दगड, कांच किंवा प्लॅस्टिकपासून मणी बनवतात. पण झाडाच्या बियांपासून केलेले मणी तुम्ही पाहिले आहेत कां? त्या झाडाचे नांव आहे जॉब्ज टिअर्स - जॉबचे अश्रू. बायबलमधल्या जॉबने खूप अश्रू गाळले असं मानतात. पण कॅथलिक धर्मांतल्या जपमाळेला मात्र मेरीचे अश्रू म्हणतात.

दोन्ही बाजूंना भोके असणाऱ्या या बिया तुकतुकीत असतात. अश्रूंसारखा त्यांचा लांबट आकार असतो. थोडक्यांत, या बिया मण्यांसारख्याच दिसतात.

हे झाड रस्त्याच्या कडेला उगवते व रानटी असावेसे वाटते. पण बियांचा रंग मात्र पांढरा असतो.



माहीत आहे कां?

## प्रभावी पुदिना



झोपेतून उठवले जाण्याचे अनेक प्रकार तुम्हाला माहीत आहेत. पहिला आणि सर्वांत प्रसन्न म्हणजे पक्षी जेव्हां खिडकीबाहेर चिवचिवत तुम्हाला पहाटेच्या साखरझोपेतून हळुवारपणे जागे करतात तो!

दुसरा तापदायक प्रकार म्हणजे कानाजवळ चुकार डांस गुंऽऽऽ गुंऽऽऽ करायला लागतात, आणि ते चावले कीं जोरांत खाज सुटते तो! बाजारांत डांसप्रतिबंधक अशी बरीच मलमे मिळतात.

आय्.आय्.टी. दिल्लीच्या संशोधक शास्त्र-ज्ञांनी मात्र याच्यावर एक अनोखा उपाय शोधून काढला आहे.

पुदिन्याच्या झाडापासून काढलेले तेल हे डांसांना पळवून लावते.

हा नवाच शोध त्यांनी लावला आहे. ते तेल अनोफिलीस डांसावर गुणकारी आहे. म्हणून हिंवतापावर हा प्रभावी उपाय ठरुं शकेल.

भारताची ओळख

## डिसेंबर हा संगीत महिना पाहूं या.



१. दक्षिण भारतीय संगीताला कर्नाटक संगीत हे नांव कुणी व केव्हां दिले?



२. अकबराच्या राजवटींतला दरबारी गायक कोण होता? त्याने कोणती शैली लोकप्रिय केली?

३. कर्नाटक संगीतातली त्रिमूर्ती कोण?



४. मुसलमानी राज्यकर्त्यांनी गझल गायकी लोकप्रिय केली. तिचा उगम कुठे झाला? एका श्रेष्ठ गझल-गायिकेचे नांव सांगा.



५. शिवाची स्तुती करणारी तमिळ उपशास्त्रीय भक्तीगीते कोणती आहेत?

(उत्तरे पान ६६ वर)

